# अग्निपुराण

प्र. न. जोशी

प्रसाद प्रकाशन



# प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद आपली पुराणे' या योजनेंतील तिसरा संच म्हणजेच सामवेद, भविष्यपुराण, अग्निपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण व लिंगपुराण आज एकदमच प्रकाशित होत आहेत. सामवेद मूळचाच लहान असल्यानें हा ग्रंथ कमी पृष्ठसंख्येचा झाला आहे. मात्र पुढील संचातील अथर्ववेद खूपच मोठा असल्यानें त्याची पृष्ठसंख्या वाढेल. या संचातील दोन पुराणेही मोठी असल्याने नियोजित पृष्ठसंख्येपेक्षा त्यांची पृष्ठसंख्याही वाढलेलीच आहे.

योजनेंचे काम आम्ही मनाशी ठरविलेल्या वेळापत्रकाप्रमाणे चाललेले आहे, याचा मला विशेष आनंद होतो. ऑगस्ट १९८० मध्ये योजना जाहीर केली. जुलै १९८१ मध्ये पहिला संच नाशिक येथे प्रकाशित झाला. दुसरा संच मे १९८२ मध्ये मुंबई येथे प्रकाशित झाला. आता तिसरा संच आज फेब्रुवारी १९८३ मध्ये नागपूर येथे प्रकाशित होत आहे. पुढील दोन संचही असेच ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे प्रकाशित होतील व मराठीतील अशा प्रकारची पहिलीच योजना यशस्वीपणे पूर्ण होईल असा मला विश्वास आहे.

पहिले दोन संच प्रकाशित झाल्यावर ते वाचून आवडल्याचे अनेकांनी आपणहून कळविले. काही जाणत्या वाचकांनी उपयुक्त सूचनाही केल्या. त्यांतील ज्या स्वीकारणे शक्य होते, त्यांचा स्वीकारही आम्ही केला आहे. योजना जाहीर करताना हे काम एकूण कशा प्रकारचे होईल, याची यथार्थ कल्पना आम्ही दिली होती व तिला अनुसरूनच हे ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत.

या अक्षरपूजेत अनेकांनी सहकार्याचा हात आपणहून पुढे केला, म्हणूनच हे एवढे प्रचंड काम सहजपणे उभे राहू शकले. त्या सर्वांचा नामोल्लेख करणे कठीणच आहे. सेंट्रल पेपर मिलचे श्री. बाबुरावजी पारखे, स्मिता प्रिंटर्सचे श्री. प्रमोद बापट, चित्रकार कौस्तुभ ॲडव्हर्टा-यजिंगचे श्री. सहस्रबुद्धे, सौष्ठव पुस्तकबांधणीचे श्री. कातुरेबंधू; या सर्वांचा यात प्रमुख सहभाग आहे.

मनोहर य. जोशी

# लेखकाचे निवेदन

'आपले वेद आपली पुराणे' या ग्रंथमालेतील चार पुराणांचा हा तिसरा संच वाचकांच्या हाती देताना मनाला विशेष आनंद होत आहे. १९८२ च्या मे महिन्यात मुंबई येथे दुसऱ्या संचाचे प्रकाशन अतिशय डौलाने व उत्साहाने झाले. वाचकांच्या प्रतिक्रियाही अतिशय सौजन्याच्या व गुणग्राहकतेच्या दिसून आल्या. आता या तिसऱ्या संचातील अग्नि-पुराण, भविष्यपुराण, लिंगपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण; हे महत्त्वाचे पुराण-ग्रंथ वाचकांच्या पसंतीस उतरतील अशी खात्री वाटते.

आपल्या प्राचीन परंपरेत पुराणांचा धागा वेदकालापासून मिळतो. अठरा महापुराणे, अठरा उपपुराणे यांचा प्रचंड विस्तार, त्यांत वेळो-वेळी पडलेली भर, त्यांतील पाल्हाळ व पुनरुक्ती आणि मुख्यतः संस्कृत भाषा; यांमुळे पुराणांतील सांस्कृतिक धन आजपर्यंत सर्वसामान्य लोकांच्या कक्षेत आले नव्हते. मूळ संस्कृत पुराणेही सहजासहजी उपलब्ध होत नाहीत. त्यांच्या अवाढव्य विस्तारामुळे ती वाचणेही अशक्य बनते. म्हणून त्यांचे रूपांतर आजच्या भाषेत करण्याची ही योजना सर्वांनाच पसंत पडली. या ग्रंथमालेतील पुराणे ही मूळ संस्कृता-तील पुराणांची अक्षरशः भाषांतरे नाहीत. निवडक विषयांची पुन्हा रचना करून, पुनरुक्ती टाळून, मूळ कथानकास वा निरूपणास धक्का लागणार नाही, अशा हेतूनें या ग्रंथांची मांडणी केलेली आहे. माझे स्वतःचे असे या पुराणग्रंथांत काहीही नाही, हे कबूल करणे अगत्याचे आहे. संस्कृत विद्येचे संशोधक, प्राचीन संस्कृतीचे अभ्यासक यांच्यासाठी हा उपक्रम नाही हे स्पष्टच आहे.

संतबोध, संतचरित्रे, संतकार्य यांच्या चिंतनात व मननात निम्मे आयुष्य गेल्यावर मी संतवाङ्मयातील अनेक संदर्भ उपनिषदांत व पुराणांत शोधू लागलो. 'अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें' असे

पुराणांविषयी श्रीज्ञानेश्वर का म्हणतात, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. घरी बहुतेक सर्व पुराणे होतीच. त्यांच्या अभ्यासात गेली आठ-दहा वर्षे गेली. या अभ्यासातून ही पुराणग्रंथमाला आकारास आली. ‘ प्रसाद ’ प्रकाशनचे श्री. म. य. जोशी यांची कुशलतापूर्वक दृष्टी भक्कम पाया म्हणून या योजनेस लाभली. पुराणांचे हे नवदर्शन वाचकांना पसंत पडले आहे असे वाटते. पुराणांतील चमत्कार, विकृत संकल्पना, अघटित प्रसंग, पाल्हाळ आणि मुख्यत: आजच्या या नव्या काळात पुराणांच्या दर्शनाचा उपयोग; यांसंबंधी एक समालोचनात्मक ग्रंथ याच मालेत वाचकांच्या हाती शेवटी देण्याचा आमचा संकल्प आहे, हे कळविण्यास विशेष आनंद होतो.

‘ अग्निपुराणा ’सारख्या काही पुराणांतून जारण, मारण, वशीकरण, उच्चाटण; इत्यादींचे अभिचारमंत्र केवळ माहितीसाठी व प्राचीन काळातील सांस्कृतिक जीवनाचा परिचय व्हावा म्हणून दिले आहेत. त्यांचा प्रत्यक्ष उपयोग करू नये. करावयाचा झाला तर तज्ज्ञांना विचारून, मूळ पुराण पाहून करावा अशी विनंती आहे. ‘ वषट् ’, ‘ वौषट् ’ हे आहुती देताना म्हणावयाचे शब्द आहेत. ‘ फट् ’ हा शब्द मंत्रातील असून त्याचा विघ्न निवारण्यासाठी उच्चार करतात. हेही ध्यानात ठेवावे.

या पुराणाच्या लेखनाच्या वेळी ‘ अग्निपुराण ’ (दोन खंड) संस्कृति-संस्थान, बरेली आणि गोरखपूरच्या गीता प्रेसचे ‘ अग्निपुराण ’ या ग्रंथांचा उपयोग झाला आहे, याचा निर्देश कृतज्ञतापूर्वक करणे अवश्याचे आहे.

—प्र. न. जोशी
फेब्रुवारी, १९८३

‘ रेणुका ’ लक्ष्मी पार्क, नवी पेठ
पुणे ३०.

# अग्निपुराण-परिचय

**जगास व्यापणारे भगवान विष्णू**

यत्तद्ब्रह्म यतः सर्वं यत्सर्वं तस्य संस्थितम् ।।
अग्राह्यकमनिर्देश्यं सुप्रतिष्ठं च यत्परम् ।
परापरस्वरूपेण विष्णुः सर्वहृदिस्थितः ।।
यज्ञेशं यज्ञपुरुषं केचिदिच्छन्ति तत्परम् ।
केचिद्विष्णुं हरं केचित्केचेद्ब्रह्माणमीश्वरम् ।।
इन्द्रादिनामभिः केचित्सूर्यं सामं च कालकम्
ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तं जगद्विष्णुं वदन्ति च ।।
स विष्णुः परमं ब्रह्म यतो नावर्तते पुनः ।
सुवर्णादिमहादानपुण्यतीर्थावगाहनैः ।।
ध्यानैर्व्रतैः पूजया च धर्मश्रुत्या तदाप्नुयात्

(३८२-१६-२०½)

हे जे सर्वत्र व्यापक ब्रह्म आहे, ज्याच्यापासून सर्वांची उत्पत्ती झाली आहे, जे सर्व-स्वरूप आहे, आणि हे सर्व काही ज्यांचा आकारविशेष आहे, ते इंद्रियांना ग्राह्य नाही. ज्याचा कोठल्याही नामादीद्वारे निर्देश केला जात नाही, ते सुप्रतिष्ठित व सर्वांहून पलीकडचे आहे, त्या परापर ब्रह्माच्या रूपात साक्षात भगवान विष्णूच सर्वांच्या हृदयांत विराजमान आहेत. तेच यज्ञाचे स्वामी व यज्ञस्वरूप आहेत. त्यांना कोणी पर-ब्रह्मरूपाने प्राप्त करू इच्छितात, कोणी विष्णुरूपाने, कोणी शिवरूपानें, कोणी ब्रह्मरूपाने, ईश्वररूपाने, कोणी इंद्रादी नामांनी, तर कोणी सूर्य, चंद्रमा व कालरूप यांनी प्राप्त करू इच्छितात. मनीषी लोक ब्रह्मा-पासून तृणापर्यंत सर्व जगतास विष्णुरूप मानतात. असे भगवान विष्णू

परब्रह्म परमात्मा आहेत. त्यांच्याकडे एकदा पोचल्यावर पुन: या जगतात यावे लागत नाही. सुवर्णदानादी मोठमोठी दानें, पुण्यतीर्थांत स्नानें, ध्यानधारणा, व्रते, पूजा, धर्माच्या वार्ता ऐकणे, यांनीच त्यांची प्राप्ती होते.

## अग्निदेवांनी सांगितलेले पुराण

अठरा महापुराणांपैकी अग्निपुराण हे एक महत्त्वाचे पुराण मानले गेले आहे. हे पुराण अग्निमाहात्म्य सांगणारे नसून ते अग्निदेवांच्या मुखातून प्रकट झाले आहे म्हणून त्याला अग्निपुराण म्हणतात. 'अग्नि-नोक्त पुराणं यदाग्नेयं वेदसम्मितम्' अग्निपुराण अग्नीनें सांगितले असून ते वेदतुल्य आहे. असे असले तरी मधून मधून याचे वक्ते ईश्वर, पुष्कर इत्यादी आहेत. आनंदाश्रमानें प्रसिद्ध केलेल्या अग्निपुराणात ३८३ अध्याय असून श्लोकसंख्या ११, ४५७ आहे. याचा काही भाग लुप्त झाला असून पुराणाची श्लोकसंख्या पंधरा हजारांपर्यंत असावी, असा अभ्यासकांचा तर्क आहे. विष्णुस्वरूप भगवान अग्निदेव यांनी वसिष्ठ नावाच्या एका ऋषीला ब्रह्मतत्त्वाचा उपदेश करण्यासाठी हे पुराण तयार झाले असले तरी सृष्टिउत्पत्ती, सृष्टिविलय, वंशपरंपरा, मन्वन्तर-वर्णन, व्यक्तिचरित्रवर्णन; अशा सर्गबद्ध मांडणीनें हे पुराण बनलेले नाही. हे विषय यात आहेत, नाहीत असे नाही, पण त्यांना गौण महत्त्व आहे.

## काही गौण गोष्टी

मग या पुराणात महत्त्व कशास आहे ? परा व अपरा विद्यांचे अतिशय सविस्तर वर्णन या पुराणात आले आहे. याची ओळख करून घेण्यापूर्वी काही गौण विषयांची ओळख करून घेऊ. प्रथमच अग्नी व वसिष्ठ यांच्या संवादरूपानें अग्निपुराणास प्रारंभ होत आहे, मत्स्या-वतार, अमृतमंथन, कूर्म आणि मोहिनीचा अवतार, वराह, नृसिह, वामन, परशुराम यांच्या अवतारांच्या कथा प्रथम आल्या आहेत. बालकांड. अयोध्याकांड, अरण्यकांड, किष्किंधाकांड, सुंदरकांड, युद्धकांड, उत्तर-

कांड यांतील रामायणकथा संक्षेपाने रामावताराच्या निमित्ताने आलेली आहे. मंथरेनें रामास वनवासास पाठविण्याचे का ठरविले ? तर एकदा रामचंद्रांनी कोठल्या तरी अपराधासाठी मंथरेस तिचे पाय धरून ओढले होते. हा राग तिच्या मनात होता, असे या पुराणाने नमूद केले आहे. त्यानंतर हरिवंशाचे व श्रीकृष्णचरित्राचे वर्णन आले आहे. महाभारताची संक्षिप्त कथा व कौरव आणि पांडव यांच्यांतील युद्ध आणि त्यांचा परिणाम यांचेही निवेदन आहे. यदुकुलाचा संहार व पांडवांचे स्वर्गगमन सांगून झाल्यावर बुद्ध व कलंकी यांच्या अवतारांच्या कथा आल्या आहेत.

जगताच्या निर्मितीची कथा, स्वायंभुव मनूचा वंश, कश्यपादींचे वंश, भुवनाकोनाशादींचे, स्वायंभुव सर्गाचे, मन्वन्तराचे वर्णन अग्निपुराणात संक्षेपाने आले आहे. तीर्थ-माहात्म्य, गंगामाहात्म्य, प्रयाग-माहात्म्य, वाराणसीमाहात्म्य, नर्मदामाहात्म्य, गयामाहात्म्य, गयेचा यात्राविधी, गयेमधील श्राद्धविधी; इत्यादींची वर्णनेही यात आली आहेत. भारतवर्षाचे वर्णन, जंबूआदी महाद्वीपांची, समस्त लोकांचीही वर्णनें आहेत. सूर्यवंशवर्णन, सोमवंशवर्णन, यदुवंशवर्णन, श्रीकृष्णांच्या पत्नी व पुत्र, तुर्वसू व त्यांचा वंश, पुरूचा वंश, असा सर्व वंश-विस्तारही येथे संक्षेपाने आलेला आहे. पण अग्निपुराण प्रसिद्ध आहें ते या बाबींसाठी नाही. या तशा गौणच गोष्टी दिसतात.

## पराविद्येची उपासना

परा आणि अपरा विद्या, हा अग्निपुराणाचा प्रमुख उद्देश आहे. ऋक्, यजू, साम, अथर्ववेद, वेदांची सहा अंगे; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष, छंद:शास्त्र, मीमांसा, धर्मशास्त्र, न्याय, आयुर्वेद, गांधर्ववेद (संगीत), धनुर्वेद व अर्थशास्त्र, या सर्व अपराविद्यांची अगदी सविस्तर मांहिती या पुराणानें दिलेली आहे. अग्राह्य, अदृश्य, गोत्ररहित, चरणरहित, नित्य, अविनाशी ब्रह्माचा बोध ज्या विद्येनें होतो तीस पराविद्या म्हटले आहे. या दोन विद्यांची सविस्तर ओळख करून देण्याच्या निमित्तानें या पुराणाची निर्मिती झालेली दिसते.

पराविद्येची उपासना कशी करावी ? यासाठी नाना उपाय सांगितले आहेत. नाना व्रते आहेत. नाना विधी आहेत. नाना विधाने आहेत. नाना मंत्रतंत्र आहेत. पूजा कशी करावी, स्नानविधी कसा करावा, देवांची वा विष्णूंची पूजा सामान्यत: कशी करावी, कुंड कसे निर्माण करावे, वासुदेव, संकर्षण, आदींची पूजा कशी करावी; यांसंबंधी सविस्तर विधिविधाने सांगितली आहेत. न्यास व मुद्रा यांची लक्षणे, शिष्याला दीक्षा देण्याचा विधी, मंत्रसाधनविधी, अपामार्जनविधी, कुशामार्जन, निर्वाणदीदीक्षा, पवित्रारोपण, देवालय निर्माण करण्याचा विधी, गणपतिपूजाविधी, स्नान-संध्या-तर्पणविधी, शिवपूजेचा, सूर्यपूजेचा विधी, चंडपूजेचा विधी, समयाचारविधी, निर्वाणदीक्षाविधी, अभिषेकादी विधी, देवार्चनाचा महिमा, तिथींची व्रते, शिवरात्रीचे व्रत, अशोकपूर्णिमेचे व्रत, वारसंबंधी व्रते, नक्षत्रसंबंधी व्रते, दिनसंबंधी व्रते, माससंबंधी व्रते, दीपदानव्रत, नवव्यूहार्चन; इत्यादी कर्ममार्गाचे, व्रतविधींचे सविस्तर दिग्दर्शन अग्निपुराणाने केले आहे.

या ब्रह्मभावाच्या प्राप्तीसाठी तत्त्वचिंतन आहेच. यम, नियम इत्यादी योगचर्या आहे, आसन, प्राणायाम. प्रत्याहार यांचे वर्णन आहेच. ध्यान, धारणा, समाधी, मननरूप ज्ञान, निदिध्यासरूप ज्ञान, भगवत्स्वरूपाचे वर्णन, ब्रह्मभावाच्या प्राप्तीसाठी उपाय, जडभरत व सौवीरनरेश यांच्या संवादातून प्रकट झालेले अद्वैत ब्रह्मज्ञानाचे अनुभवकथन, गीतासार, यमगीता; इत्यादींचा निर्देश तर आहेच. पण सर्वसाधारण लोकांसाठी, सर्व वर्णांसाठी सुलभ असा नामजपाचा, सगुणपूजेचा, मंत्रजपाचा मार्गही हे पुराण विस्ताराने खुलवून सांगते. मासोपवासव्रत, भीष्मपंचकव्रत, कौमुदव्रत, सोळा प्रकारची महादाने, संध्याविधी, गायत्रीमंत्राचे माहात्म्य, संन्यासदीक्षा, लक्ष्मीस्तोत्र, मृत्युंजययोग, सिद्धिगणपती व सूर्यदेव यांची आराधना, अष्टाक्षरमंत्र, नरसिंहस्तोत्र; इत्यादींची विस्ताराने ओळख अग्निपुराणाने करून दिलेली आहे.

अग्निपुराणाचे आणखी एक वैशिष्टच असे की, यात तंत्रोक्त व मंत्रोक्त असे जारण, मारण, वशीकरण, उच्चाटण, इत्यादींचे विधी समंत्रक असे दिले आहेत. त्रैलोक्यविजयाविद्या, संग्रामविजयविद्या,

महामारीविद्या, तंत्रविषयक सहा कर्मे, कुब्जिकान्यासविधी, मालिनी आदी मंत्र, त्रिखंडीमंत्र, गुह्यकुब्जिका, त्वरितापूजा, द्वादशाक्षरमंत्र-मंडल, मंत्रविकल्प, पंचाक्षरदीक्षा, स्तंभनादी मंत्र, सकलादी मंत्र, वागीश्वरीची पूजा, पाशुपतास्त्रमंत्र, गंगामंत्र, शिवमंत्रराज, चंडकपालिनीमंत्र, क्षेत्रपालबीजमंत्र, महामृत्युंजयमंत्र; इत्यादी अनेक मंत्रांची विधाने विशेषतः क्षत्रियांसाठी सविस्तर दिलेली आहेत. रुद्र, महादेव, चंडी, भैरव इत्यादी देवदैवतांना उद्देशून हे अघोरी मंत्र असल्यामुळे या पुराणास कोणी कोणी तामस पुराण असेही म्हटले आहे.

## अपरा विद्यांचा ज्ञानकोश

अग्निपुराणात काय नाही ? असाच प्रश्न विचारावा लागेल. परा विद्येच्या उपासनेस सुलभ होतील असे उपाय तर यात आहेतच. पण ज्यांना लौकिक, भौतिक विद्या म्हणता येईल त्यांची अत्यंत विस्तृत व त्या काळी उपलब्ध असलेली सर्व माहिती अग्निदेवांनी या पुराणात एकत्रित केली आहे. देवालय वा मंदिर कसे बांधावे, देवांची स्थापना कशी करावी, शिलान्यासविधी कसा व केव्हा करावा, मंदिरात कोठे कोणते देव स्थापन करावेत, वासुदेवादी मूर्तींची लक्षणे कोणती, पिंडीची लक्षणे कोणती, शालग्रामशिलेचे लक्षण कोणते, मत्स्यादी दशावतारांच्या मूर्ती कशा बनवाव्यात, इत्यादी संबंधीचे विस्तृत मार्गदर्शन अग्निपुराण करते, चौसष्ट योगिनींच्या प्रतिमांची लक्षणे, लिंगादींची लक्षणे, कलशाधिवासाचे वर्णन, अवभृथस्नान, ध्वजारोपण, विहिरी, तलाव, उद्याने इत्यादींची निर्मिती, मंदिरांचा, तलावांचा जीर्णोद्धारविधी, उत्सवविधी, स्नानविधी, वृक्षांचे रोपण व जतन, घरातील कपिला गाय, चूल, चक्की, उखळ, मुसळ इत्यादींची पूजा, प्रासादाचे म्हणजे मंदिराचे लक्षण, नगर, गृह इत्यादी वास्तूंची प्रतिष्ठा, असा भौतिक विधींचा, वास्तुशास्त्राचा विस्तृत आढावा हे पुराण करते.

यांखेरीज आणखी एका विशेष जीवनाचा पुरस्कार हे पुराण करते. राजास युद्धात विजय कसा मिळेल, राजाची लक्षणे कोणती, त्याचा परिवार कसा असावा, त्याचा राज्याभिषेकविधी कसा व्हावा,

कोणते मंत्र त्यावेळी म्हणावेत, आपल्या मंत्र्यांची, सेवकांची नियुक्ती राजाने कशी करावी, सेवकांची कर्तव्ये कोणती, राजाचे दुर्ग किती प्रकारचे असतात, राष्ट्राचे रक्षण दुर्गांनी कसे होते, दुर्गांची व्यवस्था कशी ठेवावी, अंतःपुरातील सेवक कोणते असावेत, राजधर्म कसा असावा, राजपुत्राचे रक्षण कसे करावे, युद्धाचा निश्चय कसा करावा, शुभाशुभ लक्षणे कशी पाहावीत, राजाची दिनचर्या कशी असावी; अशा अनेक विषयांचे मार्गदर्शन अग्निपुराण करते. पुरुषाची लक्षणे, स्त्रीची लक्षणे इत्यादी विषयही यात आहेतच.

ज्यांना केवळ लौकिक वा भौतिक विद्या म्हणता येईल अशा अनेक शास्त्रांचे वर्णन या पुराणाने केले आहे. ज्योतिषशास्त्राचे सर्वांगांनी विवेचन या पुराणानें केले आहे. कालगणना, पंचांगमानसाधन, विविध योग, नक्षत्रसंबंधी पिंडाचे वर्णन, विभिन्न बलांचे वर्णन, कोटचक्र, अर्धकांड, विविध मंडले, घातचक्र, सेवाचक्र, नक्षत्रांचे त्रिनाडीचक्र, प्रमुख संवत्सरांची फले. वश्य आदी योग, शनिदृष्टी, राहुदृष्टी, फणिराहू, तिथिराहू; इत्यादींचे समग्र वर्णन या पुराणानें केले आहे.

या ज्योतिषाशिवाय आणखीही काही शास्त्रांचा परिचय हे पुराण करून देताना दिसते. स्थापत्य, मूर्तिविज्ञान, इत्यादींचे वर्णन, आयुर्वेद, वृक्षविज्ञान, नाना रोगांवर औषधे, विष हरण करणारी औषधे, गजचिकित्सा, गवायुर्वेद, नागलक्षण, नागदंशचिकित्सा, विषहारी मंत्र, रत्नपरीक्षा, बालादीग्रहहर बालतंत्र, ग्रहबाधा, छंदःशास्त्र, छंदांचे विविध प्रकार, विषमवृत्ते अर्धसमवृत्ते, समवृत्ते, प्रस्तारनिरूपण, शिक्षावर्णन, काव्यादिकांची लक्षणे, नाटकनिरूपण, शृंगारादी रस, नायकादींचे भेद, रीतिनिरूपण, नृत्यादी ललितकला, अभिनय व काव्यालंकार, काव्यगुण व काव्यदोष, व्याकरणाचे सार, संधी, समास इत्यादी विभाग, लिंग, कारके, तद्धित प्रत्यय; इत्यादींचा विचार हे सारे भौतिक शास्त्रांचे वैभव म्हणजे या पुराणाचे उत्तमांगच म्हटले पाहिजे. म्हणूनच याला भौतिक शास्त्रांचा ज्ञानकोश म्हटले आहे.

## सुभाषितांचे अमृततुषार

अपरा व परा विद्यांचे सर्वांगांनी वर्णन करणारे असे हे महत्त्वाचे पुराण कथांसाठी, आख्यानांसाठी महत्त्वाचे नसले तरी आचार व भौतिक विद्यांची प्रतिष्ठा यांसाठी त्याचे महत्व अनन्यसाधारण आहे. आचार-धर्मांचे, तत्त्वज्ञानाचे वर्णन करताना मधून मधून हे पुराण सुभाषित-वजा वचनांची पखरण करून वाचकांच्या चित्तास संतोष देते. राजा कसा असावा ? तर 'राजा स्यात् जनरञ्जनात्'(२२०.२४) जनांच्या रंजनाने राजा हा राजा ठरतो. 'अरक्षिता: प्रजा यस्य नरकं तस्य मन्दिरम्' (२१३.१०). ज्याच्या प्रजा अरक्षित असतात त्या राजाचे स्थान नरकात असते. 'जनानुरागप्रभवा राज्ञो राज्यमहीश्रिय:'(२२३.१३) राज्य, पृथ्वी, संपत्ती या गोष्टी राजास प्रजेच्या अनुरागातूनच प्राप्त होतात. दानाविषयी अग्निपुराण काय म्हणते ? 'देशे काले च पात्रे च दानं कोटिगुणं भवेत् (२०९.५)' देश, काळ, पात्र यांचा विचार करून केलेले दान कोटिगुणांनी वाढते. पुराणाची प्रशस्ती सांगताना या पुराणाने विष्णूंच्या उपासनेस महत्त्व दिले आहे. प्रत्यक्ष विष्णू म्हणजेच हे पुराण असे म्हटले आहे. गीतासाराबरोबर शेवटी अद्वैत वेदान्ताचे मर्मही यात आले आहे. गाय ही प्राणिमात्राची प्रतिष्ठा आहे. गाय ही परममंगल आहे. गोरस पदार्थ हेच परम अन्न आहे. हेच देवांचे उत्तम हविर्द्रव्य आहे. हे सांगताना या पुराणाने म्हटले आहे;

गाव: प्रतिष्ठा भूतानां गाव: स्वस्त्ययनं परम् ।
अन्नमेव परं गावो देवानां हविरुत्तमम् ।।

(२९२.१५)

# अनुक्रमणिका

## १. प्रास्ताविक



## २. कथा-उपकथा



## ३. तीर्थक्षेत्रमाहात्म्य

## ४. सृष्टिरचना



## ५. सदाचारदर्शन

## ६. तत्त्वज्ञानदर्शन



## ७. उपसंहार व महिमा



## ८. स्तोत्रमंजूषा

# अग्निपुराण

## १ प्रास्ताविक

### अशी आठ भावपुष्पे

अहिंसा प्रथमं पुष्पं पुष्पमिन्द्रियनिग्रहः ।
सर्वपुष्पं दया भूते पुष्पं शान्तिर्विशिष्यते ।।
शमः पुष्पं तपः पुष्पं ध्यानं पुष्पं च सप्तमम् ।
सत्यं चैवाष्टमं पुष्पमेतैस्तुष्यति केशवः ।।
एतैरेवाष्टभिः पुष्पैस्तुष्यतेवार्चितो हरिः ।
पुष्पान्तराणि सन्त्यत्र ब्राह्यानि मनुजोत्तम ।।

(२०२.१७-१९)

भगवंतांना प्रसन्न करणारी आठ भावपुष्पे कोणती ? अग्निपुराणाने या प्रश्नाचे उत्तर देताना सांगितले आहे– अहिंसा हे प्रथम पुष्प आहे. इंद्रियनिग्रह हे दुसरे पुष्प आहे. प्राणिमात्रावर दया हे तिसरे पुष्प होय. शांती हे चौथे पुष्प असून ते सर्वांत महत्त्वाचे असून मनास वश करणारा शम हे पांचवे पुष्प आहे. तप हे सहावे पुष्प असून ध्यान हे सातवे पुष्प समजावे. सत्य हे आठवे पुष्प आहे. या आठ पुष्पांनी भगवान केशव संतुष्ट राहातात. या आठ पुष्पांनी त्यांचे पूजन केल्यास ते प्रसन्न राहतील. यांखेरीज त्यांना संतुष्ट करणारे दुसरे कोणतेही पुष्प या भूमंडलावर नाही.

अ...२

## व्यासवसिष्ठांचा संवाद– अग्निपुराणमाहात्म्य

अशा तात्त्विक बोधपर स्तुतींनी, प्रार्थनांनी समृद्ध असणारे अग्निपुराण हे एक अत्यंत महत्त्वाचे पुराण आहे. पुराणकार देवदेवतांना वंदन करताना म्हणतात,

**श्रियं सरस्वतीं गौरीं गणेशं स्कन्दमीश्वरम् ।**
**ब्रह्माणं वन्हिमिन्द्रादीन् वासुदेवं नमाम्यहम् ।।**

लक्ष्मी, सरस्वती, पार्वती, गणेश, कार्तिकेय, महादेव, ब्रह्मदेव, अग्नी, इंद्र आदी देवदेवता, भगवान वासुदेव यांना मी नमस्कार करतो.

पूर्वी नैमिषारण्यात शौनकादी ऋषी यज्ञ करून भगवान विष्णूंची आराधना करीत होते. तीर्थयात्रा करीत करीत सूत तेथे त्या वेळी आले. महर्षींनी त्यांचे स्वागत करून म्हटले, 'सूत, आपण आमची पूजा आज स्वीकारावी. सर्वज्ञता प्राप्त होईल असं सारभूत तत्त्व आपण आम्हांस सांगावं.' त्यावर सूत म्हणाले, 'ऋषींनो, भगवान विष्णू हेच सारतत्त्व आहे. तेच या सृष्टीचं पालन करतात. सर्वांना व्यापणारे असे हे तत्त्व आहे. विष्णुरूप ब्रह्म मीच आहे, असं जाणल्यानं सर्वज्ञता प्राप्त होते. ब्रह्माची दोन स्वरूपं जाणण्यासारखी आहेत. शब्दब्रह्म आणि परब्रह्म ही ती दोन रूपं. अपरा व परा या दोन विद्या जाणण्यासारख्या आहेत. एकदा मी, शुकदेव, पैल इत्यादी ऋषी बदरिकाश्रमास गेलो होतो. तिथं व्यासांना नमस्कार करून मी त्यांना ह्याच सारभूत तत्त्वांसंबंधी प्रश्न केला. तेव्हा त्यांनी सारतत्त्वाचा उपदेश देताना म्हटलं, 'सूता, शुकादिकांच्या बरोबर तुम्ही ऐका. एकदा मीच महर्षी वसिष्ठांना सारभूत तत्त्वासंबंधी विचारलं. त्यांनी जो उपदेश केला तोच मी आता तुम्हांस सांगतो.'

वसिष्ठ म्हणाले, 'व्यासा, ब्रह्माची दोन रूपं आहेत. पूर्वी ऋषिमुनींनी अग्निदेवासहित विचारल्यावरून जे मी सांगितलं तेच आता कथन करतो. अग्निपुराण हे सर्वोत्कृष्ट आहे. त्याचं एक एक अक्षर ब्रह्मविद्या आहे. म्हणून ते परब्रह्मरूपच आहे. ऋग्वेदादी वेदशास्त्र हे अपरब्रह्म असून परब्रह्मस्वरूप अग्निपुराण देवादिकांना परम सुखद

आहे. अग्निदेवाच्याद्वारे याचं कथन झालं असल्यानं हे अग्निपुराण वेदांप्रमाणं सर्वमान्य आहे. भगवान विष्णूच कालग्नीच्या स्वरूपात विराजमान असतात. तेच ज्योतिर्मय परात्पर ब्रह्म आहेत. ज्ञानयोग व कर्मयोग यांच्याद्वारे त्यांचंच पूजन होतं. एके दिवशी त्या विष्णुस्वरूप अग्निदेवास मीच असा प्रश्न विचारला, 'अग्निदेवा, संसारसागर पार करण्यासाठी नौकारूप परमेश्वर ब्रह्माच्या स्वरूपाचं वर्णन करावं. जे जाणल्यानं मनुष्य सर्वज्ञ होईल. त्या सारभूत तत्त्वाचं विवरण करावं.'

त्यानंतर अग्निदेवांनी त्यांना सर्व विषय समजावून दिला. ते म्हणाले, 'वसिष्ठ, मीच विष्णू आहे. मीच कालाग्निरुद्र म्हणून प्रसिद्ध आहे. मी तुम्हांस सर्व विद्यांची जी सारभूत विद्या तिचा उपदेश करतो. हाच उपदेश अग्निपुराण या नावानं प्रसिद्ध आहे. तेच सर्व विद्यांचं सार, तेच ब्रह्मस्वरूप आहे. त्यात सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वन्तर, वंशानुचरित आदींचं व मत्स्यादींचं रूप धारण करणाऱ्या भगवानांचं वर्णन आहे. ब्रह्मन्, भगवान विष्णूंच्या स्वरूपभूता दोन विद्या आहेत. एक परा व दुसरी अपरा. ऋक, यजुः, साम, अथर्ववेद, वेदांची सहा अंगं, मीमांसा, धर्मशास्त्र, पुराणं, न्याय, वैद्यक, गांधर्ववेद, धनुर्वेद, अर्थशास्त्र या सर्व अपरा विद्या आहेत. अदृश्य, अग्राह्य, गात्ररहित, चरणरहित, नित्य अविनाशी ब्रह्मावर बोध करणारी परा नावाची विद्या समजावी. या अग्निपुराणास परा विद्याच मानावी. मीच त्या विद्येचं स्वरूप समजावून सांगीन.'

# २ कथाउपकथा

## मत्स्यभगवानांचे आख्यान

वसिष्ठांच्या सांगण्यावरून अग्निदेवांनी मत्स्यकूर्मादी अवतारांच्या कथा प्रथम वर्णन केल्या. मागील कल्पाच्या शेवटी ब्राह्म नावाचा नैमित्तिक प्रलय झाला, त्या वेळी भू-आदी सर्व लोक समुद्रात बुडून गेले,

प्रलयापूर्वी वैवस्वत मनू भोग व मोक्ष यांच्या सिद्धीसाठी तपस्या करीत होता. एकदा तो कृतमला नदीच्या जलाने पितरांना तर्पण करीत असता त्याच्या ओंजळीत एक मत्स्य आला. त्याला पुन्हा पाण्यात फेकण्याचा विचार राजाने केला, तेव्हा तो मासा म्हणाला,

'महाराज, मला जलात फेकू नका. इथं सुसर इत्यादी प्राण्यांचं मला भय वाटतं.'

हे ऐकून मनूनें त्याची स्थापना कळशात केली. त्यात येताच मत्स्य मोठा झाला व म्हणाला, 'राजन्, मला यापेक्षा मोठं स्थान हवंय.' राजाने त्याला मोठ्या जलपात्रात स्थान दिले. तेथेही तो मोठा झाला व मनूस म्हणाला, 'मला आणखी मोठं स्थान हवंय.' तेव्हा मनूने त्याला सरोवरात सोडले. पण मत्स्य सरोवराएवढा झाला. राजाने त्याला समुद्रात सोडून दिले. तेव्हा तो मासा एक लाख योजने विस्तृत झाला. अशा या मत्स्यास पाहून मनूस फार विस्मय वाटला. तो त्याला म्हणाला,

'आपण आहात तरी कोण ? आपण भगवान विष्णू आहात, असं मला वाटतं. जनार्दन, आपण मला आपल्या मायेनं का मोहित करता?'

त्यावर मत्स्यरूपधारी भगवान मनूस म्हणाले, 'राजन्, मी दुष्टांचा नाश व जगताचं रक्षण करण्यासाठी जन्मास आलो आहे. आजपासून सातव्या दिवशी सर्व जग समुद्रात बुडणार आहे. त्या वेळी एक नौका तुझ्यापाशी येईल. तू सर्व प्रकारची बीजं त्या नौकेवर ठेव व आरूढ हो. सप्तर्षी तुझ्याबरोबर राहातील. ब्रह्मदेवांची रात्र आहे तोपर्यंत तू त्या नावेवरच राहा. त्या वेळी मी याच रूपात तिथं उपस्थित होईन. त्या वेळी महासर्पाच्या दोरीनं माझ्या शिंगास बांधून त्या नौकेस मला जखडून ठेव.'

इतके म्हणून भगवान मत्स्य अंतर्धान पावले. वैवस्वत मनू त्यांनी सांगितलेल्या प्रसंगाची वाट पाहू लागला. योग्य वेळ येताच समुद्राने मर्यादा सोडली. तेव्हा मनू नौकेवर आरूढ झाला. त्याच वेळी एक शिंगवाला सुवर्णमय मत्स्य भगवान प्रकट झाले. त्यांचे शरीर विशाल होते. त्यांची लांबी दहा लाख योजने होती. त्यांच्या शिंगास बांधून

नावेस जखडून टाकले. राजा मनूने त्यांच्याकडून मत्स्यपुराण ऐकले. हे सर्व पापांचा नाश करणारे आहे. मनूने भगवान मत्स्यांची नाना स्तोत्रांनी प्रार्थना केली. प्रलयाच्या शेवटी ब्रह्मदेवांकडून वेदांचे हरण करणाऱ्या हयग्रीव नावाच्या दानवाचा वध करून मत्स्य भगवानांनी वेदमंत्रांचे रक्षण केले. त्यानंतर श्रीहरींनी कूर्मावतार धारण केला.

## समुद्रमंथन, कूर्मभगवान, मोहिनीचा अवतार

पूर्वीची हकीगत आहे. देवासुरांच्या संग्रामात दैत्यांनी देवांना पराभूत केले. दुर्वासांच्या शापाने ते लक्ष्मीरहित झाले. सर्व देव क्षीर-सागरात शयन करणाऱ्या भगवान विष्णूंकडे जाऊन म्हणाले, 'भगवन, आता आपण देवांचं रक्षण करावं.' तेव्हा श्रीहरींनी ब्रह्मादी देवांना म्हटले, 'देवांनो, तुम्ही क्षीरसमुद्राचं मंथन करा. अमृत व लक्ष्मी प्राप्त करण्यासाठी असुरांबरोबर नंतर तह करा. काही मोठं काम होण्यासाठी शत्रूसही संधी द्यायला हवी. मी तुम्हांस अमृताचा स्वामी बनवीन. दैत्यांना ते मिळणार नाही. मंदराचलाची रवी आणि वासुकीचा दोर करून तुम्ही आळस सोडून माझ्या साह्यानं त्वरित मंथनास प्रारंभ करावा.'

भगवान विष्णूंचे ऐकून देव दैत्यांशी संधी करण्यासाठी क्षीर-सागराच्या तटावर आले. देव व दैत्य यांनी सहकार्याने समुद्रमंथनास प्रारंभ केला. वासुकीच्या शेपटीच्या बाजूस देव होते. त्याच्या मुखाच्या बाजूस दैत्य असल्याने वासुकीच्या निःश्वासांनी ते क्षीण होऊन गेले. देवांना मात्र पुष्टी येत चालली. समुद्रमंथनास प्रारंभ झाल्यावर खाली कोणताच आधार नसल्यामुळे मंदराचलपर्वत समुद्रात बुडू लागला. तेव्हा भगवान विष्णूंनी कूर्माचा, कासवाचा आकार धारण करून मंदराचलास आपल्या पाठीवर धारण केले.

समुद्राचे मंथन सुरू होताच त्यातून प्रथम हलाहल विष बाहेर आले. भगवान शंकरांनी त्याला आपल्या कंठात धारण केले. त्यामुळे त्यांचा कंठ काळानिळा झाला. म्हणून त्यांचे नाव 'नीलकंठ' झाले. त्यानंतर समुद्रातून वारुणीदेवी, पारिजातवृक्ष, कौस्तुभमणी, गायी,

दिव्य अप्सरा प्रकट झाल्या. त्यानंतर लक्ष्मीदेवी प्रकट झाली. तिची प्राप्ती भगवान विष्णूंना झाली. सर्व देवांनी त्यांचे दर्शन घेतले. स्तवन केले. त्यानंतर आयुर्वेदाचा प्रवर्तक धन्वन्तरी प्रकट झाला. त्याच्या हातात अमृताचा कलश होता. दैत्यांनी तो अमृतकलश हिसकावून घेतला. त्यांनी त्यातील अर्धे अमृत देवांना दिले व ते निघून गेले. त्यांत जंभ आदी दैत्य प्रमुख होते. त्यांना जाताना पाहून भगवान विष्णूंनी स्त्रीचे रूप धारण केले. त्या रूपवती स्त्रीला पाहून दैत्य मोहित झाले व म्हणाले,

‘सुमुखी, तू आमची भार्या हो. हे अमृत तू आम्हांला पाज.’

‘ठीक आहे.’ म्हणून भगवंतांनी त्यांच्या हातून अमृतकुंभ घेतला. देवांना तिने ते पाजले. त्याच वेळी राहूने चंद्राचे रूप धारण करून तो ते अमृत पिऊ लागला. तेव्हा सूर्याने व चंद्राने ते कपट ओळखले. भगवान श्रीहरींनी आपल्या चक्राने राहूचे मस्तक छाटून टाकले. शेवटी भगवंतांना दया आली. त्यांनी राहूला अमर बनविले. तेव्हा ग्रहरूप राहू भगवानांना म्हणाला, ‘या चंद्रास व सूर्यास माझ्याकडून अनेकदा ग्रहणाचा त्रास होईल. जगात ज्या वेळी दानधर्म होईल तेव्हा सर्व ठीक अक्षय होईल.’ भगवान विष्णूंनी राहूच्या बोलण्यास अनुमती दिली. त्यांनी स्त्रीरूप टाकून दिले.

परंतु महादेवांना त्या दर्शनाची इच्छा झाली. त्यांच्यासाठी श्रीहरींनी पुन्हा स्त्रीरूप धारण केले. भगवंतांच्या मायेने ते मोहित झाले. पार्वतीचा त्याग करून ते याच स्त्रीच्या मागे लागले. त्यांनी नग्न व उन्मत्त होऊन मोहिनीचे केस पकडले. आपले केस सोडवून ती तेथून निघून गेली. महादेव तिच्या मागे धावले. त्या वेळी पृथ्वीवर जेथे जेथे महादेवांचे वीर्य पडले तेथे तेथे शिवलिंगाचे क्षेत्र निर्माण झाले. सुवर्णाची खाण तयार झाली. ही सर्व माया समजून शंकर आपल्या स्वरूपात स्थिर झाले. श्रीहरी प्रकट होऊन महादेवांना म्हणाले, ‘रुद्र, तुम्ही माझ्या मायेस जिंकलं आहे.’ भगवंतांच्या प्रयत्नाने दैत्यांना अमृत मिळू शकले नाही. देवांनी त्यांचा युद्धात पराभव केला. देव स्वर्गात व दैत्य पातालात सुखाने राहू लागले.

## वराह, नृसिंह, वामन, परशुराम

पूर्वी हिरण्याक्ष नावाचा दैत्य असुरांचा राजा होता. देवांना जिंकून तो स्वर्गात राहू लागला. देवांनी भगवान विष्णूंकडे जाऊन त्यांची स्तुती केली. त्यानंतर भगवंतांनी वराहाचे रूप धारण केले. त्यांनी त्या दैत्यास मारले व देवांचे रक्षण केले. त्यानंतर भगवान वराह अंतर्धान पावले. या हिरण्याक्षाचा एक बंधू होता. त्याचे नाव हिरण्यकशिपू होते. त्याने देवांचे यज्ञभाग बंद केले व त्यांचा उपभोग तो स्वतःच घेऊ लागला. भगवानांनी नृसिंहरूप धारण करून त्या दैत्याचा असुरांसह वध केला. सर्व देव आपापल्या जागी स्थिर झाले. देवांनी त्या वेळी नृसिंहाचे स्तवन केले.

पूर्वी एकदा देव व दैत्य यांच्यांत युद्ध झाले. त्यात बली इत्यादी दैत्यांनी देवांचा पराभव केला. त्याने देवांना स्वर्गातून घालवून दिले. तेव्हा ते श्रीहरींना शरण गेले. भगवंतांनी देवांना अभय दिले. कश्यप व अदिती यांच्या स्तुतीने संतुष्ट होऊन ते अदितीच्या गर्भातून वामनाच्या रूपात प्रकट झाले. यावेळी बली गंगाद्वारी यज्ञ करीत होता. भगवान तेथे गेले व त्यांनी यज्ञात वेदांचे पठण केले. बली त्यांना प्रसन्न करण्यास उत्सुक झाला. शुक्राचार्यांनी विरोध केला तरी बलीने ऐकले नाही. भगवंतांनी त्याला तीन पादांची भूमी दान मागितली. बलीने होकार दिला. संकल्पाचे जल हातात पडताच वामन अ-वामन झाले. त्यांनी विराट रूप धारण केले. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्गलोक यांना त्यांनी आपल्या तीन पादांनी व्यापून टाकले. श्रीहरींनी बलीस सुतललोकात पाठवून दिले. त्रिलोकाचे राज्य इंद्राला मिळाले. इंद्राने देवांसहित श्रीहरींची स्तुती केली. तीनही लोकांचा तो स्वामी झाल्यामुळे सुखी झाला.

भूमंडलावर क्षत्रिय उद्धट होत आहेत असे श्रीहरींनी जाणले. पृथ्वीचा भार हलका करण्यासाठी, सर्वत्र शांती स्थापण्यासाठी जमदग्नी व रेणुका यांच्या पोटी श्रीहरींनी अवतार धारण केला. भृगुनंदन परशुराम शस्त्रविद्येत पारंगत होते. त्याच सुमारास कृतवीर्याचा पुत्र

राजा अर्जुन भगवान दत्तात्रेयांच्या कृपेने हजार बाहूंचा स्वामी झाला होता. एकदा तो शिकारीच्या उद्देशानें वनात गेला. जमदग्नींनी त्याला सेनेसह आश्रमात बोलाविले. कामधेनूच्या प्रभावाने त्यांनी राजपरिवारास भोजन घातले. राजाने क्रोधास येऊन मुनींपाशी धेनूची मागणी केली. मुनींनी धेनू देण्यास नकार दिला, तेव्हा राजाने बलपूर्वक धेनूचे हरण केले. हा वृत्तान्त समजताच परशुरामाने हैहयपुरीस जाऊन घनघोर युद्ध केले. आपल्या परशूनें त्यानें राजाचे मस्तक कापून टाकले. कामधेनूस घेऊन तो परत आश्रमात आला.

त्यानंतर परशुराम वनात गेल्यावर कृतवीर्याचा पुत्र पित्याच्या वधाचा सूड घेण्यास आश्रमात आला. त्याने जमदग्नींना मारले. आपल्या पित्याचा वध झाला हे पाहून परशुरामास फार क्रोध आला. त्यानें त्या भरात एकवीस वेळा क्षत्रियांचा संहार केला. कुरुक्षेत्रावर पांच कुंड बनवून त्याने आपल्या पितरांचे तर्पण केले. सर्व पृथ्वी त्याने कश्यप-मुनींना दान केली व स्वत: तो महेंद्रपर्वतावर राहू लागला.

## बालकांडातील रामचरित्र

भगवान विष्णूंच्या नाभिकमलातून ब्रह्मदेवांचा जन्म झाला. त्यांचा पुत्र मरीची. त्याचा कश्यप, कश्यपाचा सूर्य व सूर्याचा वैवस्वत मनू होय. या मनूपासून इक्ष्वाकु-वंशाची उत्पत्ती झाली. याच वंशात ककुत्स्थ नावाचा एक राजा झाला. याचा पुत्र रघू. रघुचा पुत्र अज. अजाचा पुत्र दशरथ. या दशरथराजापासून राक्षसांचा वध करण्यासाठी साक्षात भगवान विष्णू चार रूपांत प्रकट झाले. मोठी राणी कौसल्ये-पासून श्रीरामचंद्र प्रकट झाले. कैकेयीपासून भरत व सुमित्रेपासून लक्ष्मण व शत्रुघ्न या पुत्रांचा जन्म झाला. महर्षी ऋष्यशृंगांनी या तीन राण्यांना यज्ञसिद्ध चरू दिले होते. यांतूनच या चार कुमारांचा जन्म झाला.

श्रीरामादी सर्व बंधू आपल्या पित्याप्रमाणे पराक्रमी होते. एकदा मुनिवर विश्वामित्रांनी आपल्या यज्ञात विघ्न आणणाऱ्या राक्षसांचा नाश करण्यासाठी राजा दशरथापाशी त्याच्या पुत्रांची मागणी केली. राजानें मुनींच्याबरोबर श्रीराम व लक्ष्मण यांना पाठविले. रामांनी

तेथे जाऊन शस्त्रास्त्रांचे शिक्षण घेतले. ताटिका नावाच्या निशाचरीस मारले. मारीच नावाच्या राक्षसासही मोहित करून दूर फेकून दिले. यज्ञविघातक राक्षसास, सुबाहूस मारून टाकले. त्यानंतर ते कुमार काही कालपर्यंत महर्षींसह सिद्धाश्रमात राहिले. त्यानंतर ते विश्वामित्रांसह मिथिलानरेशांचे धनुष-यज्ञ पाहाण्यासाठी गेले.

राजा जनकाने मुनींसह यज्ञप्रसंगी श्रीरामचंद्राचे पूजन केले. श्रीरामांनी धनुष्य जोडून दाखविले व पण जिंकला. जनकाने आपली अयोनिजा कन्या सीता पराक्रम हेच विवाहशुल्क मानून श्रीरामांना समर्पित केली. श्रीरामांनी दशरथ, मुनिजन यांच्या समक्ष मिथिलेत सीतेचे विधिपूर्वक पाणिग्रहण केले. त्याच वेळी लक्ष्मणाने मिथिलेशाची कन्या ऊर्मिलाशी विवाह केला. राजा जनकाचा लहान बंधू कुशध्वज नावाचा होता. श्रुतकीर्ती व मांडवी या त्याच्या दोन कन्या. श्रुतकीर्ती शत्रुघ्नाची व मांडवी भरताची पत्नी झाली. राजा जनकाकडून सन्मानित होऊन श्रीरामचंद्र वसिष्ठ आदी महर्षींच्यासह तेथून निघाले. मार्गात त्यांनी जमदग्निनंदन परशुरामास जिंकून अयोध्येस प्रयाण केले. तेथे गेल्यावर भरत व शत्रुघ्न मामा युधाजिताच्या राजधानीस गेले.

## अयोध्याकांडातील रामचरित्र

श्रीरामचंद्र पिता व माता यांच्या सेवासत्कारात तत्पर होते. एके दिवशी राजा दशरथाने रामचंद्रांना म्हटले, 'रघुनंदन, तुझ्या गुणांवर मी प्रसन्न झालो आहे. प्रजाजनांनीही तुलाच राजसिंहासनावर अभिषिक्त केलं आहे. त्यांच्या इच्छेनुसार तू आता युवराज हो. मी उद्या सकाळी तुला युवराजपद देईन. आज रात्री तू सीतेसह उत्तम व्रताचं पालन कर. संयम कर.' राजाचे आठ मंत्री व वसिष्ठ यांनीही या सूचनेस अनुमोदन दिले. दृष्टी, जयन्त, विजय, सिद्धार्थ, राज्यवर्धन, अशोक, धर्मपाल, सुमंत्र या आठ मंत्र्यांखेरीज वसिष्ठही दशरथास सल्ला देत असत.

पिता व मंत्री यांचे बोलणे ऐकून रघुनाथांनी त्यांची आज्ञा

शिरोधार्य मानली. माता कौसल्येस ही शुभ वार्ता सांगून, देवांचे पूजन करून रामचंद्र संयमात स्थित झाले. राज्याभिषेकाची सामग्री जमविण्या-साठी मंत्र्यांना सांगून राजा दशरथ कैकेयीच्या महालात गेला. कैकेयीची मंथरा नावाची एक दासी मोठी दुष्ट होती. तिने अयोध्येची सजावट पाहिली. रामचंद्राच्या राज्याभिषेकाची वार्ता जाणून तिने राणी कैकेयीस सर्व वृत्तान्त सांगितला. एकदा कोठल्या तरी प्रसंगी रामचंद्रांनी मंथरेस तिचे पाय पकडून ओढले होते. या वैरामुळे रामचंद्रांनी वनात जावे, अशी तिची इच्छा होती. मंथरा म्हणाली,

'कैकेयी, तू सावध हो. रामचंद्रांच्या राज्याभिषेकाची तयारी होत आहे. हे सर्व तुझ्या पुत्रासाठी, तुझ्यासाठी आणि माझ्यासाठीही भयंकर आहे!'

मंथरा कुबडी होती. तिचे हे भाषण ऐकून कैकेयीने अंगावरील एक अलंकार काढून तिला दिला व प्रसन्नतेने म्हटले, 'मला जसा, राम, तसा भरतही आहे. भरताला राज्य मिळावं, असा उपाय तर मला दिसत नाही.'

हे ऐकून मंथराने तो अलंकार फेकून देऊन थोड्या रागाने म्हटले, 'तू नादान दिसतेस. अग, रामापासून तू भरताला, स्वतःला, मला वाचीव. उद्या राम राजा होणार! नंतर राज्य रामाच्या पुत्रांना मिळणार. कैकेयी, आता राजवंश भरतापासून दूर चालला. फार पूर्वीचा प्रसंग आहे. देवासुरांच्या संग्रामात शंबासुरानं देवांना मारून पिटाळून लावलं होतं. तुझे स्वामीही त्या युद्धप्रसंगी होते. तू एका रात्री आपल्या विद्येनं स्वामींचं रक्षण केलं होतंस. त्या वेळी महाराजांनी तुला दोन वर दिल्याची प्रतिज्ञा केली होती. आता याच वेळी ते दोन वर माग. एका वरानं रामास चौदा वर्षं वनवासास पाठीव. दुसऱ्या वरानं भरतास राज्यसिंहासनावर बसवून समाधानी हो.'

मंथरेचे हे बोलणे अनर्थकारक असले तरी ते कैकेयीने अर्थवान मानले. ती म्हणाली, 'कुब्जे, तू उपाय चांगला सुचविलास. राजा माझा मनोरथ अवश्यानं पूर्ण करील.' असे म्हणून कैकेयी कोपभवनात आली व जमिनीवर अस्ताव्यस्त होऊन पडली. महाराज दशरथ येताच

त्याच्याकडे रागानें तिनें पाहिले. दशरथानें म्हटले,

'सुंदरी, तुझी ही अशी दशा कशानं झाली ? तू आजारी आहेस का ? कोणत्या भयानं तू एवढी व्याकुळ झालीस ? तुला काय हवंय ? मी तुझी इच्छा पूर्ण करतो. ज्या रामाशिवाय मी क्षणभरही जिवंत राहू शकणार नाही त्याची शपथ घेऊन सांगतो, मी तुझा मनोरथ पूर्ण करीन. खरं खरं सांग. काय हवंय तुला ?'

'राजन्, आपण मला सत्याच्या रक्षणासाठी दोन वर दिले होते, ते पूर्ण करावेत. राम वनवासात जावा, तिथं त्यानं चौदा वर्षं संयमपूर्वक निवास करावा. आणि आजच भरताला युवराजपदावर अभिषेक करावा. महाराज, आपण हे दोन वर मला द्यावेत. जर आपण हे दिले नाहीत तर मी विष खाऊन मरून जाईन.' हे ऐकून दशरथ मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. थोडा सावधपणा येताच तो कैकेयीला म्हणाला,

'पापी विचार करणारी कैकेयी, तू सर्व जगताचं अप्रिय करणारी आहेस. अग, या रामानं तुझा काय अपराध केला ? केवळ तुला प्रिय वाटणारं हे कार्य करून मी या जगात निंदित होईन. तू माझी स्त्री नसून कालरात्री आहेस. माझा पुत्र भरत मात्र असा नाही. पापिणी, माझा पुत्र निघून जाताच मी मरून जाईन. तू विधवा होऊन राज्य भोगशील.'

परंतु राजा दशरथ सत्याच्या बंधनात पडला होता. त्याने रामचंद्रांना बोलावून म्हटले, 'मुला, कैकेयीनं मला फकडलं आहे. तू मला कैद करून राज्याचा स्वीकार कर. अथवा तुला वनात निवास करावा लागेल. कैकेयीचा पुत्र भरत राजा होणार आहे.' हे ऐकून रामचंद्रांनी पित्यास व कैकेयीमातेस नमस्कार केला. त्यांनी लक्ष्मण व सीता यांना बरोबर घेतले. अनाथांना दानें दिली. सुमंतासह रथावर बसून ते नगरातून बाहेर पडले. त्या वेळी माता, पिता इत्यादी शोकाकुल झाले.

त्याच रात्री रामचंद्रांनी तमसानदीच्या किनाऱ्यावर निवास केला. त्यांच्याबरोबर पुष्कळ नगरवासी गेले होते. त्यांना झोपलेले पाहून रामचंद्र पुढे निघाले. प्रातःकाली रामचंद्र जेव्हा त्यांना दिसले नाहीत तेव्हा नगरवासी निराश होऊन पुनः अयोध्येस परतले.

रामचंद्र निघून गेल्यावर दशरथास फार दुःख झाले. रडत रडतच तो कैकेयीचा महाल सोडून कौसल्येकडे गेला. सर्व राण्या व नगरवासी स्त्रिया त्या वेळी रडत होत्या. रामचंद्रांनी वल्कलें धारण केली होती. रथात बसून तें शृंगवेरपुरास आले. तेथे निषादराज गुहानें त्यांचे पूजन केले. स्वागतसत्कार केला. लक्ष्मण व गुह यांनी रामचंद्रांसाठीं रात्रभर पहारा केला. इंगुदी वृक्षाखाली रामचंद्रांचा निवास होता.

प्रातःकाली रामचंद्रांनी रथासहित सुमंतास परत पाठवून दिले. लक्ष्मण व सीता यांच्यासह ते नावेतून गंगापार झाले. प्रयागमध्ये महर्षी भरद्वाजांच्या आश्रमात जाऊन रामचंद्रांनी त्यांना प्रणाम केला. त्यांची आज्ञा घेऊन ते चित्रकूटपर्वताकडे निघाले. तेथे त्यांनी मंदाकिनीच्या तटावर पर्णकुटी बांधून निवास केला. रघुनाथांनी सीतेस चित्रकूटपर्वताचे रमणीय दृश्य दाखविले. याच वेळी एका कावळ्यानें सीतेच्या कोमल अंगावर नखांनी प्रहार केला. हे पाहून रामचंद्रांनी त्यावर अस्त्राचा प्रहार केला. तेव्हा तो कावळा रामचंद्रांना शरण आला.

रामचंद्र वनवासात निघून गेल्यावर सहाव्या दिवशीच रात्री दशरथानें कौसल्येस पूर्वीची हकीगत सांगितली. यज्ञदत्तपुत्र श्रवणकुमार अजाणता त्याच्या बाणानें शरयूच्या तटावर मरण पावला होता. श्रवणकुमाराच्या पित्यानें दशरथास शाप दिला होता. ' राजा, आम्ही दोघे पति-पत्नी पुत्राविना शोकातुर आहोत. आमचा प्राण जात आहे. तूही आमच्यासारखाच पुत्रवियोगानं मरण पावशील. त्यावेळी पुत्र तुझ्याजवळ असणार नाही.' हे सर्व सांगून राजा दशरथ म्हणाला, ' कौसल्ये, आज मला त्या शापाचं स्मरण होत आहे. याच शोकानं मी मृत्यू पावणार.' इतके म्हणून राजानें ' राम, हे राम', म्हणून स्वर्गलोकी प्रयाण केले.

कौसल्या शोकग्रस्त होऊन मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली. सर्व नरनारी रडू लागले. महर्षी वसिष्ठांनी दशरथाचे शव तेलभरी नौकेत ठेवून भरतास बोलावणे पाठविले. भरत व शत्रुघ्न आपल्या आजोळहून त्वरित अयोध्येस आले. तेथील वृत्त समजून भरतास फार दुःख झाले. शोकग्रस्त कैकेयीस भरत कठोर वचनांनी बोलू लागला.

'अग, तू माझ्या माथी कलंक लावलास. माझ्या शिरावर अपयशाचं ओझं तू टाकलंस.'

असे म्हणून त्यानें कौसल्यामातेचे दर्शन घेतले. नौकेतील पित्याच्या शवावर त्यानें शरयूतटावर अन्त्यसंस्कार केला. वसिष्ठ व गुरुजन यांना तो नंतर म्हणाला, 'मी तर रामचंद्रांनाच राजा मानतो. मी आता त्यांना आणण्यासाठी वनात जातो.'

इतके म्हणून भरत शृंगवेरपुराहून प्रयागला आला. महर्षी भरद्वाजांनी त्या सर्वांना भोजन दिले. त्यांना नमस्कार करून भरत चित्रकूटला राम व लक्ष्मण यांच्या जवळ आला. भरतानें रामचंद्रांना म्हटले, 'रघुनाथ, आपले पिताजी स्वर्गवासी झाले. आपण आता अयोध्येस येऊन राज्य चालवावं. मी आपली आज्ञा घेऊन वनवास पत्करीन.'

हे ऐकून रामचंद्रांनी पित्यास तर्पण केले. भरतास ते म्हणाले, 'तू माझ्या चरणपादुका घेऊन अयोध्येस परत जा. मी राज्य करण्यासाठी येणार नाही. पित्याच्या प्रतिज्ञेचं रक्षण करण्यासाठी मी जटा धारण करून वनातच राहीन.' श्रीरामचंद्रांचे हे बोलणे ऐकून भरत परत फिरला. अयोध्येस न राहता तो नंदिग्रामास राहू लागला. तेथे रामांच्या चरणपादुका त्याने स्थापन करून तो अयोध्येचे राज्य पाहू लागला.

## अरण्यकांडातील रामचरित्र

रामचंद्रांनी महर्षी वसिष्ठ, माता यांना भरताबरोबर पाठवून दिले. त्यानंतर महर्षी अत्री, त्याची पत्नी अनसूया, शरभंगमुनी, सुतीक्ष्ण अगस्त्यांचे बंधू अग्निजिव्ह यांना प्रणाम करून रामचंद्र अगस्त्यांच्या आश्रमात गेले व त्यांनी त्यांच्या चरणांवर मस्तक नमविले. मुनींच्या कृपेनें दिव्य धनुष्य व खड्ग घेऊन ते दंडकारण्यात आले. तेथे जनस्थानात पंचवटी नावाच्या एका गोदावरीतटी असलेल्या स्थानी ते राहू लागले.

एके दिवशी शूर्पणखा नावाची एक भयंकर राक्षसी राम, लक्ष्मण

व सीता यांना खाण्यासाठी पंचवटीत आली. रामचंद्रांचे मनोहर रूप पाहून ती कामाच्या अधीन होऊन म्हणाली, 'तू कोण आहेस ? कुठून आलास ? आता माझ्या विनंतीवरून तू माझा पती हो. तुझ्या व माझ्या संबंधास जर या दोघांची हरकत असेल तर मी यांना खाऊन टाकीन.'

असे म्हणून तिने खाण्याची तयारी केली. तेव्हा रामचंद्रांच्या सांगण्यावरून लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक व दोनही कान कापून टाकले. कापलेल्या अंगाने व रक्तधारा वाहात असताना ती आपला भाऊ खर याच्यापाशी गेली. ती त्याला म्हणाली, 'खर, माझं नाक कापलं गेलं. या अपमानानंतर मी जिवंत नाही राहू शकणार. तू मला रामाचं, लक्ष्मणाचं, सीतेचं रक्त पाजशील तेव्हाच आता माझा जीव शांत होईल.'

खराने तिला कसेतरी शांत केले. दूषण, त्रिशिरा यांच्यासह चौदा हजार राक्षसांची सेना बरोबर घेऊन त्याने रामचंद्रांवर स्वारी केली. रामांनी त्या सर्वांशी सामना केला. आपल्या तीक्ष्ण बाणांनी त्यांनी राक्षसांना बांधून टाकले. शत्रूंचे हत्ती, घोडे, रथ, पायदळ सैन्य इत्यादींचा त्यांनी नाश केला, खर, दूषण, त्रिशिरा इत्यादींचाही त्यांनी पराभव केला. तेव्हा शूर्पणखा लंकेला गेली. रावणासमोर जाऊन ती जमिनीवर पडली. तिने रागाच्या भरात रावणास म्हटले, 'अरे, राजा व रक्षक असं तुला कसं म्हणावं ? खर आदी सर्व राक्षसांचा संहार करणाऱ्या रामाच्या पत्नीस तू पळवून आण. राम व लक्ष्मण यांचं रक्त पिऊनच मी जिवंत राहू शकेन.'

'ठीक आहे. तू सांगतेस तसंच मी करीन.' असे म्हणून रावणाने मारीचाला म्हटले, 'तू सुवर्णमय मृगाचं रूप धारण करून सीतेच्या समोर जा. राम व लक्ष्मण यांना त्यांच्या आश्रमापासून दूर घेऊन जा. मी मग सीतेचं हरण करीन. जर माझं ऐकलं नाहीस तर मी तुझा प्राण घेईन.' तेव्हा तो मनाशी म्हणाला, या रावणाच्या हातून मरण्यापेक्षा रामाकडून मरण आलेले बरे. असा विचार करून त्याने मृगरूप धारण केले. तो सीतेच्या समोर वारंवार येऊ लागला. सीतेच्या आग्रहासाठी रामांनी त्याच्यावर बाण सोडला. मरताना तो मृग म्हणाला, 'हा सीते,

हा लक्ष्मण.' सीतेच्या आग्रहासाठी लक्ष्मण आपल्या इच्छेच्या विरुद्ध रामचंद्रांच्या जवळ गेला.

त्यानंतर रावणानें संधी साधून सीतेचे हरण केले. जाताना त्यानें गृध्रराज जटायूचा वध केला. जटायूनेही त्याचा रथ मोडून टाकला. रथ नाहीसा झाला तेव्हा रावणाने सीतेस खांद्यावर घेतले व लंकेस जाऊन तिला अशोकवाटिकेत ठेवले. तो सीतेस म्हणाला, 'तू माझी पट्टराणी हो.' राक्षसींना तो म्हणाला, 'तुम्ही हिचं चांगलं रक्षण करा.'

इकडे श्रीरामचंद्र मारीचाला मारून परत कुटीत येण्यास निघाले. लक्ष्मणास ते म्हणाले, 'सुमित्रानंदन, तो मृग तर मायामय होता. तो वास्तवात एक राक्षस होता. पण तू या वेळी कुटी सोडून इथं कसा ? सीतेचं कुणीतरी निश्चयानं हरण केलेलं दिसतंय.' श्रीराम आश्रमात येऊन पाहातात तो तेथे त्यांना सीता दिसली नाही. त्यांनी शोक करून म्हटले, 'प्रिये जानकी, तू मला सोडून कुठं गेलीस ?' लक्ष्मणानें रामांचे सांत्वन केले. त्या दोघांनी वनात फिरून सीतेचा शोध घेतला. त्यांची व जटायूची भेट झाली. रावणाने सीतेचे हरण केल्याचा वृत्तांत सांगून जटायूनें प्राणत्याग केला. रघुनाथांनी आपल्या हातांनी जटायूचा अग्नि-संस्कार केला. त्यानंतर त्यांनी कबंधाचाही वध केला. कबंध शापमुक्त होऊन श्रीरामांना म्हणाला, 'तुम्ही सुग्रीवाची भेट घ्यावी.'

## किष्किंधाकांडातील रामचरित्र

श्रीरामचंद्र पंपासरोवराच्या काठी येऊन सीतेसाठी शोक करू लागले. तेथे त्यांची व शबरीची भेट झाली. हनुमानाची व त्यांची भेट नंतर झाली. हनुमानाने त्यांना सुग्रीवाकडे नेले. सुग्रीवाची व रामांची मैत्री झाली. रामचंद्रांनी सर्वांच्या समक्ष ताडांच्या सात वृक्षांना एका बाणानेंच नष्ट केले. दुंदुभी नावाच्या दानवाच्या विशाल शरीरास पायाच्या एका ठोकरीने त्यांनी दूर फेकून दिले. सुग्रीवाचा भाऊ वाली त्याच्याशी वैर करीत होता. त्याचाही वध रामचंद्रांनी केला. किष्किंधापुरी, वानरांचे साम्राज्य, रुमा व तारा यांना रामांनी ऋष्यमूकपर्वतावर वानरराज सुग्रीवाच्या स्वाधीन केले.

त्यानंतर किष्किंधापुरीचा स्वामी सुग्रीव म्हणाला, 'श्रीराम, मी सीतेच्या प्राप्तीसाठी उपाय करीन.' रामचंद्र माल्यवान पर्वतावर पावसाळ्यातील चार महिने राहिले. सुग्रीव किष्किंधानगरीत राहात होता. चार महिन्यांनंतर त्यांना सुग्रीव कोठें दिसला नाही. तेव्हा रामचंद्राच्या आज्ञेनें लक्ष्मण किष्किंधेत आला व म्हणाला, 'सुग्रीव, तू रामचंद्रापाशी चल. आपल्या प्रतिज्ञेचं स्मरण ठेव. नाही तर वाली ज्या मार्गानं गेला तो मार्ग अद्याप बंद झालेला नाही. वालीच्या मार्गास अनुसरू नकोस.' तेव्हा सुग्रीव म्हणाला, 'सुमित्रानंदन, विषयभोगात आसक्त राहिल्यानं किती काळ गेला याचं स्मरण नाही राहिलं !'

इतकें बोलून वानरराज सुग्रीव रामचंद्राकडे येऊन नमस्कार करून म्हणाला, 'भगवान, मी सर्व वानरांना बोलविलं आहे. मी आपल्या इच्छेनुसार त्यांना सीतेच्या शोधासाठी पाठवीन. ते एक महिन्यात शोध करतील.' या वचनानुसार वानर पूर्व, पश्चिम, उत्तर दिशांना शोधासाठी निघाले. त्यांना जनककुमारी भेटली नाही. हनुमान मात्र रामचंद्रांनी दिलेली अंगठी घेऊन अन्य वानरांच्यासह दक्षिणेकडे गेला. विंध्यपर्वतावर त्यांनी खूप शोध केला. पण त्यांना सीतेचे दर्शन झाले नाही. निराश होऊन वानर म्हणू लागले, 'आपलं जीवन व्यर्थ आहे ! रावणाचा मार्ग दाखविणारा जटायू धन्य म्हणावा लागेल.'

त्यांची ही चर्चा संपाती नावाच्या एका गृध्राच्या कानावर आली. तो वानरांना खाण्याच्या बेतात होता. पण जटायूचे नाव ऐकून तो थोडा थबकला. तो म्हणाला, 'वानरांनो, जटायू माझा भाऊ होता. रामचंद्रांचं नाव ऐकून मी संतुष्ट झालो. जानकी लंकेत मला दिसते. तिथं ती अशोकवनात आहे. लवणसमुद्रात त्रिकूटपर्वतावर लंका वसलेली आहे. इथून तेथपर्यंत समुद्र शंभर योजनं दूर आहे. हा सर्व वृत्तान्त तुम्ही सुग्रीव व श्रीराम यांना सांगा.'

## सुंदरकांडातील रामचरित्र

संपातीचे वचन ऐकून हनुमान व अंगद वानर इतरांसह समुद्राकडे पाहू लागले. ते म्हणू लागले, 'हा समुद्र ओलांडून कोण सर्व वानरांना

जीवदान देऊ शकेल ?' हे ऐकून पवनकुमार हनुमानाने तो समुद्र ओलांडला. त्यासाठी त्याने मैनाकपर्वताची मदत घेतली. छायग्राहिणी सिंहिणीचा वध केला व हनुमानाने समुद्र पार करून लंकापुरी पाहिली. त्याने राक्षसांच्या घरात शोध घेतला. रावणाच्या अंतःपुरात शोधून पाहिले. कुंभ, कुंभकर्ण, बिभीषण, इंद्रजित इत्यादी राक्षसांच्या घरी त्याने सीतेचा शोध घेतला. त्याला सीता न आढळल्याने मोठीच चिंता वाटली. शेवटी तो अशोकवनात गेला. तेथे शिंशपावृक्षाखाली बसलेली सीता त्याला दिसली. तिच्यावर राक्षसी देखरेख करीत होत्या.

हनुमानाने वृक्षावर चढून पाहिले. रावण सीतेला म्हणत होता, 'तू माझी पत्नी हो.' रावण निघून गेल्यावर हनुमान म्हणू लागला, 'अयोध्येत दशरथ नावाचा एक राजा होता. त्याचे दोन पुत्र राम व लक्ष्मण वनवासासाठी गेले. त्यांच्यापैकी रामचंद्रांची पत्नी जनककुमारी आपणच आहात. रावणानं तुमचं बलपूर्वक हरण केलं. रामचंद्र या वेळी वानरराज सुग्रीवाचे मित्र आहेत. त्यांनी मला आपला शोध करण्यासाठी पाठविलं आहे. ओळख पटावी म्हणून रामचंद्रांनी स्वतःची अंगठी दिली आहे. ही ती अंगठी पाहावी.'

सीतेने अंगठी घेतली. वृक्षावर बसलेल्या हनुमानाकडे तिने पाहिले. हनुमान वृक्षावरून उतरला. व सीतेसमोर बसला. त्याला सीता म्हणाली, 'रघुनाथ जिवंत असतील तर ते इथं का आले नाहीत ?' सीतेची शंका जाणून हनुमान म्हणाला, 'देवी, तुम्ही इथे आहात, हे रामचंद्रांना माहीत नाही. आता माझ्याकडून त्यांना सर्व समजलं. ते सैन्यासह येऊन रावणाचा वध करतील व तुम्हांस घेऊन जातील. तुम्ही चिंता न करावी. तुमची काही खूण मला देता ?'

असे ऐकताच सीतेने चूडामणी हनुमानास देऊन म्हटले, 'बंधू, तू आता असं कर. रघुनाथांना तू त्वरित घेऊन ये. त्यांनी माझी सुटका करावी. त्यांना कावळ्याचा डोळा नष्ट करणाऱ्या घटनेचं स्मरण दे. तू आता उद्या इथून निघ. तू आलास म्हणून माझं दुःख कितीतरी कमी झालं.'

चूडामणी व काककथेचा संकेत घेऊन हनुमान म्हणाला, ' कल्याणी, तुमचे पतिदेव आता त्वरित इथं येतील. तुम्हांस घाई असेल तर माझ्या पाठीवर बसा. मी आजच तुम्हांस श्रीराम व सुग्रीव यांचं दर्शन घडवितो.' त्यावर सीता म्हणाली, ' नको. स्वतः रामच मला इथं येऊन घेऊन जातील.'

त्यानंतर हनुमानाने रावणास भेटण्याचा विचार केला. त्याने रक्षकांना मारून ते वन उजाड केले. दात व नखे यांच्या साह्याने रावणाच्या सेवकांना त्याने मारून टाकले. सात मंत्रिकुमार व रावण-पुत्र अक्षयकुमार यांना यमलोकास पोचविले. त्यानंतर इंद्रजित आला. त्याने हनुमानास नागपाशाने बांधले. त्याने हनुमानास रावणाच्या समोर नेऊन उभे केल्यावर रावण म्हणाला,

' तू कोण आहेस? '

' मी रामचंद्रांचा दूत आहे. तू सीतादेवींना रघुनाथांच्याकडं पाठवावंस. नाही तर त्यांच्या हातून सर्व लंकानिवासी राक्षसांचा व तुझा वध मात्र होईल.'

हे ऐकून हनुमानास मारण्यासाठी रावण उत्सुक बनला. बिभीषणाने त्याला आवरले. रावणाने हनुमानाच्या शेपटास आग लावून दिली. शेपूट जळू लागले. हे पाहून पवनपुत्र हनुमानाने आपल्या पेटत्या शेपटाने सारी लंकापुरी जाळून टाकली. सीतेस पुनः नमस्कार करून तो समुद्रावर येऊन अंगदादींना म्हणाला, ' मी सीतादेवींचं दर्शन घेतलं.' त्यानंतर सर्व रामचंद्रांपाशी आले व म्हणाले,

' सीतादेवींचं दर्शन झालं.'

' कपिवर ', रामचंद्र म्हणाले, ' तुला सीतेचं दर्शन कसं झालं? तिनं माझ्यासाठी कोणता संदेश दिला आहे ? मी विरहाच्या आगीत जळत आहे. तू सीतेची अमृतकथा ऐकवून मला शांत कर.'

' भगवन्, मी समुद्र ओलांडून लंकेत गेलो. तिथं सीतादेवींचं दर्शन घेतलं. त्यांनी दिलेला हा चूडामणी घ्यावा. आपण आता शोक करू नये. रावणाचा वध करून आपण देवींना घेऊन यावं.'

तो मणी हातात घेऊन रामचंद्र विरहाने व्याकुळ होऊन रडत

म्हणाले, 'हा मणी पाहताच, मला सीता भेटली असंच वाटलं. आता मला तिच्याकडं घेऊन चला. मी तिच्याशिवाय आता जगू शकणार नाही.'

त्या वेळी सुग्रीवादींनी रामचंद्रांची समजूत घालून त्यांना शांत केले. त्यानंतर रघुनाथ समुद्राच्या तटावर आले. तेथे त्यांना बिभीषण येऊन भेटला. त्याचा तिरस्कार त्याच्या बंधूने, रावणाने केला होता. बिभीषण म्हणाला, 'बंधू, तुम्ही सीतेला रामचंद्रांच्या स्वाधीन करावे' या अपराधामुळे रावणानें त्याचा धिक्कार केला. आता तो असहाय बनला. रामांनी त्याला आपले मित्र मानले.

श्रीरामांनी लंकेस जाण्यासाठी समुद्रास रस्ता मागितला. जेव्हा त्याने रस्ता दिला नाही, त्यावेळी रामांनी बाण मारला. समुद्र भयभीत होऊन रामांजवळ आला व म्हणाला, 'भगवन्, नलाचं साह्य घेऊन आपण मजवर पूल बांधावा. पूर्वी आपणच मला इतकं गभीर बनविलं होतं.' हे ऐकून रामचंद्रांनी नलाचे साह्य घेऊन वृक्ष व शिळाखंड यांचा एक पूल बांधला. त्या पुलावरून ते लंकेत वानरांसह गेले. सुवेलपर्वतावरून त्यांनी लंकापुरीचे निरीक्षण केले.

## युद्धखंडातील रामचरित्र

श्रीरामचंद्रांच्या आदेशानुसार नंतर अंगद रावणाकडे गेला व म्हणाला, 'रावणा, जनककुमारी सीतेस तू त्वरित रामचंद्रांकडे पोचवावंस. नाही तर व्यर्थ प्राणास मुकशील.' हे ऐकून रावणाने त्यालाच मारण्याचा प्रयत्न केला. राक्षसांकडून मारहाण झालेला अंगद रामचंद्रांकडे येऊन म्हणाला, 'भगवन्, रावणास केवळ युद्धच करायचंय.' अंगदाचे वचन ऐकून रामचंद्रांनी वानरांच्या सेनेसह लंकेत प्रवेश केला. हनुमान, मैंद, द्विविद, जांबवान, नल, नील, तार, अंगद, धूम्र, सुषेण, केसरी, गज, पनस, विनत, रंभ, शरभ, कंपन, गवाक्ष, दधिमुख, गवय, गंधमादन असे अनेक वानर तेथे जमले. असंख्य वानरांसह सुग्रीव युद्धभूमीवर येऊन पोचला. राक्षस व वानर यांच्यांत घनघोर युद्ध झाले. राक्षसांचे हत्ती, घोडे, रथ इत्यादी नष्ट झाले. हनुमानानें पर्वतशिखरा-

वरून आपला वैरी धूम्राक्षचा वध केला. नीलने अकंपन व प्रहस्त यांना मारून टाकले.

श्रीराम व लक्ष्मण हे इंद्रजिताच्या नागास्त्राने बांधले गेले असले तरी गरुडाच्या साह्याने ते मुक्त झाले. त्यानंतर या दोघां बंधूंनी बाणांनी राक्षसांची सेना नष्ट करण्यास प्रारंभ केला. श्रीरामांच्या बाणांच्या वर्षावाने रावणाची सेना जर्जर झाली. या दु:खाने कष्टी होऊन रावणाने कुंभकर्णास जागे केले. जागे होताच कुंभकर्णाने एक हजार मदिराकुंभ पिऊन तितक्याच पशूंना भक्षण केले. कुंभकर्ण रावणास म्हणाला, ‘ सीतेचं हरण करून तू पाप केलं आहेस. तू माझा मोठा भाऊ आहेस. म्हणून तुझ्या आज्ञेवरून लढण्यास जातो. मी वानरांसह रामास मारून टाकीन. ’

एवढे बोलून कुंभकर्णाने सर्व वानरांना मारण्यास प्रारंभ केला. एकदा तर त्याने सुग्रीवाला पकडले. तेव्हा सुग्रीवाने त्याचे नाक व कान कापून टाकले. नाक व कान कापल्यावर तो वानरांना भक्षण करू लागला. हे पाहून रामचंद्रांनी त्याचे दोनही हात कापून टाकले. त्याचे दोन पाय, त्याचे मस्तक कापून त्याला पृथ्वीवर पाडले. त्यानंतर कुंभ, निकुंभ, मकराक्ष, महोदर, महापार्श्व, मत्त, उन्मत्त, प्रधस, भासकर्ण, विरूपाक्ष, देवांतक, नरान्तक, त्रिशिरा, अतिकाय यांचा युद्धात बळी पडला. त्यानंतर इंद्रजिताने (मेघनाद) मायेने श्रीराम व लक्ष्मण यांना नागपाशाने बांधले. त्या वेळी हनुमानाने आणलेल्या पर्वतावरील ‘ विशल्या ’ नावाच्या औषधी वनस्पतीने राम व लक्ष्मण यांचे घाव बरे झाले. त्यांच्या शरीरांतील बाण निघाले. हनुमानाने पर्वत जेथून आणला तेथे ठेवून दिला.

इकडे मेघनादाने निकुंभिलादेवीच्या मंदिरात होम चालू केला. त्या वेळी आपल्या तीक्ष्ण बाणानें लक्ष्मणाने त्याला पराभूत केले. युद्धात त्याचा वध केला. पुत्राच्या मृत्यूचा वृत्तांत समजताच रावण संतप्त झाला. सीतेला मारण्यासाठी तो तत्पर झाला. पण अविंध्याने त्याला रोखले. तेव्हा तो सेना घेऊन युद्धभूमीवर आला. इंद्राच्या आज्ञेने मातलीने श्रीरघुनाथांना देवराज इंद्राच्या रथावर बसविले.

श्रीराम व रावण यांचे युद्ध श्रीराम व रावण यांच्यांतील युद्धासारखे झाले. त्याला दुसरी उपमाच नाही. रावणाने वानरांच्यावर प्रहार केले. हनुमानादी वानरांनी रावणावर हल्ले केले. मेघातून पाण्याचा वर्षाव व्हावा, त्याप्रमाणे रामांच्या बाणांची वृष्टी रावणावर होत होती. त्यांनी रावणाचे रथ, ध्वज, अश्व, सारथी, धनुष्य, बाहू, मस्तक यांना कापून काढले. कापलेल्या मस्तकाच्या जागी दुसरे मस्तक यायचे. हे पाहून रामचंद्रांनी ब्रह्मास्त्राने रावणाचे वक्ष:स्थल विदीर्ण करून टाकले. तो रणभूमीवर मरून पडला. रावणाच्या स्त्रियांनी फार विलाप केला. रामचंद्रांच्या आज्ञेने बिभीषणाने सर्वांचे सांत्वन करून रावणाच्या शवास अग्निसंस्कार केला.

त्यानंतर रामचंद्रांनी हनुमानाकडून सीतेस बोलावून घेतले. ती स्वरूपत: शुद्ध असली तरी अग्नीत प्रवेश करून तिने आपली विशुद्धता पटवून दिली. त्यानंतर रघुनाथांनी तिचा स्वीकार केला. इंद्रादी देवांनी स्तवन केले. ते म्हणाले, ‘ श्रीराम, तू राक्षसांचा संहार करणारा साक्षात विष्णू आहेस ! ’ रामचंद्रांच्या सांगण्यावरून इंद्राने अमृताचा वर्षाव करून सर्व वानरांना उठविले. रामचंद्रांनी लंकेचे राज्य बिभीषणास दिले.

त्यानंतर सर्वांना बरोबर घेऊन सीतेसह पुष्पकविमानात बसून श्रीरामचंद्र आलेल्या मार्गाने परत निघाले. मार्गात त्यांनी प्रसन्न चित्ताने सीतेस वन व दुर्गम स्थाने दाखविली. प्रयागात महर्षी भरद्वाजांना प्रणाम करून ते अयोध्येपाशी नंदिग्रामास आले. तेथे भरताने त्यांच्या चरणांना प्रणाम केला. अयोध्येत आल्यावर त्यांनी वसिष्ठ, कौसल्या, कैकेयी, सुमित्रा आदींना नमस्कार केला. राज्य ग्रहण करून त्यांनी ब्राह्मणांचे पूजन केले. अश्वमेधयज्ञ करून त्यांनी सर्व प्रकारची दाने दिली. प्रजेचे पुत्राप्रमाणे पालन केले. त्यांच्या राज्यात सर्व लोक धर्मपरायण होते. पृथ्वी सर्व प्रकारच्या फुलांनी बहरली होती. त्यांच्या राज्यात कोणाचाही अकाली मृत्यू होत नव्हता.

## उत्तरकांडातील रामचरित्र

रामचंद्र अयोध्येचे राज्य करीत असताना अगस्त्य आदी महर्षी त्यांचे दर्शन घेण्यासाठी आले. त्यांचे तेथे चांगले स्वागत झाले. ते ऋषी म्हणाले, 'भगवन्, आपण धन्य आहात. आपण लंकेत विजयी झालात. इंद्रजितासारख्या राक्षसास आपण मारलंत. आता त्याची चरित्रकथा सांगतो.' एवढे म्हणून त्यांनी चरित्र सांगितले. ब्रह्मदेवांचे पुत्र पुलस्त्य. त्यांचा पुत्र महर्षी विश्रवा. त्याच्या दोन पत्नी. एक पुण्योत्कटा व दुसरी कैकसी. ज्येष्ठ पुण्योत्कटाच्या पोटी कुबेराचा जन्म झाला. कैकसीच्या पोटी रावण जन्मास आला. त्याला दहा मुखे व वीस हात होते. रावणाने तपश्चर्या केल्यामुळे ब्रह्मदेवांनी त्याला वर दिला. त्याने सर्व देवांना जिंकले. कैकसीच्या दुसऱ्या पुत्राचे नाव कुंभकर्ण. तिसऱ्याचे नाव बिभीषण होते. कुंभकर्ण सदा झोपेत असायचा. बिभीषण मोठा धर्मात्मा होता. या तिघांची बहीण शूर्पणखा.

रावणाच्या पोटी मेघनाथ जन्मास आला. त्याने इंद्रास जिंकल्यामुळे त्याला इंद्रजित असेही नाव मिळाले. तो रावणापेक्षाही बलवान होता. पण लक्ष्मणाने त्याचा वध केला. अशी चरित्रकथा सांगून अगस्त्यादी ऋषी आपापल्या आश्रमाकडे निघून गेले. त्यानंतर देवांच्या प्रार्थनेने प्रभावित होऊन रामचंद्रांच्या आदेशाने शत्रुघ्नाने लवणासुरास मारून एक पुरी वसविली. तिचे नाव मथुरा. त्यानंतर भरताने रामचंद्रांच्या आज्ञेने सिंधुतीरनिवासी शैलूष नावाच्या बलोन्मत्त गंधर्वाचा व त्याच्या तीन कोटी वंशजांचा आपल्या तीक्ष्ण बाणांनी संहार केला. त्या देशाचे गांधार व मद्र असे दोन विभाग केले व आपल्या तक्ष व पुष्कर नावांच्या पुत्रांना तेथे स्थापित केले.

त्यानंतर भरत व शत्रुघ्न परत अयोध्येस आले. रामचंद्रांनी लोकापवादाच्या भीतीने सीतेस वनात सोडून दिले. वाल्मीकिमुनींच्या आश्रमात तिला दोन पुत्र झाले. त्यांची नावे कुश व लव अशी होती. त्यांनी गायिलेले रामचरित्र ऐकून रामांनी त्यांना आपले पुत्र म्हणून ओळखले. त्यांनी त्या पुत्रांना कोसलाच्या दोन राज्यांवर अभिषिक्त

केले. 'मी ब्रह्मी आहे' अशा भावनेने ध्यानयोगात आपल्या बंधूंसह, पुरवासियांसह रामचंद्रांनी परमधामात प्रवेश केला. त्यांनी अयोध्येत अकरा हजार वर्षे राज्य केले. अनेक यज्ञांची अनुष्ठाने केली. त्यांच्या नंतर सीतेचे पुत्र कोसलजनपदाचे राज्य करू लागले.

## हरिवंश व कृष्णचरित्र

श्रीविष्णूंच्या नाभिकमलातून ब्रह्मदेवांचा जन्म झाला. ब्रह्मदेवांपासून अत्री, अत्रीपासून सोम, सोमापासून बुध, व बुधापासून पुरूरवा झाला. त्याच्यापासून आयू–नहुष–ययाती अशी परंपरा उद्‌भवली. ययातीची पहिली पत्नी देवयानी असून यदू व तुर्वसू हे तिचे दोन पुत्र होत. दुसरी पत्नी शर्मिष्ठा नावाची वृषपर्व्याची पुत्री होती. तिच्या पोटी द्रुह्यू, अनू व पुरू हे तीन पुत्र झाले. यदूच्या वंशात यादव नावाचे प्रसिद्ध क्षत्रिय झाले. त्यात सर्वात श्रेष्ठ भगवान वासुदेव होते.

परम-पुरुष भगवान विष्णूच पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी वसुदेव व देवकी यांच्या पोटी पुत्ररूपाने प्रकट झाले. योगनिद्रेने पूर्वजन्मी हिरण्यकशिपूच्या सहा पुत्रांना देवकीच्या उदरात स्थापन केले. सातव्या गर्भातून बलभद्र प्रकट झाला. त्याला देवकीच्या उदरातून रोहिणीच्या गर्भात जावे लागले. म्हणून संकर्षण, रौहिणेय अशी नावे त्याची झाली.

त्यानंतर श्रावणाच्या कृष्णपक्षात अष्टमीस मध्यरात्री चार भुजाधारी भगवान श्रीहरी प्रकट झाले. त्या वेळी देवकी व वसुदेव यांनी त्यांचे स्तवन केले. तेव्हा ते दोन हातांचे लहान बालक बनले. कंसाच्या भयाने वसुदेवाने बालकास यशोदेच्या शय्येवर पोचविले व तिची नवजात बालिका आणून देवकीच्या शय्येवर ठेवून दिली. कंसाने तिला एका शिळेवर आपटले. तिने आकाशात जाताना सांगितले, 'देवकीचा आठवा पुत्र तुझा वध करणार आहे. मला मारून काय करणार ? तुला मारणाराचा तर जन्म झालेला आहे.'

असे म्हणून ती निघून गेली. तिने देवांच्या प्रार्थनेनुसार शुंभादी दैत्यांचा वध केला. तेव्हा इंद्राने स्तुती करतान म्हटले, 'आर्या, दुर्गा,

वेदगर्भा, अंबिका, भद्रकली, भद्रा. क्षेम्या, क्षेमकरी, नैकबाहु आदी नामांनी प्रसिद्ध असणाऱ्या जगदंबेस नमस्कार असो. तीनही काली जो हिचं नाव घेतो त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात.'

आर्या दुर्गा, वेदगर्भा, अम्बिका, भद्रकाल्यपि ।।
भद्रा क्षेम्या क्षेमकरी नैकबहुर्नमास्मि ताम् ।।
त्रिसंध्यं यः पठेन्नाम सर्वान् कामान् स चाप्नुयात
(१२.१२-१३)

कंसाने नवजात शिशूचा वध करण्यासाठी पूतनादिकांना पाठविले. वसुदेवाने आपल्या दोन्ही पुत्रांना रक्षणासाठी गोकुळात यशोदा व नंद यांच्या स्वाधीन केले. तेथे बलराम, श्रीकृष्ण हे दोन बंधू गोपबालकांसह गायी चारीत असत. सर्व जगताचे ते मालक असूनही व्रजात मात्र गोपालक बनले. एकदा त्यांच्या खोडचांनी त्रस्त होऊन यशोदेने श्रीकृष्णास उखळास बांधले. तो उखळासकट दोन अर्जुनवृक्षांच्यामध्ये झाला. दोन वृक्ष उन्मळून पडले. एकदा श्रीकृष्ण एका छकडयाच्या खाली झोपला होता. मातेच्या स्तनपानासाठी तो पाय झाडून रडू लागला. त्याच्या पायाच्या हलक्या आघाताने छकडा उलटून गेला.

आपले स्तनपान करवून मारण्यासाठी आलेल्या पूतनेस कृष्णाने यमसदनास पाठविले. वृंदावनात जाऊन त्याने कालियाचा पराभव केला. यमुनेच्या डोहातून त्याला हाकलून दिले. धेनुक, अरिष्ट, केशी इत्यादी असुरांचाही त्याने नाश केला. कृष्णाने इंद्रयाग बंद करून गिरिराज गोवर्धनाची पूजा सुरू केली. याने इंद्र कुपित झाला व त्याने वृष्टीस प्रारंभ केला. गोवर्धनपर्वत धारण करून कृष्णाने सर्वांचे रक्षण केले. शेवटी महेंद्राने त्याच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याला ' गोविंद' ही पदवी दिली. आपल्या अर्जुन नावाच्या पुत्रास त्याच्याकडे सोपविले. श्रीकृष्णाने पुन्हा इंद्रयागाचा उत्सव सुरू केला.

त्यानंतर कंसाच्या सूचनेवरून एकदा अक्रूराने या दोन बंधूंना रथात बसवून मथुरेस प्रयाण केले. ते निघाले तेव्हा गोपींनी खूप विलाप केला. त्या श्रीकृष्णांबरोबर भरपूर खेळल्या होत्या. मार्गात अक्रूरानेही

त्यांची पुष्कळ स्तुती केली. मथुरेस पोचल्यावर बेतालपणें बडबडणाऱ्या एका धोब्यास श्रीकृष्णानें मारून त्याची सारी वस्त्रे हिरावून घेतली. एका माळ्याची माळ स्वीकारून त्याने त्याच्यावर कृपा केली. कंसाची दासी कुब्जाने श्रीकृष्णास चंदनाचा लेप केला. कृष्णाने तिची वक्रता दूर केली. ती सुंदर रमणी दिसू लागली. पुढे रंगशालेच्या दारात कुवलयापीड नावाचा एक मत्त हत्ती श्रीकृष्णाने मारला. कंसाच्या समक्ष त्याने रंगमंचावरील चाणूर नावाच्या मल्लांस कुस्ती करून मारले. कृष्ण व बलराम यांनी चाणूर, मुष्टिक या मल्लांचा नाश केला.

त्यानंतर श्रीहरीने मथुराधिपती कंसास मारून त्याच्या पित्यास यदुवंशाचा राजा केले. कंसाच्या दोन राण्या होत्या. एकीचे नाव अस्ती व दुसरीचे प्राप्ती. या दोनही जरासंधाच्या कन्या होत्या. जरासंधानें मथुरापुरीस वेढा दिला. यदुवंशीयांसह युद्ध केले. बलराम व कृष्ण यांनी जरासंधाचा पराभव करून मथुरेचा त्याग केला. गोमंतपर्वतावर येऊन त्यांनी द्वारका नावाची नगरी निर्माण केली. त्यानें वासुदेव नाव धारण करून पौंड्रकाचा वध केला. भूमिपुत्र नरकासुराचा वध करून त्यानें हरण केलेल्या देव, गंधर्व व यक्षकन्यांशी कृष्णानें विवाह केला. त्याच्या सोळा हजार एकशेआठ राण्यांत रुक्मिणी प्रधान राज्ञी होती.

त्यानंतर श्रीकृष्ण सत्यभामेसह गरुडावर बसून स्वर्गलोकात गेले. त्यांनी इंद्राचा पराभव करून तेथील रत्नांसह मणिपर्वत व पारिजात-वृक्ष उचलून सत्यभामेच्या भवनात स्थापन केला. श्रीकृष्णांनी सांदीप-मुनींच्या आश्रमात शस्त्रांची विद्या प्राप्त करून घेतली. गुरुदक्षिणा म्हणून त्यांनी गुरूंचा मरण पावलेला मुलगा परत आणून दिला. त्यासाठी त्यांना पंचजन नावाच्या दैत्याचा पराभव करून यमराजाच्या लोकांत जावे लागले. यमानें तेथे त्यांची पूजा केली. राजा मुचुकुंदाच्या द्वारे त्यांनी कालयवनाचा वध केला. त्यावेळी मुचुकुंदानेही त्यांची पूजा केली.

भगवान श्रीकृष्ण वसुदेव, देवकी, ब्राह्मण यांचा मोठा आदर करीत. बलभद्र व देवती यांना निशठ व उल्मुक नावांचे दोन पुत्र झाले. श्रीकृष्ण व जांबवतीस सांब नावाचा पुत्र झाला. असेच पुत्र इतर राण्यांनाही झाले. रुक्मिणीस प्रद्युम्न झाला. तो सहा दिवसांचा असतानाच

शंबरासुराने त्याचे मायाबलानें हरण केले. त्यानें या बालकास समुद्रात फेकून दिले. समुद्रातील एका मत्स्यानें त्याला गिळले. तो मत्स्य एकानें पकडला व शंबरासुरास भेट दिला. शंबरासुरानें तो मत्स्य मायावतीच्या स्वाधीन केला. मायावतीनें आपल्या पतीस मत्स्याच्या पोटात पाहिले. ती तो मोठा होताच म्हणाली, 'नाथ, मी आपली पत्नी रती आहे. आपण माझे पतिदेव कामदेव आहात. पूर्वी शंकरांनी आपणांस दग्ध केल्यानं आपण 'अनंग' झालात. या शंबरासुरानं नंतर माझं हरण केलं. मी त्याची पत्नी होण्याचं मान्य नाही केलं. आपण माया जाणता. शंबरासुरास आपण मारावं.'

हे ऐकून प्रद्युम्नाने शंबरासुराचा वध केला. आपली भार्या मायावतीस घेऊन तो श्रीकृष्णांपाशी आला. त्याला पाहून श्रीकृष्ण व रुक्मिणी यांना आनंद झाला. प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध. बलीचा बाण नावाचा एक पुत्र होता. त्याच्या कन्येचे नाव उषा. तिचे निवासस्थान शोणिपुरात होते. बाणाने शिवांची तपस्या केल्याने त्यांनी त्याला स्वत:चा पुत्र मानले. शंकर-पार्वती क्रीडा करीत असताना उषेच्या मनात पतीची अभिलाषा निर्माण झाली. पार्वती तिला म्हणाली, 'वैशाखाच्या द्वादशीस रात्री तुझ्या स्वप्नात जो पुरुष येईल तोच तुझा पती असेल.' या रात्री तिला स्वप्नात एका पुरुषाचे दर्शन झाले. बाणासुराच्या कुंभाडक नावाच्या मंत्र्याच्या मुलीचे नाव चित्रलेखा होते. तिनें बनविलेल्या चित्रांवरून उषेने स्वप्नातील पुरुष ओळखला. तो श्रीकृष्णांचा नातू अनिरुद्ध होता. त्याचे व उषेचे लग्न झाले. शिवांच्या सूचनेवरून बाणासुराच्या ध्वजाचे पतन झाले. अनिरुद्ध व बाणासुर यांच्यात भयंकर युद्ध झाले.

श्रीकृष्ण, प्रद्युम्न, बलभद्र यांनीही शंकराबरोबर युद्ध केले. नंदी, गणेश, कार्तिकेय आदी प्रमुख वीरांना गरुडाने पराभूत केले. कृष्णांनी जृंभणास्त्राचा प्रयोग केला. तेव्हा शंकर जांभई देऊन झोपी गेले. याच वेळी कृष्णांनी बाणासुराच्या हजार हातांना कापून टाकले. पण शिवांच्या मध्यस्थीने श्रीकृष्णांनी बाणास अभयदान दिले. त्यानंतर शिवादिकांनी कृष्णांचे पूजन केले. अनिरुद्ध व उषा यादवांसहित द्वारकेत राहू लागले.

अनिरुद्धाचा पुत्र वज्र. त्यानें मार्कंडेयमुनींपासून सर्व विद्या

मिळविल्या. बलभद्रानें प्रलंबासुरास मारले. यमुनेची धारा रोखून धरली. बदलून टाकली. द्विविद नावाच्या वानराचा संहार केला. भगवान श्रीकृष्ण अनेक रूपे धारण करून रुक्मिणी व इतर राण्या यांच्यासह आनंदाने राहू लागले त्यांना अनेक पुत्र झाले.

## महाभारताची कथा

भगवान विष्णूंच्या नाभिकमलातून ब्रह्मदेव निर्माण झाले. त्यांच्यापासून अत्री, अत्रीपासून चंद्र, चंद्रापासून बुध, बुधापासून इलानंदन पुरूरवा निर्माण झाला. पुरूरव्यापासून आयू, आयूपासून नहुष व नहुषापासून ययाती निर्माण झाला. ययातीचा पुत्र पुरू. या पुरूच्या वंशात भरत व भरताच्या कुलात राजा कुरू झाला. कुरूच्या वंशात शान्तनूचा जन्म झाला. शांतनूपासून गंगानंदन भीष्म झाले. त्यांचे दोन लहान बंधू होते. एक चित्रांगद व दुसरा विचित्रवीर्य. ही शांतनूची व सत्यवतीची अपत्ये होत.

शांतनू स्वर्गलोकी गेल्यावर भीष्मांनी अविवाहित राहाण्याची प्रतिज्ञा केली. विचित्रवीर्याने राज्याचे पालन केले. चित्रांगद लहानपणीच चित्रांगद नावाच्या गंधर्वाकडून मारला गेला. भीष्मांनी संग्राम करून शत्रूच्या अंबिका व अंबालिका या कन्यांना आणले. विचित्रवीर्याच्या या दोन पत्नी झाल्या. राजा विचित्रवीर्य क्षयानें स्वर्गवासी झाला. सत्यवतीच्या अनुमतीने व्यासांनी अंबिकेच्या गर्भापासून धृतराष्ट्र व अंबालिकेच्या गर्भातून पांडू यांना निर्माण केले. धृतराष्ट्रानें गांधारीपासून शंभर पुत्रांना जन्म दिला. त्यांत दुर्योधन सर्वांत मोठा होता.

राजा पांडू वनात राहात होता. एका ऋषीच्या शापानें शतशृंगमुनींच्या आश्रमाजवळ स्त्रीसंगानंतर तो मरण पावला. कुंतीच्या गर्भातून धर्माच्या अंशापासून युधिष्ठिराचा जन्म झाला. वायूपासून भीम व इंद्रापासून अर्जुन जन्मला. पांडूची दुसरी पत्नी माद्री होती. तिला अश्विनीकुमारांच्या अंशांपासून नकुल व सहदेव हे दोन पुत्र झाले. शापवशतेनें पांडूचा मृत्यू झाल्यावर माद्री त्याच्याबरोबर सती गेली. कुंतीस विवाहपूर्वकाळात सूर्याच्या अंशापासून एक पुत्र झाला होता.

त्याचे नाव कर्ण. तो दुर्योधनाच्या आश्रयानें राहात होता.

दैवयोगानें कौरव व पांडव यांच्यांत वैरभावाची आग प्रज्वलित झाली. दुर्योधन मोठ्या कुटिल बुद्धीचा होता. त्यानें एका लाखेच्या घरात पांडवांना जाळून मारण्याचा प्रयत्न केला. परंतु पांच पांडव आपल्या मातेसह त्या जळत्या घरातून बाहेर पडले. तेथून ते एकचक्रा नगरीत आले. मुनिवेषात ते एका ब्राह्मणाच्या घरी राहू लागले. तेथे बक नावाच्या राक्षसाचा वध करून ते पांचालराज्यात आले. तेथे द्रौपदीचे स्वयंवर होते. अर्जुनानें मत्स्याचा भेद करून पण जिंकला व द्रौपदीचा पत्नी म्हणून स्वीकार केला. त्यानंतर पांडव जिवंत आहेत. असे दुर्योधनादिकांना समजले.

पांडवांनी कौरवांकडून हक्काचे अर्धे राज्य प्राप्त करून घेतले. अर्जुनानें अग्निदेवापासून गांडीव धनुष्य व दिव्य रथ यांना मिळविले. त्याला युद्धप्रसंगी भगवान कृष्णांसारखे सारथी मिळाले. त्यानें आचार्य द्रोणापासून ब्रह्मास्त्रादी आयुधे संपादन केली. कधी नष्ट न होणाऱ्या बाणांची प्राप्ती त्याला झाली. सर्व पांडव विद्यांत प्रवीण झाले. पांडवांनी सर्वत्र विजय मिळविला. युधिष्ठिर राज्य करू लागला. त्यानें सुवर्ण-राशीने परिपूर्ण असा राजसूययज्ञ केला. त्याचे हे वैभव दुर्योधनास अस्वस्थ करणारे झाले. त्यानें कर्ण, शकुनी यांच्या मदतीनें एक द्यूतसभा भरविली. त्या सभेत कौरवांनी पांडवांना कपट करून पराभूत केले. त्यानंतर आपल्या बंधूंसह युधिष्ठिर वनात निघून गेला.

तेथे प्रतिज्ञेनुसार पांडवांनी बारा वर्षे काढली. वनात एकदा कृष्णकृपेनें दुर्वासांना पांडवांनी त्यांच्या हजारो शिष्यांसह तृप्त केले. त्यांच्या बरोबर पत्नी दौपदी व पुरोहित धौम्य होते. बारा वर्षे पूर्ण झाल्यावर पांडव विराटनगरीत आले. तेथे युधिष्ठिर ' कंक ' नाव धारण करून एका ब्राह्मणाच्या रूपात राहिला. भीमसेन बल्लव झाला. अर्जुनानें स्वतःस बृहन्नडा नाव धारण केले. पांडवांची पत्नी द्रौपदी सैरंध्री या नावानें राहू लागली. एका रात्री द्रौपदीचे सतीत्व हरण करू पाहाणाऱ्या कीचकाचा वध भीमसेनानें केला. त्यानंतर कौरव विराट-राजाच्या गायी हरण करण्यासाठी आले. त्यांचा पराभव अर्जुनानें केला.

त्याचवेळी कौरवांनी पांडवांना ओळखले. श्रीकृष्णांच्या सुभद्रा नावाच्या बहिणीनें अर्जुनाशी विवाह केला होता. त्यांच्या पुत्राचे नाव अभिमन्यू होते. विराटराजानें आपल्या कन्या उत्तरा अभिमन्यूस दिली.

धर्मराज युधिष्ठिर सात अक्षौहिणी सेनेचा स्वामी झाला. कौरवांच्या बरोबर युद्ध करण्याचा प्रसंग निर्माण झाला. प्रथम श्रीकृष्णांनी परम क्रोधी दुर्योधनाचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. युधिष्ठिरास अर्धे राज्य देण्याची सूचना श्रीकृष्णांनी केली. परंतु दुर्योधनाने सुईच्या अग्राएवढीही भूमी देण्यास नकार दिला. तेव्हा युद्ध अटळ झाले. विदुरानें आपल्या घरी भगवान श्रीकृष्णांचे यथोचित पूजन व स्वागत केले. युधिष्ठिरापाशी येऊन ते म्हणाले, 'महाराज, आपण आता दुर्योधनाबरोबर युद्धाची तयारी करावी.'

## कौरवपांडवांचे युद्ध

युधिष्ठिर व दुर्योधन यांच्या सेना कुरुक्षेत्रावर युद्धासाठी सिद्ध झाल्या. आपल्या शत्रुपक्षात पितामह भीष्म, आचार्य द्रोण आदी गुरुजनांना पाहून अर्जुनाच्या मनात करुणा उत्पन्न झाली. त्याला भगवान श्रीकृष्ण म्हणाले, 'पार्था, भीष्म आदी गुरुजनांबद्दल शोक करण्यात अर्थ नाही. मनुष्याचं शरीर विनाशशील आहे. पण आत्म्याचा नाश कधीही होत नाही. हा आत्माच परब्रह्म आहे. तू कर्मयोगाचा आश्रय घेऊन क्षात्रधर्माचं पालन कर.'

श्रीकृष्णांचे हे वचन ऐकून, रथारूढ होऊन अर्जुन युद्धभूमीवर आला. त्याने शंखाचा ध्वनी केला. दुर्योधनाच्या सेनेचे पहिले सेनापती भीष्माचार्य झाले. पांडवांचा सेनापती शिखंडी होता. दोन्ही सैन्यांत मोठेच युद्ध झाले. भीष्मांनी दहा दिवसांत आपल्या बाणांनी पांडवांच्या अधिकांश सेनेचा पराभव केला. त्यानंतर वीरवर भीष्मांवर अर्जुनाने बाणांची वृष्टी केली. द्रुपदाच्या प्रेरणेने शिखंडीनेंही भीष्मांवर बाणांचा वर्षाव केला. दोन्ही बाजूंचे हत्तीस्वार, घोडेस्वार, रथी, पायदळ शिपाई खूप मरण पावले. भीष्मांचा मृत्यू त्यांच्या अधीन होता. त्यांनी वायुलोकात जाण्याची तयारी करून बाणांच्या शय्येवर ते पडून राहिले. ते

उत्तरायणाची प्रतीक्षा करीत भगवान विष्णूंच्या ध्यानात मग्न झाले.

भीष्म बाणशय्येवर झोपले तेव्हा दुर्योधन शोकाने व्याकुळ बनला. त्याने सेनापतिपद आचार्य द्रोणांना दिले. पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न झाला. त्या दोघांत मोठे युद्ध झाले. विराट, द्रुपद इत्यादी राजे द्रोणरूपी समुद्रात बुडून गेले. हत्ती, घोडे, रथ इत्यादींनी युक्त अशी दुर्योधनाची विशाल वाहिनी धृष्टद्युम्नाच्या हातून मारली गेली. एवढ्यात 'अश्वत्थामा मारला गेला' असे शब्द द्रोणांच्या कानी पडले. हे ऐकताच द्रोणाचार्यांनी शस्त्र खाली ठेवले. धृष्टद्युम्नाच्या बाणांनी जखमी होऊन ते पृथ्वीवर पडले.

द्रोण मोठे दुर्धर्ष होते. सर्व क्षत्रियांचा नाश करीत असताना त्यांना पांचव्या दिवशी मृत्यू आला. दुर्योधन पुन्हा शोकाने व्याप्त झाला. त्यानंतर त्याचा सेनापती कर्ण झाला. पांडवांच्या सेनेचा प्रमुख अर्जुन झाला. कर्ण व अर्जुन यांच्यांतही घनघोर युद्ध झाले. अर्जुनाने कर्णाचा वध केला. त्यानंतर राजा शैल्य कौरवांच्या सेनेचा अधिपती झाला. त्याच दिवशी दुपारी युधिष्ठिराने त्याला ठार केले. दुर्योधनाची सर्व सेना युद्धात मारली गेली. शेवटी भीमाशी त्याचे युद्ध झाले गदेचा प्रहार करून भीमाने दुर्योधन व त्याचे लहान भाऊ यांना मारले.

महाभारताच्या संग्रामाच्या अठराव्या दिवशी रात्री महाबली अश्वत्थाम्याने पांडवांच्या निद्रित असलेल्या एक अक्षौहिणी सेनेस ठार केले. त्याने द्रौपदीच्या पांच पुत्रांना, पांचाळांना व धृष्टद्युम्नाला मारून टाकले. पुत्रहीन द्रौपदी रडू लागली. तेव्हा अर्जुनाने अश्वत्थाम्याचा पराभव करून त्याच्या मस्तकातील मणी बाहेर काढला. द्रौपदीच्या विनवणीवरून अश्वत्थामा जिवंत सुटला; तरी त्याने उत्तरेच्या गर्भास नष्ट करण्यासाठी तिच्यावर अस्त्राचा प्रयोग केला. भगवान कृष्णांच्या कृपेने गर्भास जीवदान मिळाले.

उत्तरेच्या या गर्भातील शिशूच पुढे राजा परीक्षित या नावाने विख्यात झाला. कृतवर्मा, कृपाचार्य, अश्वत्थामा हे तीन कौरवपक्षीय त्या संग्रामात जिवंत राहिले. पांच पांडव, सात्यकी, भगवान श्रीकृष्ण हे सात पांडवपक्षातील उरले. त्या वेळी सर्वत्र अनाथ स्त्रियांचे आर्त

नाद प्रकट झाले. भीमसेनादी बंधूंनी त्यांचे सांत्वन करून मृतांचे अग्नि-संस्कार केले. त्यानंतर कुरुक्षेत्रात शरशय्येवर शान्तनुनंदन भीष्म पहुडले होते. त्यांच्याकडे युधिष्ठिर आला. त्यांच्याकडून त्याने शांति-धर्म, राजधर्म, मोक्षधर्म, दानधर्म इत्यादींसंबंधीचा उपदेश ऐकला.

त्यानंतर तो सिंहासनावर आरूढ झाला. त्यानंतर त्या शत्रुमर्दन राजाने अश्वमेधयज्ञ करून ब्राह्मणांना दाने दिली.

## यदुकुलाचा संहार, पांडवांचे स्वर्गगमन

युधिष्ठिर राजसिंहासनावर बसल्यावर धृतराष्ट्राने गृहस्थाश्रम सोडून वनात निवास करण्याचा निश्चय केला. त्याच्याबरोबर गांधारी व पृथा म्हणजे कुंती होती. दावानलात दग्ध होऊन विदुर स्वर्गवासी झाले. भगवान विष्णूंनी या प्रकारे श्रीकृष्णांचा अवतार धारण करून पृथ्वीचा भार उतरविला. दैत्यदानवांचा संहार केला. भूमीचा भार वाढविणाऱ्या यदुकुलाचाही संहार एका ब्राह्मणाच्या शापाने मुसळाच्या साह्याने झाला. अनिरुद्धाच्या वज्र नावाच्या पुत्रास राज्याच्या सिंहासनाचा अधिकार प्राप्त झाला. त्यानंतर प्रभासक्षेत्री स्वतः श्रीहरींनी आपल्या स्थूल देहाचा त्याग केला. बलभद्र शेषनागाचे अवतार होते. त्यांनी पातालात प्रवेश केला. भगवान श्रीकृष्ण जगता-तून जाताच समुद्राने मर्यादा सोडून द्वारकापुरीस बुडवून टाकले.

मरण पावलेल्या यादवांचा अग्निसंस्कार करून अर्जुनाने त्यांच्या-साठी धनाचे दान केले. भगवान कृष्णांच्या राण्या पूर्वी अप्सरा होत्या. अष्टवक्राच्या शापाने त्या मानवी झाल्या. त्यांना घेऊन अर्जुन हस्तिना-पुरास निघाला. मार्गात काही बलदंड गवळ्यांनी अर्जुनाचा तिरस्कार केला. त्याचे सर्व हिरावून घेतले. यामुळे अर्जुनाच्या मनास मोठाच शोक झाला. व्यासांच्या संमतीने त्याने श्रीकृष्णांच्या जवळ राहाण्याचे ठरविले. तो हस्तिनापुरास आला व युधिष्ठिरास म्हणाला,

'बंधू, धनुष्य तेच आहे. बाण तेच आहेत. रथही तोच. घोडे तेच. पण भगवान श्रीकृष्णांविना सर्व व्यर्थ झालं आहे.'

हे ऐकताच धर्मराज युधिष्ठिराने राज्यावर परीक्षितास स्थापन

केले. द्रौपदी व बंधू यांच्यासह तो महाप्रस्थानास निघाला. श्रीहरींच्या अष्टोत्तरशत नामांचा जप ते सर्वजण यात्रेत करीत. या यात्रेत क्रमश: द्रौपदी, सहदेव, नकुल, अर्जुन, भीमसेन असे पृथ्वीवर पडले. युधिष्ठिरास फार शोक झाला. त्यानंतर तो इंद्राने पाठविलेल्या रथावर चढला. दिव्यरूप बंधूंसह तो स्वर्गास गेला. तेथे त्याने दुर्योधनादी धृतराष्ट्रपुत्र पाहिले. त्यास भगवान श्रीकृष्णांचेही दर्शन होऊन अतिशय आनंद झाला.

## बुद्ध व कल्की यांचे अवतार

पूर्वी देव व असुर यांच्यांत घनघोर संग्राम झाला. दैत्यांनी देवांचा पराभव केला. तेव्हा देव 'त्राहि त्राहि' करून भगवंतांना शरण गेले. भगवान मायामोहरूपात राजा शुद्धोदनाचे पुत्र झाले. त्यांनी दैत्यांना मोहित केले. त्यांनी वैदिक धर्माचा त्याग केला. बुद्धाचे अनुयायी दैत्य बौद्ध गणले गेले. मायामोहच 'आर्हत'रूपात प्रकट झाला. त्यांनी दुसऱ्या अनेकांना 'आर्हत' बनविले. अशा प्रकारे त्याचे अनुयायी वैदिक धर्मापासून वंचित झाले. पाखंडी बनले. त्यांनी नरकात नेणारी कर्मे केली. ते सर्व कलियुगाच्या शेवटी वर्णसंकर होऊन नीच पुरुषांकडून दान घेतील. ते डाकू व दुराचारी होतील. अधर्मात सर्वांना रुची वाटेल. राजारूपधारी म्लेच्छ मनुष्याचे सर्व काही भक्षण करील.

त्यानंतर भगवान कल्की प्रकट होतील. ते विष्णुयशाचे पुत्र होऊन याज्ञवल्क्यांना आपले पुरोहित बनवितील. त्यांना शस्त्र–अस्त्रविद्येचे संपूर्ण ज्ञान असेल. ते या शस्त्रांनी म्लेच्छांचा संहार करतील. चार वर्ण, चार आश्रम यांची शास्त्रीय मर्यादा स्थापन करतील. सर्व प्रजा उत्तम धर्ममार्गात राहील. त्यानंतर भगवान श्रीहरी कल्कीरूपाचा त्याग करून आपल्या धामात जातील. पुन्हा सत्य युगाचे साम्राज्य होईल. प्रत्येक आपापल्या वर्णानुसार, आश्रमानुसार आचरण करील.

*

# ३ तीर्थक्षेत्रमाहात्म्य

## तीर्थसेवनाचे फल

अग्निपुराणात अग्निदेवांनी एकशे नवव्या अध्यायापासून पुढे पांच-सहा अध्यायांत तीर्थक्षेत्राच्या माहात्म्याबद्दल वर्णन केले आहे. तीर्थांचा महिमा भोग व मोक्ष देणारा आहे. ज्याचे हात, पाय, मन संयमात आहे, ज्याला विद्या, तपस्या, उत्तम कीर्ती लाभली आहे, तोच तीर्थाचे फल मिळवितो. ज्याने प्रतिग्रह सोडला आहे, जो नियमित भोजन करतो, जो इंद्रियांना स्वाधीन ठेवतो, तो पापरहित असून तीर्थयात्रेचे फल त्याला मिळते. ज्याने कधी तीन रात्रींचा उपवास केला नाही, तीर्थांची यात्रा केली नाही, गायींचे दान दिले नाही तो दरिद्री असतो. यज्ञानें ज्याची प्राप्ती होते ते फल तीर्थसेवनानेंही मिळते.

यस्य हस्तौ च पादौ च पुनश्चैव सुसंयतम् ।
विद्या तपश्च कीर्तिश्च तीर्थफलमश्नुते ।
प्रतिग्रहादुपावृत्तो लघ्वाहारो जितेन्द्रियः ।।
निष्पापपस्तीर्थयात्री तु सर्वयज्ञफलं लभेत् ।
अनुपोष्य त्रिरात्राणि तीर्थान्यनभिगम्य च ।।
अदत्त्वा काञ्चनं गांश्च दरिद्रो नाम जायते ।
तीर्थाभिगमने तत् स्याद् यद् यज्ञेनाप्यते फलम् ।।
(१०९.१-४)

पुष्कर हे श्रेष्ठ तीर्थ आहे. तेथे तीन संध्यांच्या वेळी दहा हजार कोटी तीर्थांचा निवास असतो. पुष्करात सर्व देवांसह ब्रह्मदेव निवास करतात. तेथे देव, मुनी स्नान करून सिद्धी प्राप्त करतात. पुष्करात देव व पितर यांचे पूजन करणारा मनुष्य अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त करून घेतो व ब्रह्मलोकात जातो. कार्तिकी पौर्णिमेस येथे अन्नदान

करणारा शुद्धचित्त बनून ब्रह्मलोकात जातो. पुष्कराला जाणे दुष्कर आहे. पुष्करात तपस्येचा योग येणे दुष्कर आहे. पुष्करात दानाची संधी प्राप्त होणेही दुष्कर आहे. तेथे निवास करण्याचे सौभाग्यही दुष्कर आहे. येथील निवास, जप, श्राद्ध शंभर पिढयांचा उद्धार करणारे आहे. येथेच जंबूमार्ग व तण्डुलिकाश्रमतीर्थही आहे.

कण्वाश्रम, कोटितीर्थ, नर्मदा, अर्बुद (आबू) हीसुद्धा उत्तम तीर्थे आहेत. चर्मण्वती, सिंधू, सोमनाथ, प्रभास, सरस्वती-समुद्रसंगम, सागर ही श्रेष्ठ तीर्थे आहेत. पिंडारकक्षेत्र, द्वारका, गोमती, ही सर्व प्रकारची सिद्धी देणारी क्षेत्रे आहेत. भूमितीर्थ, ब्रह्मातुंगतीर्थ, पंचनद उत्तम तीर्थे आहेत. भीमतीर्थ, गिरीन्द्रतीर्थ, पापनाशिनी देविका नदी, पवित्र विनशनतीर्थ (कुरुक्षेत्र), नागोद्भेद, अघादन, कुमारकोटितीर्थ, ही सर्व देणारी तीर्थे आहेत.' मी कुरुक्षेत्रास जाईन, कुरुक्षेत्रास जाईन, राहीन ' असे जो नेहमी म्हणतो तो शुद्ध होऊन जातो. त्याला स्वर्ग-लोकाची प्राप्ती होते, तेथे निवास करणाऱ्या माणसास श्रीहरिधामाची प्राप्ती होते. कुरुक्षेत्रानजीक सरस्वतीनदी वाहाते. तीत स्नान करणारा मनुष्य ब्रह्मलोकात जातो. तेथील धूळही परम गती प्राप्त करून देणारी आहे. धर्मतीर्थ सुवर्णतीर्थ, उत्तम गंगाद्वार (हरिद्वार), पवित्र कनखल, भद्रकर्णहृद, गंगासरस्वतीसंगम, ब्रह्मावर्त; ही पापनाशक तीर्थे आहेत.

भृगुतुंग, कुब्जाम्र गंगोद्भेद, ही पापांचा नाश करणारी तीर्थे होत. वाराणशी (काशी) सर्वोत्तम तीर्थ आहे. यालाच अविमुक्तक्षेत्र असे नाव आहे. कपालमोचनतीर्थ उत्तम आहे. प्रयाग तर सर्व तीर्थांचा राजा आहे. गोमती व गंगा यांचा संगम म्हणजे पावन तीर्थ आहे. गंगा कोठेही असली तरी सर्वत्र स्वर्गलोक देणारी आहे. राजगृह पवित्र तीर्थ आहे. शालग्राम सर्व पापांचा नाश करणारे तीर्थ आहे. वटेश, वामन, कालिकासंगम, ही तीर्थेही उत्तम आहेत.

लौहित्यतीर्थ, करतोयानदी, शोणभद्र, ऋषभतीर्थ श्रेष्ठ आहेत. श्रीपर्वत, कोलचल, सह्यगिरी, मलयगिरी, गोदावरी, तुंगभद्रा, वरदा-यिनी कावेरीनदी, तापी, पयोष्णी, रेवा (नर्मदा), दंडकारण्य; ही उत्तम तीर्थे आहेत. कालंजर, मुंजवट,शूर्पारक, मंदाकिनी, चित्रकूट व

शृंगवेरपुर ही श्रेष्ठ तीर्थे आहेत. अवनीही उत्तम तीर्थ आहे. अयोध्या सर्व पापांचा नाश करणारी आहे. नैमिषारण्य परम पवित्र तीर्थ आहे. भोग व मोक्ष प्रदान करणारे हे तीर्थ आहे.

## गंगेचा महिमा

एकशे दहाव्या अध्यायात संक्षेपाने गंगेचा महिमा वर्णन केला आहे. गंगेचे सदा सेवन करायला हवे. ती भोग व मोक्ष देणारी आहे. ज्यात गंगा वाहाते तो देश श्रेष्ठ व पावन असतो. उत्तम गतीच्या शोधात असणाऱ्या मनुष्यास गंगा नदी सर्वोत्तम आहे. गंगेचे सेवन केल्यावर माता व पिता अशा दोनही कुळांचा उद्धार होतो, एक हजार चांद्रायणव्रतांपेक्षा गंगेचे जलपान उत्तम आहे. एक मास गंगेचे सेवन करणारा मनुष्य सर्व यज्ञांचे फल प्राप्त करून घेतो.

गंगादेवी सर्व पापांना दूर करते. स्वर्ग देणारी ही नदी आहे. गंगेत जोपर्यंत हाडें पडत आहेत, तोपर्यंत स्वर्गात निवास मिळतो. आंधळ्या-पांगळ्यांनी गंगा सेवन केल्यास ते देवाप्रमाणे होतात. गंगा-तीर्थातील माती धारण करणारा मनुष्य सूर्याप्रमाणे पापनाशक होतो. गंगेचे दर्शन, तिचा स्पर्श, तिचे कीर्तन करून मनुष्य आपल्या शेकडो, हजारो पिढ्यांच्या पुरुषांना पवित्र करतो.

## प्रयागमाहात्म्य

एकशे अकराव्या अध्यायात संक्षेपाने प्रयागाचे महत्त्व वर्णन केले गेले आहे. भोग व मोक्ष देणारे हे प्रयागक्षेत्र आहे. प्रयागात ब्रह्मा, विष्णू आदी देव व थोर थोर मुनी निवास करतात. नद्या, समुद्र, सिद्ध, गंधर्व, अप्सरा यांचाही निवास या तीर्थात आहे. प्रयागात तीन अग्नि-कुंडे आहेत. त्यांतून गंगा सर्व तीर्थांच्या सह मोठ्या वेगाने वाहाते. येथे त्रिभुवनविख्यात सूर्यकन्या यमुनाही आहे. गंगा व यमुना यांचा मध्यभाग पृथ्वीचा जघन मानला आहे. प्रयागला ऋषींच्या जघनाच्या खालचे उपस्थ मानले आहे.

प्रतिष्ठान (झूसी) सहित प्रयाग, कंबल, अश्वतर नाग व

भोगावतीतीर्थं यांना ब्रह्मदेवांच्या यज्ञाची वेदी मानली आहे. प्रयागात मूर्तिमान वेद व यज्ञ राहातात. या तीर्थाचे स्तवन, नामसंकीर्तन, येथील मातीला स्पर्श, यांमुळे सर्व पापांचा नाश होतो. प्रयागामध्ये गंगा-यमुनेच्या संगमावर केलेले दान, श्राद्ध, जपादी कर्म अक्षय होते.

वेद अथवा लोक; कोणी सांगितले तरी शेवटी प्रयागतीर्थात मरण्याचा विचार सोडीत नाहीत. प्रयागमध्ये साठ कोटी दहा हजार तीर्थांचा निवास आहे. म्हणून ते सर्वश्रेष्ठ आहे. वासुकी नागाचे स्थान, भोगावतीतीर्थं, हंसप्रपतन, ही उत्तम तीर्थे आहेत. कोटी गोदाने करून जे फल मिळेल ते प्रयागात तीन दिवसांत स्नान करून प्राप्त होते. प्रयागात माघमासात स्नान केल्यावर मनीषी पुरुष असे म्हणतो की, 'गंगा सर्वत्र सुलभ आहे. पण गंगाद्वार, प्रयाग, गंगासागरसंगम, या तीन स्थानांवर तो जाणं फार कठीण आहे.' प्रयागात दान देऊन मनुष्य स्वर्गात जातो. या लोकी तो राजांचाही राजा होतो.

अक्षयवटाच्या समीप, संगमात मृत्यू प्राप्त झाला तर भगवान विष्णूंच्या धामात मनुष्य जातो. प्रयागात परम रमणीय उर्वशीपुलिन, संध्यावट, कोटितीर्थ, दशाश्वमेधघाट, गंगा-यमुनासंगम, रजोहीन मानस-तीर्थ, वासरक्ततीर्थ; ही सर्व उत्तम स्थाने आहेत.

## वाराणसीचे माहात्म्य

एकशेंबाराव्या अध्यायात वाराणसीमाहात्म्य वर्णन संक्षेपाने आले आहे. वाराणसी परम उत्तम तीर्थ आहे. येथें श्रीहरींचे नाम घेऊन जो निवास करतो, त्याला भोग व मोक्ष यांची प्राप्ती होते. महादेवांनी पार्वतीस या तीर्थाचे माहात्म्य सांगितले आहे. ते म्हणाले, 'गौरी, मी या क्षेत्रास कधीच मुक्त नाही केलं. मी सदा इथंच निवास करतो. म्हणून यास 'अविमुक्त' क्षेत्र म्हणतात. या क्षेत्रात केलेला जप, तप, होम, दान अक्षय्य होतं. दगडानं दोन पाय तोडून बसावं, पण काशी कधीच सोडू नये. हरिश्चंद्र, आम्रातकेश्वर, जपेश्वर, श्रीपर्वत, महालय, भृगू, चंडेश्वर, केदारतीर्थ, ही आठ या अविमुक्त क्षेत्रात परम गोपनीय तीर्थे आहेत.

'म्हणं हे अविमुक्त क्षेत्र सर्व गोपनीयांत परम गोपनीय आहे. हे दोन योजनं लांब व अर्धा योजन रुंद आहे. 'वरणा' व 'असी' या दोन नद्यांच्या मध्ये 'वाराणसीपुरी' आहे. इथं स्नान, जप, होम, मृत्यू, देवपूजन, श्राद्ध, दान, निवास, जे काही असेल ते सर्व भोग व मोक्ष देणारं होतं.'

## नर्मदामाहात्म्य, श्रीपर्वतमहिमा

एकशेतेराव्या अध्यायात संक्षेपाने नर्मदेचे महत्त्व वर्णन केले आहे. नर्मदा श्रेष्ठ तीर्थ आहे. गंगेच्या जलाचा स्पर्श होताच मनुष्य त्वरित पवित्र होतो. पण नर्मदेच्या जलाचे दर्शन घेताच तो पवित्र होतो, नर्मदातीर्थ शंभर योजने लांब व दोन योजने रुंद आहे. अमरकंटक-पर्वताच्या चारही दिशांना नर्मदेसंबंधी साठ कोटी साठ हजार तीर्थे आहेत. कावेरीसंगमतीर्थ फार पवित्र आहे.

आता या श्रीपर्वताचे माहात्म्य पाहा. एकदा गौरीनें श्रीदेवीचे रूप धारण करून मोठी तपस्या केली. त्यामुळे श्रीहरी प्रसन्न होऊन त्यांनी वरदान दिले, 'देवी, तुला अध्यात्म ज्ञान प्राप्त होईल. तुझा हा पर्वत 'श्रीपर्वत' या नावानं विख्यात होईल. याच्या चारही दिशांनी शंभर योजनंपर्यंत स्थान अत्यंत पवित्र राहील.' येथे केलेले दान, तप, जप, श्राद्ध, सर्व काही अक्षय होते. हे तीर्थ सर्व देणारे आहे. येथील मृत्यू शिवलोकाची प्राप्ती करून देतो. या पर्वतावर भगवान शिव नेहमी पार्वतीबरोबर क्रीडा करीत असतात. येथेच हिरण्यकशिपू तपस्या करून बलवान झाला. मुनींना येथे तपस्या करून सिद्धी प्राप्त होतात.

## गयामाहात्म्य

एकशेचौदाव्या अध्यायात गयेचे माहात्म्य आले आहे. सर्व तीर्थांत गया श्रेष्ठ आहे. एका समयाची हकीगत आहे. गय नावाच्या असुराने फार मोठी तपस्या केली. त्यामुळे देव सतप्त झाले व ते क्षीर-सागरात महाविष्णूंपाशी गेले व म्हणाले,

'भगवन्, आपण गयासुरापासून आमचं रक्षण करावं.'

'तथास्तु' असे म्हणून श्रीहरी गयासुरापाशी गेले व म्हणाले,

'एखादा वर माग.'

'भगवन्, मी सर्व तीर्थांहून अधिक पवित्र कसा होईन ?'

'तू म्हणशील तसंच होईल.'

इतके म्हणून भगवान निघून गेले. सर्व मनुष्यें त्या दैत्याचे दर्शन घेऊन भगवंतापाशी आले. पृथ्वी रिकामी झाली. स्वर्गवासी देव, ब्रह्मा आदी प्रधान देव श्रीहरींच्यापाशी जाऊन म्हणाले,

'देवा, श्रीहरी, पृथ्वी व स्वर्ग रिकामे पडले आहेत. दैत्याचं दर्शन होताच सर्व लोक आपल्या धामाकडे वळतात.'

'ब्रह्मदेव, तुम्ही या सर्व देवांसह गयासुराकडं जावं. यज्ञभूमी तयार करण्यासाठी त्याचं शरीर मागावं.'

भगवंतांचा हा आदेश ऐकून सर्व देवांसह ब्रह्मदेव गयासुराकडे जाऊन म्हणाले, 'दैत्यप्रवर, मी तुझ्याकडं अतिथी होऊन आलो आहे. तुझ्या पावन शरीराचं दान मी यज्ञासाठी मागतो आहे.'

'तथास्तु' म्हणून गयासुर धरणीवर पडला. ब्रह्मदेवांनी त्याच्या मस्तकावर यज्ञ सुरू केला. पूर्णाहुतीचा समय होताच गयासुराचे शरीर चंचल झाले. हे पाहून ब्रह्मदेवांनी विष्णूंना म्हटले, 'देवा, हा गयासुर पूर्णाहुतीच्या वेळी विचलित होत आहे.' तेव्हा विष्णूंनी धर्मास बोलावले व म्हटले, 'तुम्ही या असुराच्या शरीरावर देवमयी शिला ठेवून द्यावी. सर्व देव त्या शिलेवर बसतील. त्यांच्यांत माझी एक गदाधर मूर्तीही विराजमान होईल.'

हे ऐकून धर्माने देवमयी विशाल शिला गयासुराच्या शरीरावर ठेविली. धर्माची पत्नी धर्मवती. तिला एक कन्या झाली. तिचे नाव धर्मव्रता होते. ती मोठी तपस्विनी होती. ब्रह्मदेवांचे पुत्र मरीचींनी तिच्याशी विवाह केला. ते धर्मव्रतेशी रममाण झाले. एके दिवशी महर्षी वनात कुश व पुष्प आदी आणून फार थकून 'प्रिये, माझे पाय दाब बरं.'

'ठीक आहे' म्हणून धर्मव्रता मुनींचे पाय दाबू लागली. मुनींना झोप लागली. एवढ्यात तेथे ब्रह्मदेव आले. धर्मव्रतेने विचार

केला, 'मी ब्रह्मदेवांचं पूजन करू ? की मुनींची चरणसेवाच करू ? ब्रह्मदेव तर गुरूंचे गुरू. माझ्या पतिदेवांनाही पूज्य. म्हणून त्यांचं पूजन करणं उचित आहे' असा विचार करून तिने पूजासामग्री जमा करून ब्रह्मदेवांची पूजा सुरू केली. झोप संपताच मरीचीमुनी जागे झाले. त्यांना धर्मव्रता जवळ कोठे दिसली नाही. आज्ञा उल्लंघन करणाऱ्या पत्नीस शाप देताना त्यांनी म्हटले. 'तू शिला होऊन जा.'

'मुने, चरणसेवा सोडून मी आपणांस पूज्य असणाऱ्या पितामहांची पूजा केली.' धर्मव्रता कुपित होऊन म्हणू लागली, 'म्हणून मी सर्वथा निर्दोष आहे. असं असूनही आपण मला शाप दिलात ? म्हणून आपणा-सही भगवान शिवांकडून शाप प्राप्त होईल.' इतके म्हणून धर्मव्रतेनें अग्नीत प्रवेश केला. हजारो वर्षांची कठोर तपस्या तिनें केली. श्रीविष्णू आदी देवांनी प्रसन्न होऊन तिला म्हटले,

'वर माग.'

'आपण देवांनी मला शापातून मुक्त करावं.'

'शुभे, महर्षी मरीचींनी दिलेला शाप व्यर्थ कसा होईल ? तू देवांच्या चरणचिन्हांनी अंकित अशी परमपवित्र शिला होशील. गया-सुराचं शरीर स्थिर राखण्यासाठी तुझा उपयोग होईल. त्या वेळी देवव्रता, देवशिला, सर्वदेवस्वरूपा, सर्वतीर्थमयी पुण्यशिला म्हणून तुझा लौकिक होईल.'

'देवांनो, आपण मला प्रसन्न झालात. शिला झाल्यावर माझ्यावर ब्रह्मदेव, विष्णू, महादेव आदी देव, गौरी-लक्ष्मी आदी देवी सदा विराज-मान राहावेत.' 'तथास्तु' म्हणून सर्व देव स्वर्गास निघून गेले. या देवमयी शिलेस धर्माने गयासुराच्या शरीरावर ठेविले. पण तो त्या शिलेसह हलू लागला. हे पाहून रुद्रादी देव त्या शिलेवर जाऊन बसले. त्या देवांसहित तो असुर हलत राहिला. तेव्हा देवांनी क्षीरसागरशायी भगवान विष्णूंना प्रसन्न केले. श्रीहरींनी त्यांना आपली गदाधरमूर्ती प्रदान केली व म्हटले, 'देवगण, आपण आता जावं. मी या मूर्तीच्या रूपानं तिथं उपस्थित होईन.'

दैत्याचे शरीर स्थिर राखण्यासाठी साक्षात गदाधारी भगवान

विष्णू तेथे उपस्थित झाले. पूर्वी गद नावाचा एक भयंकर असुर होता. त्याला विष्णूंनी मारले व त्याच्या हाडांपासून विश्वकर्म्यानें गदेची निर्मिती केली. हीच 'आदिगदा' होय. या गदेने भगवान गदाधरांनी 'हेती' आदी राक्षसांचा वध केला. म्हणून त्यांना 'आदिगदाधर' म्हणतात.

देवमयी शिलेवर गदाधर स्थित होताच गयासुर स्थिर झाला. ब्रह्मदेवांनी पूर्णाहुती दिली. त्यानंतर गयासुराने देवांना म्हटले, 'ही वंचना कशासाठी ? विष्णूंनी म्हटलं असतं तरी मी स्थिर झालो नसतो ? देवांनो, तुम्ही मला शिला आदीनं दबविलं आहे. तर आपण मला एखादा वर द्यावा.'

'दैत्यप्रवर, तीर्थ निर्माण करण्यासाठी आम्ही तुझ्या शरीरास स्थिर केलं आहे. म्हणून तुझं हे क्षेत्र भगवान विष्णू, शिव व ब्रह्मदेव यांचं निवासस्थान होईल. सर्व तीर्थांहून हे तीर्थ प्रसिद्ध होईल. पितरांसाठी हे क्षेत्र ब्रह्मलोकाची प्राप्ती करून देणारं होईल.'

इतके म्हणून सर्व देव तेथेच राहू लागले. देवी ,तीर्थं इत्यादींनीही तेथेच निवास केला. ब्रह्मदेवांनी यज्ञ पूर्ण करून ऋत्विजांना दक्षिणा दिली. पांच कोसांचे गयाक्षेत्र व पंचावन्न गावे समर्पित केली. त्यांनी सुवर्णाचे अनेक पर्वत बनवून दिले. दूध व मध यांच्या नद्या समर्पित केल्या. दही व तूप यांची सरोवरे दान केली. अन्नांचे मोठे पहाड, कामधेनू, कल्पवृक्ष, सोन्या-चांदीची घरे यांचेही दान दिले. या सर्व वस्तूंचे दान करताना ब्रह्मदेव म्हणाले, 'विप्रांनो, आता तुम्ही अन्य व्यक्तींपासून कधी याचना करून दान मागू नका.'

त्यानंतर प्रत्यक्ष धर्माने यज्ञ केला. तेव्हा लोभवश होऊन ब्राह्मण पुन्हा दान मागण्यासाठी तेथे गेले. तेव्हा ब्रह्मदेवांनी त्यांना शाप दिला, 'आता तुम्ही विद्याहीन व लोभी व्हाल. आता या नद्यांतून दूध इत्यादी दिसणार नाही. सुवर्णाचे पर्वतही दगडांचे बनतील.' तेव्हा सर्व ब्राह्मण ब्रह्मदेवांना म्हणाले, 'भगवन्, आपल्या शापानं आमचं सर्वस्व नष्ट झालं. आता आमची उपजीविका कशी चालावी ?' तेव्हा ब्रह्मदेव ब्राह्मणांना म्हणाले, 'आता या तीर्थापासूनच तुमची उपजीविका चालेल.

जोपर्यंत सूर्य व चंद्र राहतील तोपर्यंत या वृत्तीवर तुमचा जीवननिर्वाह होईल. जे लोक या गयातीर्थात येतील, ते तुमची पूजा करतील. हव्य, कव्य, धन, श्राद्ध इत्यादींच्या द्वारे तुमचा सत्कार करतील. त्यांच्या शंभर पिढ्या नरकातून स्वर्गलोकी जातील. स्वर्गात राहाणारे त्यांचे पितर परम पदास जातील.'

महाराज गयानेही या क्षेत्रात खूप अन्न व दक्षिणा देऊन यज्ञ केला. त्याच्या नावानेच या गयापुरीची प्रसिद्धी झाली. पांडवांनीही या गयेतील श्रीहरींची आराधना येथे येऊन केली होती.

अग्निदेवांनी गयेचा यात्राविधीही समजावून दिला. श्राद्धविधीही समजावून सांगितला.

# ४ सृष्टिरचना

## जगताची निर्मिती

अग्निपुराणाच्या सतराव्या अध्यायात अग्निदेवांनी जगताच्या निर्मितीची हकीगत सांगितली आहे. श्रीहरीच स्वर्गआदींचे निर्माते आहेत. सृष्टी, प्रलय ही त्यांचीच रूपे आहेत. सृष्टीच्या आदिकारणात तेच आहेत. तेच सगुण, तेच निर्गुण आहेत. सर्वांत प्रथम सत्स्वरूपी अव्यक्त ब्रह्मच होते. त्या वेळी आकाश नव्हते. दिवस-रात्रीचा अनुभव नव्हता. नंतर सृष्टिकालात परमपुरुष श्रीविष्णूंनी प्रकृतीत प्रवेश करून तिला क्षुब्ध केले. विकृत केले. त्या प्रकृतीपासून महत्तत्त्व झाले. त्याच्यापासून अहंकार प्रकट झाला. अहंकार तीन प्रकारचा आहे. १ वैकारिक (सात्त्विक), २ तेजस (राजस) व ३ भूतादिरूप (तामस) तामस अहंकारापासून शब्दतन्मात्राचे आकाश उत्पन्न होते. आकाशापासून

स्पर्शतन्मात्राचा वायू निर्माण होतो. वायूपासून तन्मात्राचे जल निर्माण होते. जलापासून गंधतन्मात्राचा प्रादुर्भाव होतो.

तामस अहंकारापासून ही सर्व सृष्टी निर्माण होते. इंद्रियें तेजस वा राजस अहंकारापासून प्रकट होतात. दहा इंद्रियांच्या दहा देवता अधिष्ठात्या असून अकरावे इंद्रिय मन आहे. ही वैकारिक अथवा सात्त्विक अहंकाराची सृष्टी आहे. त्यानंतर नाना प्रकारची सृष्टी निर्माण करण्याच्या इच्छेनें भगवान स्वयंभूने सर्वांत प्रथम जलाची निर्मिती केली. त्यानंतर आपल्या शक्तीनें वीर्य निर्माण केले. जलास 'नार' असे नाव आहे. कारण ते नरापासून उत्पन्न झाले. जलच पूर्वी भगवानांचे 'अयन' म्हणजे निवासस्थान होते. म्हणून त्यांना नारायण अशी संज्ञा प्राप्त झाली.

स्वयंभू श्रीहरींनी जे वीर्य स्थापन केले ते जलात सुवर्णमय अंड्याच्या रूपात प्रकट झाले. त्यातून साक्षात ब्रह्मदेव प्रकट झाले. भगवान हिरण्यमयानें त्याच अंड्यात एक वर्षभर निवास केला होता. नंतर त्याने त्याचे दोन भाग केले. एकाचे नाव 'द्युलोक' आणि दुसऱ्याचे नाव 'भूलोक' झाले. या दोन विभागांच्या मध्ये त्यानें आकाशाची निर्मिती केली. जलावर तरंगती पृथ्वी निर्माण करून दहा दिशांचे विभाग केले. त्यानंतर प्रजापतीनें काल, मन, वाणी, काम, क्रोध, रती, विद्युत, वज्र, मेघ, रोहित, इंद्रधनुष्य, पक्षी, पर्जन्य इत्यादींची निर्मिती केली.

त्यानंतर यज्ञाच्या सिद्धीसाठी मुखातून ऋक्, यजू, साम हे वेद प्रकट केले. त्यांच्या द्वारे साध्यगणांनी देवांच्यासाठी यज्ञ केला. नंतर ब्रह्मदेवांनी आपल्या हातातून लहान-मोठी भूते निर्माण केली. सनत्कुमाराची उत्पत्ती केली. क्रोधापासून रुद्र प्रकट झाला. मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, वसिष्ठ या सातांची निर्मिती ब्रह्मदेवांनी आपल्या मनापासून केली. रुद्रगणाने प्रजावर्गाची निर्मिती केली. ब्रह्मदेवांनी आपल्या शरीराचे दोन भाग केले. अर्धा भाग पुरुष व अर्धा स्त्री बनला. त्या नारीच्या गर्भातून नंतर प्रजेची निर्मिती केली. हा आदिपुरुष स्वायंभुव मनू व आदिनारी शतरूपा असून त्यांच्यापासून

मानवी सृष्टी प्रकट झाली.

## स्वायंभुव मनूचा वंश

स्वायंभुवमनू व त्याची तपस्विनी भार्या शतरूपा यांच्या पोटी प्रियव्रत व उत्तानपाद नावांचे दोन पुत्र, एक सुंदर कन्या यांची निर्मिती झाली. कन्येचे नाव देवहूती असून ती कर्दमऋषींची भार्या झाली. राजा प्रियव्रतास सम्राट कुक्षी व विराट या नावांचे सामर्थ्यशाली पुत्र झाले. उत्तानपाद व सुरुची यांना उत्तम नावाचा पुत्र झाला. सुनीतीपासून त्याला ध्रुव प्राप्त झाला. कुमार ध्रुवाने उत्तम कीर्ती मिळविण्यासाठी तीन हजार दिव्य वर्षांचे तप केले. भगवान विष्णूंनी त्याच्यावर प्रसन्न होऊन त्याला अढळ असे ध्रुवपद दिले. ध्रुवाचा हा अभ्युदय पाहून शुक्राचार्यांनी म्हटले, 'या ध्रुवाच्या अद्‌भुत तपस्येचा प्रभाव पाहा केवढा मोठा. याचं शास्त्रज्ञान कसं अद्‌भुत आहे. सप्तर्षींच्या पुढंच हा स्थित झाला आहे.'

या ध्रुवाची पत्नी शंभू. त्यांना श्लिष्टी व भव्य नावांचे पुत्र झाले. श्लिष्टीची पत्नी सुच्छाया. त्यांना क्रमशः रिपू, रिपुंजय, पुष्य, वृकल, वृकतेजा या पांच निष्पाप पुत्रांचा लाभ झाला. रिपू व बृहती यांना चाक्षुष व सर्वतेज नावांचे पुत्र झाले. चाक्षुषाने वीरण प्रजापतीची कन्या पुष्करणीपासून मनूला जन्म दिला. मनू व नड्‌वला यांना दहा उत्तम पुत्र झाले. उरू, पुरू, शतद्युम्न, तपस्वी, सत्यवाक, कवी, अग्निष्टुत, अतिरात्र, सुद्युम्न, अभिमन्यू ही त्यांची नावे होत. उरू व आग्नेयीने अंग, सुमना, स्वाती, क्रतू, अंगिरा व गय अशा सहा तेजस्वी पुत्रांना जन्म दिला. अंगाने सुनीथापासून एका वेन नावाच्या संतानास जन्म दिला. हा प्रजेचे रक्षण न करता सदा पापकर्मांत रमायचा. त्याला मुनींनी कुशांनी मारले.

त्यानंतर ऋषींनी संतानासाठी वेनाच्या डाव्या हाताचे मंथन केले. यातून राजा पृथूचा जन्म झाला. त्याने यज्ञ करून सर्वांना आनंदित केले. वेनकुमार पृथूने धनुष्य व बाण घेऊन सर्व प्रजेचे रक्षण केले. राजसूययज्ञात दीक्षित झालेल्या नरेशांत पृथू पहिला भूपाल होता.

मागध व सूत यांनी त्याचे स्तवन केले. तो प्रजेचे रंजन करणारा राजा झाला. त्याने प्रजेच्या रक्षणासाठी अन्नधान्याची निर्मिती करण्याकरिता गोरूपधारिणी पृथ्वीचे दोहन केले. त्या वेळी देव, मुनिवृंद, गंधर्व, अप्सरा, पितर, दानव, सर्प, लता, पर्वत, मनुष्य यांच्याद्वारे पृथ्वीने सर्वांना दूध दिल्याने त्यांनी प्राण धारण केले. पृथूस दोन धर्मज्ञ पुत्र झाले. त्यांची नावे अंतर्धी व पालित अशी होती. अंतर्धानास शिखंडिनीपासून हविर्धन नावाचा पुत्र झाला. अग्निकुमारी धिषणाने हविर्धानाच्या अंशापासून सहा पुत्रांना जन्म दिला. प्राचीनबर्ही, शुक्र, गय, कृष्ण, व्रज, अजिन अशी त्यांची नावे होती.

प्राचीनबर्ही मुख्यत्वेकरून यज्ञांत राहायचा. त्यामुळे पृथ्वीवर सर्वत्र कुश फैलावले होते. प्राचीनबर्हीषाची पत्नी समुद्रकन्या सवर्णाने दहा पुत्रांना आपल्या गर्भात धारण केले. ते सर्व ‘ प्रचेता ’ या नावांनी प्रसिद्ध होऊन धनुर्वेदात तत्पर झाले. ते समान धर्माचे आचरण करून, समुद्राच्या जलात राहून हजार वर्षांसाठी तप करू लागले. त्यांना भगवान विष्णूंनी प्रजापती होण्याचा वर दिला. ते जेव्हा संतुष्ट होऊन जलाच्या बाहेर आले, तेव्हा त्यांनी सर्व भूमंडल व आकाश सघन वृक्षांनी व्याप्त झालेले पाहिले. तेव्हा त्यांनी आपल्या मुखातील अग्नी व वायू यांच्या साह्याने वृक्षांना जाळून टाकले. वृक्षांचा हा संहार पाहून राजा सौम्य त्या प्रचेतांना म्हणाला,

‘आपण आपला कोप शांत करावा. हे वृक्ष आपणांस एक ‘ मारिषा ’ नावाची सुंदर कन्या अर्पण करतील. ही कन्या तपस्वी मुनी कंडूच्या अंशापासून प्रम्लोचा नावाच्या अप्सरेच्या गर्भातून उत्पन्न झाली. मीच या कन्येचं पालन पोषण केलं. हिच्या गर्भापासून दक्ष उत्पन्न होतील. ते प्रजेची वृद्धी करतील.’

प्रचेतांनी त्या कन्येस स्वीकारले. तिच्या गर्भातून दक्ष उत्पन्न झाला. दक्षाने चर, अचर, द्विपद, चतुष्पद आदी प्राण्यांची मानसिक सृष्टी निर्माण करून अनेक कन्यांना निर्माण केले. त्याने त्यांतील दहा धर्मराजास अर्पण केल्या. तेरा कन्या कश्यपास दिल्या. सत्तावीस कन्या चंद्रास, चार अरिष्टनेमीस, दोन बहुपुत्रास व दोन अंगिरास दिल्या.

पूर्वी मानसिक संकल्पातून सृष्टी निर्माण व्हायची. दक्षकन्यांपासून मैथुनापासून निर्मिती होत गेली.

धर्मराजाच्या दहा पत्नींपासून अनेक संताने झाली. विश्वा नावाच्या पत्नीपासून विश्वेदेव प्रकट झाले. साध्येने साध्यांना जन्म दिला. मरुत्वतीने मरुत्वानास व वसूने वसुगणास निर्माण केले. भानूपासून भानू व मुहूर्तापासून मुहूर्त नावाचे पुत्र झाले. धर्मापासून घोष नावाचा, यामीपासून नागवीथी नावाची पुत्र व कन्या यांची निर्मिती झाली. पृथ्वीस मरुत्वतीपासून विषय निर्माण झाला. संकल्पापासून संकल्पांची निर्मिती झाली. चंद्रापासून नक्षत्ररूपिणी पत्नींपासून आठ पुत्र झाले.

चंद्राच्या आठ पुत्रांची नावे अशी—आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास. हे आठ वसू होत. त्यांना वैतण्डय, श्रम, शांत, मुनी नावांचे पुत्र झाले. ध्रुवाचा पुत्र लोकान्तकारी काल व सोमाचा पुत्र वर्चा. धर व मनोहरा यांच्यापासून द्रविण, हुतहव्यवह, शिशिर, प्राण व रमण यांची उत्पत्ती झाली. अनिलाचा पुत्र पुरोजय व अनलाचा अविज्ञात पुत्र. अग्नीचा पुत्र कुमार. त्यानंतर शाख, विशाख, नैगमेय नावांचे पुत्र झाले. कृत्तिकेच्या गर्भातून कुमार झाला. तो कार्तिकेय नावाने प्रसिद्ध झाला. कृत्तिकेचा दुसरा पुत्र सनत्कुमार, प्रत्यूषचा देवल व प्रभासास विश्वकर्मा झाला. विश्वकर्मा शिल्पज्ञ होता.

सुरभीस कश्यापासून अकरा रुद्र झाले. सतीने तपस्येने महादेवांना प्रसन्न केले. तिला त्यांच्यापासून अजैकपाद, अहिर्बुंध्न्य, त्वष्टा व रुद्र हे चार पुत्र झाले. त्वष्टयाचा पुत्र विश्वरूप. हर, बहुरूप, त्र्यंबक, अपराजित, वृषाकपी, शंभू, कपर्दी, वैवत, मृगव्याध, सर्प व कपाली, हे अकरा रुद्र होत.

## कश्यपादींचे वंश

आता अदिती आदी दक्ष कन्यांपासून कश्यपांची संतती पाहू. चाक्षुषमन्वन्तरात तुषित नावाचे बारा देव होते. तेच पुन्हा वैवस्वत. मन्वन्तरात कश्यपांच्या अंशापासून अदितीच्या गर्भात आले. विष्णू,

शक्र, त्वष्टा, धाता, अर्यमा, पूषा, विवस्वान, सविता, मित्र, वरुण, भग व अंशू हे बारा आदित्य झाले. अरिष्टानेमीस चार पत्नींपासून सोळा संताने झाली. बहुपुत्रास कपिला, लोहिता आदीपासून विद्युत्स्वरूपाच्या चार प्रकारच्या कन्या झाल्या. अंगिरा मुनींना ऋचा झाल्या. कृशाश्वास दोन पत्नींपासून देवांची दिव्य आयुधे प्राप्त झाली.

आकाशात जसा सूर्याचा उदय होतो व तो मावळतो, त्याचप्रमाणे देव युगा-युगात प्रकट होतात व नाहीसे होतात. कश्यपांना पत्नी दिती पासून हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष नावांचे दोन पुत्र झाले. सिंहिका नावाची कन्याही झाली. ही विप्राचीत्ती नावाच्या दानवाची पत्नी होय. तिच्या गर्भातून राहू आदींची निर्मिती झाली. हिरण्यकशिपूस पराक्रमी असे चार पुत्र झाले. ल्हाद, अनुल्हाद, प्रल्हाद, संल्हाद अशी त्यांची नावे होती. ल्हादाचा पुत्र ह्रद. संल्हादाचे शिबी, व बाष्कल. प्रल्हादाचा पुत्र विरोचन. विरोचनाचा बली. बलीस शंभर पुत्र झाले. बाणासुर सर्वांत ज्येष्ठ होता. हिरण्याक्षाचे पांच पुत्र. शंबर, शकुनी, द्विमूर्धा, शंकू व आर्य अशी त्यांची नावे होती.

कश्यपांची दुसरी पत्नी दनूच्या गर्भापासून शंभर दानवपुत्र जन्मास आले. त्यांतील स्वर्भानूची कन्या सुप्रभा होती. पुलोमा दानवाची पुत्री शची. उपदानवाची कन्या हयशिरा, वृषपर्व्याची शर्मिष्ठा होती. पुलोमा व कालका या वैश्वानराच्या कन्या. या दोनही कश्यपांच्या पत्नी झाल्या. त्यांना कोटयवधी पुत्र झाले. प्रल्हादाच्या वंशात चार कोटी निवातकवच नावाचे दैत्य झाले. कश्यपांना ताम्रापासून सहा पुत्र झाले. काकी, श्येनी, भासी, गृध्रिका, शुचिग्रीवा इत्यादीही कश्यपांच्या भार्या होत. त्यांना काकादी पक्षी झाले. ताम्राचे पुत्र घोडे व उंट झाले. विनताचे अरुण व गरुड नावांचे दोन पुत्र. सुरसापासून हजारो सर्प झाले. कद्रूस शेष, वासुकी, तक्षक आदी हजारो नाग झाले. क्रोधवशास दंशनशील दातांचे सर्प झाले. धरापासून जलपक्षी झाले. सुरभीपासून गाय, म्हैस इत्यादी पशू झाले. इराच्या गर्भापासून तृणादी उत्पन्न झाले. खसापासून यक्ष, राक्षस व मुनीस अप्सरा, अशी संतती झाली. अरिष्टास गंधर्व झाले. अशी ही कश्यपांची स्थावरजंगम सृष्टी.

या सर्वांना पुन्हा असंख्य पुत्र झाले. देवांनी दैत्यांना युद्धात जिंकले. आपले पुत्र मरण पावलेले पाहून दितीनें कश्यपांना सेवेनें संतुष्ट केले. इंद्राचा नाश करणारा पुत्र तिला हवा होता. ती व्रतपालनात तत्पर राहिली. गर्भवती असताना भोजन केल्यावर पाय न धुताच ती झोपी गेली. हे छिद्र पाहून इंद्रानें तिच्या गर्भात प्रवेश केला. त्यानें गर्भाचे तुकडे केले. पण व्रताच्या प्रभावानें ते मरण पावले नाहीत. ते सर्व अत्यंत तेजस्वी एकोणचाळीस मरुत नावाचे देव झाले.

ब्राह्मण व औषधी यांचा राजा चंद्रमा झाला. जलाचा स्वामी वरुण बनला. राजांचा राजा कुबेर झाला. द्वादश सूर्यांचे अधीश्वर श्रीविष्णू झाले. वसूंचा राजा पावक झाला. मरुद्‌गणांचा स्वामी इंद्र झाला. प्रजापतींचा स्वामी दक्ष व दानवांचा अधिपती प्रल्हाद झाला. पितरांचा यमराज व भूतादिकांचे स्वामी शिव बनले. शैलांचा राजा हिमवान व नद्यांचा स्वामी सागर झाला. गंधर्वांचा चित्ररथ, नागांचा वासुकी, सर्पांचा तक्षक व पक्ष्यांचा गरूड राजा झाला. हत्तींचा ऐरावत, गायींचा नंदी, वनचर जीवांचा स्वामी सिंह व वनस्पतींचा स्वामी प्लक्ष (पिंपरी) झाला. घोड्यांचा प्रमुख उच्चैःश्रवा झाला. सुधन्वा पूर्वेचा रक्षक झाला. दक्षिणेचा शंखपद, पश्चिमेचा केतुमान, उत्तरेचा हिरण्यरोमक रक्षणकर्ता झाला.

## विविध सर्गांचे वर्णन

प्रथम महत्तत्त्वाची निर्मिती झाली. यालाच ब्राह्मसर्ग म्हणतात. नंतर दुसरी तन्मात्रांची सृष्टी झाली. हिला भूतसर्ग म्हणतात. तिसरी वैकारिक सृष्टी झाली. तिला ऐन्द्रियकसर्ग म्हणतात. असा तीन प्रकारचा प्राकृतसर्ग आहे. चौथ्या प्रकारच्या सृष्टीस ' मुख्य सर्ग ' म्हणतात. वृक्ष-पर्वतादी स्थावरसृष्टीस मुख्य म्हणतात. ' तिर्यक्तस्रोता 'मध्ये पशु-पक्षी येतात. तैर्यग्योन्य हा पांचवा सर्ग आहे. ऊर्ध्वस्रोतांच्या सृष्टीस देवसर्ग म्हणतात. हा सहावा सर्ग होय. त्यानंतर अर्वाक्स्रोतांची सृष्टी झाली. हा सातवा मानवसर्ग होय. आठवा अनुग्रहसर्ग सात्त्विक व तामसही आहे. शेवटचे पाच ' वैकृतसर्ग ' असून प्रारंभीचे तीन ' प्राकृतसर्ग ' होत.

प्राकृत व वकृत आणि नववा कौमारसर्ग, हे एकूण नऊ सर्ग ब्रह्मदेवांकडून प्रकट झाले. ख्याती आदी दक्षकन्यांशी भृगूआदी महर्षींनी विवाह केला. काही लोक नित्य, नैमित्तिक, प्राकृत, या तीन भेदांची सृष्टी मानतात. प्रतिदिन होणारा 'नित्यसर्ग' आहे. भृगूंना त्यांची पत्नी ख्यातीपासून धाता व विधाता या दोन देवांचा लाभ झाला. लक्ष्मी नावाची कन्याही झाली. ही भगवान विष्णूंची पत्नी झाली. इंद्राने स्वतःच्या अभ्युदयासाठी त्यांचे स्तवन केले.

धाता व विधाता यांना अनुक्रमे प्राण व मृकण्डू नावाचे दोन पुत्र झाले. मृकण्डूस मार्कंडेय झाले. त्यांना वेदशिरा नावाचा पुत्र झाला. मरीचीस संभूतीपासून पौर्णमास नावाचा पुत्र झाला. अंगिरास स्मृतीपासून अनेक पुत्र व सिनीवाली, कुहू, राका व अनुमती या कन्या झाल्या. अत्रींना अनसूयेपासून सोम, दुर्वास व दत्तात्रेय या नावांचे पुत्र झाले. यांतील दत्तात्रेय महान योगी पुरुष होते.

पुलस्त्य मुनींची पत्नी प्रीती. त्यांना दत्तोली नावाचा पुत्र झाला. पुलहास क्षमेपासून सहिष्णू व सर्पपादिक यांचा जन्म झाला. क्रतूस सन्नतीपासून वालाविल्य नावांचे साठ हजार पुत्र झाले. हे तेजस्वी असून अंगठ्याएवढे होते. वसिष्ठांना ऊर्जेपासून राजा, गात्र, ऊर्ध्वबाहू, सवन, अनक, शुक्र, सुतपा या सात ऋषींचा जन्म झाला. स्वाहा व अग्नीस पावक, पवमान, शुची नावांचे पुत्र झाले. अजास अग्निष्यात्त, बर्हिषद्, अनग्नी व साग्नी हे पितर झाले. त्यांना स्वधापासून मेना व वैधारिणी या दोन कन्या झाल्या. अधर्माची पत्नी हिंसा. त्यांना अमृत नावाचा पुत्र व निकृती नावाची कन्या झाली. या दोघांना भय व नरक हे दोन पुत्र झाले. माया व वेदना या त्यांच्या पत्नी झाल्या. मायाने भयापासून मृत्यू नावाचा पुत्र प्राप्त करून घेतला. वेदनाने नरकापासून दुःख नावाच्या पुत्रास जन्म दिला. मृत्यूपासून व्याधी, जरा, शोक, तृष्णा, क्रोध यांची उत्पत्ती झाली.

ब्रह्मदेवांना एक रडणारा पुत्र झाला. रुदनामुळे त्याचे नाव रुद्र असे झाले. ब्रह्मदेवांनी त्याला भव, शर्व, ईशान, पशुपती, भीम, उग्र, महादेव या नावांनी पुकारले. रुद्राची पत्नी सती. हिने आपल्या पित्या-

वर, दक्षावर रागावून देहत्याग केला. हिमवानाची कन्या म्हणून तिनें पुन्हा जन्म घेतला. ती शंकरांची पत्नी झाली.

## भुवनकोश व स्वायंभुव सर्ग

आग्निध्र, अग्निबाहू, वपुष्मान, द्युतिमान, मेधा, मेधातिथी, भव्य, सवन, क्षय हे प्रियव्रताचे पुत्र होते. त्यांचा दहावा पुत्र ज्योतिषमान नावाचा होता. त्यांच्या पित्याने त्यांना सात द्वीपे दिली. आग्निध्रास जंबूद्वीप मिळाले, मेधातिथीस प्लक्षद्वीप प्राप्त झाले, वपुष्मानास शाल्मलिद्वीप, ज्योतिष्मानास कुशद्वीप, द्युतिमानास क्रौंचद्वीप व भव्यास शाकद्वीप मिळाले. सवनास पुष्करद्वीप प्राप्त झाले. आग्निध्राने आपल्या पुत्रांत जंबूद्वीपास वाटून दिले. नाभीस हिमवर्ष (भारतवर्ष), किंपुरुषास हेमकूटवर्ष, हरिवर्षास नैषधवर्ष, इलावृतास इलावृतवर्ष, रम्यकास रम्यकवर्ष, हिरण्यवानास श्वेतवर्ष व कुरूस उत्तरकुरुवर्ष प्राप्त झाले. भद्राश्वास भद्राश्ववर्ष, केतुमालास केतुमालवर्ष देऊन प्रियव्रत वनात निघून गेला. शालग्रामक्षेत्रात त्यानें तपश्चर्या केली व विष्णुलोक प्राप्त करून घेतला.

किंपुरुषादी आठ वर्षांत सुखाची समृद्धी असून यत्न न करताच सर्व भोगसिद्धी प्राप्त होतात. तेथे जरामृत्यू, धर्माधर्म, उत्तम-मध्यम-अधम असे भेद नाहीत. तेथें कधी युगपरिवर्तन होत नाही. हिमवर्षाच्या नाभीस मेरू देवीपासून ऋषभदेव पुत्ररूपाने प्राप्त झाले. ऋषभाचा पुत्र भरत. या भरतामुळेच भारतवर्ष हे नाव प्राप्त झाले. भरताचा मुलगा सुमती. सुमतीचा पुत्र इंद्रद्युम्न. त्याचा परमेष्ठी व परमेष्ठीचा प्रतिहार पुत्र. त्याचा प्रतिहर्ता, त्याचा भव, त्याचा उद्गीथ, त्याचा प्रस्तार, त्याचा विभू पुत्र होय. विभूचा पृथू, पृथूचा नक्त पुत्र. नक्ताचा गय. गयाचा नर. नराचा पुत्र विराट. विराटाचा महावीर्य व त्याचा धीमान. धीमानाचा महांत व त्याचा पुत्र मनस्यू. त्याचा पुत्र त्वष्टा, त्याचा विरज, त्याचा रज पुत्र होय. रजाचा शत्रुजित पुत्र असून त्याला शंभर पुत्र झाले. त्यांत विश्वज्योती प्रमुख होता. त्याने भारतवर्षाची अभिवृद्धी

केली. हा सर्व वृत्तांत एकशेसातव्या अध्यायात आलेला आहे.

## भुवनकोशमंडल व भूमंडलादी द्वीपे

यानंतर एकशेआठाव्या अध्यायात अग्निदेवांनी भुवनकोश व भूमंडलादी द्वीपे यांचे वर्णन केले आहे. जंबू, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौञ्च, शाक व पुष्कर ही सात द्वीपे चारही दिशांनी खारे पाणी, इक्षुरस, मदिरा, घृत, दधी, दुग्ध व मधुर जळ यांच्या सात समुद्रांनी वेढलेली आहेत. जंबूद्वीप या सर्व द्वीपांत मध्यवर्ती आहे. त्याच्याही आत मेरुपर्वत आहे. त्याचा विस्तार चौऱ्यांशी हजार योजने आहे. तो सोळा हजार योजने पृथ्वीत घुसला आहे. वर त्याचा भाग बत्तीस हजार योजने आहे. हा पर्वत पृथ्वीरूपी कमळाच्या कर्णिकेप्रमाणे स्थित आहे. त्याच्या दक्षिणेस हिमवान, हेमकूट, निषध व उत्तरेस नील, श्वेत, शृंगी हे वर्षपर्वत आहेत. निषध व नील हे दोन पर्वत एक एक लाख योजने फैलावले आहेत. इतर पर्वत दहा हजार योजनांपेक्षा कमी आहेत.

मेरुपर्वताच्या दक्षिणेस पहिले वर्ष भारतवर्ष आहे. दुसरे किंपुरुष, तिसरे हरिवर्ष. उत्तरेस रम्यक, हिरण्मय व उत्तरकुरू ही वर्षे आहेत. त्यांच्यामध्ये इलावृतवर्ष आहे. यात सुवर्णपर्वत आहे. याच्या चारही दिशांना मंदराचल, गंधमादन, विपुल, सुपार्श्व या नावांचे पर्वत आहेत. या पर्वतावर कदंब, जंबू, पिंपळ, वट अशावृक्षांची दाटी आहे. जंबू वृक्षापासूनजंबूद्वीप हे नाव पडले. जंबूवृक्षाचे फळ हत्तीसारखे मोठे असून त्याच्यापासून जंबू नदी प्रवाहित झाली आहे. हिच्यापासूनच जांबूनद नावाचे सुवर्ण प्राप्त होते.

मेरुपर्वताच्या पूर्वेस भद्राश्वपर्व, पश्चिमेस केतुमालवर्ष आहे. पूर्वेस चैत्ररथ, दक्षिणेस गंधमादन, पश्चिमेस वैभ्राज व उत्तरेस नंदन नावांची वने आहेत. अरुणोद, महाभद्र, शीतोद, मानस, ही चार सरोवरे चार दिशांना आहेत. सितांभ व चक्रभुंज आदी पर्वत मेरूच्या पूर्वेस आहेत. दक्षिणेस त्रिकूट, पश्चिमेस शिखिवास, उत्तरेस शंखकूट असून सुमेरूपर्वताच्या वर ब्रह्मदेवांची पुरी आहे. ब्रह्मपुरीच्या चारही दिशांना इंद्रादी लोकपालांची नगरे आहेत. ब्रह्मपुरीहून श्रीविष्णूंच्या चरणकमलां-

पासून निघालेली गंगा नदी चंद्रमंडलास आप्लावित करून स्वर्गाहून खाली पृथ्वीवर उतरली. पूर्वेस सीतानदी भद्राश्वपर्वतापासून निघाली व अनेक पर्वत ओलांडून समुद्रास मिळाली. याच प्रकारे अलकनंदा दक्षिणेस जाऊन भरतवर्षांत येते व सात भागांत विभक्त होऊन समुद्रास मिळते.

चक्षू पश्चिम समुद्रास व भद्रा उत्तरकुरुवर्षास पार करून समुद्रास मिळते. माल्यवान व गंधमादन या पर्वतांच्या मध्ये कर्णिकार मेरुपर्वत आहे. जठर, देवकूट हे दोन मर्यादापर्वत आहेत. मेरूच्या पश्चिमेस निषध व पारियात्र नावांचे दोन मर्यादापर्वत आहेत. उत्तरेस त्रिशृंग व रुधिर नावांचे वर्षपर्वत आहेत. केसरपर्वतांच्या मध्यभागी लक्ष्मी, विष्णू, अग्नी, सूर्य आदी देवांची नगरे आहेत. पापी पुरुषास येथे प्रवेश नसतो.

भगवान विष्णू भद्राश्ववर्षात हयग्रीवाच्या रूपाने राहातात. केतुमालवर्षात ते वराहरूपानें, भारतवर्षात कूर्मरूपाने व उत्तरकुरुवर्षात मत्स्यरूपाने निवास करतात. भगवान श्रीहरी सर्व विश्वास पूज्य आहेत. किंपुरुषादी आठ वर्षांत क्षुधा, भय, शोक आदी काहीच नसते. तेथे प्रजेस चोवीस हजार वर्षांपर्यंत रोग-शोकरहित जीवन जगता येते. तेथे कृतत्रेतादी युगांची कल्पना नाही. कधी पाऊस पडत नाही. तेथे केवळ पार्थिव जल असते. या सर्व वर्षांत सात कुलपर्वत आहेत. त्यांच्यापासून निघालेल्या शेकडो तीर्थरूपा नद्या आहेत.

## आणि असा हा भारतवर्ष

समुद्राच्या उत्तरेस व हिमालयाच्या दक्षिणेस भारतवर्ष आहे. त्याचा विस्तार दोन हजार योजने आहे. स्वर्ग, अपवर्ग (मोक्ष) प्राप्त करून घेणाऱ्यांसाठी ही कर्मभूमी आहे. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, हिमालय, विंध्य व पारियात्र हे सात येथील कुलपर्वत आहेत. इंद्रद्वीप, कसेरू, ताम्रवर्ण, गभस्तिमान, नागद्वीप, सौम्य, गांधर्व, वारुण ही आठ द्वीपे आहेत. समुद्राने घेरलेले भारतवर्ष हे नववे द्वीप आहे.

भारतद्वीप उत्तर-दक्षिण हजारो योजनांचे आहे. भारताचे नऊ विभाग आहेत. त्याच्या पूर्वेस किरात व पश्चिमेस यवन राहातात. मध्यभागी ब्राह्मणादी वर्णांचा निवास आहे. वेद, स्मृती आदी नद्या पारियात्रपर्वतापासून उगम पावतात. विंध्याचलापासून नर्मदादी नद्या

निर्माण झाल्या. सह्यपर्वतापासून तापी, पयोष्णी, गोदावरी, भीमरथी, कृष्णा-वेणा आदी नद्यांचा उगम झाला. मलयापासून कृतमाला, महेंद्रापासून त्रिसामा इत्यादी नद्या उगम पावल्या. हिमालयापासून चंद्रभागा इत्यादी नद्या उगम पावल्या. भारताच्या पश्चिमेस कुरू, पांचाल, मध्यदेश आदी आहेत. भारतवर्षाचे असे वर्णन एकशेअठराव्या अध्यायात आले आहे.

## जंबू आदी महाद्वीपे

जंबूद्वीपाचा विस्तार एक लाख योजनांचा आहे त्याच्या भोवती एक लाख योजने खाऱ्या पाण्याचा समुद्र आहे. त्या क्षारसमुद्रास घेरून प्लक्षद्वीप आहे. मेघातिथीचे सात पुत्र या द्वीपाचे स्वामी आहेत. शांतभय, शिशिर, सुखोदय, आनंद, शिव, क्षेम व ध्रुव हे ते सात पुत्र होत. त्यांच्या नावांनी सात द्वीपे आहेत. गोमेध, चंद्र, नारद, दुंदुभी, सोमक, सुमना व शैल हे या वर्षांचे सुंदर मर्यादापर्वत आहेत. येथील निवासी वैभ्राज या नावाने विख्यात आहेत. या द्वीपात सात मुख्य नद्या आहेत. प्लक्ष ते शाकद्वीपापर्यंत लोकांचे आयुष्य पांच हजार वर्षांचे आहे. तेथे वर्णाश्रमधर्माचे पालन केले जाते.

आर्य, कुरू, विंविश व भावी या तेथील ब्राह्मणादी वर्णांची नावे आहेत. चंद्र त्यांचा आराध्य देव आहे. प्लक्षद्वीपाचा विस्तार दोन लाख योजने आहे. तितक्याच मोठ्या इक्षुरसाच्या समुद्राने ते वेढले गेले आहे. त्यानंतर शाल्मलद्वीप असून ते प्लक्षापेक्षा दुप्पट मोठे आहे. वपुष्मानाचे सात पुत्र या द्वीपाचे स्वामी झाले. श्वेत, हरित, जीमूत, लोहित, वैद्युत, मानस व सुप्रभ अशा नावांनी त्यांची सात वर्षे आहेत. याच्या दुप्पट सुरोद नावाच्या मदिरेने हे द्वीप घेरलेले आहे. कुमुद, अनल, बलाहक, द्रोण, कंक, महिष, कुकुद्मान हे येथील मर्यादापर्वत होत. येथे सात नद्या प्रसिद्ध आहेत. कपिल, अरुण, पीत व कृष्ण हे येथील वर्ण असून लोक वायुदेवाची पूजा करतात.

यानंतर कुशद्वीप येते. ज्योतिष्मानाचे पुत्र याचे अधिकारी आहेत. उद्भिद्, धेनुमान, द्वैरथ, लंबन, धैर्य, कपिल, प्रभाकर ही त्यांची नावे

होत. तेथील ब्राह्मण भगवान विष्णूंचे पूजन करतात. विद्रुम, हेमशैल, द्युतिमान, पुष्पवान, कुशेशय, हरी व मंदराचल हे सात तेथील वर्षपर्वत आहेत. हे कुशद्वीप तुपाच्या समुद्राने वेष्टिलेले आहे. हा घृतसमुद्र क्रौंच-द्वीपाने वेढलेला आहे. राजा द्युतिमानचा पुत्र क्रौंचद्वीपाचा स्वामी आहे. कुशल, मनोयुग, उष्ण, प्रधान, अंधकारक, मुनी व दुंदुभी हे सात द्युतिमानाचे पुत्र होत. या द्वीपातील मर्यादापर्वत व नद्या सात आहेत. क्रौंच, वामन, अंधकारक, रत्नशैल, देवावृत, पुंडरीक, दुंदुभी ही पर्वतांची नावे आहेत. येथील ब्राह्मण पुष्कर, पुष्कल, धन्य व तिष्य या नावांनी प्रसिद्ध आहेत. ते श्रीहरींची आराधना करतात. क्रौंचद्वीप दधिमंडोदकाने घेरलेले असून तो समुद्र शाकद्वीपाने वेढलेला आहे. भव्यचे पुत्र येथील अधिपती आहेत. जलद, कुमार, सुकुमार, मणीवक, कुशोत्तर, मोदाकी, द्रुम ही त्यांची नावे होत.

उदयगिरी, जलधर, रैवत, श्याम, कोद्रक, आंबिकेय, सुरम्यपर्वत केसरी, हे येथील सात मर्यादापर्वत आहेत. तेथे सात नद्या आहेत. मग, मगध, मानस्य, मंदग हे येथील ब्राह्मण असून ते सूर्यरूपधारी भगवान नारायणांची आराधना करतात. शाकद्वीप क्षीरसागराने वेढलेले असून क्षीरसागर पुष्करद्वीपाने परिवेष्टित आहे. येथील अधिकारी राजा सवनाचे दोन पुत्र आहेत. महावीत व धाता हे त्याचे दोन पुत्र होत. तेथे एक मानसोत्तर नावाचा वर्षपर्वत आहे. येथील लोक दहा हजार वर्षेपर्यंत जगतात. लोक ब्रह्मदेवांचे पूजन करतात. पुष्करद्वीप स्वादिष्ट जलाच्या समुद्राने वेढलेले आहे. या समुद्राचे पाणी कधी वाढत नाही. कमी होत नाही. या समुद्रापलीकडे दुप्पट आकाराची सुवर्णमयी भूमी आहे. येथे कोणतेच प्राणी नाहीत. त्यानंतर लोकालोकपर्वत असून तो अंधाराने आवृत झाला आहे. हा अंधार अंडकटाहाने आवृत आहे. या भूमीचा विस्तार पन्नास कोटी योजने आहे.

## भुवनकोशाचे वर्णन

एकशेएकोणिसाव्या अध्यायात वरील महाद्वीपांचे वर्णन आल्या-वर एकशेविसाव्या अध्यायात भुवनकोशाचे वर्णन आले आहे. पृथ्वीच्या

खाली सात पाताळे आहेत. एक एक पाताळाचा विस्तार दहा हजार योजनांचा आहे. अतल, वितल, नितल, महातल, सुतल, तलातल व रसातल ही सात पाताळे होत. या पाताळांची भूमी क्रमाने काळी, पिवळी, लाल, शुभ्र, विटकरी, फत्तरी व सुवर्णमयी आहे. हे सर्व पाताळ अत्यंत रमणीय आहेत. तेथे दैत्य व दानव सुखपूर्वक निवास करतात. सर्व पाताळांच्या खाली शेषनाग असून तो भगवान विष्णूंचा तमोगुण-प्रधान अवतार आहे. त्याच्यात अनंत गुण असल्याने त्याला अनंतही म्हणतात. तो आपल्या मस्तकावर पृथ्वी धारण करतो.

पृथ्वीच्या खाली अनेक नरक आहेत. भगवान विष्णूंचे भक्त नरकात येत नाहीत. सूर्यदेवाच्या प्रकाशाने उजळणाऱ्या पृथ्वीचा जेवढा विस्तार आहे तितकाच नभोलोकाचा विस्तार मानला गेला आहे. पृथ्वीच्यापासून एक लाख योजने सूर्यमंडल आहे. तेथून एक लाख योजने चंद्रमा आहे. तेथून एक लाख योजने नक्षत्रमंडल प्रकाशित होत असते. येथून दोन लाख योजने उंच बुध विराजमान होतो. तेथून दोन लाख योजने वर शुक्र व तेथून तितकाच दूर मंगळ आहे. तेथून दोन लाख योजने दूर बृहस्पती आहे. तेथून दोन लाख योजने दूर शनैश्चर आहे. तेथून एक लाख योजने वर सप्तर्षींचे स्थान आहे. तेथून एक लाख योजने दूर उत्तरध्रुव प्रकाशित होतो.

ध्रुवाच्या वर कोटी योजने महर्लोक आहे. येथे भृगू आदी सिद्ध निवास करतात. महर्लोकाच्यावर दोन कोटी योजने जनलोक आहे. येथे सनक, सनंदन आदी सिद्ध पुरुष राहातात. जनलोकापासून आठ कोटी योजने दूर तपोलोक आहे. येथे वैराज नावाचे देव राहातात. येथून पुढे सत्यलोक, ब्रह्मलोक आहे. जेथपर्यंत पायी जाता येते तो भूलोक होय. भुवर्लोक, स्वर्गलोक यांचाही उल्लेख आला आहे. यानंतर सूर्य-लोक, चंद्रलोक, शिशुमारचक्र, चंद्रसूर्यांचे रथ, शुक्राचा, मंगळाचा, बृह-स्पतीचा, शनैश्चराचा रथ, त्यांचे घोडे इत्यादींचे वर्णन आले आहे.

विष्णूंच्या शरीरभूत जलापासून पर्वत, समुद्र, पृथ्वी यांची निर्मिती झाली. ग्रह, नक्षत्र, तीन लोक, नदी, पर्वत, समुद्र, वन ही सर्व भगवान विष्णूंचीच रूपे होत. जे आहे व जे नाही ते सर्व भगवान

विष्णूच आहेत. भगवान विष्णू ज्ञानरूप आहेत. तेच परमपद आहेत. चित्त शुद्ध करून मनुष्याने विशुद्ध ज्ञानाच्या द्वारे विष्णुस्वरूप व्हावे.

## मन्वन्तरांचे वर्णन

सर्वांत प्रथम स्वयंभुव मनू झाला. आग्नीध्र आदी त्याचे पुत्र होत. या मन्वन्तरात यम नावाचा देव, और्व आदी सप्तर्षी व शतक्रतू इंद्र होता. दुसऱ्या मन्वन्तराचे नाव स्वारोचिष असून त्यात पारावत व तुषित हे देव होते. या मनूच्या पुत्रांची नावे चैत्र व किंपुरुष अशी होती. त्या वेळी विपश्चित नावाचा इंद्र व ऊर्जस्वन्त आदी सप्तर्षी होते. तिसऱ्या मनूचे नाव उत्तम असून त्याचे अजादी पुत्र होते. त्या वेळी सुशांती नावाचा इंद्र, सुधामा इत्यादी देव व वसिष्ठांचे पुत्र सप्तर्षी होते. चौथा मनू तामस नावाचा होता. त्या वेळी स्वरूपादी देव, शिखरी इंद्र व ज्योतिर्होमादी सप्तर्षी होते. त्याचे ख्याती आदी नऊ पुत्र होते.

रैवत नावाच्या पाचव्या मन्वन्तरात वितथ इंद्र, अमिताभ देव, हिरण्यरोमा आदी मुनी व बलबंधादी पुत्र होते. सहाव्या चाक्षुष मन्वन्तरात मनोजव नावाचा इंद्र व स्वाती आदी देव होते. सुमेधादी महर्षी होते. गुरू आदी मनुपुत्र होते. सातव्या मन्वन्तरात सूर्यपुत्र श्राद्धदेव मनू झाला. त्या वेळी आदित्य, वसू व रुद्र हे देव, पुरंदर नावाचा इंद्र, वसिष्ठ, कश्यप, अत्री, जमदग्नी, गौतम, विश्वमित्र व भारद्वाज हे सप्तर्षी होते. हे वर्तमान मन्वन्तराचे वर्णन आहे. वैवस्वत मनूचे इक्ष्वाकू आदी पुत्र होते. या सर्व मन्वन्तरांत भगवान श्रीहरी अंशावतार म्हणून झाले. स्वायंभुव मन्वन्तरात भगवान मानस या नावाने प्रकट झाले. त्यानंतरच्या सहा मन्वन्तरांत ते क्रमानें अजित, सत्य, हरी, देववर, वैकुंठ, वामन या रूपांत प्रकट झाले. छायेच्या गर्भातून उत्पन्न झालेला सूर्यनंदन सावर्णी हा आठवा मनू होणार आहे.

हा आपल्या पूर्वजाच्या, श्राद्धदेवाच्या समान वर्णाचा होईल. म्हणून त्याचे नाव सावर्णी असेल. त्या वेळी सुतपा आदी देव, तेजस्वी अश्वत्थामा आदी सप्तर्षी, बली, इंद्र व विरजादी मानसपुत्र होतील. नवव्या मनूचे नाव दक्षसावर्णी राहील. त्या वेळी पार आदी देव असतील.

इंद्राचे नाव अद्‌भुत असे राहील. सवन आदी श्रेष्ठ ब्राह्मण सप्तर्षी होतील. धृतकेतू हा मनुपुत्र होईल. दहावा मनू ब्रह्मसावर्णी नावाचा होईल. सुख आदी देवगण, शांती नावाचा इंद्र, हविष्यादी मुनी, सुक्षेत्र आदी मनुपुत्र होईल.

त्यानंतर अकरावा मनू धर्मसावर्णी नावाचा होईल. त्या वेळी विहंगादी देव, गण इंद्र, निश्चर आदी मुनी, सर्वत्रग मनुपुत्र होतील. बाराव्या मनूचे नाव रुद्रसावर्णी होईल. त्या वेळी ऋतधामा नावाचा इंद्र, हरित आदी देव, तपस्यादी सप्तर्षी, देववान आदी मनुपुत्र होतील. तेराव्या मनूचे नाव रौच्य होईल. सूत्रामणी देव असतील. दिवस्पती इंद्र होईल. तो दानवांचे, दैत्यांचे मर्दन करील. रौच्य मन्वन्तरात निर्मोह आदी सप्तर्षी व चित्रसेनादी मनुपुत्र होतील. चौदावा मनू भौत्य नावाचा होईल. त्या वेळी शुची इंद्र, चाक्षुष देव, अग्निबाहू आदी सप्तर्षी होतील. मनुपुत्रांची नावे उरू आदी असतील.

सप्तर्षी द्विजगण भूमंडलावर वेदांचा प्रचार करतात. देव यज्ञ-भागाचा भोग घेतात. मनुपुत्र या पृथ्वीचे पालन करतात. ब्रह्मदेवांच्या एका दिवसात चौदा मनू होतात. मनू, देव, इंद्र इत्यादीही तितक्यांदा होतात प्रत्येक द्वापरच्या अंती व्यासरूपधारी श्रीहरी वेदाचे विभाग करतात. वेद एकच होत. त्याचे चार चरण व एक लक्ष ऋचा होत्या. आदिवेद एकच होता. प्रथम एकच यजुर्वेद होता. त्याला मुनिवर व्यासांनी चार भागांत विभक्त केले. त्यांनी अध्वर्यूचे काम यजुर्भागाने होताचे ऋग्वेदाने, उद्‌गात्याचे साममंत्रांनी, ब्रह्माचे कार्य अथर्व-वेदाच्या मंत्रांनी करण्याचे ठरविले. व्यासांचे प्रथम शिष्य पैल होते. ते ऋग्वेदाचे पंडित झाले.

इंद्राने प्रमती व बाष्कल यांना संहिता दिली. बाष्कलाने बौध्य आदींना चार विभागांत वाटून दिली. व्यासांचे परम शिष्य वैशंपाय-नांनी यजुर्वेदरूप वृक्षाच्या सत्तावीस शाखा निर्माण केल्या. काण्व व वाजसनेय आदी शाखा याज्ञवल्क्यांनी संपादित केल्या. व्यासशिष्य जैमिनींनी सामवेदरूपी वृक्षाच्या शाखा तयार केल्या. व्यासशिष्य सुमंतूने अथर्ववेदाचीही एक शाखा बनविली. त्यांनी पैप्पल आदी हजारो

शिष्यांकडून अध्ययन करवून घेतले. भगवान व्यासदेवांच्या कृपेने सूताने पुराणसंहितेचा विस्तार केला. ही सर्व हकीगत एकशेपन्नासाव्या अध्यायातील आहे.

# ५ सदाचारदर्शन

## विष्णू आदी देवांचा पूजाविधी

अग्निपुराणात प्रामुख्याने नित्याचे धर्मकृत्य, कर्मकांड, सदाचार, धर्मकर्तव्ये, वर्णाश्रमाविधी, व्रतविधी यांचेच वर्णन आले आहे. एकविसाव्या अध्यायात विष्णू आदी देवांच्या सामान्य पूजेचा विधी वर्णन केला आहे. भगवान विष्णूंच्या पूजेत सर्वप्रथम परिवारासहित भगवान अच्युतांना नमस्कार करावा, पूजामंडपात प्रवेश करून धाता, विधाता, गंगा, यमुना यांचे पूजन करावे शंखनिधी, पद्निधी, द्वारलक्ष्मी, वास्तुपुरुष तथा आधारशक्ती, कूर्म, अनंत, पृथ्वी, धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांची पूजा करावी.

त्यानंतर ऋग्वेदादी वेद, सत्ययुगादी युगे, सत्त्वादी गुण, सूर्यादींची पूजा करावी. याच प्रकारे विमला, उत्कर्षिणी, ज्ञाना, क्रिया, योगा आदी शक्तींची पूजा करावी. प्रण्ही, सत्या, ईशा, अनुग्रहा, निर्मलमूर्ती दुर्गा, सरस्वती, गणेश, क्षेत्रपाल व वासुदेव (संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध) इत्यादींची पूजा करावी. नंतर हृदय, शिर, शिखा, वर्म, नेत्र आदी अंगांची व शंख, चक्र, गदा, पद्म या अस्त्रांची, श्रीवत्स, कौस्तुभ वनमाला, लक्ष्मी, पुष्टी, गरुड, गुरुदेव यांची पूजा करावी. त्यानंतर इंद्र, अग्नी, यम, निर्ऋती, जल(वरुण.) वायू, कुबेर, ईशान, ब्रह्मा, अनंत या दिक्पालांची, अस्त्रांची, कुमुदादी विष्णुपार्षदांची, द्वारपालांची, विश्वक्सेनाची पूजा करावी.

या नंतर शिवांची पूजा अशी करावी. प्रथम नंदीचे पूजन करावे.

नंतर महाकालाचे. नंतर दुर्गा, यमुना, गणादिक, वाणी, श्री, गुरू, वास्तुदेव, आधारशक्ती, धर्म इत्यादींची अर्चना करावी. त्यानंतर वामा, ज्येष्ठा, रौद्री, काली, कलविकरणी, बलविकरिणी, बलप्रमथिनी, सर्वभूतदमनी, मनोन्मनी, या नऊ शक्तींचे क्रमानें पूजन करावे. 'हां हं हां शिवमूर्तये नमः' या मंत्राने हृदयादी अंगांची व ईशान आदी मुखसहित शिवांची पूजा करावी. 'हौं' शिवाय हौं इत्यादींनी केवळ शिवांचीच पूजा करावी. 'हां' या मंत्रानें ईशानादी पांच मुखांची आराधना करावी. 'ह्री गौर्यै नमः' याने गौरीचे व 'गं गणपतयें नमः' यानें गणपतीची, नाममंत्रांनी इंद्रादी दिक्पालांची, चंडकी, हृदय, शिर इत्यादींची पूजा करावी.

आता सूर्याची पूजा कशी करायची ? दंडी सर्वप्रथम पूजनीय आहे. त्यानंतर क्रमशः पिंगल, उच्चैःश्रवा, अरुण यांची पूजा करावी. नंतर प्रभूत, विमल, सोम, दोन संध्याकाळ, परमसुख, स्कंद इत्यादींची पूजा करावी. दीप्ता, सूक्ष्मा, जया, भद्रा, विभूती, विमला, अमोघा, विद्युता, सर्वतोमुखी या नऊ शक्तींची पूजा करावी. त्यानंतर 'ॐ ब्रह्मविष्णु-शिवात्मकाय सौराय पीठाय नमः' या मंत्रानें सूर्याचे पूजन करावे. 'ॐ खं खखोल्काय नमः' या मंत्रानें सूर्यमूर्तीची अर्चना करावी. नंतर 'ॐ ऱ्हां ऱ्हीं सः सूर्याय नमः' या मंत्रानें सूर्याची पूजा करावी. त्यानंतर हृदयादिकांचे पूजन करावे. 'ॐ आं नमः' म्हणून हृदयाची, 'ॐ अर्काय नमः' म्हणून शिराची पूजा करावी. त्यानंतर 'ॐ भूर्भुवः स्वः ज्वालिन्यै शिखायै नमः' म्हणून शिखेची, 'ॐ हुं कवचाय नमः' म्हणून कवचाची, 'ॐ भां नेत्राभ्यां नमः' म्हणून नेत्रांची व 'ॐ रम् अर्कास्त्राय नमः' म्हणून अस्त्रांची पूजा करावी. त्यानंतर सूर्याची शक्ती राणी राज्ञी, छायादेवी यांची पूजा करून चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पती, शुक्र, शनी, राहू केतू यांची क्रमानें पूजा करावी. सूर्याच्या प्रचंड तेजाचे पूजन करावे.

आता संक्षेपानें आसन, मूर्ती, मूल, इत्यादी अंग, परिचारक इत्यादींची पूजा पाहू. भगवान विष्णूंच्या आसनाची पूजा 'ॐ श्रीं श्रीं श्रीधरो हरिः ऱ्हीं' या मंत्रानें करावी. याच मंत्रानें त्यांच्या मूर्तीची पूजा करावी. हा त्र्यैलोक्यमोहन मंत्र आहे. भगवानांच्या पूजेत 'ॐ क्लीं हृषीकेशाय नमः', 'ॐ हूं विष्णवे नमः' या मंत्रांचा उपयोग

करावा. संपूर्ण दीर्घ स्वरांच्या साह्याने हृदयादींची पूजा करावी. 'ॐ आं हृदयाय नमः' या मंत्राने हृदयाची, 'ॐ ईं शिरसे नमः' या मंत्राने शिराची, 'ॐ ऊं शिखायै नमः' याने शिखेची, 'ॐ एं कवचाय नमः' याने कवचाची, 'ॐ ऐं नेत्राभ्यां नमः' याने नेत्रांची व 'ॐ औं अस्त्राय नमः' याने अस्त्रांची पूजा करावी.

परिचारकांची पूजा संग्रामात विजय देणारी आहे. चक्र, गदा, शंख, मुसळ, खड्ग, शाङ्‌र्गधनुष्य, पाश, अंकुश, श्रीवत्स, कौस्तुभ, वनमाला, श्रीं या बीजाने युक्त श्रीमहालक्ष्मी, गरुड, गुरुदेव व इंद्रादी देवता यांचे पूजन करावे. 'ॐ चं चक्राय नमः', 'ॐ गं गदायै नमः' अशी सरस्वतीच्या आसनाची पूजा करावी. या वेळी 'ॐ ऐं देव्यै सरस्वत्यै नमः' या मंत्रांचा उपयोग करावा. 'ॐ ऱ्हीं देव्यै सरस्वतै नमः' या मंत्राने सरस्वतीच्या मूर्तीची पूजा करावी. सरस्वतीच्या परिचारकांत लक्ष्मी, मेधा, कला, तुष्टी, पुष्टी, गौरी, प्रभा, मती, दुर्गा, गण, गुरू, क्षेत्रपाल यांचीही पूजा करावी.

'ॐ गं गणपतये नमः' या मंत्राने गणेशाची, 'ॐ ऱ्हीं गौर्यै नमः' या मंत्राने गौरीची, 'ॐ श्रीं श्रियै नमः' याने श्रीची, 'ॐ ऱ्हीं त्वरितायै नमः' या मंत्राने त्वरिताची, 'ॐ ऐं क्लीं त्रिपुरायै नमः' या मंत्राने त्रिपुराची पूजा करावी.

## पूजेसाठी स्नानविधी

प्रथम नृसिंहबीजाचा मंत्र म्हणून मृत्तिका हातात घ्यावी. तिची विभागणी दोन भागांत करून एका भागाने नाभीपासून पायांपर्यंत लेपन करावे. नंतर दुसऱ्या भागाने करावे. सबंध अंगास लेपन झाल्यावर मलस्नान करावे. नंतर शुद्धीसाठी जलात बुडी मारून आचमन करावे नृसिंहमंत्राने न्यास करून आत्मरक्षा करावी. त्यानंतर विधिस्नान करावे. प्राणायाम करून हृदयात भगवान विष्णूंचे ध्यान धरावे. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या वासुदेवमंत्राने संकल्पपूर्वक जलस्नान करावे. वेदादी मंत्रांनी मार्जन करावे. अघमर्षणादी मंत्र म्हणावेत.

वस्त्र बदलून अंगन्यास करून मार्जन करावे. हातात जल घेऊन

नारायणमंत्राने प्राणसंयम करून जलास नाकाने हुंगावे. नंतर भगवानांचे ध्यान करावे व जलाचा त्याग करावा. यानंतर अर्घ्य देऊन 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या द्वादशाक्षरमंत्राचा जप करावा. अन्य देवांना भक्तिपूर्वक तर्पण करावे. देवता, ऋषी, पितर, मनुष्य, भूते यांना तर्पण करून आचमन करावे. अंगन्यास करून हृदयात मंत्र जपून पूजामंदिरात प्रवेश करावा.

## भगवंतांची मंत्रपूजा

एकविसाव्या व बाविसाव्या अध्यायांत वरील विधी सांगितल्यावर नारदांनी ऋषींना विष्णुपूजेचा सविस्तर विधी तेविसाव्या अध्यायात सांगितला. हात-पाय धुऊन आसनावर बसावे व आचमन करावे. मौनभावात राहून सर्व बाजूंनी आपले रक्षण करावे. पूर्वदिशेस मुख करून स्वस्तिकासन वा पद्मासन घालून स्वस्थ बसावे. नाभिस्थानी स्थित असलेल्या प्रचंड वायुरूप 'यं' बीजाचे चिंतन करावे. आपल्या शरीराची पापे दूर करावीत. हृदयकमलात असलेल्या तेजराशीरूप 'क्षों' बीजाचे ध्यान करावे. यानंतर आकाशातील चंद्रासारख्या शांत ज्योतीचे ध्यान करावे. शरीरशुद्धी, हस्तशुद्धी मुद्रा व न्यासयुक्त करावी.

यानंतर एकेका अक्षराने क्रमशः बारा अंगांचा द्वादशाक्षरांच्या मंत्राने न्यास करावा. हृदय, शिर, शिखा, कवच, अस्त्र, नेत्र, उदर, पाठ, बाहू, ऊरू, गुढघे, पाय ही शरीराची बारा स्थाने होत. 'ॐ ॐ नमः हृदये । ॐ नं नमः शिरसि । ॐ भों नमः शिखायम् इत्यादी मंत्रांनी न्यास करावा. मुद्रा समर्पण करून भगवान विष्णूंचे स्मरण करावे. अष्टोत्तरशत नामांनी भगवान विष्णूंचे पूजन करावे. डाव्या भागास जलपात्र व उजव्या भागास पूजासाहित्य घेऊन 'अस्त्राय फट्' मंत्राने स्नान घालावे. नंतर गंध, पुष्प यांनी अर्घ्य द्यावा. हातात जल घेऊन 'अस्त्राय फट्' या मंत्राने अभिमंत्रित करून योगपीठ पावन करावे. मध्यभागी सर्वव्यापी चेतन ज्योतिर्मय परमात्मा श्रीहरींचे ध्यान करून योगपीठावर पूर्व आदी दिशांना अनुक्रमे धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, अग्नी आदी दिक्पाल व अधर्म आदी विग्रहांची स्थापना करावी. त्या

पीठावर कासव, अनंत, पद्म, सूर्य आदींची व विमलादी शक्तींची व ग्रहांची कर्णिकेत स्थापना करावी.

नंतर आपल्या हृदयात ध्यान करावे. आवाहन केल्यावर अर्घ्य, पाद्य, आचमन, मधुपर्क, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, आभूषण, गंध, धूप, दीप व नैवेद्य आदींना पुंडरीक्ष विद्येने (ॐ नमो भगवते पुण्डरीक्षाय) या मंत्राने अर्पण करावे. भगवानांच्या सेवेतील पार्षदांची पूजा करावी. पूर्वेस गरुड, दक्षिणेस चक्र, उत्तरेस गदा, ईशान्येस शंख, अग्निकोणात धनुष्य यांची स्थापना करावी. भगवानांच्या डाव्या-उजव्या बाजूंस दोन तूणीर, डाव्या बाजूस तलवार व ढाल, उजव्या बाजूस लक्ष्मी व डाव्या बाजूस पुष्टी देवता, यांची स्थापना करावी. भगवानांच्या पुढे वनमाला, श्रीवत्स, कौस्तुभ यांची स्थापना करावी.

बीजमंत्राने भगवंतांची अर्चना करावी. मंत्रजपाने त्यांना प्रदक्षिणा घालावी. स्तुती करून अर्घ्य, समर्पण करून, हृदयात भगवानांना धारण करावे. 'परब्रह्म भगवान विष्णू मीच आहे' अशी भावना धरून 'भगवान, आपण यावं' असे त्यांचे स्वागत करावे. अशी मंत्रपूजा केल्यास मनुष्य मोक्षाचा धनी होतो.

## कुंडनिर्माण व अग्निस्थापना

त्यानंतर चोविसाव्या अध्यायात कुंडनिर्माण व अग्निस्थापना या विधींचे वर्णन आले आहे. चोवीस अंगुलांचीं चौकोनी भूमी तयार करावी. चारही बाजूंनी बरोबर खणावे. दोन अंगुले भूमी चारही बाजूंनी सोडून खोदलेल्या कुंडाची मेखला बनवावी. सत्त्व, रज व तम अशा तीन मेखला असतात. त्यांचे मुख पूर्वेस असावे. मेखलांची उंची जास्तीत जास्त बारा अंगुलांची असावी.

योनी सुंदर बनवावी. तिची लांबी दहा अंगुले असावी. पुढे ती क्रमशः सहा, चार, दोन अंगुलांची व्हावी. योनीचे स्थान कुंडाच्या पश्चिमदिशेस मध्यभागी असावे. तिची आकृती पिंपळाच्या पानासारखी असावी. तिचा काही भाग कुंडात प्रविष्ट झालेला असावा. योनीचा मूलभाग तीन अंगुलांचा व पुढील भाग सहा अंगुलांचा असावा.

चौकोनी कुंडाचा अर्धा भाग मध्ये सूत ठेवून कोणत्या तरी कोणा-पर्यंत आखावा. कुंडनिर्माणविधीचा हा शास्त्रशुद्ध भाग मुळातच पाहाण्यासारखा आहे. कमलाच्या आकृतीच्या गोल कुंडाच्या मेखलेवर दलाकार चिन्हे बनवावीत. होमासाठी एक सुंदर स्रुक् तयार करावी. हिचा आकार बाहुदंडासारखा असावा. या श्रुकाचेही विस्तृत वर्णन आले आहे.

देवीच्या स्वरूपाचे ध्यान करावे 'दिव्य रूपाची देवी, दिव्य वस्त्राभूषणांनी विभूषित आहे.' असे चिंतन करावे. देवीस संतुष्ट करण्यासाठी अग्निदेवाच्या रूपात श्रीहरींनी यावे, अशी भावना असावी. अग्नीस कुंडात स्थापन करावे. त्यात समिधा टाकून दर्भांनी परिसमूहन करावे. सर्व दिशांना कुशास्तरण करून समिधा, कुश, स्रुक्, स्रुवा, आज्यस्थली, चरुस्थली, व कुशाच्छादित तूप, प्रणीतापात्र; इत्यादी वस्तू नीट ठेवाव्यात. प्रणीतामधील जलाने पूजावस्तू पवित्र कराव्यात. प्रणीतापात्रात फुले टाकून भगवान विष्णूंचे ध्यान करावे.

यानंतर हवन, नामान्तव्रत, व्रतबन्धान्तव्रत, समावर्तनान्त, यज्ञाधिकारान्त, प्रणवोच्चार इत्यादींचे निर्देश करून साधक मूलमंत्राने स्रुवानें पूर्णाहुती देण्यास सांगितलें आहे. मंत्राच्या शेवटी 'वौषट्' पद लावून प्लुतस्वरानें सुस्पष्ट मंत्रोच्चार करावा. विष्णुदेवासाठी चरू तयार करावा. इष्टदेव श्रीहरींना आसन, उपचार, गंध, पुष्प इत्यादी देऊन त्यांची आराधना करावी. त्यांच्यासमोर अग्निश्वरास 'आधार' नावाच्या दोन घृताहुती द्याव्यात. त्यातील एक वायव्यकोणात व दुसरी नैर्ऋत्यकोणात असावी. 'आज्यभागा'च्या दोन आहुत्या, एक दक्षिणेस व दुसरी उत्तरेस द्याव्यात. तुपानें इष्टदेवास तृप्त करावे. होमपूजन समाप्त झाल्यावर स्नानादींनी शुद्धता करावी. शिष्यांच्या द्वारे यं, रं, वं, लं या पार्थिव शक्तींनी न्यास करावा. गुरूकडून नवा जन्म झाल्यावर श्रीहरींनी पुष्पांजली समर्पित करावी. वासुदेवांची अर्चना करून गुरु-चरणांचे पूजन करावे. प्रणीताच्या जलानें आपणांस व अग्निकुंडास अभिषेक करून अग्नीस आपल्या आत्म्यात सामावून घ्यावे. त्यानंतर विष्वक्सेनाचे विसर्जन करावे. याने मुमुक्षू पुरुष श्रीहरिस्वरूप होतो. त्याला

सायुज्य मोक्ष प्राप्त होतो.

## वासुदेव, संकर्षण इत्यादींचे मंत्र, द्वादश व्यूह

वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध या चार व्यहमूर्तींच्या नामांच्या आधी ॐ कार, अ, आ, अं, अः ही चार बीजे आणि 'नमो भगवते' या पदांची जोड द्यावी. शेवटी नमः पद म्हणावे. ॐ अं नमो भगवते वासुदेवाय नमः ' ' ॐ आं नमो भगवते संकर्षणाय नमः', 'ॐ अं नमो भगवते प्रद्युम्नाय नमः ', 'ॐ अः नमो भगवते अनिरुद्धाय नमः ' असे हे चार मंत्र होतात. यानंतर नारायणमंत्राचे स्वरूप असे आहे. 'ॐ नमो नारायणाय ', 'ॐ तत्सत् ब्रह्मणे ॐ नमः ' हा ब्रह्ममंत्र आहे. 'ॐ विष्णवे नमः' हा विष्णुमंत्र आहे. 'ॐ क्ष्रौं ॐ नमो भगवते नरसिंहाय नमः ' हा नृसिंहमंत्र आहे. 'ॐ भूगर्भो भगवते वराहाय ' हा भगवान वराहांचा मंत्र आहे. हे सर्व मंत्रराज आहेत. या मंत्रांचे वासुदेवादी नायक आहेत. ते उपासकांना इष्टदेव आहेत. त्यांची अंगकांती क्रमशः जवाकुसुमाप्रमाणे अरुण, हळदीसमान पिवळी, निळी, श्यामल, लोहित, मेघसदृश, अग्नितुल्य, पिंगल असते.

ज्यांच्या आदी व्यंजन असते त्यांची लक्षणे अन्य प्रकारची असतात. दीर्घ स्वरांशी संयोग झाला की त्यांची भिन्न भिन्न रूपे होतात. त्यांच्या अंतांत अंकांची नामे असून अंकनामांच्या नंतर नमः पद असते. ऱ्हस्व स्वरांनी युक्त बीजांक उपाङ्ग असतो. देवांच्या नामासंबंधी अक्षरांना पृथक् पृथक् करून त्यांतील प्रत्येकाच्या अंती बीजाचा योग करून अंगन्यास करावा. पांचापासून बारा अंकांपर्यंत न्यासवाक्याची कल्पना करून सिद्धीस अनुरूप जप करावा. हृदय, शिर, शिखा, कवच, नेत्र, अस्थी ही सहा अंगे होत. मूलमंत्राच्या बीजांचा या अंगांशी न्यास करावा. हृदय, शिर, शिखा, हात, नेत्र, उदर, पाठ, बाहू, ऊरू, जानू, जंघा व पाय ही बारा अंगे आहेत.

कं टं पं शं वैनतेयाय नमः हा गरुडासंबंधी बीजमंत्र आहे. खं टं फं षं गदायै नमः हा गदामंत्र आहे. शं टं वं सं पुष्टयै नमः हा पुष्टि-देवीचा मंत्र आहे. गं डं भं हं श्रियै नमः हा श्रीमंत्र आहे. चं णं मं क्षं

हा पांचजन्यमंत्र आहे. छं तं पं कौस्तुभाय नमः हा कौस्तुभमंत्र आहे. जं खं वं सुदर्शनाय नमः हा सुदर्शनचक्रमंत्र आहे. सं वं दं लं श्रीवत्साय नमः हा श्रीवत्समंत्र आहे. ॐ व वनमालायै नमः हा वनमालामंत्र आहे. ॐ पं पद्मनाभाय नमः हा पद्मनाभाचा मंत्र आहे.

प्रथम प्रणव व हृदयमंत्राचे उच्चारण करावे. ॐ हृदयाय नमः म्हणून हृदयास स्पर्श करावा. नंतर 'पराय शिरसे स्वाहा' म्हणून मस्तकास स्पर्श करावा. नंतर इष्टदेवतेचे नाम घेऊन शिखेस स्पर्श करावा. 'वासुदेवाय शिखायै वषट्' हा शिखेचा मंत्र होय. यानंतर 'आत्मने कवचाय हुम्' म्हणून कवच-न्यास करावा. पुन्हा देवाचे नाव घेऊन 'वासुदेवाय अस्त्राय फट्' म्हणून अस्त्र-न्यासाची क्रिया पुरी करावी. प्रथम 'ॐकारादि' जे नामात्मक पद आहे त्याच्या शेवटी नमः पद जोडून त्या नामात्मक पदास चतुर्थ्यन्त करावे. एका व्यूहापासून षड्विंश व्यूहापर्यंत समान मंत्र आहे. 'पराय' पदानें एकमात्र परम-पुरुष परमात्म्याचा बोध होतो. तोच एकाचा दोन होतो. तो प्रकृती व पुरुष या दोन व्यूहांतून व्यक्त होतो. 'ॐ परायाग्न्यात्मने नमः' हा व्यापक मंत्र आहे. वसू, अर्क, अग्नी या त्रिव्यूहात्मक मूर्ती असून अग्नीचा न्यास करून हात व सर्व शरीरभर व्यापक न्यास करावा.

वायू व अर्क यांचा क्रमशः डाव्या व उजव्या हातांच्या अंगुलींवर न्यास करावा. हृदयास अग्नीचे चिंतन करावे. त्रिव्यूहचिंतनाचा हाच क्रम आहे. चतुर्व्यूहात चार वेदांचा न्यास असतो. संपूर्ण देह ऋग्वेद, अंगुलींत यजुर्वेद, हातांत आयुर्वेद व हृदय व चरणांत सामवेद यांचा न्यास करावा. पंचमव्यूहात प्रथम आकाशाचा शरीरात व हातात पृथक न्यास करावा. नंतर अंगुलींत न्यास करून वायू, ज्योती, जल, पृथ्वी यांचा क्रमशः मस्तक, हृदय, गुह्य, चरण या अंगांवर न्यास करावा. आकाश, वायू, अग्नी, जल व पृथ्वी या पांच तत्त्वांना पंचव्यूह म्हणतात. मन, श्रवण, त्वचा, नेत्र, रसना व नासिका या सहा इंद्रियांना षड्व्यूह म्हणतात. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक अशा सात लोकांचा सप्तव्यूह होतो. बुद्धी, अहंकार, मन, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ही आठ तत्त्वे अष्टव्यूहरूप आहेत.

जीव, बुद्धी, अहंकार, मन, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्या समुदायास नवव्यूह म्हणतात. संपूर्ण देह, शिर, ललाट, मुख, हृदय, नाभी, गुह्य, जानू, पाद या नऊंचा व इंद्राचा पूर्ववत व्यापक न्यास केला की दशव्यूहात्मक न्यास होतो. दोन आंगठे, दोन तळहात, तर्जनी आदी आठ बोटे, शिर, ललाट, मुख, हृदय, नाभी, गुह्य, जानुद्वय, पाद-द्वय; यांचा एकादशव्यूह न्यास होतो. विष्णू, मधुसूदन, त्रिविक्रम, वामन, श्रीधर, हृषिकेश, पद्मनाभ, दामोदर, केशव, नारायण, माधव, गोविंद यांचा द्वादशात्मक व्यूह होतो.

पुरुष, बुद्धी, अहंकार, मन, चित्त, शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध, श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका, वाक्, हात, पाय, गुद, उपस्थ, भूमी, जल, तेज, वायू, आकाश; अशी पंचवीस तत्त्वे आहेत. यांतील पुरुषाच्या सर्वांगात व्यापक न्यास करून दहांचा अंगुष्ठ आदीत न्यास करावा. करतल, शिर, ललाट, मुख, हृदय, नाभी, गुह्य, ऊरू, जानू, पाय, उपस्थ, हृदय, मूर्धा यांचा क्रमशः न्यास करावा.

विद्वान पुरुषाने अष्टदल कमलचक्रात प्रकृतीचे चिंतन करून तिचे पूजन करावे. त्या कमलाच्या पूर्वेस, दक्षिणेस, पश्चिमेस, उत्तरेस हृदयादी चार अंगांचा न्यास करावा. सर्व मनोरथाच्या सिद्धीसाठी साधकाने विश्वरूप परमात्म्याचे यजन करावे. सर्व व्यूह, हृदयादी पांच अंगे, गरुड, इंद्र इत्यादींसहित श्रीहरींचे पूजन करावे. शेवटी विश्वक्सेनाची नाममंत्राने पूजा करावी. 'रौं' विश्वक्सेनाय नमः ' म्हणून पूजनोपचार अर्पण करावेत.

## शिष्यांचा दीक्षाविधी

यानंतर सव्विसाव्या अध्यायात मुद्रांची लक्षणे सांगितल्यावर सत्ताविसाव्या अध्यायात शिष्यांना दीक्षा देण्याचा विधी वर्णन केला आहे. कमलाकार मंडलात श्रीहरींचे पूजन करावे. दशमी तिथीस सर्व यज्ञसंबंधित सामग्री जमवावी. तिची शुद्धी करावी. नरसिंहबीजमंत्राने (क्ष्रौं) शंभरदा अभिमंत्रित करावे. त्या मंत्राच्या अंती 'फट्' म्हणून

राक्षसांच्या विनाशासाठी सर्वत्र जलबिंदु टाकावेत. नंतर सर्वस्वरूपा प्रासादरूपिणी शक्तीचा न्यास करावा. सर्वौषधींवर वासुदेवमंत्राने अभिमंत्रण करावे. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, नारायण या पांच मूर्तींवर मूलमंत्राच्या द्वारे पंचगव्य तयार करून कुशाग्राने त्याचे प्रोक्षण करावे.

पूर्वाभिमुख होऊन, उभे राहून मनातल्या मनात भगवान विष्णूंचे चिंतन करावे. वर्धनीसहित कलशावर स्थापित असलेल्या विष्णूंचे अंगां-सहित पूजन करावे. अस्त्रमंत्राने वर्धनीस शंभरदा अभिमंत्रित करून अविच्छिन्न जलधारेत तिला ईशान्यकोणाशी न्यावे. पंचरत्नयुक्त सवस्त्र वेदीवर श्रीहरींची पूजा करावी. पुंडरीकमंत्रद्वारे उखा (पात्रविशेष)चे प्रक्षालन करून आत सुगंधयुक्त तूप ओतावे. त्यात गायीचे दूध भरून वासुदेवमंत्राने त्याचे अवेक्षण करावे. संकर्षणमंत्राने सुसंस्कृत केलेल्या दुधात घृताक्त तांदूळ सोडावेत. प्रद्युम्नमंत्राने त्या दूध-तांदुळास आलोडन करून उलटेपालटे करावे. चरू वा खीर पक्व होईल तेव्हा आचार्याने अनिरुद्धमंत्रद्वारे त्याला खाली उतरवावे.

त्यानंतर त्यावर जल शिंपडून, घृतालेपन करून, हातात भस्म घेऊन, नारायणमंत्राने ललाट व पार्श्वभाग यांवर ऊर्ध्वपुंड्र करावेत. संस्कारयुक्त चरूचे चार भाग करून एक भाग इष्टदेवास अर्पण करावा. दुसरा भाग कलशास, तिसरा अग्नीस व चौथा गुरूने शिष्यांसह बसून खावा. यामुळे आत्मशुद्धी होईल. दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी दुधाळ वृक्षाचे दातवण घ्यावे. त्याला नारायणमंत्राने अभिमंत्रित करावे. दंत-शुद्धी करून दातवण फेकून द्यावे. आपल्या पातकाचे स्मरण करून पूर्व, अग्निकोण, उत्तर अथवा ईशानकोण या दिशेस तोंड करून चांगले स्नान करावे. 'मी निष्पाप आहे. शुद्ध होऊन शुभ सिद्धीसाठी अग्रेसर झालो आहे.' अशा भावना दृढ धरून, आचमन, प्राणायाम करून, मंत्रोपदेष्टा गुरूने भगवान विष्णूंची प्रार्थना करून, त्यांना प्रदक्षिणा घालून पूजागृहात प्रवेश करावा.

देवेश्वर श्रीहरींची प्रार्थना झाल्यावर गुरूने अग्नीआदींच्या धारणेने शिष्यभूत समस्त पशूंचे शोधन करावे. संस्कार करावा. नंतर

वासुदेवादी मूर्तींशी संयोग करावा. शिष्यांना त्यांचे नेत्र बांधून मूर्तींकडे पाहाण्यास सांगावे. मूर्तींवर पुष्पांजली अर्पण करावी. गुरूने या वेळी नामनिर्देश करावा. शिष्यांकडून मूर्तींचे मंत्ररहित पूजन करावें. ज्या शिष्याच्या हातून ज्या मूर्तीवर फूल गळून पडेल, तिचे नाव गुरूने शिष्यास द्यावे. कुमारी कन्येच्या हाताने कातलेले काळ्या रंगाचे सूत घेऊन, त्याला त्रिगुणित करून, त्यात प्रक्रियाभेदाने देवीचे चिंतन करावे. त्या सूत्रास प्राकृतिक पाशांच्या तत्त्वानुसार चोवीस गाठी मारून ते पेल्यात ठेवून कुंडाजवळ स्थापन करावे.

तीन, पांच, दहा, बारा, जितके सूत्रभेद असतील तितक्या त्याला गाठी असाव्यात. हृदयापासून अस्त्रापर्यंत पांच अंगसंबंधी मंत्र म्हणून सर्व भूतांना प्रकृतिक्रमाने तन्मात्रास्वरूपात लीन करावे व त्या मायामय सूत्रात व पशूत (जीवात) प्रकृती, लिंगशक्ती, कर्ता, बुद्धी, मन, यांचा उपसंहार करावा. त्यानंतर पंचतन्मात्र, बुद्धी, कर्म, पंचमहाभूत, या बारा रूपांत अभिव्यक्त द्वादशात्मक सूत्र व शिष्य यांच्या शरीरात चिंतन करावे. त्यानंतर इच्छेनुसार सृष्टीचे संपातविधीनें हवन करावे. सृष्टिक्रमानें एकेकासाठी शंभर शंभर आहुत्या द्याव्यात. पेल्यात ठेवलेल्या ग्रथित सूत्रास कुंभेशास समर्मित करावे. त्यानंतर यथोचित रीतीनें अधिवासन करून शिष्यास दीक्षा द्यावी.

त्यानंतर श्रीहरींचे स्मरण करून कुशांवर भूतांसाठी बली द्यावेत. 'नमो भूतेभ्यः' म्हणून भगवान विष्णूंचे पूजन करावे. अग्नीस तुपाने तृप्त करून, शिष्यास बोलावून बद्धपद्मासनावर बसवावे. त्यास सवन प्रोक्षण करून विष्णुहस्तानें त्याच्या मस्तकास स्पर्श करावा. कुंभेश्वरास प्रार्थना करून गुरूने पूर्वोक्त सूत्राचा संस्कार करावा. मूलमंत्रानें सृष्टीस शंभर आहुत्या द्याव्यात. श्वेतरज (वाळू) घेऊन तिला शंभरदा मूलमंत्र म्हणून अभिमंत्रित करावे. शिष्याच्या हृदयास ताडन करावे. 'हुं फट्'चा उच्चार करावा. आचार्याने अग्नीत होम करावा. शुद्ध झालेल्या शिष्याचा स्वीकार करावा.

या प्रयोगात 'ॐ वं भूतानि वियुङ्क्ष्व हुं फट्' या मंत्रानें ताडन करावे. 'ॐ यं भूतान्यापातयेऽहम्' या मंत्राने 'आपातन' (वियोजन)

करून पुन्हा दिव्य प्रकृतीशी संयोजन करावे. या वेळी 'ॐ यं भूतानि युङ्क्ष्व' हा मंत्र म्हणावा. पूर्णाहुतीच्या वेळी 'ॐ भूतानि संहार स्वाहा' हा होममंत्र म्हणावा. 'ॐ अं ॐ नमो भगवते वासुदेवाय अं वौषट्' हा पूर्णाहुतीचा मंत्र आहे.

त्यानंतर 'ॐ रां (नमः) कर्मेन्द्रियाणि', 'ॐ दें (नमः) बुद्धीन्द्रियाणि' या मंत्रांच्या शेवटी 'वियुङ्क्ष्व हुं फट्' याची संयोजना करावी. 'ॐ सुं गन्धतन्मात्रे बिम्बं युङ्क्ष्व हुं फट्', 'ॐ सं पाहि हां ॐ स्वं स्वं युङ्क्ष्व प्रकृत्या अं जं हुं गन्धतन्मात्रे संहर स्वाहा' हे क्रमशः संयोजन व होम यांचे मंत्र होत. त्यानंतर पुर्णाहुती करून उत्तरवर्ती कर्मे करताना पुढील मंत्र म्हणावेत. 'ॐ रां रसतन्मात्रे । ॐ तें रूपतन्मात्रे । ॐ वं स्पर्शतन्मात्रे । ॐ यं शब्दतन्मात्रे । ॐ नमः । ॐ सों अहंकारे । ॐ नं बुद्धयौ । ॐ प्राकृतौ' असा हा दीक्षायोग एकव्यूहात्मक मूर्तीसाठी आहे.

यानंतर ज्ञानेन्द्रियांचे, तन्मात्रांचे, मनबुद्धीचे, अहंकाराचे, लिंगात्म्याचे शोधन करून शेवटी पुनः प्रकृतीची शुद्धी करावी. 'शुद्ध झालेला प्राकृत पुरुष ईश्वरीय धामात प्रतिष्ठित आहे. त्याने सर्व भोगांचा अनुभव घेतला आहे. आता तो मुक्तिपदात स्थित आहे' अशा प्रकारचे ध्यान करून पूर्णाहुती द्यावी. ही दीक्षा अधिकार प्रदान करणारी आहे. द्वादशी तिथीस गुरूने शिष्याला दीक्षा द्यावी. दीक्षाकर्मात प्रथम ज्या सूत्रास गाठी दिल्या होत्या त्या सोडून गुरूने शिष्याच्या शरीरावर क्रमशः त्या तत्त्वांचे शोधन करावे. पूर्णाहुतीच्या द्वारे शिष्यास उत्तम तत्त्वाने संयुक्त करावे. या प्रकारे शिष्य प्रकृतिभावास प्राप्त होतो.

यानंतर शिष्यास 'शक्ती' नावाची दीक्षा कशी द्यावी, ध्यानयोगाने, उत्तानमुद्रेने शोधन कसे करावे, शिष्यास परमेश्वरपदावर प्रतिष्ठित कसे करावे, आत्मशुद्धी कशी कशी करावी, शिष्य वा पुत्र यास अधिकार देऊन गुरूने संन्यास कसा घ्यावा, आत्मनिष्ठ होऊन देहपाताची प्रतीक्षा कशी करावी, इत्यादी विषयांचा निर्देश आला आहे.

## अपामार्जन विधान, कुशापामार्जन स्तोत्र

यानंतर अठ्ठाविसाव्या अध्यायात आचार्यांच्या अभिषेकाचे विधान, एकोणतिसाव्या अध्यायात मंत्रसाधनविधी, सर्वतोमद्रादी मंडलांचे लक्षण, तिसाव्या अध्यायात भद्रमंडलादींचा पूजाविधी इत्यादींचे वर्णन आले असून एकतिसाव्या अध्यायात 'अपामार्जनविधान' व 'कुशापामार्जन' नावांच्या स्तोत्रांचे वर्णन आले आहे. अपामार्जनविधानानें मानव दुःखापासून मुक्त होतो. त्याला सुखाची प्राप्ती होते. सच्चिदानंदमय, परमार्थरूप, सर्वान्तर्यामी, महात्मा, निराकार, सहस्र आकारधारी व्यापक परमात्म्यास माझा नमस्कार असो. जो सर्व कल्मषांनी रहित, परम शुद्ध व नित्य ध्यानयोगरत आहे, त्याला नमस्कार करून मी प्रस्तुत विधान सांगतो, असे कल्पून अपामार्जनविधी करावा.

मी भगवान वराह, नृसिंह, वामन यांना नमस्कार करून रक्षणाच्या विषयासंबंधी काही सांगतो. माझे हे कथन सफल व्हावे. मी भगवान त्रिविक्रम, श्रीराम, वैकुंठ व नर यांना नमस्कार करतो. अशा भावनेने म्हणावे.

वराह नरसिंहेश वामनेश त्रिविक्रम ।
हयग्रीवेश सर्वेश हृषीकेश हराशुभम् ।।
अपराजित चक्राद्यैश्चतुर्भिः परमायुधैः ।
अखण्डितानुभावैस्त्वं सर्वदुष्टहरो भव ।।
हरामुकस्य दुरितं सर्वं च कुशलं कुरु ।
मृत्युबन्धार्तिभयदं दुरिष्टस्य च यत्फलम् ।।

भगवान वराह, नृसिंहेश्वर, वामनेश्वर, त्रिविक्रम, हयग्रीवेश, सर्वेश, हृषीकेश, माझे सारे अशुभ दूर व्हावे. कोणाकडूनही पराभूत न होणाऱ्या परमेश्वरा, आपल्या अखंडित प्रभावशाली चक्र आदी चार आयुधांनी सर्व दुष्टांचा संहार करावा. प्रभो, आपण रोगी वा प्रार्थीची सर्व पापे दूर करावीत. त्याच्यासाठी कुशल-क्षेमाचे संपादन करावे. दोषयुक्त यज्ञ वा पापाचा फलरूप मृत्यू, बंधन, रोग, पीडा, भय

इत्यादींचा आपण नाश करावा.

अशा प्रकाच्या उत्कृष्ट स्तोत्रांनी व प्रार्थनांनी हा अध्याय समृद्ध बनला आहे. ॐ भगवान वासुदेवांना नमस्कार असो. खड्गधारी श्रीकृष्णांना नमस्कार असो. आदिचक्रधारी कमलनयन केशवांना नमस्कार असो. वराहरूपी नारायणा, दुष्ट रोगांचा नाश करावा. गोविंदा, त्रिदोषज, संनिपात, आगन्तुक, ऐकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक ज्वरांचा नाश करावा. नेत्ररोग, शिरोरोग, उदररोग, श्वासावरोध, अतिश्वास (दमा), परिताप, कंपन, गुदरोग, नासिकारोग, पादरोग, कुष्ठरोग, क्षयरोग, कामलादी रोग, दारुण प्रमेह, भगंदर, अतिसार, मुखरोग, मूत्रकृच्छ्र व इत्यादी भयानक रोग दूर करावेत. भगवान वासुदेवांच्या संकीर्तनाने वातज, पित्तज, कफज, संन्निपातज इत्यादी रोगांचा नाश होतो. 'अच्युत', 'अनंत', 'गोविंद' या नामांच्या उच्चाराने सर्व रोग नष्ट होतात.

स्थावर, जंगम, कृत्रिम, दन्तोद्भूत, नखोद्भूत, आकाशोद्भूत असे दुःखदायक रोग वासुदेवांच्या संकीर्तनाने दूर होतात. डाकिनी, वेताळ, पिशाच, गंधर्व, यक्ष, राक्षस, शकुनी, पूतना आदी ग्रह इत्यादींचा नाश होतो. वासुदेवा, आपण सर्वात्मा परमेश्वर जनार्दन आहात. आपण सर्व रोगांचा नाश करावा. श्रीविष्णूंच्या स्मरणाने पापसमूहाचा नाश होतो. सर्वत्र शांती व्हावी, मंगल व्हावे. दुष्ट रोगाचा नाश व्हावा. भगवान वासुदेवांच्या शरीरापासून प्राप्त झालेल्या कुशांनी या रोगांचा नाश व्हावा. नरनारायण व गोविंद यांनी अपामार्जन करावे. त्यांच्या वचनाने सर्व दुःखांचे शमन होईल. सर्व रोगांच्या निवारणासाठी 'अपामार्जनस्तोत्र' प्रशस्त आहे. मी श्रीहरी आहे. कुशा विष्णू आहेत. त्यांनीच रोगांचा नाश केला आहे.

## निर्वाणदीक्षेसाठी अठ्ठेचाळीस संस्कार

बत्तिसाव्या अध्यायात निर्वाणदीक्षेसाठी अठ्ठेचाळीस संस्कार सांगितले आहेत. या संस्कारांमुळे मनुष्य देवतुल्य होतो. गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चूडाकर्म,

चार ब्रह्मचर्यव्रतें– वैष्णवी, पार्थी, भौतिकी व श्रोतिकी, गोदान, समावर्तन, सात पाकयज्ञ– अष्टका, अन्वष्टका, पार्वणश्राद्ध, श्रावणी, आग्रहायणी, चैत्री व आश्वयुजी, सात हविर्यज्ञ– आधान, अग्निहोम, दर्श, पौर्णमास, चातुर्मास्य, पशुबंध, सौत्रामणी, सात सोमसंस्था– अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ, षोडशी, वाजपेय, अतिरात्र, आप्तोर्याम, सहस्त्रेश यज्ञ– हिरण्याङ्घ्रि, हिरण्याक्ष, हिरण्यमित्र, हिरण्यपाणि, हेमाक्ष, हेमांग, हेमसूत्र, हिरण्यास्य, हिरण्यांग, हेमजिव्ह, हिरण्यवान, यज्ञांचा स्वामी अश्वमेध, आठ गुण– सर्वभूतदया, क्षमा, आर्जव, शौच, अनायास, मंगल, अकृपणता, अस्पृहा असे संस्कार करावेत.

इष्टदेवास मूलमंत्रानें शंभर आहुत्या द्याव्यात. सौर, शाक्त, वैष्णव, शैव हे सर्व दीक्षेत समान आहेत. या संस्कारांनी संस्कृत होऊन मनुष्य भोग-मोक्षाचा धनी होतो. तो सर्व रोगांपासून मुक्त होऊन देवासमान होतो. इष्टदेवाचा जप, होम, पूजन यांनी मनुष्यास इच्छित वस्तूची प्राप्ती होते.

## पवित्रारोपण, भूतशुद्धी, योगपीठस्थ देवांचा पूजाविधी

तेहतिसाव्या अध्यायात पवित्रारोपणविधी, भूतशुद्धीं इत्यादी विषयांची माहिती आलेली आहे. वर्षात एकदा केलेला पवित्रारोपणाचा विधी संपूर्ण वर्षभर केलेल्या श्रीहरींच्या पूजेचे फल देणारा आहे. आषाढ शुक्ल एकादशीपासून कार्तिक शुक्ल एकादशीपर्यंत पवित्रारोपणाविधी केला जातो. प्रतिपदा धनद तिथी आहे. द्वितीया आदी तिथी क्रमशः लक्ष्मी आदी देवतांच्या आहेत. लक्ष्मीची द्वितीया, गौरीची तृतीया, गणेशाची चतुर्थी, सरस्वती व नागदेव यांची पंचमी, कार्तिकेयाची षष्ठी, सूर्याची सप्तमी, मातृकांची अष्टमी, दुर्गेची नवमी, नागांची वा यमराजाची दशमी, भगवान विष्णूंची एकादशी, श्रीहरींची द्वादशी, कामदेवांची त्रयोदशी, शिवांची चतुर्दशी आणि ब्रह्मदेवाची पौर्णिमा व अमावास्या असते.

पवित्रारोपणाचा विधी सर्व देवांसाठी समान आहे. केवळ मंत्रादी विधी प्रत्येक देवासाठी वेगळा आहे. पवित्रक बनविण्यासाठी सोने,

चांदी, तांबे, कापसाचे सूत, इत्यादींचा उपयोग होतो. ब्राह्मणीच्या हाताने कातलेले सूत सर्वोत्तम होय. असे जर मिळाले नाही तर कोणतेही सूत्र संस्कार करून उपयोगात आणावे. सूत तिप्पट, पुन्हा तिप्पट करून त्याचे पवित्रक बनवावे. एकशेआठ तंतूंचे सूत्र उत्तम असते. पवित्रारोपणाच्या पूर्वी इष्टदेवाची प्रार्थना करावी. इष्टदेवाच्या मंडलासाठी गायत्रीमंत्राचा जप करून पवित्रक बांधावे. इष्टदेव नारायणांसाठी गायत्रीमंत्र असा आहे. 'ॐ नमो नारायणाय विद्महे, वासुदेवाय धीमहि, तन्नो विष्णुः प्रचोदयात्' देवप्रतिमांवर अर्पण करण्यासाठी अनेक प्रकारची पवित्रके असतात. एक मूर्तीच्या नाभीपर्यंत पोचते. दुसरे मांडयापर्यंत, तिसरे गुडघ्यांपर्यंत, चौथे पायांपर्यंत पोचणारे असते. हे शेवटचे पवित्रक 'वनमाला' या नावाने ओळखले जाते. ते एक हजार आठ तंतूंचे बनलेले असते.

या पवित्रकाचे वर्णन आणखीही पुढे आले आहे. आचार्यांसाठी, पिता-मातेसाठी, पुस्तकावर अर्पण करण्यासाठी, स्वतःस धारण करण्यासाठी, अशी अनेक पवित्रके व त्यांची लक्षणे वर्णन करण्यात आली आहेत. मंद, मध्यम, उत्तम पुरुषांसाठी अनामिका, मध्यमा व अंगुष्ठ यांनी पवित्र पवित्रक घालावे. पवित्रकास रोचना, अगरुकर्पूरमिश्रित हळद, कुंकुम इत्यादींचा रंग द्यावा. भक्त पुरुषाने एकादशीस स्नान, संध्या पूजा करून भगवान श्रीहरींचे भजन करावे. 'क्षं क्षेत्रपालाय नमः' म्हणून क्षेत्रपालाची पूजा करावी. 'श्रियै नमः' म्हणून देवीची, 'धात्रे नमः' म्हणून धात्याची व 'गंगायै नमः' म्हणून गंगेची अर्चना करावी. विधाता, यमुना, शंखनिधी, पद्मनिधी यांचीही पूजा करावी.

त्यानतर 'सारंगाय नमः' म्हणून विघ्नकारी भूतांना दूर करावे, नंतर 'ॐ हां वास्त्वाधिपतये ब्रह्मणे नमः' म्हणून ब्रह्मदेवांना पुष्प वाहावे. आसनावर बसून नंतर भूतशुद्धी करावी. या भूतशुद्धीचा विधी असा आहे.

ॐ ह्रूं हः फट् ह्रूं गन्धतन्मात्रं संहरामि नमः ।
ॐ ह्रूं हः फट् ह्रूं रसतन्मात्रं संहरामि नमः ।
ॐ ह्रूं हः फट् ह्रूं रूपतन्मात्रं संहरामि नमः ।

ॐ ह्रूं हः फट् ह्रूं स्पर्शतन्मात्रं संहरामि नमः ।
ॐ ह्रूं हः फट् ह्रूं शब्दतन्मात्रं संहरामि नमः ।

अशा पांच उद्घात-वाक्यांचा उच्चार करून गंधतन्मात्रास्वरूप भूमिमंडलास, वज्रचिन्हित सुवर्णमय चतुरस्र पीठास, इंद्रादी देवांना आपल्या चरणावर स्थित पाहून त्यांचे चिंतन करावे. या प्रकारे गंधतन्मात्र शुद्ध झाल्यावर त्याला रसतन्मात्रात लीन करावे. रसतन्मात्राचा रूपतन्मात्रात संहार असा करावा 'ॐ ह्रुं हः फट् ह्रुं रसतन्मात्रं संहरामि नमः', 'ॐ ह्रूं हः फट् ह्रूं रूपतन्मात्रं संहरामि नमः', 'ॐ ह्रूं हः फट् ह्रूं स्पर्शतन्मात्रं सहरामि नमः', ॐ ह्रुं हः फट् ह्रुं शब्दतन्मात्रं संहरामि नमः' या वाक्यांचा उच्चार करून जानू पासून नाभीपर्यंतच्या भागास श्वेतकमलाने चिन्हित शुक्लवर्ण, अर्ध-चंद्राकार पाहावे. ध्यानद्वारे वरुणदेवाचे पूजन करावे. या उच्चारणामुळे रसतन्मात्राची शुद्धी होते.

यानंतर रसतन्मात्राचा रूपतन्मात्रेत लय करावा. अशीच क्रमशः शुद्धी सर्व शरीराची करावी. 'यं', 'रं', 'वं', 'लं' या बीजमंत्रांनी चिंतन करून दिव्य देहास मिळवावे आणि करन्यास व अंगन्यास करावा. भगवान विष्णू, अनंत, इत्यादींचे पूजन करावे. गण, सरस्वती, नारद, नलकूबर, गुरू, गुरुपादुका, परमगुरू, त्यांच्या पादुका यांची पूजा करावी. पूर्वसिद्ध व परसिद्ध शक्तींची पूजा करावी. लक्ष्मी, सरस्वती, प्रीती, कीर्ती, शांती, कांती, पुष्टी, तुष्टी, या पूर्वसिद्ध शक्ती होत. इंद्र, दिक्पाल, श्रीहरी यांची पूजा करावी. धृती, श्री, रती, कांती आदी परसिद्ध शक्ती असून मूलमंत्राने भगवान अच्युतांची स्थापना करावी. पूजेच्या प्रारंभी भगवानांना प्रार्थना करावी. 'भगवन्, आपण माझ्या समीप उपस्थित असावं.' (ॐ अभिमुखो भव).

त्यानंतर त्यांना अर्घ्य, पाद्य, गंध, उपचार इत्यादी देऊन अर्चना करावी. 'ॐ भीषय भीषय हृदयाय नमः । ॐ त्रासय त्रासय शिरसे नमः । ॐ मर्दय मर्दय शिखायै नमः । ॐ रक्ष रक्ष नेत्रत्रयाय नमः । ॐ प्रध्वंसय प्रध्वंसय कवचाय नमः । ॐ हूं फट् अस्त्राय नमः' अशा प्रकारे अग्निकोणादी दिशांची क्रमाने मूलबीजद्वारे अंगांचे पूजन करावे.

पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर दिशांना मूर्त्यात्मक आवरणाची अर्चना करावी. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध या चार मूर्ती आहेत. अग्निकोणादी कोणात अनुक्रमे श्री, रती, घृती, कांती यांची पूजा करावी. याही श्रीहरींच्याच मूर्ती आहेत. याच दिशांना शंख, चक्र, गदा, पद्म यांची परिचर्या करावी. पूर्वादी दिशांना शार्ङ्ग, मुसळ, खड्ग, वनमाला यांची अर्चना करावी. बाह्यभागात दिशांना क्रमशः इंद्र, अग्नी, यम, निर्ऋती, वरुण, वायू, कुबेर व ईशान यांची पूजा करून नैर्ऋत्य व पश्चिम दिशांच्या मध्ये अनंताची व पूर्व व ईशान्य दिशांच्या मध्ये ब्रह्मदेवांची अर्चना करावी. बाह्यभागात वज्रआदी अस्त्रमय आवरणाची पूजा करावी. ऐरावत, रेडा, वानर, मत्स्य, मृग, शश, वृषभ, कूर्म, हंस इत्यादींचीही पूजा करावी. पृश्निगर्भ व कुमुद आदी द्वारपालांची पूजा करावी. त्यानंतर श्रीहरींना नमस्कार करून 'ॐ विष्णुपार्षदेभ्यो नमः' म्हणून बलिपीठावर बली समर्पित करावा.

ईशान्यकोणात 'ॐ विश्वाय विष्वक्सेनात्मने नमः' अशा मंत्राने विष्वक्सेनाची अर्चना करावी. भगवानांच्या उजव्या हातात रक्षासूत्र बांधावे उपवास करावा. भगवानांची स्तुती करावी. भगवानांचे नित्य पूजन लक्ष्मीची प्राप्ती करून देणारे आहे. 'ॐ ह्रीं श्रीं श्रीधराय त्रैलोक्यमोहनाय नमः' हा भगवानांच्या पूजेसाठी मंत्र आहे.

## देवालयनिर्मितीचे फल

यानंतर चौतिसाव्या अध्यायात पवित्रारोपणासाठी पूजाहोमादी विधी, पस्तिसाव्या अध्यायात पवित्राधिवासनविधी, छत्तिसाव्यात भगवान विष्णूंसाठी पवित्रारोपणविधी, सदतिसाव्यात सर्व देवांसाठी पवित्रारोपणविधी इत्यादी विषय आले असून अडतिसाव्या अध्यायात देवालयनिर्मितीने प्राप्त होणाऱ्या फळाचे वर्णन केले आहे. हा सर्व विधी अग्निदेवांनी वसिष्ठांना वर्णन करून सांगितला आहे.

देवासाठी मंदिर, जलाशय आदी निर्माण करण्याची इच्छा झाली की तो शुभ संकल्पच हजारो जन्मांची पातके नष्ट करतो. जो मनाने भावनाद्वारे मंदिर निर्माण करतो, त्याच्या शेकडो जन्मांतील पापे

नाहीशी होतात. दुसऱ्याने निर्माण केलेल्या कृष्णमंदिरात जो अनुमोदन देतो तोही समग्र पापांपासून मुक्त होतो. त्याला अच्युतदेवाचा लोक प्राप्त होतो. विष्णूंचे मंदिर निर्माण करून मनुष्य आपल्या पूर्वीच्या व होणाऱ्या हजार कुलांचा उद्धार होऊन तो विष्णूलोकात जातो. देवालयांची निर्मिती केली की, ब्रह्महत्येसारख्या पापांचाही नाश होतो.

यज्ञापासून ज्या फलाची प्राप्ती होत नाही त्याची प्राप्ती देवालय निर्माण केल्यानें होते. देवालयास निर्माण करून मनुष्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचे फल प्राप्त होते. रणभूमीवर मरणाऱ्यास जे फल प्राप्त होते ते देवालय निर्माण करणाऱ्यास सहज सुलभ होते. एकायतन म्हणजे एकाच देवाचे लहानसे देवालय निर्माण करणारा स्वर्ग वा दिव्य-लोक प्राप्त करून घेतो. त्र्यायतन मंदिराचा निर्माता ब्रह्मलोकात जातो. पंचायतन मंदिराची निर्मिती करणारा शिवलोकास जातो. अष्टायतन देवालय निर्माण करणारा श्रीहरींच्या सन्निध राहातो. षोडशायतन निर्माण करणारा भोग व मोक्ष यांची प्राप्ती करून घेतो.

श्रीहरींच्या मंदिराच्या तीन श्रेणी आहेत. कनिष्ठ, मध्यम व श्रेष्ठ. यांना निर्माण करून स्वर्गलोक, विष्णुलोक व मोक्षाची प्राप्ती होते. धनवान मनुष्य विष्णूंचे उत्तम श्रेणीचे मंदिर बांधून जे फल मिळवितो तेच फल निर्धन मनुष्य निम्नश्रेणीचे मंदिर बनवून मिळवितो. एक लाख वा एक हजार वा शंभर अथवा पन्नास मुद्रा खर्च करून भगवान विष्णूंचे मंदिर बनविणारा नित्य त्या लोकास जातो. जे लोक लहानपणी खेळताना धुळीचे मंदिर बनवितात तेही विष्णुधामास जातात. तीर्थस्थानी, पवित्रस्थानी, सिद्धक्षेत्रात, आश्रमात भगवान विष्णूंचे मंदिर जो बनवितो त्याला तिप्पट फल मिळते. जो मनुष्य विष्णूंच्या मंदिरास चुन्यानें लिंपतो, त्यावर बंधूकाचे फूल चित्रित करतो तो शेवटी भगवानांच्या धामास जातो. जीर्ण झालेले मंदिर जो दुरुस्त करतो, नवीन बनवितों त्याला दुप्पट फलाची प्राप्ती होते. त्याला साक्षात विष्णुस्वरूपाची प्राप्ती होते.

जो मनुष्य भगवान श्रीकृष्णांचे मंदिर बनवितो तो पुण्यवान बनून आपल्या कुलाचा उद्धार करतो. जो भगवान विष्णू, शिव, सूर्य, देवी

यांची मंदिरे बनवितो त्याला या लोकी अक्षय कीर्ती प्राप्त होते. भगवानांचे मंदिर बनविले नाही तर धनाचा उपयोग तरी काय? कमावलेल्या धनाचा नाश निश्चित आहे. म्हणून बुद्धिमान माणसाने विष्णू आदी देवांची मंदिरे बांधावीत. त्याच्या घरात चराचर त्रिभुवनाचा निवास असतो. ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत जे स्थूल, सूक्ष्म, भूत, वर्तमान, भविष्य निर्माण झाले ते सर्व भगवान विष्णूंपासूनच. अशा देवाधिदेवाचे मंदिर बनविणारा या जगात पुन्हा येत नाही.

मंदिर बनविण्यापेक्षा अधिक पुण्य देवाची मूर्ती तयार करण्यात आहे. देवाच्या मूर्तीच्या स्थापनेसाठी जो यज्ञ होतो त्याचे अनंत फल आहे. कच्च्या मातीच्या मूर्तीपेक्षा लाकडी मूर्ती श्रेष्ठ. तिच्यापेक्षा विटेची, फत्तराची, सुवर्णादी धातूंची मूर्ती उत्तम फलदायी होते. देव-मंदिराचा प्रारंभ झाला की सात जन्मांची पापे नष्ट होतात. मनुष्य स्वर्गाचा धनी होतो. तो नरकात जात नाही. त्याच्या शंभर पिढ्यांचा उद्धार होतो व तो विष्णुलोकास पोचतो. यमराजाने आपल्या दूतांना म्हटले आहे,

'देवप्रतिमा व मंदिरं निर्माण करणाऱ्या, त्याची पूजा करणाऱ्या लोकांना तुम्ही नरकात नेऊ नये. देवमंदिर बनवीत नाही त्याला मात्र पकडून आणावे. भगवानांना जे शरण गेले आहेत त्यांना मात्र तुम्ही पकडू नका. श्रीकृष्णांचं नामसंकीर्तन करणाऱ्यास तुम्ही पकडू नका. जे नित्य भगवान जनार्दनांची पूजा करतात त्यांच्याकडे तुम्ही नजर फिरवू नका. जे लोक फूल, धूप, वस्त्रं, आभूषणं यांनी भगवंतांची पूजा करतात, त्यांनाही स्पर्श करू नका. कारण ती माणसं भगवान श्रीकृष्णांच्या धामास पोचलेली असतात. जे भगवानांच्या मंदिरास सारव-तात, रंग देतात, दुरुस्ती करतात, त्यांना व त्यांच्या वंशजांना तुम्ही सोडून द्यावं. ज्यानं भगवंतांचं मंदिर बनविलं आहे त्याच्या शंभर पिढ्यांपर्यंत तुम्ही त्याच्याकडं वाईट नजरेनं पाहू नका. यज्ञकर्त्यास जे फल मिळतं तेच विष्णूंचं मंदिर बनविणाऱ्यास मिळतं. भगवान विष्णू सप्तलोकमय आहेत. त्यांचं मंदिर जो बनवितो, तो आपल्या कुलास तारतो. त्याला अक्षयलोकाची प्राप्ती होते. भगवानांची प्रतिमा बनवि-

णारा मनुष्य विष्णुलोकास जातो.'

## विष्णूंची स्थापना व भूपरिग्रह

भगवान हयग्रीव एकोणचाळिसाव्या अध्यायात सांगतात की, त्यांच्या पंचरात्र-सप्तरात्र धर्माचा प्रसार ऋषींनी मानवलोकात केला आहे. त्यांची संख्या पंचवीस असून नावे अशी आहेत. आदिहयशीर्षतंत्र, त्रैलोक्यमोहनतंत्र, वैभवतंत्र, पुष्करतंत्र, प्रल्हादतंत्र, गार्ग्यतंत्र, गालवतंत्र, नारदीयतंत्र, श्रीप्रश्नतंत्र, शांडिल्यतंत्र, ईश्वरतंत्र, सत्यतंत्र, शौनकतंत्र, वसिष्ठोक्त ज्ञानसागरतंत्र, स्वायंभुवतंत्र, कापिलतंत्र, तार्क्ष्य-(गरुड)तंत्र, नारायणीयतंत्र, आत्रेयतंत्र, नारसिंहतंत्र, आनंदतंत्र, आरुणतंत्र, बोधायनतंत्र, अष्टांगतंत्र, विश्वतंत्र.

या तंत्रांना अनुसरून द्विजानें देवविग्रहाची प्रतिष्ठा करावी. कच्छदेश, कावेरीतट, कोंकण, कामरूप, कलिंग, कांची, काश्मीर या देशांत उत्पन्न झालेल्या ब्राह्मणानें देवप्रतिष्ठा करू नये. आकाश, वायू, तेज, जल, पृथ्वी, ही पंचमहाभूते पंचरात्र आहेत. जो चेतनाशून्य व अज्ञानांधकारानें व्याप्त आहे तो पंचरात्ररहित मानावा. 'मी पापमुक्त परब्रह्म विष्णू आहे' असे म्हणणारा देशिक असतो. बाह्य लक्षणांनी हीन वाटला तरी तो तंत्रवेत्ता आचार्य मानला जातो.

देवदेवतांची स्थापना नगराभिमुख करावी. कुरुक्षेत्र, गया आदी तीर्थस्थानांत अथवा नदीच्या समीप देवालय निर्माण करू नये. ब्रह्मदेवांचे मंदिर नगराच्या मध्यभागी बांधावे. इंद्राचे पूर्वदिशेस व अग्निदेवाचे आणि मातृकांचे मंदिर आग्नेयकोणात बांधावे. भूतगण व यमराज दक्षिणेस, चंडिका, पितृगण, दैत्यदिक यांचे मंदिर नैर्ऋत्यकोणात बांधावे. वरुणाचे पश्चिमेस, वायुदेवाचे व नागाचे वायव्येस, यक्षवर कुबेराचे उत्तरदिशेस, चंडीमहेशाचे ईशान्येस आणि विष्णूचे मंदिर सर्वत्र बांधावे.

दोन देवमंदिरे असतील तर दुप्पट जागा सोडून देवमंदिर बांधावे. भूमीचे शोधन केल्यावर भूमिपरिग्रह करावा. त्यानंतर प्राकाराच्या सीमेपर्यंत माप, हरिद्राचूर्ण, खील, दधी, सक्तू यांनी भूतबली द्यावा.

त्यानंतर षडक्षरमंत्रानें आठही दिशांना सक्तू विखरून म्हणावे, 'या भूमिखंडावर जे राक्षस, पिशाच आदी निवास करतात, त्यांनी इथून निघून जावं. मी इथं भगवान श्रीहरींचं मंदिर बांधणार आहे.'

राक्षसाश्च पिशाचाश्च येऽस्मिंस्तिष्ठन्ति भूतले ।
सर्वे ते व्यपगच्छन्तु स्थानं कार्यमिहं हरे ।।

त्यानंतर भूमीस नांगराने नांगरून गोचारण करावे. आठ परमाणूंचा रथरेणू होतो. आठ रथरेणूंचा त्रसरेणू होतो. आठ त्रसरेणूंचा बालाग्र होतो. आठ बालाग्रांची लिक्षा होते, आठ लिक्षांची यूका, आठ यूकांची यवमध्य, आठ यवांचा अंगुल, चोवीस अंगुलांचा कर व अठ्ठावीस अंगुलींचा पद्महस्त होतो.

## मंदिराचा शिलान्यासविधी

चाळिसाव्या अध्यायात वास्तुमंडलवर्ती देवांची स्थापना, त्यांचे पूजन, अर्घ्यदान, बलिदान इत्यादी विधींचे वर्णन आले आहे. त्यानंतर पुढल्या एकेचाळिसाव्या अध्यायात हयग्रीवांनी मंदिराच्या शिलान्यासविधीचे वर्णन केले आहे. प्रथम मंडप बनवावा. नंतर उत्तर दिशेस चार कुंडे बनवावीत. ही कुंडे क्रमशः कुंभन्यास (कलशस्थापना), इष्टकान्यास ( वीट वा फत्तराची स्थापना ), द्वार स्तंभ यांचा आश्रय घेतील. कुंडे तयार झाल्यावर वास्तुदेवाचे पूजन करावे. पायात उपयोगात येणारी वीट चांगली पक्की असावी. ती बारा बारा अंगुलांच्या लांबीची असावी. पायात फत्तर घातला तरीही उत्तम. एक एक फत्तर एक एक हात लांब असावा.

तांब्याच्या नऊ कलशांची, मातीच्या कलशांची शक्तीनुसार स्थापना करावी. जल, पंचकषाय (जांभूळ, सेमर, खिरैंटी, मौलसिरी, बोर), सर्वौषधी, चंदनमिश्रीत जल यांनी कलश पूर्ण भरलेले असावेत. याच प्रकारे सोने, धान्य, गंध, चंदन इत्यादींनी पूजा करून कलशांतील जलाने 'आपो हि ष्ठा' इत्यादी तीन ऋचांनी, 'शं नो देवीराभिष्टय' आदी मंत्रांनी, 'तरत्स मन्दी:' इत्यादी मंत्रांनी, पावमानी ऋचांनी,

'उदुत्तमं वरुणं', 'कया नः' आणि 'वरुणस्योत्तम्भनमसि' इत्यादी मंत्रांनी पाठपूर्वक 'हंसः शुचिषद्' इत्यादी मंत्रांनी, श्रीसूक्ताच्या उच्चाराने शिला व विटा यांना अभिषेक करावा.

त्यानंतर मंडपामध्ये शय्येवर पूर्वमंडलात भगवान विष्णूंचे पूजन करावे. अरणीमंथनाद्वारे अग्नी प्रकट करून द्वादशमंत्राने त्यात समिधांचे हवन करावे. 'आधार' व 'आज्यभाग' नावांच्या आहुती प्रणवमंत्राने द्याव्यात. त्यानंतर अष्टाक्षरमंत्राने आठ आहुत्या देऊन 'ॐ भूः स्वाहा, ॐ भूवः स्वाहा, ॐ स्वः स्वाहा' अशा तीन व्याहृतींनी क्रमशः अग्नी, सोम व भगवान पुरुषोत्तम यांच्या निमित्ताने हवन करावे. त्यानंतर प्रायश्चित्त नावाचे हवन करून प्रणवयुक्त द्वादशाक्षरमंत्राने उडीद, तूप, तिल यांची पूर्णाहुती द्यावी. त्यानंतर आचार्याने पूर्वाभिमुख होऊन आठ दिशांना स्थापित कलशांवर पृथक् पृथक् पद्म आदी देवांची स्थापना व पूजा करावी. धरती लिंपून फत्तराची एक शिला व कलश यांची स्थापना करावी. नऊ कलशांवर पद्म, महापद्म, मकर, कूर्म, कुमुद, आनंद, पद्म व शंख यांना आठ कलशांवर व मध्यवर्ती कलशावर पद्मिनीस स्थापन करावे.

कलश हालणार नाहीत, डोलणार नाहीत, असे पाहावे. पूर्वेपासून ईशान्येपर्यंत एकेका कोणात एक एक वीट ठेवावी. त्यांवर विमलादी शक्तींचा न्यास करावा. मध्ये 'अनुग्रहा'ची स्थापना करावी त्यानंतर प्रार्थना करावी, 'मुनिवर अंगिराची सुपुत्री इष्टकादेवी, तुझं कोणतंच अंग तुटकं, फाटकं नाही. खराब नाही. तू सर्व अंगांनी पूर्ण आहेस. माझं तू अभीष्ट पूर्ण करावंस. मी आता प्रतिष्ठा करीत आहे.' या अर्थाच्या मंत्राने इष्टकांची स्थापना करून एकाग्रचित्ताने मध्यस्थानी गर्भाधान करावे. एका कलशावर देवेश्वर भगवान नारायण, पद्मिनी (लक्ष्मी) यांना स्थापित करून जवळच माती, धातू, रत्ने ठेवून द्यावीत. त्यानंतर अस्त्राची पूजा करावी. तांब्याच्या पात्रात पृथ्वीचे पूजन करावे. तिला प्रार्थना करावी.

'सर्व भूतांची ईश्वरी पृथ्वीदेवी, तू पर्वतांच्या आसनानं सुशोभित आहेस. चारही दिशांनी समुद्रांनी वेष्टित आहेस. एकान्तात गर्भधारणा

कर. वसिष्ठकन्या नंदा, वसू व प्रजा यांच्यासहित तू मला आनंदित कर. भार्गवपुत्री जया, अंगिराचे पुत्री पूर्णा, तुम्ही माझी कामना पूर्ण करा. महर्षी कश्यपांची कन्या भद्रा, तू माझी बुद्धी कल्याणमयी कर. सर्व बीजांनी युक्त, समस्त रत्नांनी व औषधांनी संपन्न सुंदरी जयादेवी, इथं आनंदपूर्वक रमावं. कश्यपपुत्री भद्रा, तू प्रजापतीची पुत्री आहेस. तू परम महान, सुंदरी, सुकान्त होऊन या गृहात रममाण हो भार्गवी-देवी, तू परम आश्चर्यमयी आहेस. गंध, माल्य यांनी सुशोभित व पूजित होऊन लोकांना ऐश्वर्य देणाऱ्या देवी, तू या घरात रमून जा. या देशाचे सम्राट, या नगराचे राजे, या घराचे मालक, लहान मुलं, प्राणी यांना आनंद देणाऱ्या संपदेची वृद्धी कर.'

अशी प्रार्थना करून कुंडात गर्भास स्थापन करावे. हे गर्भाधान रात्री व्हावे. या वेळी गायी व वस्त्रे यांचे दान करावे. लोकांना भोजन द्यावे. मंदिराच्या उंचीच्या मानानें प्रधान देवाचे पीठ निर्माण करावे. 'मी देवमंदिर बनवीत आहे.' अशा भावानें हे कार्य व्हावे. मंदिर बनवून संपत्तीचे फल मिळविता येते.

## प्रासादलक्षणवर्णन

आता सर्वसाधारणपणे प्रासादाचे म्हणजे देवालयाचे वर्णन हयग्रीवांनी बेचाळिसाव्या अध्यायात केले आहे. ज्याला मंदिर बनवा-यचे आहे, त्यानें चौकोनी क्षेत्राचे सोळा भाग करावेत. मधल्या भागात आयसहित गर्भ (मंदिरामधील मोकळी जागा) निश्चित करावा. उरलेल्या बारा भागांवर भिंती उभ्या कराव्यात. भिंतीच्या उंचीपेक्षा दुप्पट उंची शिखराची असावी. दोनही पार्श्वभागी बाहेर पडण्याचा मार्ग असावा. मंदिराच्या पुढील भूभाग शिखरासारखा करावा. मंदिरा-पुढला सभामंडप विस्ताराने मंदिराच्या भर्गसूत्रापेक्षा दुप्पट असावा. मंदिराचे पादस्तंभ आदी भिंतीच्या बरोबर असावेत. ते मध्यवर्ती स्तंभांनी विभूषित असावेत. मंदिराच्या गर्भाच्या प्रमाणात त्याचे मुख-मंडप (सभामंडप वा जगमोहन) असावा. त्यानंतर एक्याऐंशी स्थानांनी युक्त असा वास्तुमंडप बनवावा.

प्रासादाच्या या लक्षणानंतर प्रतिमेचे लक्षण सांगितले आहे. प्रतिमेच्या मानानें प्रासाद असावा. प्रतिमा जितकी मोठी तितकीच सुंदर पिंडी बनवावी. गर्भाच्या आठव्या अंशाच्या मापाचा रथाचा मार्ग असावा. तीन रथकांवर तीन वामांची स्थापना करावी. शिखरासाठी चार सूत्रांचा निपातन करावा. शिखराच्या अर्ध्या भागात सिंहाची प्रतिमा निर्माण करावी. शिखराच्या चार भागांपैकी दोन भागांना शुकनासा म्हणतात. शुकनासाच्या वर वेदी व वेदीच्या वर आमलसार नावाचा कंठसहित कलश निर्माण करावा. त्याला विकराल बनवू नये. वेदीच्या मानानें वरचा कलश असावा. मंदिराची दारे सुंदर व शोभासंपन्न असावीत. दाराच्या वरचा भाग सुंदर, मंगलमय करून त्यावर वृक्षाच्या दोन शाखा खोदाव्यात.

दोन चतुर्थांशात चंड, प्रचंड, विस्वक्सेन व वत्सदंड; या चार द्वारपालांच्या मूर्ती तयार कराव्यात. सुंदर रूपाच्या लक्ष्मीदेवीची मूर्ती तयार करावी. तिच्या हातात कमल असावें. दिग्गज कलशांनी तिला न्हाऊ घालताहेत असे असावे. मंदिराचा परकोट त्याच्या उचीच्या एकचतुर्थांश असावा. प्रासादाच्या गोपुराची उंची प्रासादाच्या चौथ्या भागाबरोबर असावी.

विष्णु-मंदिराच्या पुढे एक गरुडमंडप व भौमादी धाम तयार करावें. भगवानांच्या मूर्तीभोवती भगवत्प्रतिमा, अवतारांच्या मूर्ती तयार कराव्यात. पूर्व दिशेस वराह, दक्षिणेस नृसिंह, पश्चिमेस श्रीधर, उत्तरेस हयग्रीव, आग्नेयेस परशुराम, नैर्ऋत्येस श्रीराम, वायव्येस वामन, ईशान्येस वासुदेव यांच्या प्रतिमा स्थापन कराव्यात.

## शालग्राममूर्तीचे वर्णन

यानंतर मंदिरातील देवांची स्थापना, भूतशांती, वासुदेवादी प्रतिमांची लक्षणे अशी माहिती त्रेचाळिसाव्या व चव्वेचाळिसाव्या अध्यायांत आली आहे. पंचेचाळिसाव्या अध्यायात पिंडिकादींची लक्षणे असून सेहेचाळिसाव्या अध्यायात शालग्राममूर्तीचे वर्णन आले आहे.

भगवान हयग्रीवांनी या अध्यायात भोग व मोक्ष देणाऱ्या शालग्राम-मूर्तीचे वर्णन केले आहे.

ज्या शालग्राम शिलेवर चक्राचे चिन्ह असेल व जिचा वर्ण शुभ्र असेल तर तिला 'वासुदेव' असे नाव आहे. ज्या शिलेचा रंग लाल आहे, जीवर दोन चक्रे आहेत तिला 'संकर्षण' म्हणतात. जीवर चक्राचे सूक्ष्म चिन्ह असेल, अनेक छिद्रे असतील, निळा वर्ण असेल तिला प्रद्युम्न असे नाव आहे. ज्या शालग्रामावर कमलाचे चिन्ह असेल, ज्याची आकृती गोल असेल, रंग पिवळा असेल, ज्यावर दोन-तीन रेखा असतील त्याला अनिरुद्ध अशी संज्ञा आहे. ज्याची कांती काळी, नाभी उन्नत, ज्यावर मोठी छिद्रे असतील त्याला नारायण असे म्हणतात. ज्यावर कमल व चक्र यांची चिन्हे असतील, पृष्ठभागावर छिद्र असेल, जो बिंदूने युक्त असेल तो परमेष्ठी या नावाने ओळखला जातो. ज्यावर चक्राचे स्थूल चिन्ह असेल, ज्याची कांती श्याम असेल, ज्यावर गदेसारखी रेखा असेल त्या शालग्रामास विष्णू म्हणतात. नृसिंहशालग्रामावर चक्राचे स्थूल चिन्ह असते. त्याची कांती कपिलवर्णाची असते. त्यावर पांच बिंदू शोभतात.

वराहविग्रहावर शक्ती नावाच्या अस्त्राचे चिन्ह असते. त्यावर दोन असमान चक्रे असतात. त्याची कांती इंद्रनीलमण्याप्रमाणे असते. त्यावर तीन रेषांचे चिन्ह शोभत असते. ज्याचा पृष्ठभाग उंच असतो, जो गोलाकार असून आवर्तचिन्हाने युक्त व श्याम असतो त्या शाल-ग्रामास कूर्म अशी संज्ञा आहे. जो अंकुशाच्या रेषेने सुशोभित, नीलवर्ण, बिंदुयुक्त असतो त्यास हयग्रीवशालग्राम असे म्हणतात. ज्यावर एक चक्र व कमलाचे चिन्ह रेखित झालेले असते, त्या शालग्रामास वैकुंठ असे म्हणतात. ज्याची आकृती मोठी असते, ज्यावर तीन बिंदू शोभतात, जो काचेसमान श्वेत असतो, त्यास मत्स्यावताधारी भगवानांची मूर्ती मानतात. ज्यावर वनमालेचे चिन्ह व पांच रेखा असतात त्या गोलाकार शालग्रामशिलेस श्रीधर असे नाव आहे.

गोलाकार, अत्यंत छोटा, निळा व बिंदुयुक्त शालग्रामशिळा वामन या नावाने प्रसिद्ध असते. ज्याची कांती श्याम, दक्षिण भागावर

रेखा, डाव्या भागावर बिंदू असेल तर त्या शालग्रामास त्रिविक्रम म्हणतात. ज्यावर सर्पचिन्ह असेल, ज्याचे तेज अनेक प्रकारांचे असेल, जो अनेक मूर्तींनी मंडित असेल त्यास अनंत शेषनाग अशी संज्ञा आहे. जो स्थूल आहे, ज्याच्या मध्यभागी चक्राचे चिन्ह असेल, अधोभागी सूक्ष्म बिंदू शोभतो त्या शालग्रामास दामोदर म्हणतात. एक चक्राच्या शालग्रामास सुदर्शन, दोन चक्रांच्या शालग्रामास लक्ष्मीनारायण, तीन चक्रांच्या शालग्रामास अच्युत वा त्रिविक्रम अशी संज्ञा आहे. चार चक्रांनी युक्त शालग्रामास जनार्दन, पांच चक्रांच्या शालग्रामास वासुदेव, सहा चक्रांच्या शालग्रामास प्रद्युम्न, सात चक्रांच्या शालग्रामास संकर्षण म्हणतात. आठ चक्रांच्या शालग्रामास पुरुषोत्तम, नऊ चक्रांच्या शालग्रामास नवव्यूह, दहा चक्रांच्या शालग्रामास दशावतार, अकरा चक्रांच्या शालग्रामास अनिरुद्ध व बारा चक्रांच्या शालग्रामास द्वादशात्मा म्हणतात. अधिक चक्रांच्या शालग्रामास अनंत असे नाव आहे.

## श्रीहरींच्या चोवीस मूर्ती व द्वादशाक्षरस्तोत्र

यानंतर सत्तेचाळिसाव्या अध्यायात शालग्रामविग्रहांच्या पूजेचे वर्णन आले आहे. पुढे अठ्ठेचाळिसाव्या अध्यायात श्रीहरींच्या चोवीस मूर्तींचे वर्णन आले आहे. ओंकारस्वरूप केशव आपल्या हातांत पद्म, शंख, चक्र व गदा धारण करतात. नारायण शंख, पद्म, गदा व चक्र धारण करतात. मी प्रदक्षिणापूर्वक त्यांच्या चरणांवर नतमस्तक होतो. माधव गदा, चक्र, शंख व पद्म धारण करणारे असून मी त्यांना नमस्कार करतो. गोविंद आपल्या हातांत चक्र, गदा, पद्म, शंख धारण करतात. श्रीविष्णू गदा, पद्म, शंख, चक्र धारण करून मोक्ष देतात. मधुसूदन शंख, चक्र, पद्म व गदा धारण करतात. मी त्यांना भक्तिपूर्वक वंदन करतो. त्रिविक्रम पद्म, गदा, चक्र व शंख धारण करतात. भगवान वामन हातांत शंख, चक्र, गदा व पद्म धारण करून शोभतात.

श्रीधर कमल, चक्र, शाङ्‌र्गधनुष्य व शंख धारण करतात. ते सर्वांना सद्‌गती प्रदान करतात. हृषीकेश गदा, चक्र, पद्म व शंख धारण करून सर्वांचे रक्षण करतात. वरदायक भगवान पद्मनाभ शंख, पद्म,

चक्र व गदा धारण करतात. दामोदर पद्म, शंख, गदा व चक्र यांनी शोभा पावतात. वासुदेव गदा, शंख, चक्र, पद्म धारण करून सर्व जगाचा विस्तार करतात. संकर्षण गदा, शंख, पद्म व चक्र धारण करून आपले रक्षण करतात.

वादकुशल भगवान प्रद्युम्न हातांत चक्र, शंख, गदा व पद्म धारण करतात. अनिरुद्ध चक्र, गदा, शंख, व पद्म धारण करतात. त्यांनी आमचे रक्षण करावे. सुरेश्वर पुरुषोत्तम चक्र, कमल, शंख, गदा धारण करतात. भगवान अधोक्षज पद्म, गदा, शंख, चक्र धारण करतात. ते आपले रक्षण करोत. नृसिंहदेव चक्र, कमल, गदा व शंख धारण करतात. त्यांना नमस्कार असो. गदा, पद्म, चक्र, शंख धारण करणारे अच्युत आमचे रक्षण करोत. शंख, गदा, चक्र, पद्म धारण करणारे बालबटु-रूपधारी वामन, पद्म, चक्र, शंख, व गदा धारण करणारे जनार्दन, शंख, पद्म, चक्र, गदा धारण करणारे श्रीहरी व शंख, गदा, पद्म व चक्र धारण करणारे श्रीकृष्ण भोग व मोक्ष देणारे होवोत.

आदिमूर्ती भगवान वासुदेव आहेत. त्यांच्यापासून संकर्षण प्रकट झाला. संकर्षणापासून प्रद्युम्न, प्रद्युम्नापासून अनिरुद्ध झाला. यांच्या-पासून क्रमशः केशवादी तीन तीन रूपांत प्रकट झाले. यांची संख्या बारा झाली. चोवीस मूर्तींच्या स्तुतीचे हे द्वादशाक्षरस्तोत्र जो पाठ करील, श्रवण करील त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. वासुदेवापासून केशव, नारायण, माधव यांची, संकर्षणापासून गोविंद, विष्णू व मधु-सूदनांची व प्रद्युम्नापासून त्रिविक्रम, वामन, श्रीधर यांची व अनिरुद्धा-पासून हृषीकेश, पद्मनाभ व दामोदर यांची अभिव्यक्ती झाली. असे हे बारा प्रकट झाले.

या अध्यायातील बारा श्लोक स्तुतीचे आहेत. प्रत्येक श्लोकात भगवानच्या दोन दोन मूर्तींचे स्तवन असून प्रत्येक श्लोकाचे प्रारंभीचे एक अक्षर घेतल्यास 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' असा द्वादशाक्षर-मंत्र होतो. शेवटी स्तोत्रमंजूषेत हे स्तोत्र दिलेले आहे.

## दशावतारांची प्रतिमालक्षणे

मत्स्यादी अवतारांच्या प्रतिमांचे लक्षण एकोणपन्नासाव्या अध्यायात आले आहे. मत्स्यभगवानांची आकृती मत्स्याच्या समान असून कूर्मभगवानांची आकृती कासवाप्रमाणे असते. पृथ्वीचे उद्धारक भगवान वराह मनुष्यरूपी असावेत. त्यांच्या उजव्या हातांत गदा व चक्र व डाव्या हातांत शंख व पद्म असते. पद्माच्या स्थानी डाव्या भागात पद्मादेवी सुशोभित असते. पृथ्वी व अनंत चरणांशी असतात. भगवान वराहांच्या स्थापनेनें राज्याची प्राप्ती होते. नरसिंहांचे मुख खुले असावे. त्यांनी आपल्या डाव्या मांडीवर दानव हिरण्यकशिपू दाबलेला असून ते त्या दैत्याचे वक्ष विदीर्ण करतात, त्यांच्या गळयात माला व हातांत चक्र व गदा असतात.

वामनांच्या अवतारात छत्र व दंड यांना महत्त्व आहे. ते चतुर्भुज आहेत. परशुरामांच्या अवतारात हातांत धनुष्य व बाण असावेत. खड्ग, फरशी यांनीही ते सुशोभित होतात. श्रीरामचंद्रांना धनुष्य, बाण, खड्ग, शंख यांची जरूरी असते. कधी ते द्विभुजही असतात. बलरामांच्या हातात गदा व नांगर असतो. ते कधी चतुर्भुजही असतात. डाव्या बाजूच्या वरच्या हातात नांगर व खालच्या हातात शंख, उजव्या वरच्या हातात मुसळ व खालच्या हातात सुदर्शनचक्र असते.

बुद्धदेव उंच पद्मासनावर असतात. त्यांचा एक हात वरद, दुसरा हात अभयमुद्रा करणारा असतो. ते शांत स्वरूपाचे आहेत. त्यांच्या शरीराचा रंग गोरा व कान लांब असतात. ते सुंदर पीत वस्त्रानें शोभतात. कल्की भगवान धनुष्य व तूणीर यांनी शोभायमान असतात. ते म्लेछांचा संहार करतात. ते ब्राह्मण असतील. घोडयाच्या पाठीवर बसून त्यांच्या हातात खड्ग, शंख, चक्र व गदा शोभतात.

वासुदेवादी नऊ मूर्तींची लक्षणेही भगवान हयग्रीवांनी वर्णन केली आहेत. त्यांच्या उजव्या वरच्या हातात उत्तम चक्र असते. हे वासुदेवांचे मुख्य लक्षण आहे. त्यांच्या पार्श्वभागी ब्रह्मदेव व महादेव असतात. शंख अथवा वरदमुद्रा ते धारण करतात. त्यांचे स्वरूप द्विभुज अथवा चतुर्भुज असते. बलरामांना चार हात असतात. त्यांच्या डाव्या हातांत

हल (नांगर) व मुसळ असते. उजव्या हातांत गदा व पद्म असतात. प्रद्युम्नाच्या उजव्या हातांत चक्र व शंख असून डाव्या हातांत धनुष्यबाण असतात. द्विभुज प्रद्युम्न आपल्या हातात गदा व धनुष्य धारण करतात. अनिरुद्ध व नारायण चतुर्भुज असतात.

ब्रह्मदेव हंसावर आरूढ झालेले असतात. त्यांना चार मुखे व चार हात असतात. त्यांचे उदरमंडळ विशाल असते. त्यांना लांब दाढी व मस्तकावर जटा असतात. त्यांच्या उजव्या हातात अक्षसूत्र व स्रुवा व डाव्या हातांत कुंडिका व आज्यस्थली असते. त्यांच्या वाम भागात सरस्वती व दक्षिण भागात सावित्री असते. विष्णूंना आठ हात असून ते गरुडावर आरूढ झालेले असतात. त्यांच्या उजव्या हातांत खड्ग, गदा, बाण व वरदमुद्रा असते. डाव्या हातांत धनुष्य, खेट, चक्र व शंख असतात. ते चतुर्भुजही असतात. नृसिहांना चार भुजा असून दोन हातांत शंख व चक्र व दोन हातांनी ते महान असुर हिरण्यकशिपूचा वध करतात. वराहास चार भुजा असतात. त्यांनी आपल्या करतलावर शेष-नाग धारण केलेला असतो. डाव्या हाताने त्यांनी पृथ्वी व वाम भागास लक्ष्मी धारण केलेली असते. त्रैलोक्यमोहन श्रीहरी गरुडावर आरूढ झालेले असून त्यांना आठ भुजा असतात. उजव्या हातांत चक्र, शंख, मुसळ व अंकुश धारण करून ते डाव्या हातांत शंख, शाङ्र्गधनुष्य, गदा व पद्म धारण करतात. त्यांच्या वामभागी कमलधारिणी कमला व दक्षिणभागी वीणाधारिणी सरस्वती यांच्या प्रतिमा असतात.

भगवान विश्वरूपांस वीस हात असून त्यांच्या उजव्या हातांत खड्ग, मुसळ, अंकुश, पट्टिश, मुद्गर, पाश, शक्ती, शूल व बाण ही आयुधे असतात. डाव्या हातांत शंख, शाङ्र्गधनुष्य, गदा, पाश, तोमर, हल, फरशी, दंड, सुरी व ढाल अशी आयुधे असतात. त्यांच्या उजव्या भागास चतुर्भुज ब्रह्मदेव व डाव्या अंगास त्रिनेत्रधारी महादेव विराज-मान होतात. जळशायी जलात शयन करतात. त्यांची मूर्ती शेषशय्येवर झोपलेली बनवावी. भगवती लक्ष्मी त्यांची चरणसेवा करते. विमला आदी शक्ती त्यांची स्तुती करतात. श्रीहरींच्या नाभिकमलावर चतुर्भुज ब्रह्मदेव विराजमान असतात.

हरिहरमूर्ती या प्रकारे बनवावी. त्यांच्या उजव्या हातांत शूल व ऋष्टी आणि डाव्या हातांत गदा व चक्र असते. शरीराच्या उजव्या भागावर रुद्रांचे चिन्ह व वाम भागावर केशवांचे चिन्ह असते. उजव्या भागी गौरी व डाव्या भागी लक्ष्मी असावी. भगवान हयग्रीवांच्या चार हातांत शंख, चक्र, गदा, वेद असून त्यांनी आपला डावा पाय शेषनागावर व उजवा पाय कूर्माच्या पाठीवर ठेवलेला असतो. दत्तात्रेयांना दोन हात असून त्यांच्या वामांगी लक्ष्मी शोभते. भगवान पार्षद विष्वक्सेन आपल्या चार हातांत चक्र, गदा, हल व शंख धारण करतात.

## चंडी आदी देवतांची प्रतिमालक्षणे

चंडी वीस भुजांची असते. ती आपल्या उजव्या हातांत शूल, खड्ग, शक्ती, चक्र, पाश, खेट, आयुध, अभय, डमरू व शक्ती ही आयुधे धारण करते. तिच्या डाव्या हातांत नागपाश, खेटक, कुठार, अंकुश, पाश, घंटा, आयुध, गदा, दर्पण व मुद्गर असतात. चंडिकेस दहाही हात असतात. तिच्या चरणांशी मुंडके कापलेला महिष असतो. त्याच्या हातात उगारलेले शस्त्र असते. त्याच्या ग्रीवेपासून एक पुरुष प्रकट झालेला असून तो अत्यंत कुपित झालेला असतो. त्याच्या हातात शूल व मुखातून रक्त गळत असते. गळयात माळ, डोक्यावर केस व दोनही नेत्र लाल असतात. देवीचे वाहन सिंह त्याचे रक्त चाटीत असतो. त्या महिषासुराच्या गळयात कसून बांधलेला पाश असतो. देवीचा उजवा पाय सिंहावर व डावा पाय महिषासुरावर असतो.

ही चंडीदेवी त्रिनेत्रधारिणी व शस्त्रांनी संपन्न असून शत्रूंचे मर्दन करणारी असते. नवकलात्मक पीठावर दुर्गेची प्रतिमा स्थापून तिची पूजा करावी. दुर्गेची एक प्रतिमा आठ भुजांचीही असते. तिच्या उजव्या हातांत मुंड, खेटक, दर्पण, तर्जनी, धनुष्य, ध्वज, डमरू, ढाल, पाश असून डाव्या हातांत शक्ती, मुद्गर, शूल, वज्र, खड्ग, अंकुश, बाण, चक्र व शलाका अशी आयुधे असतात. देवीस कधी सोळा वा अठरा भुजाही असतात. रुद्रचंडा आदी नऊ दुर्गा प्रसिद्ध आहेत. रुद्रचंडा, प्रचंडा, चंडोग्रा, चंडनायिका, चंडा, चंडवती, चंडरूपा, अतिचंडिका

आदी देवी आठ दिशांना पूजित असतात. नववी उग्रचंडा मध्यभागी स्थापित करून पूजा करण्यास योग्य आहे. या सर्व सिंहवाहिनी आहेत.

यां नऊ दुर्गा 'आलीढा' या आकृतीच्या असून त्यांची स्थापना पुत्रपौत्रादी आणि वृद्धीसाठी करावी. गौरी चंडिकादी देवींच्या रूपात पूजिली जाते. तिच्या हातात कुंडी, अक्षमाला, गदा, अग्नी धारण करून तीच रंभा नावाने ओळखली जाते. वनात तीच सिद्धा असते. सिद्धावस्थेत ती अग्नीत स्थित असते. तीच ललिता आहे. तिच्या डाव्या हातात गर्दनसहित मुंडके असून दुसऱ्या हातात दर्पण आहे. उजव्या हातात फलांजली व सौभाग्याची मुद्रा असते.

लक्ष्मीच्या उजव्या हातात कमल व डाव्या हातात श्रीफल असते. सरस्वतीच्या दोनही हातांत अक्षमाला व पुस्तक यांची शोभा असते. उरलेल्या दोनही हातांत वीणा असते. गंगेची अंगकांती श्वेत असून ती मकरावर आरूढ झालेली असते. तिच्या एका हातात कलश व दुसऱ्या हातात कमल असते. यमुनादेवी कासवावर आरूढ झालेली असते. तिच्या दोनही हातांत कलश असतात. ते श्यामवर्णाचे असतात. याच रूपात तिची पूजा करावी. तुंबरूची प्रतिमा वीणेसहित असावी. त्यांची अंगकांती श्वेत आहे. शूलपाणी शंकर वृषभावर आरूढ असून मातृकांच्या मागेपुढे ते चालतात. ब्रह्मदेवांची प्रिया सावित्री गौरवर्णाची व चतुर्मुखी आहे, तिच्या डाव्या हातांत अक्षमाला व स्रुक् असून उजव्या हातांत कुंड व अक्षपात्र असते. तिचे वाहन हंस आहे शंकरप्रिया पार्वती वृषभावर आरूढ होते. तिच्या उजव्या हातात धनुष्यबाण व डाव्या हातात चक्रधनुष्य शोभते. कौमारी शक्ती मोरावर आरूढ झालेली असते. तिची अगकांती लाल असून ती आपल्या हातांत शक्ती धारण करते.

लक्ष्मी आपल्या उजव्या हातांत चक्र व शंख धारण करते. डाव्या हातांत गदा व पद्म असते. वाराही शक्ती रेडयावर आरूढ झालेली असून तिचे हात दंड, शंख, चक्र व गदा यांनी सुशोभित असतात. ऐन्द्री शक्ती ऐरावत हत्तीवर आरूढ झालेली असते. तिला सहस्र नेत्र असतात. तिच्या हातात वज्र असते. ऐन्द्री देवी सिद्धी प्राप्त करून देणारी असते. चामुंडेचे नेत्र खोल असून तिचे शरीर मांसरहित असते.

तिला तीन नेत्र असून ती हत्तीचे चर्म पांघरते. तिच्या डाव्या हातांत कपाल व पट्टिश असून उजव्या हातांत शूल व कटयार असते. ही शवावर आरूढ झालेली असून हाडांचे दागिनें घासते.

विनायक म्हणजे गणेशाची आकृती माणसासारखी असून त्याचे पोट मोठें असते. तोंड हत्तीसारखे असून सोंड लांब असते. तो यज्ञोपवीत धारण करतो. गणेशाच्या अवयवांचे प्रमाणही दिलेले आहे. स्कंद मयूरा-वर आरूढ झालेला असतो. त्याच्या पार्श्वभूमीवर सुमुखी व विडालाक्षी मातृका आणि शाख व विशाख अनुज उभे असतात. त्याला दोन भुजा असून तो बालरूपधारी असतो. त्याच्या उजव्या हातात शक्ती व डाव्या हातात मुकुट असतो. त्याला एक वा सहा मुखे असतात. कौमारीशक्तीच्या उजव्या सहा हातांत शक्ती, बाण, पाश, खड्ग, गदा व तर्जनी (मुद्रा) ; अशी आयुधे असतात. डाव्या हातांत मोरपंख, धनुष्य, खेट, पताका, अभयमुद्रा व मुकुट अशी आयुधे असतात. रुद्र-चर्चिका देवी हत्तीचे चर्म पांघरते. तिच्या डाव्या उजव्या हातांत कपाल कर्तरी, शूल व पाश असतात. हीच देवी अष्टभुजा या रूपात पूजिली जाते.

मुंडमाला व डमरू यांनी युक्त असणारी रुद्रचामुंडा होय. ही नृत्य करीत असल्याने नाट्येश्वरीही आहे. हीच आसनावर बसून चतुर्मुखी महालक्ष्मी तामसी असून मनुष्य, घोडे, म्हशी, हत्ती यांना खात असते. सिद्धचामुंडास दहा भुजा व तीन नेत्र असतात. तिच्या उजव्या भागाच्या पाच हातांत शस्त्र, खड्ग व तीन डमरू धारण केलेले असतात. डाव्या भागाच्या हातांत घंटा, खेटक, खट्वांग व ढाल ही आयुधे असतात. सिद्धयोगेश्वरी सर्व सिद्धी देणारी आहे. याच देवीची स्वरूपभूता एक शक्ती असून तिची अंगकांती अरुण वर्णाची आहे. ती आपल्या दोन हातांत पाश व अंकुश धारण करते. हीच भैरवी या नावाने प्रसिद्ध आहे. रूपविद्यादेवी बारा भुजांची असते. या सर्व देवी स्मशानभूमीत प्रकट होणाऱ्या असून भयंकर आहेत.

क्षमादेवी एका वृद्ध स्त्रीच्या रूपात असते. तिला दोन हात असतात. तिचे तोंड उघडलेले असते. दात बाहेर आलेले असतात.

जमिनीवर गुढगे टेकून, हाताचे साह्य घेऊन ही बसलेली असते. ती उपासकांचे कल्याण करते. यक्षिणींचे डोळे स्तब्ध व मोठे असतात. शाकिनी वक्र दृष्टीने पाहाते. अप्सरा सदा अत्यंत रमणीय व सुंदर रूपाच्या असतात.

भगवान शंकरांचा द्वारपाल नंदीश्वर असून त्याच्या हातांत अक्षमाला व त्रिशूल असते. महाकालाच्या एका हातात तलवार, दुसऱ्यात कापलेले मुंडके, तिसऱ्यात शूल व चौथ्यात खेट नावाचे आयुध असते. भृंगीचे शरीर कृश असते. तो नृत्यमुद्रेत असतो. त्याचे मस्तक कूष्मांडासमान स्थूल असते. वीरभद्रादी गण हत्ती व गाय यांच्या कानां-प्रमाणे व मुखांप्रमाणे असतात. घंटाकर्णास अठरा भुजा असतात. तो पाप व रोग यांचा नाश करतो. त्याच्या डाव्या आठ हातांत वज्र, खड्ग, दंड, चक्र, बाण, मुसळ, अंकुश, मुद्गर व उजव्या हातांत तर्जनी, खेट, शक्ती, मुंड, पाश, धनुष्य, घंटा व कुठार अशी आयुधे असतात. उरलेल्या दोन हातांत त्रिशूल असते.

## सूर्यादी ग्रह, दिक्पाल इत्यादींच्या प्रतिमा

सात अश्वांनी ओढल्या जाणाऱ्या रथावर सूर्यदेव विराजमान झालेला असतो. सूर्य आपल्या दोनही हातांत दोन कमले धारण करतो. त्याच्या उजव्या अंगास दौत व कलम घेऊन दंडी उभा असतो. वाम भागास पिंगल हातात दंड घेऊन उभा असतो. हे दोघे सूर्यदेवाचे पार्षद होत. सूर्याच्या पार्श्वभागी चवऱ्या ढाळणाऱ्या राज्ञी व निष्प्रभा उभ्या असतात. घोड्यावर बसलेली केवळ सूर्याची प्रतिमाही करतात. सर्व दिक्पाल हातांत वरद मुद्रा, दोन दोन कमले, शस्त्रे धारण करून पूर्वादी दिशांत भ्रमण करतात.

बारा दलांचे एक कमलचक्र बनवावे. त्यात सूर्य, अर्यमा आदी बारा आदित्यांची स्थापना करावी. आदित्यगणांना चार हात असतात. त्या हातांत मुद्गर, शूल, चक्र व कमल अशी आयुधे असतात. वरुण, सूर्य, सहस्रांशू, धाता, तपन, सविता, गभस्तिक, रवी, पर्जन्य, त्वाष्टा, मित्र व विष्णू हे बारा आदित्य होत. मेषादी बारा राशींत राहून हे

जगताला प्रकाश देतात. त्यांची अंगकांती क्रमशः काळी, लाल, थोडीशी लाल, पिवळी, पांडुवर्णाची, पांढरी, कपिलवर्णाची, पीतवर्णाची, पोपटाप्रमाणे हिरवी, धवलवर्णी, धूम्रवर्णी व निळी असते. इडा, सुषम्ना, विश्वार्ची, इंदू, प्रर्वादिनी, प्रर्हर्षिणी, महाकाली, कपिला, प्रबोधिनी, नीलांबरा, वनान्तस्था व अमृताख्या या त्यांच्या शक्ती होत. सूर्यदेवाचे प्रचंड मुख विशाल असते. त्याला दोन भुजा असतात. तो आपल्या हातांत कमल व खड्ग धारण करतो.

चंद्रमा कुंडिका व जपमाला धारण करतो. मंगळाच्या हातांत शक्ती व अक्षमाला असते. बुधाच्या हातांत धनुष्य व अक्षमाला शोभते. बृहस्पती अक्षमाला व कुंडिका धारण करणारा आहे. शुक्राच्या हातांत कुंडिका व अक्षमालाच असते. शनी किंकिणीसूत्र धारण करतो. राहू अर्धचंद्रधारी असून केतूच्या हातांत खड्ग व दीपक असतो. अनंत, तक्षक, कर्कोटक, पद्म, महापद्म, शंख, कुलिक आदी मुख्य नाग सूत्रधारी असतात. फणा हे त्यांचे मुख आहे. ते सर्व प्रभापुंजाने उद्भासित होतात. इंद्र वज्रधारी असून तो हत्तीवर आरूढ झालेला असतो. अग्नीचे वाहन बकरा असून तो शक्तिधारी आहे. यम दंडधारी असून रेड्यावर आरूढ झालेला असतो. निर्ऋती खड्गधारी असून मनुष्य त्याचे वाहन आहे. वरुण मकरावर आरूढ झालेला असून तो पाश धारण करणारा आहे. वासुदेव वज्रधारी असून त्याचे वाहन मृग आहे. कुबेर बकऱ्यावर आरूढ होऊन गदा धारण करतो. ईशान जटाधारी असून त्याचे वाहन मृग आहे.

सर्व लोकपाल द्विभुज असतात. विश्वकर्मा अक्षसूत्र धारण करतो. हनुमानाच्या हातात वज्र असते. त्याने आपल्या दोनही पायांखाली असुरास दाबून धरलेले असते. किन्नरांच्या मूर्तींच्या हातांत वीणा असते. विद्याधर माला धारण करतात. ते आकाशात स्थिरावलेले आहेत. पिशाचांची शरीरे दुर्बळ असतात. वेताळांची मुखे विकराळ असतात. क्षेत्रपाल शूलधारी असून प्रेतांचे पोट लांब व शरीर कृश असते. ग्रहादिकांच्या प्रतिमांची ही लक्षणे एकावन्नाव्या अध्यायात आलेली आहेत.

## चौसष्ट योगिनी, भैरव आदींच्या प्रतिमांची लक्षणे

बावन्नाव्या अध्यायात चौसष्ट योगिनींचे वर्णन आले आहे. त्यांची स्थाने पूर्वदिशेपासून ईशान्यदिशेपर्यंत असतात. या योगिनींची नावे अशी आहेत. १ अक्षोभ्या, २ रूक्षकर्णी, ३ राक्षसी, ४ क्षपणा, ५ क्षमा, ६ पिङगाक्षी, ७ अक्षया, ८ क्षेमा, ९ इला, १० नीलालया, ११ लोला, १२ रक्ता (वा लक्ता), १३ बलाकेशी, १४ लालसा, १५ विमला, १६ दुर्गा (अथवा हुताशा), १७ विशालाक्षी, १८ ऱ्हींकारा (वा हुंकारा) १९ वडवामुखी, २० महाक्रूरा, २१ क्रोधना, २२ भयंकरी, २३ महानना, २४ सर्वज्ञा, २५ तरला, २६ तारा, २७ ऋग्वेदा, २८ हयानना, २९ सारा, ३० रससंग्राही (अथवा सुसंग्राही वा रुद्रसंग्राही) ३१ शबरा (वा शम्बरा), ३२ तालजङिका, ३३ रक्ताक्षी, ३४ सुप्रसिद्धा, ३५विद्युज्जिव्हा, ३६ करङिकणी, ३७ मेघनादा, ३८ प्रचण्डा, ३९ उग्रा, ४० कालकर्णी, ४१ वरप्रदा, ४२ चण्डा (अथवा चन्द्रा), ४३ चण्डवती (वा चन्द्रावली), ४४ प्रपञ्चा, ४५ प्रलयान्तिका, ४६ शिशुवक्त्रा, ४७ पिशाची, ४८ पिशितासवलोलुपा, ४९ धमनी, ५० तपनी, ५१ रागिणी (अथवा वामनी), ५२ विकृतानना, ५३ वायुवेगा, ५४ बृहत्कुक्षि, ५५ विकृता, ५६ विश्वरूपिका, ५७ यमजिव्हा, ५८ जयन्ती, ५९ दुर्जया, ६० जयन्तिका (अथवा यमान्तिका), ६१ बिडाली, ६२ रेवती, ६३ पूतना आणि, ६४ विजयान्तिका.

योगिनी आठ अथवा चार हातांनी युक्त असतात. त्या इच्छेनुसार शस्त्र धारण करतात. उपासकांना सर्व सिद्धी प्रदान करतात. भैरवास बारा हात असतात. त्याच्या मुखात उंच दात व शिरावर जटा व चंद्रमा असतो. त्यानें एका बाजूच्या पांच हातांत खड्ग, अंकुश, कुठार, बाण व अभय देणारी मुद्रा, ही आयुधे धारण केलेली असतात. दुसऱ्या पांच हातांत धनुष्य, त्रिशूल, खट्वांग, पाशकार्ध, वरमुद्रा ही आयुधे असतात. उरलेल्या दोन हातांत गजचर्म शोभते. हत्तीचे चर्म हे त्याचे वस्त्र होय. सर्पांची आभूषणे तो धारण करतो. प्रेताच्या आसनावर असलेल्या मातृकांच्या मध्यभागी तो असतो. भैरवास पांच मुखे असावीत.

पुर्वदिशेपासून अग्निकोणापर्यंत विलोमक्रमाने प्रत्येक दिशेस भैरवास स्थापन करून क्रमश: त्यांचे पूजन करावे. ' ॠ ऱ्हां भैरवायनम: प्राच्याम् । ॐ ऱ्हीं भैरवाय नम:– ऐशान्याम् । ॐ ऱ्हूं ऱ्हूं भैरवाय नम: –उदीच्याम् । ॠ ऱ्हें भैरवाय नम:– वायव्ये । ॐ ऱ्हैं भैरवाय नम:– प्रतीच्याम् । ॐ ऱ्हों भैरवाय नम:– नैर्ऋत्याम् । ॐ ऱ्हौं भैरवाय नम: –अवाच्याम् । ॐ ऱ्ह: भैरवाय नम:– आग्नेय्याम ; अशा मंत्रांनी त्या त्या दिशेकडील भैरवाचे पूजन करावे. अशीच आणखी वीरभद्र, गौरी, ललितादेवी, चंडिका; इत्यादी देवींची लक्षणे या अध्यायात आली आहेत.

## लिंग व लिंगमान, पिंडिकालक्षण

यानंतर त्रेपन्नाव्या व चोपन्नाव्या अध्यायांत लिंग व लिंगमान इत्यादींची लक्षणे वर्णन केली आहेत. घृतमय लिंग, वस्त्रमय लिंग, मृत्तिका-लिंग, काष्ठलिंग, प्रस्तरलिंग, मोतीलिंग, सुवर्णलिंग, लोहलिंग, चांदी, तांबे, पितळ, रत्न, पारा, इत्यादींची लिंगे, असे लिंगांचे विविध प्रकार आहेत. अशी लिंगांच्या प्रकारांची संख्या या चोपन्नाव्या अध्यायात पंधरा हजार चारशे सांगितली आहे ! पंडरीकलिंग, विशाललिंग, त्रपुष-लिंग, अमृताक्षलिंग, पूर्णेदुलिंग, बालेन्दुलिंग, कुमुद, मुखलिंग, असे आणखीही प्रकार आहेत. पंचावन्नाव्या अध्यायात पिंडिकांचे लक्षण सांगितले आहे.

## मंडपनिर्माण, तोरण-स्तंभ, कलश, ध्वज, दिक्पालयाग

यानंतर छपन्नाव्या अध्यायात हयग्रीवांनी प्रतिष्ठेच्या पांच अंगांचे वर्णन सुरुवातीस दिलें आहे. प्रतिमा पुरुषाचे प्रतीक असली तर पिंडिका प्रकृतीचे. प्रतिमा नारायणरूप असेल तर पिंडिका लक्ष्मीचे रूप. या दोघांच्या योगास ' प्रतिष्ठा ' म्हणतात. इच्छेनुसार फल मिळविण्या-साठी मनुष्याने इष्ट देवाची प्रतिष्ठा (स्थापना) करावी. आचार्यांना विचारून मंदिराच्यापुढे गर्भसूत्र काढून आठ, सोळा अथवा वीस हातांचा मंडप तयार करावा. त्यातील आठ हात मंडप ' निम्न', सोळा हातांचा

मंडप ' मध्यम ' व वीस हातांचा मंडप ' उत्तम ' मानला गेला आहे. मंडपात देवाच्या स्नानासाठी कलशाची स्थापना करावी. यागासाठी द्रव्यसामग्री जमवावी.

मंडपाच्या अर्ध्या व तृतीयांश भागात सुंदर वेदी बनवावी. मोठ-मोठे कलश, छोटे छोटे घडे, चांदवे यांनी ती विभूषित करावी. पंच-गव्याने सर्वत्र प्रोक्षण करावे. वस्त्र व माला यांनी शोभणाऱ्या गुरूचे पूजन करावे. अंगठी आदी भूषणे व प्रार्थनादींनी मूर्तिपालक विद्वानांचा सत्कार करून कुंडाकुंडावर बसवावे. पूर्वादी दिशांना पिंपळ, वट, प्लक्ष आदी वृक्षांची तोरणे बांधावीत. पूर्वदिशेचे द्वार ' सुशोभन ' या नावाने प्रसिद्ध असते. दक्षिण दिशेच्या द्वारास ' सुभद्र ' म्हणतात. पश्चिमद्वारास ' सुकर्मा ' व उत्तरद्वारास ' सुहोत्र ' म्हणतात. हे तोरणस्तंभ पांच हात उंचीचे असावेत. त्यांची स्थापना करून ' स्योना पृथिवि नो ' (शुक्ल यजुर्वेद ३६।१३) या मंत्राने पूजा करावी. तोरणस्तंभाच्या मूलभागी मंगल अंकुरांनी युक्त असा कलश स्थापन करावा.

तोरणस्तंभाच्या वरच्या भागी सुदर्शनचक्राची स्थापना करावी. तेथेच पांच हातांचा ध्वज स्थापन करावा. त्याची रुंदी सोळा अंगुलांची असावी. त्या ध्वजाचा दंड सात हात उंच असावा. अरुणवर्ण, अग्निवर्ण (धूम्रवर्ण), कृष्ण, शुक्ल, पीत, रक्त श्वेत या वर्णांचे ध्वज पूर्वादी दिशांना क्रमशः असावेत. कुमुद, कुमुदाक्ष, पुंडरीक, वामन, शंकुकर्ण, सर्वनेत्र, सुमुख, सुप्रतिष्ठित अशा या ध्वजांच्या अनुक्रमाने देवता आहेत. त्यांच्यात कोटयवधी दिव्य गुण विद्यमान आहेत. सुपक्व बिंबाप्रमाणे लाल असणारे कलश असावेत. ते जलाने पूर्ण भरावेत. त्यांची संख्या एकशेअठ्ठावीस असावी. जेव्हा ' कालदंड ' नावाचा योग नसेल अशा ठिकाणी त्यांची स्थापना करावी. सर्व कलशांत सुवर्ण टाकावे. त्यांच्या कंठभागात वस्त्र लपेटावे. जलपूर्ण असे हे कलश तोरणाच्या बाहेर स्थापित करावेत.

वेदीच्या पूर्वादी दिशांनाही आणि कोणांतही कलश स्थापन करावेत. प्रथम पूर्वादी चारही दिशांना चार कलशांची स्थापना करावी.

त्या वेळी 'आजिघ्र कलशं' आदी मंत्राचा पाठ करावा. त्या कलशांतून पूर्वादी दिशांना इंद्रादी दिक्पालांना आवाहन करून त्यांची पूजा करावी. इंद्रास आवाहन करताना म्हणावे, 'ऐरावतावर बसलेल्या, हातात वज्र, धारण करणाऱ्या इंद्रदेवा, इथं तू यावंस. अन्य देवांना घेऊन तू या पूर्व-द्वाराचं रक्षण करावंस. मी आपणांस नमस्कार करतो आहे.' असे आवाहन करून पुरुषानें 'त्रातारमिन्द्रम्' इत्यादी मंत्रांनी त्याची आराधना करावी.

यानंतर 'अग्निर्मूर्द्धा', 'अग्नये नमः' इत्यादी मंत्रांनी अग्नीची व 'वैवस्वतं सङ्गमनम्' या मंत्रांनी यमदेवाची आराधना करावी. 'उरुं हि राजा वरुण' इत्यादी मंत्रांनी वरुणाचे, 'ॐ नमो वायवे' या मंत्राने वायूचे, 'सोमाय नमः' म्हणून सोमाचे, 'ईशानायनमः' म्हणून ईशानाचे, 'हिरण्यगर्भः' अथवा 'नमस्ते ब्रह्मणे' इत्यादी मंत्रांनी ब्रह्मदेवांची आराधना करावी. 'नमोऽस्तु सर्वेभ्यो' अथवा 'अनन्ताय नमः' इत्यादी मंत्रांनी भगवान अनंतदेवांची पूजा करावी.

## कलशाधिवासविधीचे वर्णन

सत्तावन्नाव्या अध्यायात कलशाधिवासाचे वर्णन आले आहे. प्रतिष्ठेसाठी, देवपूजनासाठी भूमीवर नृसिंहमंत्राचा पाठ करून राक्षसांना दूर घालविण्यासाठी अक्षता, पंचगव्य यांनी प्रोक्षण करावे. रत्नयुक्त कलशावर अंगदेवतांसहित श्रीहरींची पूजा करून अस्त्रमंत्रानें एकशे-आठ कमंडलूंचे पूजन करावे. अविच्छिन्न धारांनी वेदी सिंचित करून तीवर व्रीही (तांदूळ, जव इत्यादी) संस्कारपूर्वक पसरावेत. वस्त्र-वेष्ठित कलशावर भगवान विष्णू व लक्ष्मी यांची पूजा करावी. त्या-नंतर 'योगेयोगे' इत्यादी मंत्रांनी मंडलावर शय्या स्थापन करावी. स्नानमंडपात कुशांच्यावर शय्या व शय्येवर रुईची गादी अंथरावी. दिशा व विदिशांच्या अधिपतींचे पूजन करावे. पूर्वादी दिशांना क्रमशः विष्णू, मधुसूदन, त्रिविक्रम, वामन आणि अग्नी आदी कोणांत क्रमशः श्रीधर, हृषीकेश, पद्मनाभ, दामोदर यांचे पूजन करावे.

यानंतर स्नानमंडपात ईशानकोणातील वेदीने विभूषित चार

कलशांत स्नानोपयोगी सर्व द्रव्ये स्थापन करावीत. त्या कलशांना चारही दिशांना ठेवावे. पूर्व दिशेच्या कलशात वड, गूलर, पिंपळ, चाफा, अशोक, श्रीद्रुम (बिल्व), पलाश, अर्जुन, पाकर, कदंब, मौलगिरी, आम्र या वृक्षांचे पल्लव टाकावेत. दक्षिणदिशेच्या कलशात कमल, रोचना, दूर्वा, कुश, जातिपुष्प, कुंद, श्वेतचंदन, रक्तचंदन, सरस, तगर, अक्षता टाकाव्यात. पश्चिमेच्या कलशात सोने, चांदी, समुद्रगामिनी नदीतील माती, गंगेतील मृत्तिका, गोमय, जव, तांदूळ, तीळ टाकावेत. उत्तरेच्या कलशात विष्णुपर्णी (भुईआवळा), शालपर्णी, भृंगराज, शतावरी, सहदेवी, बच, सिंही, बला, व्याघ्रो, लक्ष्मणा या औषधींना सोडावे.

ईशान्यकोणातील कलशात मंगलकारक वस्तू सोडाव्यात. अग्निकोणात सात स्थानांवरील मृत्तिका सोडावी. नैर्ऋत्यकोणात गंगेतील वाळू व जल सोडावे. वायव्येकडील कलशात सूकर, वृषभ, गजराज यांचे दात, शिंगे यांनी खोदलेली माती, कमलाच्या मुळातील माती, कुशमूलांची माती असावी. तीर्थ–पर्वतांवरील माती, नागकेसराचे फूल, केशर, चंदन, अगरू, कर्पूर, वैदूर्य, विद्रुम, मुक्ता, स्फटिक, हिरा, पंचरत्न इत्यादीनांही काही कलशांत सोडावेत.

या सर्व वस्तू एका कलशात टाकून त्यावर इष्टदेवतेची स्थापना करावी. अन्य कलशांत नदी, नद, तलाव यांतील जल भरावे. कलश गंधोदकानें पूर्ण भरावेत. त्या सर्वांना श्रीसूक्ताने अभिमंत्रित करावे. जव, सरस, गंध, कुशाग्र, अक्षत, तीळ, फल, पुष्प यांना अर्घ्यासाठी पूर्व दिशेला विशेष पात्रात ठेवावे. कमल, श्यामलता, दूर्वादल, विष्णुक्रान्ता, कुश या सर्वांना पाद्यनिवेदनासाठी दक्षिणभागी स्थापित करावे. दक्षिणदिशेस मधुपर्क असावा. कंकोळ, लवंग, जायफळ यांना आचमनासाठी उत्तरदिशेस ठेवावे. अग्निकोणात दूर्वा व अक्षता यांनी युक्त असे नीरांजन ठेवावे. वायव्यकोणात उद्वर्तनपात्र व ईशान्यकोणात गंधपात्र ठेवावे. कलशात सुरमांसी (जटामांसी), आवळा, हळद इत्यादी सोडावेत. नीरांजनासाठी अडुसष्ट द्वीपांची स्थापना करावी शंख, धातुनिर्मित चक्र, श्रीवत्स, वज्र व कमलपुष्प यांना सुवर्णाच्या पात्रात ठेवावे.

## भगवानांचे स्नान व शयनविधी

आचार्यानें ईशानकोणात एक होमकुंड तयार करावे. त्यात वैष्णवाग्नीची स्थापना करावी त्यानंतर गायत्रीमंत्राने एकशेआठ आहुत्या देऊन संपातविधीने कलशावर प्रोक्षण करावे. त्यानंतर मूर्ति-पालकाने व शिल्पींसह यजमानाने गाणेबजावणे करून कारुशालेत जावे. तेथे प्रतिमावर्ती इष्टदेवतेस उजव्या हातात कौतुकसूत्र (कंकणादी) बांधावे. यावेळी 'विष्णवे शिपिविष्टाय नमः०' या मंत्राचा पाठ करावा. त्यावेळी आचार्याने हातात लोकरी सूत, सरस, रेशमी वस्त्र यांनी कौतुक बांधावे. मंडलात सवस्त्र प्रतिमेची स्थापना करावी. पूजा करून स्तुती करताना म्हणावे, 'विश्वकर्म्यानं बनविलेली देवी, प्रतिमे, तुला नमस्कार असो. सर्व जगाला प्रभावित करणाऱ्या जगदंबे, तुला वारंवार प्रणाम असो. ईश्वरी, मी निरामय नारायणदेवांचं पूजन करतो. तू शिल्पसंबंधी दोषांनी रहित हो. माझ्यासाठी सदा समृद्धिशालिनी बनावंस.'

अशी प्रार्थना करून प्रतिमेस स्नानमंडपात न्यावे. शिल्पीस यथेष्ठ द्रव्य देऊन संतुष्ट राखावे. गुरूस गोदान द्यावे. 'चित्रं देवाना०' इत्यादी मंत्रांनी प्रतिमेचे नेत्रोन्मीलन करावे. 'अग्निज्योतिः० ' आदी मंत्रांनी दृष्टिसंचार करावा. त्यानंतर भद्रपीठावर प्रतिमा स्थापन करावी. आचार्यानें श्वेतपुष्प, तूप, सरस, दूर्वादल, कुशाग्र इष्टदेवास वाहावेत. यानंतर 'मधु वाता० ' इत्यादी मंत्रांनी गुरूनें प्रतिमेच्या नेत्रांत अंजन लावावे. यावेळी 'हिरण्यगर्भः०', 'इमं मे वरुण०' इत्यादी मंत्रांचा पाठ करावा. त्यानंतर 'घृतवती ' ऋचेचा पाठ करून घृताचे स्नान घालावे. त्यानंतर मसुराच्या पिठाचे सुगंधी उटणे लावून 'अतो देवाः०' इत्यादी मंत्रांचा पाठ करावा. नंतर 'सप्तं ते अग्नें०' इत्यादी मंत्रांनी गुरूनें गरम जलानें प्रतिमेस स्नान घालावे. त्यानंतर 'द्रुपदादिव० ' इत्यादी मंत्रांनी अनुलेपन, 'आपो हि ष्ठा०' इत्यादी मंत्रांनी अभिषेक करावा. त्यानंतर नदी, तीर्थ यांच्या जलानें स्नान घालून 'पावमानी ' ऋचेचा पाठ करावा. रत्नस्पर्शानें युक्त अशा जलाने स्नान घालावे. 'समुद्रं गच्छ

अ...८

स्वाहा०' इत्यादी मंत्र म्हणून तीर्थाची मृत्तिका व कलशातील जल यांनी स्नान घालावे. 'शं नो देवी०' इत्यादी व गायत्रीमंत्रानें जलानें प्रतिमेस स्नान घालावे.

'हिरण्यगर्भः', इत्यादी मंत्रांनी पांच प्रकारची मृत्तिका घेऊन परमेश्वरास स्नान घालावे. यानंतर 'इमं मे गंगे यमुने०' या मंत्रानें वालुकामिश्रित जलानें व 'तद् विष्णोः०' या मंत्रानें माती मिसळून जलानें स्नान घालावे. 'या औषधीः०' या मंत्रानें औषधी जलानें स्नान घालावे. 'यज्ञा यज्ञा०' इत्यादी मंत्रांनी आवळा आदी फळांनी मिश्रित जलानें स्नान घालावे. 'पयः पृथिव्यां०' या मंत्रानें पंचगव्यानें स्नान घालावे 'याः फलानीः०' या मंत्रानें फलमिश्रित जलाने, 'विश्वतश्चक्षुः०' या मंत्राने उत्तरवर्ती कलशातील जलाने, 'सोमं राजानं०' या मंत्राने पूर्ववर्ती जलाने, 'विष्णो रराटमसि०' या मंत्राने दक्षिणवर्ती कलशातील जलाने, 'हँ्सः शुचिषद्०' या मंत्राने पश्चिमवर्ती कलशातील जलानें भगवानांना स्नान घालावे.

अशा विविध यजुर्वेदातील मंत्रांनी आवळ्यांच्या, जटामांसमिश्रित, गंधमिश्रित जलांनी परमेश्वरास स्नान घालावे. त्यानंतर त्यांची प्रार्थना करावी 'भगवन्, सर्व लोकांवर अनुग्रह करणाऱ्या सर्वव्यापी वासुदेवा, यावं. आपण यावं. या यज्ञभागास ग्रहण करावं. आपणांस नमस्कार असो.' 'मुञ्चामि त्वा०' या मंत्रानें कौतुकसूत्र सोडावे. 'हिरणमयेन०' मंत्रानें पाद्य व अर्घ्य द्यावेत. त्यानंतर विविध मंत्रांनी गंध, माला, पवित्रक, वस्त्र, उत्तरीय, फूल, औषध, धूप, अंजन, तिलक, पुष्पमाला, छत्र, दर्पण, चवरी, आभूषण, इत्यादी वस्तू भगवंतांना अर्पण कराव्यात.

वायुदेवासंबंधी मंत्रांनी व्यजन, 'मुञ्चामि त्वां०' या मंत्रानें फूल अर्पण करून प्रणवयुक्त मंत्रद्वारे श्रीहरींची स्तुती करावी. भगवानांना उठविताना 'सौपर्ण' सूक्ताचा पाठ करावा. भगवानांना उठवून मंडपातील शय्येवर न्यावे. त्यावेळी 'शकुनि' सूक्ताचा पाठ करावा. ब्रह्मरथ अथवा पालखीतून भगवानांना शय्येवर न्यावे. 'अतो देवाः०' व 'श्रीश्च ते लक्ष्मीश्च' या मंत्रांनी प्रतिमेस शय्येवर आणावे. त्यानंतर निष्कलीकरणाची क्रिया करावी. सिंह, वृषभ, हत्ती, व्यजन,

कलश, वैजयंती (पताका), भेरी व दीपक या आठ वस्तू मंगलसूचक आहेत. अश्वसूक्ताचा पाठ करून या सर्व वस्तू भगवंतांना दाखवाव्यात. 'त्रिपात्' या मंत्राने भगवानांच्या चरणांवर उखा (पात्रविशेष), अंबिका (कढई), दर्विका, पात्र, उखळ, मुसळ, झाडू, भोजनपात्र इत्यादी सामान ठेवावे. त्यांच्या शिराकडे वस्त्र व रत्न यांनी युक्त असा कलश स्थापित करावा. या घटास 'निद्रा' अशी संज्ञा आहे. असा हा भगवानांचा शयनविधी अठ्ठावन्नाव्या अध्यायात आलेला आहे.

## पुस्तकलेखनविधी

यानंतर एकोणसाठाव्या अध्यायात अधिवासविधीचे वर्णन आले आहे. श्रीहरींच्या जवळ जाण्यास 'अधिवासन' म्हणतात. 'मी अथवा माझा आत्मा सर्वज्ञ, सर्वव्यापी पुरुषोत्तम आहे' अशी भावना करून आत्म्याची परमात्म्याशी एकता स्थापन करावी. त्यानंतर साठाव्या अध्यायात वासुदेवादी देवांचा स्थापनाविधी वर्णन केला आहे. एक-सष्टाव्या अध्यायात अवभृथस्नान, द्वारप्रतिष्ठा, ध्वजारोपण इत्यादी विधींचे वर्णन आले आहे. याचप्रमाणे बासष्टाव्या अध्यायात लक्ष्मी आदी देवतांच्या प्रतिष्ठेचा सामान्य विधी वर्णन केला आहे. त्रेसष्टाव्या अध्यायात विष्णू आदी देवांच्या प्रतिष्ठेचा सामान्य विधी वर्णन करून पुस्तकलेखनविधी समजावून दिला आहे.

आचार्याने स्वस्तिकमंडलात शरयंत्राच्या आसनावर लेख्य, लिखित पुस्तक, विद्या व श्रीहरी यांचे यजन करावे. त्यानंतर यजमान, गुरू, विद्या, भगवान विष्णू, लिपिक पुरुष यांची अर्चना करावी. त्यानंतर पूर्वाभिमुख होऊन पद्मिनीचे ध्यान करावे. चांदीच्या दौतीत शाई घ्यावी. सोन्याच्या कलमाने देवनागरी अक्षरात पांच श्लोक लिहावेत. त्यानंतर ब्राह्मणांना यथाशक्ति भोजन द्यावे. स्वसामर्थ्यानुसार दक्षिणा द्यावी. आचार्य, विद्या, विष्णू यांचे पूजन करून पुराणादींचे लेखन करावे. ईशान्यकोणात भद्रपीठावर दर्पणावर पुस्तक ठेवून यजमानाने नेत्रो-न्मीलन करून पुस्तकाची स्थापना करावी. पुस्तकावर पुरुषसूक्ताचा न्यास करावा.

प्राणप्रतिष्ठा, पूजन, चरुहोम करून आचार्यास दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार करावा. ब्राह्मणास भोजन द्यावे. त्या ग्रंथास रथावर वा हत्तीवर बसवून जनसमाजाबरोबर नगरात मिरवणूक काढावी. शेवटी घरी वा देवालयी त्याची स्थापना करून पूजा करावी. ग्रंथास वस्त्राने आवेष्टित करून पाठाच्या आदिअंती त्याची पूजा करावी. पुस्तक-वाचकाने विश्वशांतीचा संकल्प करून एका अध्यायाचा पाठ करावा. गुरूने कुंभजलाने यजमानास अभिषेक करावा. ब्राह्मणास पुस्तकदान केले तर अनंत फलांची प्राप्ती होते. गोदान, भूमिदान, विद्यादान, ही तीन अतिदाने आहेत. शाईने लिहिलेल्या पत्रसंचयाचे दान विद्यादानाचे फल देणारे आहे. या पानांची, अक्षरांची जितकी संख्या होईल, तितके हजार वर्षे दाता विष्णुलोकात पूजित होतो. पंचरात्र, पुराण, महाभारत यांचे दान करणारा मनुष्य स्वतःच्या एकवीस पिढ्यांचा उद्धार करून परतत्त्वात विलीन होतो.

## विहीर, तलाव इत्यादींची प्रतिष्ठा

चौसष्टाव्या अध्यायात विहीर, तलाव आदींच्या प्रतिष्ठाविधीचे वर्णन आले आहे. भगवान श्रीहरीच जलरूपाने देवश्रेष्ठ सोम व वरुण झाले आहेत. संपूर्ण विश्व अग्नीष्टोममय आहे. जलरूप नारायण याचे कारण आहेत. मनुष्याने वरुणाची सुवर्ण, रौप्य वा रत्नमयी प्रतिमा निर्माण करावी. वरुणदेव द्विभुज, हंसारूढ, नदी व नाला यांनी युक्त असतात. त्यांच्या उजव्या हातात अभयमुद्रा व डाव्या हातात नागपाश असतो. यज्ञमंडपाच्या मध्यभागी कुंडाने सुशोभित वेदिका असावी. तिला तोरण बांधून कमंडलूसहित वरुणकलशाची स्थापना करावी. याप्रकारे भद्रक (दक्षिणद्वार), अर्धचंद्र (पश्चिमद्वार), स्वस्तिक (उत्तरद्वार) येथेही वरुणकलशांची स्थापना करावी. कुंडात अग्नीचे आधान करून पूर्णाहुती द्याव्यात.

'ये ते शतं वरुण०' या मंत्राने स्नानपीठावर वरुणाची स्थापना करावी. त्यानंतर आचार्याने मूलमंत्राचा उच्चार करून, वरुणदेवास बोलावून त्यांना घृताने स्नान घालावे. नंतर 'शं नो देवी०' या मंत्राने

त्याला प्रक्षालन करून ‘ शुद्धवालः सर्वशुद्धवालो० ’ इत्यादी मंत्रांनी पवित्र जलाने स्नान घालावे. त्यानंतर स्नानपीठाच्या पूर्वादी दिशांना आठ कलशांना स्थापन करावे. पूर्वेकडील कलशात समुद्राचे जल, आग्नेयकडील कलशात गंगाजल, दक्षिणेकडे पावसाचे पाणी, नैर्ऋत्ये-कडील कुंभात झऱ्याचे पाणी, पश्चिमेकडील कलशात नदीचे पाणी, वायव्येस नदाचे जल, उत्तरेच्या कुंभात औद्भिज जल, ईशान्येस तीर्थाचे जल असावे. ही जले मिळाली नाहीत तर सर्व कलशात नदीचे जल भरावे. या सर्व कलशांना ‘ यासां राजा० ’ या मंत्राने अभिमंत्रित करावे. पुरोहिताने वरुणदेवाचे ‘ सुमित्रिया० ’ या मंत्राने मार्जन करावे. ‘ चित्रं देवानां० ’ व ‘ तच्चक्षुर्देवहितं० ’ या मंत्रांनी मधुत्रय (मध, तूप व साखर) यांनी वरुणदेवाचे नेत्रोन्मीलन करावे. नंतर वरुणाच्या सुवर्णमयी प्रतिमेचे पूजन करावे. आचार्यास गोदान द्यावे.

यानंतर ‘ समुद्रज्येष्ठाः० ’ या मंत्राने वरुणदेवास पूर्वकलशातील जलाने अभिषेक करावा. ‘समुद्रं गच्छ०’ या मंत्राने आग्नेयेकडील कलशा-तील गंगाजलाने, ‘सोमो धेनुं०’ या मंत्राने दक्षिणेकडील जलाने, ‘ देवी-रापो०’ या मंत्राने नैर्ऋत्येकडील कलशातील निर्झर जलाने, ‘पंच नद्यः०’ या मंत्राने पश्चिमेकडील नदीजलाने, ‘ उद्भिद्भ्यः० ’ या मंत्राने उत्तरे-कडील उद्भिजलाने व पावमानी ऋचेने ईशानकोणातील कलशातील तीर्थजलाने वरुणास अभिषेक करावा. यजमानाने मौन राहून ‘ आपो हि ष्ठा०’ या मंत्राने पंचगव्य घेऊन ‘हिरण्यवर्णा०’ या मंत्राने सुवर्णजलाने, ‘आपो अस्मान्०’ या मंत्राने वर्षाजलाने, व्याहृतींचा उच्चार करून कूप-जलाने, ‘ आपो देवी० ’ या मंत्राने तडागजलाने व तोरणवर्ती वरुणजलाने वरुणदेवास स्नान घालावे. ‘ वरुणस्योत्तम्भनमसि ’ या मंत्राने पर्वतीय जलाने एक्याऐंशी कलशांनी त्याला स्नान घालावे. ‘त्वं नो अग्ने वरुणस्य०’ या मंत्राने अर्घ्य प्रदान करावेत. व्याहृतींचा उच्चार करून मधुपर्क, ‘ बृहस्पते अति यदर्यो० ’ या मंत्राने वस्त्र, ‘ इमं मे वरुण० ’ या मंत्राने पवित्रक व प्रणवाने उत्तरीय समर्पण करावे.

वारुणसूक्ताने वरुणदेवास पुष्प, चवरी, दर्पण, छत्र, पताका समर्पण कराव्यात. मलमंत्राने ‘ उत्तिष्ठ ’ असे म्हणून उत्थापन करावे.

त्या रात्री अधिवासन करावे. ' वरुणं वा ' या मंत्राने संनिधीकरण करून वरुणसूक्ताने त्याचे पूजन करावे. मूलमंत्राने पुन्हा सजीवीकरण करून चंदनादींनी त्याची पूजा करावी. अग्निकुंडात समिधांचे हवन करावे. वैदिक मंत्रांनी गंगा आदी चार गायींचे दोहन करावे. सर्व दिशांना यवनिर्मित चरूची स्थापना करून होम करावा. चरूस व्याहृती, गायत्री, वा मूलमंत्राने अभिमंत्रित करावे. सूर्य, प्रजापती, दिव, अनंतनिग्रह, पृथ्वी, देहधृती, रती, रमती, उग्र, भीम, रौद्र, विष्णू, वरुण, धाता, रायस्पोष, महेंद्र, अग्नी, यम, निर्ऋती, वरुण, वायू, कुबेर, ईश, अनंत, ब्रह्मा, राजा जलेश्वर; या नामांचे चतुर्थ्यन्त रूप बोलून शेवटी स्वाहा म्हणून बली समर्पित करावा. ' इदं विष्णु:० ' व ' तद् विप्रासो० ' या मंत्रांनी आहुत्या द्याव्यात. ' सोमो धेनुं० ' या मंत्राने सहा आहुत्या द्याव्यात. ' इदं मे वरुण:० ' या मंत्राने एक आहुती द्यावी. ' आपो हि ष्टा ' आदी तीन ऋचांनी व ' इमा रुद्र० ' या मंत्राने आहुत्या द्याव्यात.

नंतर दिशांना बली समर्पित करून गंधादींनी पूजा करावी. त्यानंतर प्रतिमेस मंडलात स्थापन करून तिची गंधपुष्पादींनी व सुवर्णपुष्पादींनी पूजा करावी. नंतर आठ दिशांना जलाशय व आठ वालुकामयी सुरम्य वेदी यांना निर्माण करावे. ' वरुणस्य० ' या मंत्राने घृत व यवनिर्मित चरू एकशेआठ आहुतींनी द्यावा. शांतिजलाने वरुणदेवावर अभिषेक करून सजीवीकरण करावे. वरुणदेव गौरीदेवी या पत्नीसह विराजमान होऊन नदीनदांनी युक्त आहे असे ध्यान करावे. ' ॐ वरुणाय नम:० ' या मंत्राने पूजन करून सांन्निध्यकरण करावे. त्यानंतर वरुणदेवाची गजराजावरून नगरात मिरवणूक काढावी. त्यानंतर देवास ' आपो हि ष्ठा० ' मंत्राने त्रिमधुयुक्त कलशजलात राखावे व कलशासहित वरुणास जलाशयाच्या मध्यभागी सुरक्षित ठेवावे.

यानंतर यजमानाने स्नान करून वरुणाचे ध्यान करावे. ' समस्त लोक जलमय झाला आहे ' अशी भावना मनात धारण करावी. यूपाची स्थापना करावी. हा यूप कूपासाठी उपयोगी होतो. त्याच्या मूलभागी हेममय फलाचा न्यास करावा. वापीत पंधरा हात, पुष्करणीत वीस हात, तलावात पंचवीस हात लांबीचा यूप जलात निवेशित करावा. यज्ञमंडपाच्या

प्रांगणात 'यूप ब्रह्मा०' या मंत्राने यूपाची स्थापना करावी. त्याला वस्त्राने गुंडाळावे. यूपावर पताका लावावी. त्याची गंधादिकांनी पूजा करावी. आचार्यास भूमी, गाय, सुवर्ण, जलपात्र, दक्षिणा यांचे दान करावे. अन्य ब्राह्मणांनाही दक्षिणा द्यावी.

आब्रह्मस्तम्बपर्यन्तं ये केचित्सलिलार्थिनः ।
ते तृप्तिमुपगच्छन्तु तडागस्थेन वारिणा ।।

'ब्रह्मापासून तृणापर्यंत जे जलपिपासू आहेत ते या तडागत स्थित राहून जलाने तृप्त व्हावेत' अशी प्रार्थना करून जलाशयात पंचगव्य टाकावे. त्यानंतर 'आपो हि ष्ठा०' इत्यादी तीन ऋचांनी ब्राह्मणांनी संपादित केलेल्या शांतिजलाचा निक्षेप करावा. ब्राह्मणांना गोवंशाचे दान करावे. एकदाच जलाशय निर्माण केल्यास एक लाख अश्वमेधयज्ञ केल्याचे फल प्राप्त होते. त्याला स्वर्गाची प्राप्ती होते. जलाशयाने गायी आदी प्राणी जल पिऊन तृप्त होतात. त्याचा निर्माता पापमुक्त होतो.

## सभास्थापना, गृहप्रवेश, गोमातेस प्रार्थना

पासष्टाव्या अध्यायात सभा म्हणजे देवमंदिर, गृहप्रवेश, गोमाता यांच्या संबंधाने माहिती आलेली आहे. भूमीची परीक्षा करून तेथे वास्तुदेवतेची पूजा करावी. आपल्या रुचीनुसार देवसभा निर्माण करून अनुकूल देवाची स्थापना करावी. नगरातील चौकात वा ग्रामात मंदिर निर्माण करावे. शून्यस्थानी करू नये. देवमंदिराची स्थापना करणारा मनुष्य पापरहित होऊन आपल्या समस्त कुळाचा उद्धार करतो व स्वर्गलोकात आनंदाचा अनुभव घेतो. भगवान श्रीहरींचे राजाच्या प्रासादाप्रमाणे मंदिर बनवावे. चार, तीन, दोन अथवा एक शालेचे गृह बनवावे. जेथे ऋण अधिक होईल तेथे घर बांधू नये.अधिक व्यय झाला की, पीडाच होते. म्हणून आयव्यय यांचे संतुलन असावे.

घराची लांबी व रुंदी जितक्या हातांची असेल त्यांच्या गुणाकाराने होणाऱ्या संख्येस 'कराशी' म्हणतात तिलाच गर्गाचार्यांच्या

ज्योतिषविद्येत प्रवीण गुरूनें आठपट करावे. पुन: सातानें भागून 'वारा'-चा निश्चय होतो. आठाने भागल्यास जो शेष राहील त्याला 'व्यय' म्हणतात. विद्वान पुरुषाने करराशीस सातानें गुणावे. त्याला पुन्हा आठाने भागून उरलेल्या भागानुसार ध्वजादी आयांची कल्पना करावी. १ ध्वज, २ धूम, ३ सिंह, ४ श्वान, ५ वृषभ, ६ खर, ७ गज, ८ काक; हे क्रमश: आठ आय आहेत.

तीन शालायुक्त गृहांचे तीन भेद उत्तम मानले गेले आहेत. उत्तरपूर्व दिशेस ते निर्माण करू नयेत. दक्षिणदिशेस अन्यगृहाने युक्त दोन शालांचे भवन श्रेष्ठ मानले आहे. दक्षिण-पश्चिम दिशेस एक शालागृह श्रेष्ठ मानले गेले आहे. एक शालागृहाचे ध्रुव व धान्य असे दोन भेद आहेत. गृहांच्या सोळा भेदांपैकी दहा उत्तम आहेत. पांचवा, नववा, दहावा, अकरावा, तेरावा, चौदावा भयावह आहे. चार शालांचें घर उत्तम असून नेहमी दोषरहित असते. देवांसाठी एक मजल्यापासून सात मजल्यांचे घर बनवावे.

गृहप्रवेश करणाऱ्या पुरुषाने आळस सोडून प्रात:काली सर्वौषधि-मिश्रित जलानें स्नान करावे. दैवज्ञ ब्राह्मणांची पूजा करावी. त्यांना मधुर अन्नाचे भोजन द्यावे. ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करून गायीच्या पाठीवर हात ठेवून पूर्णकलशानें, सुशोभित तोरणयुक्त गृहात प्रवेश करावा. घरात जाऊन एकाग्रचित्तानें गायीस प्रार्थना करावी, 'ॐ श्रीवसिष्ठांकडून ललितपालित नंदे, धन व संतान देऊन माझा आनंद वाढीव. प्रजेस विजय देणाऱ्या भार्गवनंदिनी जये, तू धन व संपत्ती देऊन माझा आनंद वाढीव. अंगिराकी पुत्री पूर्णे, माझे मनोरथ पूर्ण कर. कश्यपकुमारी भद्रे, तू सर्व बीजं व औषधी वनस्पती यांनी संपन्न होऊन या घरात आनंदपूर्वक राहा.

'कश्यपपुत्री देवी भद्रे, तू सर्वथा सुंदर आहेस. महती महत्ताने युक्त आहेस. तू सौभाग्यशालिनी, उत्तम व्रताचं पालन करणारी हो. माझ्या घरी आनदपूर्वक निवास कर. देवी भार्गवी, जये, सर्वश्रेष्ठ आचार्यांनी तुझं पूजन केलं आहे. तू चंदन व पुष्पमाळा यांनी अलंकृत होऊन सर्व जगास ऐश्वर्य देतेस. तू माझ्या घरी आनंदानं विहार

करावास. अंगिरामुनींची पुत्री पूर्णे, तू अव्यक्त व अव्याकृत हो. इष्ट-देवी, तू मला अनुग्रह कर. माझ्या घरी जन, धन, हत्ती, घोडे, गायी म्हशी आदींची वृद्धी तू करावीस.'

## देवांची सामान्य प्रतिष्ठा, मासोपवास

सहासष्टव्या अध्यायात देवसमुदायाच्या प्रतिष्ठेचे वर्णन आले आहे. आदित्य, वसू, रुद्र, साध्य, विश्वदेव, अश्विनीकुमार, ऋषी, अन्य देवगण; हे सर्व देवसमुदाय होत. ज्या देवतेचे नाव असेल त्याचे आदी अक्षरे ग्रहण करून मात्रांच्या द्वारे भेदन करावे. नंतर दीर्घ स्वरांनी युक्त बीजांच्या द्वारे अंगन्यास करावा. नंतर प्रथम अक्षराचा बिंदु व प्रणव यांचे संयुक्त 'बीज' मानावे. सर्व देवांचे मूलमंत्राने पूजन करून त्यांची स्थापना करावी. नियम, व्रत, कृच्छ्र, मठ, सेतू, गृह, मासोपवास, द्वादशीव्रत यांनाही महत्त्व द्यावे.

प्रथम शिला, पूर्णकुंभ, कास्यपात्र तयार ठेवावे. साधकाने ब्रह्म-कूर्च घेऊन 'तद् विष्णोः परमं' या मंत्राने कपिलेच्या दुधाने यवमय चरू अर्पण करावा. प्रणवाच्या द्वारे त्यात घृत घालून दर्वीने तो संघटित करावा. त्यानंतर श्रीविष्णूंचे पूजन करावे. व्याहृती व गायत्रीमंत्राने 'तद्विप्रासो०' या मंत्राने चरुहोम करावा. 'विश्वतश्चक्षुः०' या मंत्राने भूमी, अग्नी, सूर्य, प्रजापती, अंतरिक्ष, द्यौ, ब्रह्मा, पृथ्वी, कुबेर, सोम यांना 'स्वाहा' म्हणून आहुत्या द्याव्यात. इंद्रादी देवांचीही स्तुती करावी. त्यांना मंत्रांनी आहुत्या द्याव्यात. चरुभागाचे हवन करून आदरपूर्वक दिग्बली द्यावा.

त्यानंतर एकशेआठ पलाशसमिधांनी हवन करून पुरुषसूक्ताने घृतहोम करावा. 'इरावती धेनुमती०' या मंत्राने तिलाष्टकाचा होम करून ब्रह्मा, विष्णू व शिव या देवांचे पार्षद, ग्रह, लोकपालक यांना आहुत्या द्याव्यात. पर्वत, नदी, समुद्र या सर्वांना आहुत्या द्याव्यात. 'वौषट्' युक्त वैष्णवमंत्राने पंचगव्य व चरू यांचे प्राशन करून आचार्यास तिलपात्र, वस्त्र, दक्षिणा, अलंकृत गाय यांचे दान करावे. 'भगवान् विष्णुः प्रीयताम्' असे म्हणून व्रताचे विसर्जन करावे.

मासोपवासादी व्रतांच्या विधीसंबंधीही याच अध्यायात सांगितले आहे. प्रथम देवाधिदेवास यज्ञानें संतुष्ट करावे. तिला, तण्डुल, यव यांनी वैष्णव चरूस घृतानें युक्त करून मूर्तिमंत्राने हवन करावे. त्यानंतर मासाधिपती विष्णू आदी देवांच्या उद्देशानें पुनः होम करावा. 'ॐ श्री विष्णवे स्वाहा । ॐ विष्णवे विभूषणाय स्वाहा । ॐ विष्णवे शिपिविष्टाय स्वाहा । ॐ नरसिंहाय स्वाहा । ॐ पुरुषोत्तमाय स्वाहा' या मंत्रांनी घृतप्लुत अश्वत्थवृक्षाच्या बारा समिधांनी हवन करावे. 'विष्णो रराटमसि०' या मंत्राने बारा आहुत्या द्याव्यात. नंतर 'इदं विष्णु०' 'इरावती०' या मंत्रांनी चरूच्या बारा आहुत्या द्याव्यात. 'तद्विप्रासो०' या मंत्राने घृताहुती समर्पित करावी. नंतर शेष होम करून तीत पूर्णाहुत्या द्याव्यात. 'युञ्जते' आदी अनुवाकाचा जप करून मंत्रोच्चारणपूर्वक पिंपळाच्या पानावर चरू ठेवून त्याचे प्राशन करावे.

त्यानंतर मासाधिपतींच्या उद्देशानें बारा ब्राह्मणांना भोजन द्यावे. तेरावा उत्तम आचार्य असावा. मधुर जलाचे तेरा कलश, उत्तम छत्र, पादुका, वस्त्र, सुवर्ण, माला इत्यादी वस्तू अर्पण कराव्यात. व्रतपूर्तीसाठी सर्व वस्तू तेरा तेरा असाव्यात. 'गायी प्रसन्न होऊन, हर्षित होऊन चराव्यात' असे समजून गोपथ (गोचरणभूमी) तयार करून दहा हात उंचीचा यूप करावा. गृहस्थाने होम आदी करून पूर्वोक्त विधीस अनुसरून गृहात प्रवेश करावा. या समयी सामान्य लोकांसाठी अन्नछत्र सुरू करावे. जो मनुष्य उद्यान निर्माण करतो तो चिरकाल नंदनकाननात निवास करतो. मठप्रदानानें स्वर्गलोक व इंद्रलोकाची प्राप्ती त्याला होते. त्याचा निवास वरुणलोक व देवलोक यांत होतो. विटांचा सेतू बांधणारा स्वर्गास जातो. गोपथ निर्माण करणारा गोलोकी जातो. कृच्छ्रव्रत करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो. गृहदान करणारा प्रलयकालापर्यंत स्वर्गात निवास करतो. गृहस्थानें शिव आदी देवांची समुदायप्रतिष्ठा करावी.

## जीर्णोद्धारविधी

सदुसष्टाव्या अध्यायात जीर्णोद्धाराचा विधी संक्षेपाने सांगितला

आहे. मूर्तीला विभूषित करून स्नान करावे. अत्यंत जीर्ण, अंगहीन, भग्न, शिलामात्रावशिष्ट मूर्तीचा त्याग करावा. त्या स्थानी देवळात नवीन मूर्तीची स्थापना करावी. भूतांच्या संहारविधीनंतर नृसिहमंत्राने सहस्र आहुत्या द्याव्यात. पहिली जीर्ण मूर्ती उचलावी. काष्ठाची असेल तर अग्नीस समर्पित करावी. प्रस्तराची विसर्जित करावी. धातुमय, रत्नमय मूर्ती समुद्रात विसर्जित करावी. जीर्णांग मूर्तीस यानावर आरूढ करून, वस्त्रांनी आच्छादित करून, वाजतगाजत जलात सोडावे. आचार्यास दक्षिणा द्यावी. त्याच दिवशी नव्या मूर्तीची स्थापना करावी. याप्रकारे कूप, वापी, तलाव आदींचाही जीर्णोद्धार करावा.

## आणि असा उत्सवविधी

अडुसष्टाव्या अध्यायात उत्सवाच्या विधीचे वर्णन आले आहे. देवाची स्थापना झाल्यानंतर त्याच वर्षात एकरात्र, त्रिरात्र, अष्टरात्र उत्सव करावा. उत्सवाशिवाय देवप्रतिष्ठा निष्फल होते. भगवानांची नगरयात्रा काढावी. मंगलाकुरांचे रोपण करावे. नृत्य, गीत, गाणे-बजावणे करावे. अंकुरांच्या रोपणास शराब, हाडे यांची उपयुक्तता आहे. यव, शाली, तिल, मुद्‌ग, गोधूम, श्वेत सर्षप, कुलत्थ, माष, निष्पाव यांना प्रक्षालित करून वपन करावे. प्रदीपाच्या साह्याने रात्री नगरभ्रमण करून इंद्रादी दिक्पाल, कुमुदादी दिग्गज, सर्व प्राणिमात्र इत्यादींसाठी बली प्रदान करावा. देवयात्रा काढणाऱ्यास अश्वमेध-यज्ञाचे फल प्राप्त होते.

प्रथम देवमंदिरात येऊन म्हणावे, 'भगवन्, देवश्रेष्ठ, आपली उद्या तीर्थयात्रा आहे. सर्वज्ञ, आपण तिला अनुज्ञा द्यावी.' अशी प्रार्थना करून उत्सवकार्यास सुरुवात करावी. वैष्णवांच्यासह मूलमंत्राचा पाठ करून देवमूर्तीस घृताचे लेपन करावे. सर्व रात्रभर घृतधारेचा अभिषेक करावा. देवास दर्पण दाखवावा. आरती, गीत, वाद्य आदी मंगल कृत्य करावे. चवरी ढाळून पूजन करावे. पुन्हा दीप, गंध, पुष्पे यांनी यजन करावे. हळद, कापूर, केशर, श्वेतचंदनाचे चूर्ण, या वस्तू देवावर व उपासकावर टाकल्या की, सर्व तीर्थांची फलप्राप्ती होते. नियत स्थावर

देवमूर्तीची स्थापना करावी. अर्चना करून छत्रचामरे व शंखनाद यांच्या साहाय्याने राष्ट्राचे पालन करणाऱ्या नदीवर जावे.

नदीत स्नान घालण्याच्या आधी तटावर वेदी निर्माण करावी. मूर्तीस यानातून उतरवून तिला वेदीपाशी न्यावे. तेथे चरू निर्माण करून त्याची आहुती द्यावी. होम करावा. वरुणदेवाची प्रार्थना करून तीर्थांना आवाहन करावें. 'आपो हि ष्ठा०' मंत्रानें अर्घ्य देऊन पूजन करावे. देवमूर्तीस जलात अघमर्षण करून ब्राह्मणांनी, महाजनांनी स्नान करावे. स्नानानंतर मूर्तीस वेदीवर ठेवावे. तेथे मूर्तीचे पूजन करून नंतर तिला देवप्रासादात घेऊन जावे. असा हा उत्सव भोग व मोक्ष देणारा आहे.

## स्नपनोत्सवाचे वर्णन

अग्निदेवांनी एकोणसत्तराव्या अध्यायात स्नपनोत्सवाचे (स्नानाच्या उत्सवाचे) वर्णन केले आहे. प्रसादासमोर मंडपाच्या खाली कलशांचा न्यास करावा. भगवान श्रीहरींचे ध्यान, पूजन, हवन करावे. पूर्णाहुतीस एक हजार वा शंभर आहुत्या द्याव्यात. स्नान, द्रव्य यांच्या द्वारा कलशांना विन्यास करावा. कंठसूत्रयुक्त कुंभांना अधिवासन करून मंडलात ठेवावे.

चौकोनी मंडल तयार करून त्याला अकरा रेखांनी विभाजित करावे. चारही दिशांना नऊ नऊ काष्ठांची स्थापना करावी. त्यांना शालिचूर्णाने पूरित करावें. कुंभमुद्रेची रचना करून पूर्वादी दिशांना कलश ठेवावेत. पुंडरीकमंत्रानें त्यांत दर्भ टाकावेत. सर्व रत्नसमन्वित जलपूर्ण कुंभास मध्ये ठेवावे. उरलेल्या आठ कुंभांत क्रमशः यव, व्रीही, तिल, नीवार, श्यामाक, कुलत्थ, मुद्ग, श्वेत सर्षप टाकून आठ दिशांना स्थापित करावे. पूर्व दिशावर्ती नवकात घृतपूर्ण कुंभ राखावा. त्यात पलाश, अश्वत्थ, वट, बिल्व, औदुंबर, प्लक्ष, जंबू, शमी व कपित्थ इत्यादी वृक्षांच्या सालींचा रस टाकावा. आग्नेयकोणावर्ती नवकात (नवांच्या समुदायात) मधुपूर्ण घटाचा न्यास करावा. या कलशात गोशृंग, पर्वत, गंगाजल, गजशाला, तीर्थं, शेत, खळिहान या आठ स्थलांची माती सोडावी.

दक्षिणावर्ती नवकात तिलतैलाने परिपूर्ण असा घट स्थापन करावा. त्यात क्रमश: नारंगी, लिंबू, खजूर, मृत्तिका, नारळ, सुपारी, डाळिंब, फणस इत्यादी फळे टाकावीत. नैर्ऋत्यकोणातील नवकात क्षीरपूर्ण कलश ठेवावा. त्यात कुंकू, नागपुष्प, चंपक, मालती, मल्लिका, पुनाग, करवीर, कमल यांना टाकावे. पश्चिमेकडील नवकात नारळाचे पाणी भरून कलश ठेवावा. त्यात नदी, समुद्र, सरोवर, कूप, वर्षा, हिम, निर्झर, देवनदीचे जल यांना सोडावे. वायव्यकोणातील नवकात कदली-जलपूरित कुंभ ठेवावा. त्यात सहदेवी, कुमारी, सिंही, व्याघ्री, अमृता, विष्णुपर्णी, दूर्वा इत्यादी औषधी वनस्पती टाकाव्यात. पूर्वादी उत्तर-वर्ती नवकात दधिकलश ठेवावा. त्यात पत्र, वेलदोडा, चंदन, लता, कस्तुरी, कृष्णागुरू, सिद्धद्रव्य इत्यादी घालावेत. ईशान्यनवकात शांति-जलाचा कुंभ असावा. त्यात शुभ्र रजत, लोह, त्रपू, कास्य, शिसे, रत्ने टाकावीत. प्रतिमेस घृताचे अभ्यंग घालून मूलमंत्राने स्नान घालावे. तिची गंधादिकांनी पूजा करावी. अग्नीत होम करून पूर्णाहुती द्यावी. सर्व भूतांना बली प्रदान करावा. ब्राह्मणांना दक्षिणापूर्वक भोजन द्यावे. या प्रकारे एक हजार आठ कलशांनी स्नपनोत्सव करावा. या अनुष्ठानाने मनुष्यास सर्व काही प्राप्त होते. यज्ञाच्या अवभृथस्नानानेच पूर्ण स्नान होते. पार्वती, लक्ष्मी यांच्या विवाहाच्या आरंभी स्नपनोत्सव करतात.

## वृक्षांचा प्रतिष्ठाविधी

सत्तराव्या अध्यायात वृक्षांच्या प्रतिष्ठेचा विधी समजावून सांगितला आहे. हा विधी भोग व मोक्ष देणारा आहे. वृक्षांना सर्वौषधिजलाने लिप्त, सुगंधी चूर्णाने विभूषित करावे. मालांनी वृक्षांना अलंकृत करावे. सर्व वृक्षांना सुवर्णमयी सुईने कर्णवेधन व सुवर्णशलाकेने अंजन करावे. वेदिकेवर सात फळे ठेवावीत. प्रत्येक वृक्षाचे अधिवासन करून कुंभ समर्पित करावा. इंद्रादी दिक्पालांसाठी बलिप्रदान करावे. वृक्षाच्या अधिवासनाच्या वेळी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद यांच्यापैकी एकाच्या मंत्रांनी अथवा वरुण, मत्तभैरव यांच्या मंत्रांनी होम करावा.

श्रेष्ठ ब्राह्मणाने वृक्षवेदीवर स्थित होऊन वृक्ष व यजमान यांना

स्नान घालावे. यजमानाने अलंकृत होऊन ब्राह्मणांना गाय, भूमी, आभूषणे, वस्त्रे, दक्षणादी देऊन चार दिवस क्षीरयुक्त भोजन द्यावे. या कर्मात तिळ, घृत, पलाशसमिधा यांनी हवन करावे. आचार्यास दुप्पट दक्षिणा द्यावी. मंडप निर्माण करावा. वृक्ष व त्याची प्रतिष्ठा यांनी पाप दूर होते. उद्यानाच्या प्रतिष्ठेने पाप दूर होऊन परम सिद्धीची प्राप्ती होते.

## गणपतीचा पूजाविधी

गणपतीचे पूजन सर्व अभीष्ट अर्थांची सिद्धी देणारे आहे. 'गणंजयाय स्वाहा.'– हृदय, 'एकदंष्ट्राय हुं फट्'– शिर, 'अचलकर्णिने नमो नमः'– शिखा, 'गजवक्त्राय नमो नमः'– कवच, 'महोदराय चण्डाय नमः'– नेत्र आणि 'सुदण्डहस्ताय हुं फट्'– अस्त्र, या मंत्रांनी अंगन्यास करावा. गण, गुरू, गुरुपादुका, शक्ती, अनंत, धर्म यांचे पूजन करून कमलकर्णिकेत बीजाची अर्चना करावी. तीव्रा, ज्वालिनी, नंदा, भोगदा, कामरूपिणी, उग्रा, तेजोवती, सत्या व विघ्ननाशिनी या नऊ शक्तिपीठांची पूजा करावी. चंदनादी अर्पण करावे. आसन द्यावे. 'यं' शोषकवायू, 'रं' अग्नी, 'लं' प्लव (पृथ्वी) आणि 'वं' अमृत अशी बीजे मानली गेली आहेत. 'ॐ लम्बोदराय विद्महे महोदराय धीमहि तन्नोदन्ती प्रचोदयात्' हा गणेशगायत्रीमंत्र आहे. गणपती, गणाधिप, गणेश, गणनायक, गणक्रीड, वक्रतुण्ड, एकदंष्ट्र, महोदर, गजवक्त्र, लम्बोदर, विकट, विघ्ननाशन, धूम्रवर्ण आणि इंद्रादी दिक्पाल, या सर्वांची गणपतीच्या पूजेत अंगरूपाने पूजा करावी. हा विषय एकाहत्तराव्या अध्यायात आला आहे.

## स्नान, संध्या, तर्पण

स्नान, संध्या, तर्पण यांचा विधी हा बहात्तराव्या अध्यायाचा विषय आहे. नाना मंत्र, विविध न्यास, मुद्रा इत्यादींचे तपशीलवार वर्णन आले आहे. कोठल्या तरी तलावाची अस्त्रमंत्राने (फट्) आठ अंगुले खोदून माती आणावी. तिचे मंत्रद्वारे पूजन करावे. शिरोमंत्र

(स्वाहा) म्हणून तिला तटावर ठेवावे. अस्त्रमंत्राने तिची शुद्धी करावी. नंतर शिखामंत्र (वषट) उच्चारून कवचमंत्राने (हुम्) त्या मृत्तिकेचे तीन भाग करावेत. प्रथम भागाच्या जलमिश्रित मातीस नाभीपासून पायांपर्यंतच्या अंगास लावावी. दुसऱ्या भागाची दीप्तिमती मृत्तिका उरलेल्या शरीरास लावावी. दोनही हातांनी कान-नाक इत्यादी बंद करून, श्वास रोखून मनातल्या मनात कालाग्नीच्या सारख्या तेजोमय अस्त्राचे चिंतन करून, पाण्यात बुडी मारून स्नान करावे. शारीरिक मल धुऊन काढणारे हे स्नान झाल्यावर संध्या करून विधिस्नान करावे.

हृदयमंत्र (नमः) म्हणून अंकुशमुद्राद्वारे सरस्वती आदी तीर्थांतील एका तीर्थाचे भावनाद्वारे आकर्षण करून, पुन्हा संहारमुद्रा करून समीपवर्ती तीर्थात त्याची स्थापना करावी. त्यानंतर मातीचा तिसरा भाग अंगन्यासासाठी मंत्रपूजक वापरावा. ॐ हृदयाय नमः, शिरसे स्वाहा, शिखायै वषट्, कवचाय हुम्, नेत्रत्रयाय वौषट् व अस्त्राय फट् या सहा मंत्रांनी त्या मातीस अभिमंत्रित करावे. पूर्व भागाच्या मातीस 'अस्त्राय फट्' या मंत्राचा जप करून अभिमंत्रित करावे. उत्तर भागाच्या मातीस 'ॐ नमः शिवाय' या मंत्राचा जप करून मंत्रित करावे.

त्यानंतर मातीचा थोडासा भाग घेऊन सर्व दिशांना टाकावा. सोडताना 'अस्त्राय हुं फट्'चा जप करावा. त्यानंतर 'ॐ नमः शिवाय' व 'ॐ सोमाय स्वाहा' या मंत्रांचा जप करावा. अंगन्यास करताना चार मंत्रांचा पाठ करावा. भगवान शिव, विष्णू, गंगा यांचे स्मरण करून पाण्यात बुडी मारावी. 'ॐ हृदयाय नमः'। 'शिरसे स्वाहा'। 'शिखायै वषट्', 'कवचाय हुम्'। 'नेत्रत्रयाय वौषट्' आणि 'अस्त्राय फट्' या मंत्रांचा उच्चार करून डावा उजवा हात मिळवून कुंभमुद्रेच्या द्वारे अभिषेक करावा. रक्षणासाठी पूर्वादी दिशांना जल फेकावे, सुगंध, आवळा इत्यादी राजोचित उपचारांनी स्नान करावे.

त्यानंतर 'ॐ अस्त्राय हुं फट्' या मंत्राचा उच्चार करून शिरापासून पायापर्यंत भस्म लावून विधिपूर्वक पुन्हा स्नान करावे. ईशान, तत्पुरुष, अघोर, गुह्यक वा वामदेव व सद्योजात यांच्या मंत्रांनी मस्तक,

मुख, हृदय, गुह्यांग, शरीराचे अन्य अवयव यांना अनुलेपन करावे स्त्री, नपुंसक, शूद्र, मांजरी, शव, उंदराचा स्पर्श झाला की आग्नेय-स्नानाचा विधी करावा. सूर्य किरणे दिसत असताना जर आकाशातून जलवर्षाव होत असेल तर पूर्वाभिमुख होऊन दोन हात वर उंचावून, ईशानमंत्राचा उच्चार करून, सात पावले चालून त्या वर्षाजलानें स्नान करावे. याला 'माहेंद्रस्नान' म्हणतात. गायींच्या समूहात मध्य-भागी राहून त्यांच्या खुरांनी उडालेल्या धुळीनें इष्टदेवसंबंधी मूल-मंत्राचा जप करून कवचमंत्र (हुम्) म्हणून स्नान करावे. यास 'पावन स्नान' म्हणतात. अभिषेक सद्योजात आदी मंत्रांचा उच्चार करून जो केला जातो, त्यास 'मंत्रस्नान' म्हणतात. अशा प्रकारे वरुण व अग्नी यांच्या मंत्रांनीही स्नान करावें. मनातल्या मनात मूलमंत्राचा उच्चार करून प्राणायामपूर्वक मानसिक स्नान करावे. यानंतर संध्याविधीचे वर्णन आले आहे. ब्रह्मतीर्थाच्या जलाने तीनदा मंत्रपाठपूर्वक आचमन करावे. आत्मतत्त्व, विद्यातत्त्व, शिवतत्त्व, या तीन शब्दांच्या अंती नमः, स्वाहा जोडून मंत्रपाठ करावा. 'ॐ आत्मतत्त्वाय नमः स्वाहा', 'ॐ विद्यातत्त्वाय नमः स्वाहा', 'ॐ शिवतत्त्वाय नमः स्वाहा' या मंत्रांनी आचमन करून मुख, नासिका, नैत्र, कान यांना स्पर्श करावा. मनातल्या मनात पुरुषाने शिवसंहितेची आवृत्ती करावी. आचमन व अंगन्यास करावा.

प्रातःकाली ब्राह्मी संध्येचे ध्यान करावे. संध्यादेवी या वेळी ब्रह्म-शक्तीच्या रूपात स्थित असते. तिची अंगकांती लाल असते. तिला चार मुखे व चार हात असतात. तिच्या उजव्या हातात कमल व स्फटिक-माला असते. डाव्या हातात दंड व कमंडलू असतो. मध्यान्हकाली वैष्णवी शक्तीच्या रूपात संध्येचे ध्यान करावे. यावेळी ही गरुडावर बसलेली असते. कमलाच्या आसनावर ती स्थिर असते. तिची अंगकांती श्वेत असते. ती आपल्या डाव्या हातात शंख व चक्र धारण करते. उजव्या हातांत गदा व अभयमुद्रा असते. संध्याकाळी रुद्रशक्तीच्या रूपात संध्यादेवीचे ध्यान करावे. ती वृषभाच्या पाठीवर बसलेली असतें. कमलासनस्थ या देवीस तीन नेत्र असतात. तिच्या मस्तकावर

अर्धचंद्राचा मुकुट असतो. उजव्या हातांत त्रिशूल व रुद्राक्ष असून डाव्या हातांत अभय व सक्त असतात.

हंसपद्मासनं रक्तां चतुर्वक्त्रां चतुर्भुजाम् ।
अब्जाक्षमालिनी दक्षे वामेदण्डकमण्डलुम् ।।
ताक्ष्र्यपद्मासनां ध्यायेन्मध्यान्हे वैष्णवीं सिताम् ।
शङ्खचक्रधरां वामे दक्षिणे सगदाभयाम् ।।
रौद्रीं ध्यायेद् वृषब्जस्थां त्रिनेत्रां शशिभूषिताम् ।
त्रिशूलाक्षधरां दक्षे वामे सामयशक्तिकाम् ।।
(७२.२७-२९)

या तीन संध्या क्रमशः हृदय, बिंदू, ब्रह्मरंध्र यांत स्थित होतात. चौथ्या संध्येचे काही रूप नसते. ती परमशिवात विराजमान असते. शिव सर्वांहून पर म्हणजे श्रेष्ठ असल्याने हिला 'परमा संध्या' असे नाव आहे. तर्जनीच्या मूलभागी पितरांचे, कनिष्ठभागी प्रजापतीचे, अंगुष्ठाच्या मूलभागात ब्रह्माचे, हाताच्या अग्रभागी देवांचे तीर्थ असते. उजव्या हातात अग्नीचे, डाव्या हातात सोमाचे, बोटांच्या पर्वांत सर्व देवांचे तीर्थ असते. संध्येचे ध्यान केल्यावर शिवसंबंधी यंत्रांनी जलाशयास शिवस्वरूप मानून 'आपो हि ष्ठा०' या मंत्राने त्या जलात स्नान करावे. उजव्या हाताने शिरावर मार्जन करावे.

यानंतर अघमर्षण करावे. उजव्या हाताच्या बोधरूप शिवमय जलास नाकाजवळ न्यावे. इडानाडीनें श्वास घ्यावा आणि आतील काळ्या रंगाच्या पापपुरुषास उजव्या पिंगलानाडीनें बाहेर काढून जलात स्थापित करावा. त्या पापमय जलास हाताच्या वज्रमयी शिलेची भावना करून शिपडावे. यामुळे अघमर्षणकर्म संपन्न होते. त्यानंतर कुश, पुष्प, अक्षत, जलयुक्त अर्घ्य घेऊन 'ॐ नमः शिवाय स्वाहा' या मंत्राने तो भगवान शिवांना अर्पण करावा. यथाशक्ती गायत्रीमंत्राचा जप करावा.

यानंतर तर्पणविधी पाहा. देवांसाठी देवतीर्थाने त्यांचे नाम उच्चारून तर्पण करावे. ‘ॐ हूं शिवाय स्वाहा’ असा मंत्र म्हणून शिवांना तर्पण करावे. अन्य देवांचेही स्वाहायुक्त नामे घेऊन तर्पण करावे. ‘ॐ हां हृदयाय नमः । ॐ ह्रीं शिरसे स्वाहा । ॐ हूं शिखायै वषट् । ॐ हैं कवचाय हुम् । ॐ हौं नेत्रत्रयाय वौषट् । ॐ हः अस्त्राय फट्’ या वाक्यांनी क्रमशः हृदय, शिर, शिखा, कवच, नेत्र, अस्त्र यांच्यावर न्यास करावेत. आठ देवगणांना त्यांच्या नावांनंतर ‘नमः’ म्हणून तर्पणार्थ जल अर्पित करावे.

आठ देवगणांना त्यांच्या नामांसमोर ‘नमः’ पद जोडून जल अर्पण करावे. ‘ॐ हां आदित्येभ्यो नमः । ॐ हां वसुभ्यो नमः । ॐ हां रुद्रेभ्यो नमः । ॐ हां विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । ॐ हां मरुद्भ्यो नमः । ॐ हां भृगुभ्यो नमः । ॐ हां अङ्गिरोभ्यो नमः’ अशा रीतीने देवगणांना तर्पण झाल्यावर जानवे माळेप्रमाणे करून ऋषींना तर्पण करावे. ‘ॐ हां अत्रये नमः । ॐ हां वसिष्ठाय नमः । ॐ हां पुलस्तये नमः । ॐ हां क्रतवे नमः । ॐ हां भरद्वाजाय नमः । ॐ हां विश्वामित्राय नमः । ॐ हां प्रचेतसे नमः । ॐ हां मरीचये नमः’ या मंत्रांनी अत्र्यादी ऋषींना एक एक अंजली अर्पण करावी. सनकादिक ऋषींना दोन दोन अंजली अर्पण करून पुढील मंत्र म्हणावेत. ‘ॐ हां सनकाय वषट् । ॐ हां सनन्दनाय वषट् । ॐ हां सनातनाय वषट् । ॐ हां सनत्कुमाराय वषट् । ॐ हां कपिलाय वषट् । ॐ हां पञ्चशिखाय वषट् । ॐ हां ऋभवे वषट्’ अशा मंत्रांनी हातांच्या कनिष्ठिकांच्याद्वारे जलांजली द्यावी.

‘ॐ हां सर्वेभ्यो भूतेभ्यो वषट्’ या मंत्राने वषट्स्वरूप भूतगणांना तर्पण करावे. त्यानंतर यज्ञोपवीतास उजव्या खांद्यावर घेऊन कुशतिलांसह तीन तीन अंजली पितरांना अर्पण कराव्यात. ‘ॐ हां कव्यवाहनाय स्वधा । ॐ हां अनलाय स्वधा । ॐ हां सोमाय स्वधा । ॐ हां यमाय स्वधा । ॐ हां अर्यम्णे स्वधा । ॐ हां अग्निष्वात्तेभ्यः स्वधा । ॐ हां बर्हिषद्भ्यः स्वधा । ॐ हां आज्यपेभ्यः स्वधा । ॐ हां सोमपेभ्यः स्वधा’ या मंत्रांनी विशिष्ट देवदेवतांप्रमाणे पितरांनाही

जलांजलीनें तृप्त करावं.

त्यानंतर 'ॐ ह्रां ईशानाय पित्रे स्वधा' म्हणून पित्यास, 'ॐ ह्रां पितामहाय स्वधा' म्हणून पितामहास व 'ॐ शान्तप्रपितामहाय स्वधा' म्हणून प्रपितामहास तृप्त करावे. याप्रकारे समस्त प्रेतपितरांना तर्पण करताना म्हणावे, 'ॐ ह्रां पितृभ्यः स्वधा । ॐ ह्रां पितामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां प्रपितामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां वृद्धप्रपितामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां मातृभ्यः स्वधा । ॐ ह्रां मातामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां प्रमातामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां वृद्धप्रमातामहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां सर्वेभ्यः पितृभ्यः स्वधा । ॐ ह्रां सर्वेभ्यः ज्ञातिभ्यः स्वधा । ॐ ह्रां सर्वाचार्येभ्यः स्वधा । ॐ ह्रां दिग्भ्यः स्वधा । ॐ ह्रां दिग्पतिभ्यः स्वधा । ॐ ह्रां सिद्धेभ्यः स्वधा । ॐ ह्रां मातृभ्यः स्वधा । ॐ ह्रां ग्रहेभ्यः स्वधा । ॐ ह्रां रक्षोभ्यः स्वधा' अशा वाक्यांनी क्रमशः पितर, पितामह, वृद्धप्रपितामह, माता, मातामह, प्रमातामह, वृद्धप्रमातामह, सर्व पितर, सर्व ज्ञातिजन, सर्व आचार्य, सर्व दिशा, सर्व दिग्पती, सिद्ध, मातृका, ग्रह व राक्षस यांना अंजली द्यावी.

## सूर्यदेवाचा पूजाविधी

त्र्याहत्तराव्या अध्यायात भगवान महादेवांनी स्कंदास करन्यास व अंगन्यासपूर्वक सूर्यदेवाचा पूजाविधी समजावून दिला आहे. 'मी तेजोमय सूर्य आहे' असे चिंतन करून अर्घ्यपूजन करावे. सूर्याचे अंगद्वारे रक्षावगुंठन करावे. पूजासामग्रीस जलाने प्रोक्षित करावे. पूर्वाभिमुख होऊन सूर्यदेवाची पूजा करावी. 'ॐ आं हृदयाय नमः' या मंत्रानें सर्व अंगांवर न्यास करावा. पूजागृहाच्या द्वारी दक्षिणेस दंडी व डाव्या बाजूस पिंगल यांचे पूजन करावे. ईशानकोणात 'गं गणपतये नमः' म्हणून गणेशाची व अग्निकोणात गुरूची पूजा करावी. पीठाच्या मध्यभागात कमलाकार आसनाचे चिंतन व पूजन करावे.

पीठाच्या कमळात 'रां दीप्तायै नमः' या मंत्राने दीप्ताची, 'रीं सूक्ष्मायै नमः' या मंत्रानें सूक्ष्माची, 'रूं जयायै नमः' या मंत्रानें जयाची, 'रें भद्रायै नमः'नें भद्राची, 'रैं विभूतये नमः' म्हणून

विभूतीची, 'रौं विमलायै नमः' म्हणून विमलाची, 'रौं अमोघायै नमः' या मंत्राने अमोघाची व 'रं विद्युतायै नमः' म्हणून विद्युताची पूजा करून मध्यभागी 'रः सर्वतोमुख्यै नमः' या मंत्राने नऊ पीठ-शक्तींची आराधना करावी. त्यानंतर 'ॐ ब्रह्मविष्णुशिवात्मकाय सौराय योगपीठात्मने नमः' या मंत्राने सूर्याच्या आसनाची पूजा करावी. नंतर 'खखोल्काय नमः' या षडक्षरमंत्रास 'ॐ हं खं' जोडून नऊ अक्षरांनी युक्त (ॐ हं खं खखोल्काय नमः) मंत्राने सूर्यदेवास आवाहन करावे.

अंजलीत घेतलेले जल ललाटाला लावून रक्तवर्णी सूर्यदेवाचे ध्यान करावे. भावनेने त्याला आपल्या समोर स्थापित करावे. पुन्हा 'ह्रां ह्रीं सः सूर्याय नमः' असे म्हणून सूर्यदेवास अर्घ्य द्यावा. त्यानंतर बिंबमुद्रा धारण करून आवाहन आदी उपचार करावेत. त्यानंतर सूर्य-देवाला गंधादी समर्पित करावे. नंतर पद्ममुद्रा, बिंबमुद्रा यांनी अग्नी आदी कोणांत हृदयादी अंगांची पूजा करावी. अग्निकोणात 'ॐ आं हृदयाय नमः' या मंत्राने हृदयाची, नैर्ऋत्यकोणात 'ॐ भूः अर्काय शिरसे स्वाहा' या मंत्राने शिराची, वायव्यकोणात 'ॐ भुवः सुरेशाय शिखायै वषट्' या मंत्राने शिखेची, ईशानकोणात 'ॐ स्वः कवचाय हुम्' या मंत्राने कवचाची, 'ॐ हां नेत्रत्रयाय वौषट्' या मंत्राने इष्ट-देवाची व 'वः अस्त्राय फट्' या मंत्राने अस्त्राची पूजा करावी.

हृदय, शिर, शिखा, कवच यांच्यासाठी पूर्वादी दिशांत धेनुमुद्रेचे प्रदर्शन करावे. नेत्रांसाठी गोशृंगाची मुद्रा करावी. अस्त्रासाठी त्रासनी-मुद्रा योजून ग्रहांना नमस्कार करावा. त्यांचे पूजन करावे. 'ॐ सों सोमाय नमः' या मंत्राने पूर्वेस चंद्राची, 'ॐ बुं बुधाय नमः' या मंत्राने दक्षिणेस बुधाची, 'ॐ बृं बृहस्पतये नमः' या मंत्राने पश्चिमेस बृहस्पतीची, 'ॐ भं भार्गवाय नमः' या मंत्राने उत्तरेस शुक्राची पूजा करावी. त्याचप्रमाणे पूर्वादी दिशांत चंद्रमादी ग्रहांची पूजा करून अग्नी आदी कोणांत शेष ग्रहांचे पूजन करावे. 'ॐ भौं भौमाय नमः' या मंत्राने अग्निकोणात मंगळाची, 'ॐ शं शनैश्चराय नमः' या मंत्राने नैर्ऋत्यकोणात शनैश्चराची, 'ॐ रां राहवे नमः' म्हणून वायव्य-

कोणात राहूची आणि 'ॐ कें केतवे नमः' म्हणून ईशानकोणात केतूची गंधादी उपचारांनी पूजा करावी. खकोल्की म्हणजे भगवान सूर्याच्या-बरोबर या सर्व ग्रहांचे पूजन करावे.

मूलमंत्राचा* जप करून, अर्घ्यपात्रात जल घेऊन सूर्यास समर्पित करावे. त्याची स्तुती करावी. सूर्यासमोर मुख करून, उभे राहून, सूर्य-देवास नमस्कार करून म्हणावे, 'प्रभो, आपण माझ्या अपराधांना व त्रुटींना क्षमा करावी.' यानंतर 'अस्त्राय फट्' या मंत्राने अणुसंहाराचे समाहरण करून 'शिव, सूर्य कल्याणमय सूर्यदेव,' असे म्हणून संहारिणी-शक्तीच्या मुद्राद्वारे सूर्याच्या उपसंहृत तेजास आपल्या हृदयकमलाव स्थापित करावे. सूर्यदेवाचे निर्माल्य पार्षद चंडास अर्पण करावे. अशा प्रकारे जगदीश्वर सूर्याच पूजन करून जप, ध्यान, होम केल्याने साध-काचे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

## शिवपूजेचा विधी

चौऱ्याहत्तराव्या अध्यायात महादेवांनी स्कंदास शिवपूजेचा विधी समजावून दिला आहे. आचमन, स्नान इत्यादी करून प्रणवाचा जप करावा व सूर्यदेवास अर्घ्य द्यावेत. पूजामंडपाच्या द्वारासमोर 'फट्' या मंत्राने जलाने शिंपडून 'हां' या बीजमंत्राने नंदी+ आदी द्वारपालांचे पूजन करावे. द्वारावर औदुंबराची स्थापना करावी. वरच्या भागावर गणपती, सरस्वती, लक्ष्मी यांची पूजा करावी. वृक्षाच्या उजव्या शाखेवर अथवा द्वाराच्या दक्षिणभागावर नंदी व गंगा यांचे पूजन करावे. डाव्या भागी महाकाल व यमुना यांची पूजा करावी. त्यानंतर दिव्य दृष्टीने विघ्नांचे निवारण करावे. 'आकाशचारी सारी विघ्नं दूर व्हावीत' अशी भावना करून फुले फेकावीत.

---

* 'शारदातिलका'नुसार सूर्याचा दशाक्षर मूलमंत्र असा आहे. 'ॐ ह्रीं घृणिः सूर्य आदित्य श्रीं. इति दशाक्षरो मन्त्रः:। परंतु 'ॐ हं खं' या बीजांसह 'खखोल्काय नमः' या षडक्षरमंत्रास बीजमंत्र मानले आहे.

+ नारदपुराणानुसार नंदी, भृंगी, रिटी, स्कंद, गणेश, उमामहेश्वर, वृषभ व महाकाल हे शिवांचे द्वारपाल आहेत.

त्यानंतर यज्ञमंडपात प्रवेश करावा. उजव्या पावलाने मंडपात प्रवेश करून औदुंबरवृक्षावर न्यास करावा. मंडपाच्या मध्यभागी पीठावर आधारभूमीवर 'ॐ ह्रां वास्त्वधिपतये ब्रह्मणे नमः' अशा मंत्राने वास्तुदेवतेची पूजा करावी. हातात तांब्या घेऊन, शिवाची आज्ञा मागून मौन राहून गंगा आदी नदीच्या तटावर जावे. तेथे जाऊन आपल्या शरीरास पवित्र करावे. गायत्रीमंत्राचा जप करावा. जलाशयात उतरून तांब्या भरावा. हृदयबीजाचा, (नमः) चा उच्चार करून पूजेसाठी गंध, अक्षत, पुष्प आदी द्रव्ये सिद्ध करावीत. भूतशुद्धीचे कर्म करावे. उत्तराभिमुख होऊन आराध्यदेवाच्या उजव्या भागाच्या शरीराच्या विविध अंगांवर मातृकान्यास करावेत. कूर्ममुद्रेचे प्रदर्शन करून द्वादशदलयुक्त हृदयकमलात आपल्या आत्म्याचे चिंतन करावे.

त्यानंतर शरीरात शून्याचे चिंतन करून पांच भूतांचे क्रमशः शोधन करावे. पायांचे दोन अंगठे शून्यरूप पाहावेत. मूलाधारातील कुंडलिनीशक्तीस जागृत करून हृदयकमलाने संयुक्त करावी. चिंतन करावे की, हृदयरंध्रात स्थित अग्नितुल्य तेजाची 'हूं' बीजात्म कुंडलिनीशक्ती विराजत आहे. या वेळी चिंतन करणाऱ्या साधकाचा प्राणवायू अवरोध (कुंभक) करून त्याचा निःसारण (रेचक) करावा. त्यानंतर 'हुं फट्'चा उच्चार करून उत्तरोत्तर चक्रांचे भेदन करावे. व कुंडलिनीस हृदय, कंठ, टाळ, भ्रूमध्य, ब्रह्मरंध्र यांत नेऊन स्थापित करावे. अशा प्रकारे चक्रांचे भेदन करून कुंडलिनीस हृदयकमलातील ब्रह्मरंध्रातील 'हुं' बीजस्वरूप जीवास सहस्रारचक्रात स्थापित करावे. शिखेच्यावर 'हूं'चा न्यास करून शुद्ध बिंदुस्वरूप जीवाचे चिंतन करावे. कुंभक प्राणायाम करून चैतन्यगुणयुक्त जीवास शिवाशी संयुक्त करावे.

अशा रीतीने शिवात लीन झाल्यावर साधकाने सबीज रेचक प्राणायामाने शरीरगत भूतांचे शोधन करावे. शरीराच्या पायांपासून बिंदूपर्यंत सर्व तत्त्वांचे विलोमक्रमाने चिंतन करावे. बिंदूरूप जीवास लीन करून पृथ्वी, वायू यांचा एक दुसऱ्यात लय करावा. दोन परस्पर विरोधी भूतांचा लय करावा. आकाशाचा कोणाशी विरोध नाही. म्हणून त्याची शुद्धी अशी करावी. भूमंडळाचे स्वरूप चतुष्कोणी आहे.

त्याचा रंग सुवर्णाप्रमाणे पिवळा आहे. ते कठोर असून वज्राच्या चिन्हानें आणि 'ह्रां' या आत्मीय बीजानें युक्त आहे. त्यात 'निवृत्ती' नावाची कला आहे.

जलाचे स्वरूप अर्धचंद्राकार आहे. ते द्रवरूप आहे. चंद्रमंडलमय आहे. त्याची कांती उज्ज्वल आहे. ते दोन कमलांनी चिन्हित आहे. 'ह्रीं' या बीजानें ते युक्त असून 'प्रतिष्ठा' नावाच्या स्वरूपास प्राप्त होते. वामदेव व तत्पुरुषमंत्रांनी संयुक्त जलतत्त्व चार गुणांनी युक्त आहे. असे चिंतन करून जलतत्त्वास वन्हीच्या रूपात लीन करावे. अग्निमंडल त्रिकोणी असून त्याचा वर्ण लाल आहे. नाभीपासून हृदया-पर्यंत ते स्थित असते. ते स्वस्तिकचिन्हानें युक्त असून त्यात 'हूं' बीज असते. ते विद्याकलारूप आहे. त्याचा मंत्र अघोर असून तो तीन गुणांनी युक्त आहे. अग्नितत्त्वास या प्रकारे वायूत लीन करावे. वायुमंडल षट्कोणाकार आहे. शरीराच्या हृदयापासून भुवयांपर्यंत त्याचे स्थान आहे. ते सहा बिंदूंनी युक्त असून काळया रंगाचे असते. ते 'हैं' या बीजानें युक्त असते. ते सद्योजातमंत्रानें युक्त असून शांतिकलास्वरूप आहे. त्यात दोन गुण असून ते पृथ्वीभूत आहे. अशा प्रकारे वायुतत्त्वाचेही शोधन करावे.

आकाशाचे स्वरूप व्योमाकार, नादबिंदुमय, गोलाकार, बिंदू व शक्ती यांनी विभूषित व शुद्ध स्फटिकाप्रमाणे निर्मल असते. शरीरातील भ्रूमध्यापासून ब्रह्मरंध्रापर्यंत त्याचा निवास असून 'ह्रौं फट्' या बीजानें ते युक्त असते. ते शान्त्यतीतकलामय* असते. ते एक गुणानें युक्त असून परम शुद्ध असते. या चिंतनानें आकाशतत्त्वाचे शोधन करावे. त्यानंतर अमृतवर्षी मूलमंत्रानें सर्वांना परिपुष्ट करावे. नंतर आधारशक्ती, कूर्म, अनंता (पृथ्वी) ची पूजा करावी. धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांची पूजा करावी. अधर्म, अज्ञान, अवैराग्य, अनैश्वर्य यांची पूजा करावी. पीठाच्या मध्यभागी असणाऱ्या कमलाची पूजा करावी. त्यावरील देवमूर्ती सच्चिदानंदघन भगवान शिवांना आवाहन करावे. त्या शिवमूर्तीत

---

* शान्त्यतीतकलेत इन्धिका, दीपिका, रेचिका, मोचिका या चार कला असतात.

शिवस्वरूप आत्म्यास पाहावे. त्यानंतर आसन, पादुकाद्वय, नऊ पीठ-शक्ती या बारांचे ध्यान करावे. शक्तिमंत्राच्या शेवटी 'वौषट्' पद लावून त्याचा उच्चार करावा व आत्ममूर्तीस दिव्य अमृताने आप्लवित करावे.

त्यानंतर 'हुं फट्' या मंत्राने प्राकाराचा, भावनाद्वारे भावनात्मक शक्तिजलाचा विस्तार करावा. त्यानंतर महामुद्रा करावी. नंतर पूरक प्राणायामाने हृदयकमलात विराजमान झालेल्या शिवांचे ध्यान करावे. भावमय पुष्पांनी त्यांची पायांपासून शिरापर्यंतच्या अंगांची पूजा करावी. हे भावमय पुष्प आनंदामृतमय मकरंदाने परिपूर्ण असावे. त्यानंतर शिवमंत्राने नाभिकुंडातील शिवस्वरूपी अग्नीस तृप्त करावे. तोच शिवानल ललाटात बिंदुरूपात स्थित असावा. त्याचा विग्रह मंगलमय असतो.

स्वर्ण, रजत व ताम्रपत्र यांपैकी एका पात्रास अर्घ्यासाठी घेऊन त्याला अस्त्रबीजाने (फट्) जलाने धुवावे. बिंदुरूप शिवातून प्रकट होणाऱ्या अमृताच्या भावनेने युक्त अशा जल व अक्षत आदींच्याद्वारे हृदयमंत्राने (नमः) ते पूर्ण भरावे. नंतर हृदय, शिर, शिखा, कवच, नेत्र, अस्त्र या सहा अंगांनी त्या अर्घ्यपात्राचे पूजन करावे. देवतांसंबंधी मूलमंत्राने त्याला अभिमंत्रित करावे. नंतर अस्त्रमंत्राने (फट्) त्याचे रक्षण करून कवचबीजाने (हुम्) त्याला अवगुंठित करावे. या प्रकारे अष्टांगअर्घ्याची रचना करून, धेनुमुद्रेने त्याचे अमृतीकरण करून ते जल सर्वत्र शिंपडावे. आपल्या मस्तकावर त्या जलबिंदूचा अभिषेक करावा. पूजासामग्रीसही त्या जलाने सिंचित करावे.

यानंतर अमृता (धेनुमुद्रा) करून देवतेस आसनावर बसवावे. पूजन करून आपल्या मस्तकास तिलक लावून मूलमंत्रद्वारे आराध्य-देवास पुष्प समर्पित करावे. स्नान, देवपूजा, होम, भोजन, यज्ञानुष्ठान, योग, साधन, आवश्यक जप करून साधकाने मौन राहावे.

स्नाने देवार्चने होमे भोजने योगयोगवोः ।
आवश्यके जपे धीरः सदा वाचयमो भवेत् ।।

(७४.३९)

प्रणवाचा नादपर्यंत उच्चार करून मंत्राचे शोधन करावे. उत्तम संस्कारयुक्त देवपूजा करावी. मूलगायत्री अथवा रुद्रगायत्रीने अर्घ्यपूजन करून अर्घ्य देवास सर्मपित करावा. ब्रह्म पंचक (पंचगव्य व कुशोदकाचा ब्रह्मकूर्च) तयार करून पूजित शिवलिंगाचे पुष्पनिर्माल्य ईशानकोणात 'चण्डाय नमः' म्हणून चंडास सर्मपित करावे. त्या ब्रह्मपंचकाने नंतर पिंडिका व शिवलिंगास स्नान घालून 'फट्'चा उच्चार करावा. नंतर 'नमो नमः'चा उच्चार करून लिंगावर अभिषेक करावा. हा लिंग-शोधनाचा विधी आहे.

आत्मा (शरीर व मन), द्रव्य (पूजासामग्री), मंत्र, लिंगशुद्धी झाल्यावर मग सर्व देवतांचे पूजन करावे. वायव्यकोणात 'ॐ हां गणपतये नमः' म्हणून गणेशाची पूजा करावी. ईशानकोणात 'ॐ हां गुरुभ्यो नमः' म्हणून गुरू, परम गुरू, परात्पर गुरू, परमश्रेष्ठ गुरू यांची पूजा करावी. त्यानंतर कूर्मरूपी शिलेवर असलेली अंकुरसदृश आधारशक्तीचे व ब्रह्मशिलेवर असलेल्या शिवांच्या आसनभूत अनंत-देवास 'ॐ हां अनन्तासनाय् नमः' या मंत्राने पूजावे. शिवांच्या आसनाची, पादुकांची पूजा करावी. नंतर धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य यांची पूजा करावी. यानंतर 'ॐ हां अधश्छदनाय नमोऽधः', 'ॐ हां ऊर्ध्वच्छद-नाय नमः ऊर्ध्वे', 'ॐ पद्मासनाय नमः' या मंत्राने अष्टदलकमलाची, 'ॐ हां कर्णिकायै नमः' म्हणून कर्णिकेची पूजा करावी. कमलातील नऊ पाठशक्तींची पूजा करावी. वामा, ज्येष्ठा, रौद्री, काली, कला-विकारिणी, बलविकारणी, बलप्रमथिनी, सर्वभूतदमनी व मनोन्मनी या सर्वांचे क्रमशः पूजन करावे. नंतर पृथ्वी आदी अष्टमूर्तींची पूजा करावी. 'ॐ सूर्यमूर्तये नमः' म्हणून पूर्वेस, अग्निकोणात 'ॐ चंद्रमूर्तये नमः', दक्षिणेस 'ॐ पृथ्वीमूर्तये नमः', 'नैर्ऋत्येस 'ॐ जलमूर्तये नमः', पश्चिमेस 'ॐ वन्हिमूर्तये नमः', वायव्येस 'ॐ वायुमूर्तये नमः', उत्तरेस 'ॐ आकाशमूर्तये नमः' व ईशान्येस 'ॐ यजमानमूर्तये नमः' अशा मंत्रांनी ही पूजा असावी.

त्यानंतर शुद्ध विद्येची व तत्त्वव्यापक आसनांची पूजा करावी· त्या सिंहासनावर कर्पूरगौर, सर्वव्यापी, पांच मुखांनी युक्त महादेवांना

प्रतिष्ठित करावे. त्यांना दहा भुजा असतात. त्यांच्या मस्तकावर अर्धचंद्र असतो. त्यांच्या उजव्या हातांत शक्ती, ऋष्टी, शूल, खट्वांग, वरदमुद्रा असून डाव्या हातांत डमरू, बिजौरा लिंब, सर्प, अक्षसूत्र व नीलकमल असते.

न्यसेत् सिंहासन देवं शुक्लं पञ्चमुखं विभुम् ।
दशबाहुं च खण्डेंदुं दधानं दक्षिणैः करैः ।।
शक्त्यृष्टिशूलखट्वाङ्गवरदं वामकैः करैः ।।
डमरुं बीजपूरं च नागाक्ष सूत्रकोत्पलम् ।।
(७४.५०–५१)

आसनाच्या मध्यभागी भगवान शिवांची मूर्ती बत्तीस लक्षणांनी संपन्न असते. शिवांचे स्मरण करून 'ॐ हां हां हां शिवमूर्तये नमः' म्हणून त्यांना नमस्कार करावा. ध्यान करून 'ॐ हां हौं शिवाय नमः' म्हणून आवाहनीमुद्रा करून शिवांना आवाहन करावे. नंतर स्थापनीमुद्रा करून त्यांची स्थापना केल्यावर संनिधापिनी मुद्रा करून 'निष्ठुरायै कालकल्यायै फट्' अशा मंत्राचा उच्चार करून खड्गमुद्रेनें येणाऱ्या विघ्नांना दूर घालवून द्यावे. त्यानंतर लिंगमुद्रा करून नमस्कार करावा.

त्यानंतर 'नमः' म्हणून अवगुंठन करावे. इष्टदेवास आपल्यासमोर स्थापावे. 'प्रभो, मी आपलाच आहे.' असे म्हणून 'संनिधान' निर्माण करावे. पूजा चालू आहे तोपर्यंत भगवानांच्या समीपतेस अक्षुण्ण राखणे म्हणजेंच 'निरोध' आहे. अभक्तांच्या समक्ष शिवतत्त्वाचे अप्रकाशन वा संगोपन ते अवगुंठन आहे. त्यानंतर सकलीकरण करून 'हृदयाय नमः', 'शिरसे स्वाहा', 'शिखायै वषट्', 'कवचाय हुम', 'नेत्राभ्यां वौषट्', 'अस्त्राय फट्' या सहा मंत्रांनी हृदयादी अंगांची अंगीशी एकता स्थापना करावी. हेच 'अमृतीकरण' होय. चैतन्यशक्ती भगवान शंकरांचे हृदय आहे. आठ प्रकारचे ऐश्वर्य हे त्यांचे शिर आहे. वशित्व त्यांची शिखा आहे. अभेद्य त्यांचे कवच आहे. त्यांचा दुःसह प्रताप सर्व विघ्नांचा नाश करणारे अस्त्र आहे. हृदयादींना पूर्वेकडे करून क्रमशः 'नमः', 'स्वधा', 'स्वाहा', 'वौषट्' उच्चारून

पाद्य आदी निवेदन करावे.

पाद्यास आराध्यदेवाच्या युगलचरणारविंदास, आचमनाने त्यांच्या मुखारविंदास, अर्घ्य, दूर्वा, पुष्पे, अक्षता यांना मस्तकास समर्पित करावे. गंध, पुष्प इत्यादी पंच उपचारांनी विधिपूर्वक शिवांची पूजा करावी. जलाचा अभिषेक, उटणे लावणे, मार्जन करणे, यांनी भगवानांना स्नान घालावे. दूध, दही, तूप, मध, साखर यांनी क्रमशः ईशान, तत्पुरुष, अघोर, वामदेव, सद्योजात या पांच मंत्रांनी अभिमंत्रित करून त्यांना स्नान घालावे. पचामृताने स्नान घालावे. यामुळे भोग व मोक्ष यांची प्राप्ती होते. त्यानंतर शीतल जलाने स्नान घालावे. चदन, केशर यांचे स्नान झाल्यावर शिवमूर्तीस नीट पुसावे. त्यानंतर अर्घ्य द्यावा. शिवलिंगाच्या मध्यभागी कधी फूल नाही असे करू नये. चंदनाचे लेपन करून सर्व उपचार समर्पित करावेत. यज्ञोपवीत द्यावे. शिवमंत्र म्हणून फूल वाहावे. धूपद्वारे पूजन करावे. घंटा वाजवून गुग्गुळाचा धूप दाखवावा. नंतर 'शिवाय नमः' म्हणून अमृतासमान स्वादू जलाचे आचमन करावे. आरती करावी. नंतर नमस्कार करून देवांच्या आज्ञेने त्यांच्या भोगांगांची पूजा करावी.

अग्निकोणात चंद्रासमान उज्ज्वल हृदयाची, ईशानकोणात सुवर्ण-समान शिराची, नैर्ऋत्यकोणात लाल रंगाच्या शिखेची, वायव्यकोणात काळया रंगाच्या कवचाची पूजा करावी. नंतर अग्निवर्ण नेत्र व कृष्ण-पिंगल अस्त्र यांची पूजा करून चतुर्मुख ब्रह्मा व चतुर्भुज विष्णू आदींना कमलदलात मानून या सर्वांची पूजा करावी. मूलस्थानी 'ॐ हां हूं शिवाय नमः' म्हणून पूजन करावे. 'ॐ हां हृदयाय नमः', 'ह्रीं शिरसे स्वाहा' म्हणून हृदय व शिर यांची पूजा करावी. 'हूं शिखायै वषट्' म्हणून शिखेची व 'हैं कवचाय हुम्' म्हणून कवचाची व 'अस्त्राय फट्' म्हणून अस्त्राची पूजा करावी. त्यानंतर परिवारासहित शिवांना क्रमशः पाद्य, आचमन, अर्घ्य, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, आचमनीय, करोद्वर्तन, तांबूल, मुखवास, दर्पण अर्पण करून त्यांच्या मस्तकावर दूर्वा, अक्षत, पवित्रक अर्पून मूलमंत्राचा जप एकशे आठ वेळा करावा. त्यानंतर त्यांना प्रार्थना करावी. 'प्रभो, गुह्यातील गुह्य वस्तूचं

आपण रक्षण करता. आपण माझा हा जप ग्रहण करावा. आपल्या कृपेनं मला सिद्धी प्राप्त होईल.'

गुह्यातिगुह्यगोप्ता त्वं गृहाणास्मत्कृतं जपम् ।
सिद्धिर्भवतु मे येन त्वत्प्रसादात् त्वयि स्थिते ।।

(७४-७८½)

भोगाची इच्छा करणाऱ्या पुरुषाने वरील श्लोक म्हणून मूल-मंत्राचा उच्चार करून भगवानांच्या वरद हातावर अर्घ्य देऊन म्हणावे, 'देवा, शंकरा, आम्ही आपल्या चरणांना शरण आलो आहोत. आम्ही शुभाशुभकर्म करीत असतो. त्यांना सर्वांना आपण नष्ट करावं. हूं क्षः शिव दाता आहे. शिवच भोक्ता आहे. शिवच हे सर्व जगत आहे. शिवाचा सर्वत्र जय असावा. जो शिव आहे तोच मी आहे.

यत्किंचितुर्महे देव सदा सुकृतदुष्कृतम् ।
तन्मे शिवपदस्थस्य हूं क्षः क्षेपय शंकर ।।
शिवो दाता शिवो भोक्ता शिवः सर्वमिदं जगत् ।
शिवो जयति सर्वत्र यः शिवः सोऽहमेव च ।।

(७४.८०-८२)

असा जप करून आराध्यदेवास सर्वस्व अर्पण करावे. अर्घ्य देऊन भगवानांची स्तुती करावी. शेवटी अष्टमूर्तिधारी आराध्यदेव शिवांना प्रदक्षिणा करून त्यांना साष्टांग नमस्कार घालावा.

## चंडाचा पूजाविधी

पंचाहत्तराव्या अध्यायात शिवपूजेच्या अंगभूत होमाचा विधी वर्णन केला आहे. त्यानंतर शहात्तराव्या अध्यायात चंडाच्या पूजेचा विधी सांगितला आहे. सर्व पूजा पूर्ण झाल्यावर साधकाने शिवांना प्रार्थना करावी. म्हणावे, 'भगवन्, मी केलेला पूजाविधी, होम आदी कार्य संपन्न झालेले आहे. या सर्व पुण्यकर्मांचं फलही आपणच ग्रहण करावं.' असे म्हणन स्थिरचित्ताने 'उद्भव' मुद्रा करून, अर्घ्यंजलाने

नमः' सहित मूलमंत्र म्हणून इष्टदेवास अर्घ्य द्यावा. प्रणाम करून म्हणावे, 'प्रभो, माझ्या अपराधांची क्षमा करावी.' नाराचमुद्रा करून 'अस्त्राय फट्' चा उच्चार करून शिवलिंगास मूर्तीसंबंधी मंत्र म्हणून अभिमंत्रित करावे. त्यानंतर पूर्वोक्त विधीनेच चंडाचे पूजन करावे.

'ॐ चंडेशानाय नमः' म्हणून चंडदेवतेस नमस्कार करावा. मंडलाच्या मध्यभागी 'ॐ चंडमूर्तये नमः' म्हणून चंडाची पूजा करावी. त्या मूर्तीला 'ॐ धूलिचंडेश्वराय हूं फट् स्वाहा' म्हणून चंडेश्वरास आवाहन करावे. त्यानंतर त्याची अंगपूजा करावी. 'ॐ चंडहृदयाय हूं फट्' म्हणून हृदयाची, 'ॐ चंडशिरसे हूं फट्' म्हणून शिराची, 'ॐ चंडशिखायै हूं फट्' म्हणून शिखेची, 'ॐ चंडायुष्कवचाय हूं फट्' म्हणून कवचाची आणि 'ॐ चंडास्त्राय हूं फट्' म्हणून अस्त्राची पूजा करावी. त्यानंतर रुद्राग्नीपासून उत्पन्न झालेल्या चंडदेवाची अशी ध्यान-पूर्वक प्रार्थना करावी.

चंडदेव आपल्या हातांत शूल व टंक धारण करतात. त्यांचा रंग सावळा आहे. त्यांच्या तिसऱ्या हातात अक्षसूत्र व चौथ्यात कमंडलू आहे. ते टंकाकृती व अर्धचंद्रकार मंडलात स्थित आहेत. त्यांना चार मुखे आहेत. असे ध्यान करून त्यांची यथाशक्ति पूजा करावी. जप करावा. दशांश होम करावा. गाय, भूमी, सुवर्ण, वस्त्र, मणिसुवर्ण, आदी सोडून शेष सारा निर्माल्य चंडेश्वरास अर्पण करावा. म्हणावे, 'चंडेश्वरा, भगवान शिवांच्या आज्ञेनं हे लेह्य, चोष्य अन्न, तांबल, पुष्पमाला, अनुलेपन आदी निर्माल्यरूप भोजन तुम्हांस समर्पित असो. चंडदेवा, हे सर्व पूजायुक्त कर्मकांड मी तुमच्याच आज्ञेनं केले आहे. मोहवश जीवात न्यूनता निर्माण झाली असेल, ती पूर्ण व्हावी. न्यूनातिरिक्ततेचा दोष संपावा.'

असे म्हणून त्या देवेश्वराचे स्मरण करावे. त्यास अर्घ्य द्यावा. संहारमूर्तीचा मंत्र म्हणून संहारमुद्रा धारण करून, प्राणायामपूर्वक मूल-मंत्राचा उच्चार करून उपसंहार करावा. निर्माल्य जेथून काढले त्या जागेस गायीच्या शेणानें सारवावे. तेथे दीप लावावा. अर्घ्यादी प्रोक्षण करून देवाचे विसर्जन करावे.

## कपिला गाय, चूल, चक्की, उखळी, मुसळ, केरसुणी इत्यादींचा पूजाविधी

त्यानंतर सत्याहत्तराव्या अध्यायात भगवान महेश्वरांनी स्कंदास कपिला गायीच्या पूजनाचा विधी सांगितला. गोमातेचे पूजन पुढील मंत्रांनी करावे. 'ॐ कपिले नन्दे नमः । ॐ कपिले भद्रिके नमः । ॐ कपिले सुशीले नमः । ॐ कपिले सुरभिप्रभे नमः । ॐ कपिले सुमनसे नमः । ॐ कपिले भुक्तिमुक्तिप्रदे नमः' यानंतर गोमातेस प्रार्थना करावी, 'देवांना अमृत देणाऱ्या वरदायिनी, जगन्माते, सौरभेयी, तू हा ग्रास ग्रहण कर. मला मनोवांच्छित वस्तू दे. कपिले, महर्षी वसिष्ठ व बुद्धिमान विश्वामित्र यांनीही तुला वंदन केलं होतं. माझ्या हातून जे दुष्कर्म झालं असेल, त्या पापातून तू माझी मुक्तता कर. गायी सदा माझ्या पुढे असाव्यात, मागे असाव्यात, गायींनी माझ्या हृदयात निवास करावा. मी सदा गायींच्याबरोबर निवास करावा. गोमाते, माझ्यासाठी तू हा ग्रास ग्रहण करावास.'

अशी प्रार्थना करणारा मनुष्य पापरहित बनून शिवस्वरूप होतो. विद्येचा अभ्यास करणाऱ्या पुरुषानें प्रतिदिन विद्याग्रंथांचे पूजन करावे. गुरुचरणांना नमस्कार करावा. गृहस्थानें नित्य मध्यान्हकाली स्नान करून आठ पुष्पांनी भगवान शिवांचे पूजन करावे. शिवांचे जानू, पाय, हात, उर, शिर, वाक्, दृष्टी, बुद्धी या आठ अंगांच्या पूजेस 'अष्टपुष्पिका-पूजा' म्हणतात. मध्यान्हकाली सुंदर रीतीने सारवलेल्या स्वयंपाक-गृहातून शिजवलेले अन्न आणावे. आणि

त्र्यंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनम् ।
उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय माऽमृतात् ।। वैषट् ।।

(शुक्ल यजुर्वेद ३.६०)

अशा प्रकारे 'वौषट्' पदानें युक्त असा मृत्युंजयमंत्र सात वेळा जपावा. कुशयुक्त जलाच्या बिंदूंनीं त्या अन्नास प्रोक्षित करावे. भगवानांना सर्व अन्न निवेदन करावे.

त्यानंतर अर्धे अन्न चुल्लिकाहोमासाठी ठेवावे. विधिपूर्वक चुलीची शुद्धी करावी. तिच्या आगीत प्राणायामपूर्वक एक आहुती द्यावी. नंतर नाभिगत अग्नीस-जठरानलास उद्देशून एक आहुती द्यावी व प्राणायाम-पूर्वक बाहेर येणाऱ्या वायूच्यासह अग्नीबीज (रं) पासून क्रमशः 'क' आदी अक्षरांचा उच्चार करून कंठादी मार्गाच्या बाहेर 'तू शिवस्वरूप अग्नी आहेस' असे चिंतन करून चुलीची पूजा करावी. पूर्वादी दिशांना 'ॐ ह्रां अग्नये नमः । ॐ ह्रां सोमाय नमः । ॐ ह्रां सूर्याय नमः । ॐ ह्रां बृहस्पतये नमः । ॐ ह्रां प्रजापतये नमः । ॐ ह्रां सर्वेभ्यो देवेभ्यो नमः । ॐ ह्रां सर्वविश्वेभ्यो नमः । ॐ ह्रां अग्नये स्विष्टकृते नमः' या आठ मंत्रांनी अग्नीआदी आठ देवांची पूजा करावी. या मंत्रांच्या अंती 'स्वाहा' पद जोडून एक एक आहुती द्यावी. अपराधाची क्षमा मागून पूजा विसर्जित करावी.

चुलीच्या उजव्या भागास 'धर्माय नमः' या मंत्राने धर्माची व डाव्या भागास 'अधर्माय नमः' या मंत्राने अधर्माची पूजा करावी. स्वयंपाकाच्या भांड्यांत कांजी आदी घालून 'रसपरिवर्तमानाय वरुणाय नमः' या मंत्राने वरुणाची पूजा करावी. स्वयंपाकगृहाच्या दारावर 'विघ्नराजाय नमः' म्हणून विघ्नराजाची व 'सुभगाय नमः' म्हणून चक्कीची, जात्याची पूजा करावी.

उखळीची 'ॐ रौद्रिके गिरिके नमः' या मंत्राने रौद्रिका व गिरिका समजून पूजा करावी. मुसळाची पूजा 'बलप्रियायायुधाय नमः' या मंत्राने त्याला बलभद्राचे आयुध समजून करावी. केरसुणीतही या दोन देवता (रौद्रिका व गिरिका) असतात. शय्येवर कामदेवाची व मधल्या खांबाजवळ स्कंदाची पूजा करावी. त्यानंतर व्रतसाधकाने वास्तुदेवतेस बली देऊन सोन्याच्या थाळीत वा पत्रावळीवर मौनभावाने भोजन करावे. भोजनपात्रासाठी वड, पिंपळ, मंदार, साखु इत्यादींच्या पानांचा उपयोग करू नये. प्रथम अन्नाच्या पांच आहुत्या द्याव्यात. जठराग्नीस उद्दीप्त करून भोजन करावे. नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय, या पांच उप-वायूंना आहुत्या द्याव्यात. 'एतेभ्यो नागादिभ्य उपवायुभ्यः स्वाहा' या मंत्राने आचमन करून भात आदी भोजन निवेदन करावे. पुन्हा आचमन

करून म्हणावे, 'ॐ अमृतोपस्तरणमसि स्वाहा ' यानंतर पांच प्राणांना आहुती देताना म्हणावे, १) ॐ प्राणाय स्वाहा, २) ॐ अपानाय स्वाहा, ३) ॐ व्यानाय स्वाहा, ४) ॐ समानाय स्वाहा, ५) ॐ उदानाय स्वाहा. यानंतर भोजन करून पुन्हा नंतर पाणी हातात घेऊन 'ॐ अमृतापिधानमसि स्वाहा ' हा मंत्र म्हणून आचमन करावे. अन्नपचनासाठी हा मंत्र आहे.

## पवित्राधिवासन, पवित्रारोपण

यानंतर अठ्ठयाहत्तराव्या व एकोणऐंशिव्या अध्यायांत पवित्राधिवासनविधी व पवित्रारोहणाचा विधी असतो. आषाढ मासाच्या आदिचतुर्दशीस व श्रावण व भाद्रपदाच्या शुक्ल व कृष्ण चतुर्दशीस वा अष्टमीस पवित्रारोहण वा पवित्रारोपण करतात. आषाढमासाच्या पौर्णिमेपासून कार्तिकमासाच्या पौर्णिमेपर्यंत प्रतिपदा आदी तिथींना भिन्नभिन्न देवतांसाठी पवित्रारोहण करावे. प्रतिपदेस अग्नीसाठी, द्वितीयेस ब्रह्मदेवांसाठी, तृतीयेस पार्वतीसाठी, चतुर्थीस गणेशासाठी, पंचमीस नागराजासाठी, षष्ठीस स्कंदासाठी, सप्तमीस सूर्यासाठी, अष्टमीस शूलपाणीसाठी, नवमीस दुर्गेसाठी, दशमीस यमराजासाठी, एकादशीस द्रासाठी, द्वादशीस भगवान गोविंदासाठी, त्रयोदशीस कामदेवासाठी, चतुर्दशीस शिवासाठी, पौर्णिमेस अमृतभोजी देवांसाठी पवित्रारोपण विधी करावा.

सत्ययुगादी तीन युगांत क्रमशः सोनें, चांदी, तांबे यांचे पवित्रक अर्पण केले जात असे. परंतु कलियुगात, सूत, रेशीम, कमलाचा धागा यांचे पवित्रक करतात. प्रणव, चंद्रमा, अग्नी, ब्रह्मा, नागगण, स्कंद, श्रीहरी, सर्वेश्वर व सर्व देव हे क्रमशः पवित्रकाच्या नऊ तंतूंच्या देवता आहेत. उच्च श्रेणीचे पवित्रक एकशे आठ सूत्रांचे बनविलेले असते. मध्यम श्रेणीचे चोपन व निम्न श्रेणीचे सत्तावीस सूत्रांचे असते. अथवा एक्याऐंशी, पन्नास वा अडतीस सूत्रांचेही पवित्रक बनते. यांशिवाय सर्व देवांना उपयोगी पडणारे एक चौथे पवित्रकही आहे. ते पिंडी वा मूर्तीच्या बरोबर असते. अशा पवित्रकास 'गंगावतारक' म्हणतात. याला 'सद्योजात' मंत्रानें नीट घुतले पाहिजे. याला 'वामदेव' मंत्राने ग्रंथी

बांधाव्यात. 'अघोर'मंत्राने याची शुद्धी करावी. 'तत्पुरुष'मंत्राने रक्तचंदनाने याला रंगवावे. कस्तुरी, गोरोचना, कापूर, हळद, गेरू इत्यादी रंगांनी पवित्रक रंगवावे. साधारणतः पवित्रकास दहा गाठी असाव्यात. प्रकृती, (क्रिया) पौरुषी, वीरा, अपराजिता, जया, विजया, अजिता, सदाशिवा, मनोन्मनी, सर्वतोमुखी, या दहा गाठींच्या देवता आहेत, पवित्रकास चंद्रमंडल, अग्निमंडल, सूर्यमंडल यांनी युक्त असल्याची भावना करावी. त्याला साक्षात शिव मानून हृदयात धारण करावे. त्याच्या दिव्य रूपाचे चिंतन करावे.

याप्रकारे द्वारपाल, दिक्पाल, कलश आदींवरही एक एक पवित्रक चढवावे. शिवलिंगासाठी एका हातापासून नऊ हातांपर्यंत पवित्रक असावे. एका हाताच्या पवित्रकास अठ्ठावीस गाठी असतात. नंतर क्रमशः दहा दहा गाठी वाढतात. नऊ हातांच्या पवित्रकास या प्रकारे एकशेआठ गाठी असतात. या ग्रंथी दोन दोन अंगुलांच्या अंतरावर असाव्यात. ज्या दिवशी पवित्रक धारण करायचे, त्या दिवशी उपासकाने नित्यकर्म करून, पवित्र होऊन, सायंकाळी पुष्प व वस्त्र यांनी युक्त होऊन यागमंदिरात, पूजामंडपात जावे. संध्योपासना, तर्पणकर्म, सूर्यपूजा करावी. 'हां शान्तिकलाद्वाराय नमः', 'हां विद्याकलाद्वाराय नमः', 'हां निवृत्तिकलाद्वाराय नमः', 'हां प्रतिष्ठाकलाद्वाराय नमः' या मंत्रांनी पूर्वादी चारही दिशांची द्वारे पूजावीत. दारांवर दोन दोन द्वारपाल ठेवावेत. त्यांची पूजा करावी. पूर्वेस 'नन्दिने नमः', 'महाकालाय नमः' या मंत्रांनी नंदी व महाकाल यांची, दक्षिणेस 'भृङ्गिणे नमः', 'गणाय नमः' या मंत्रानी भृंगी व गणाची, पश्चिमेस 'वृषभाय नमः', 'स्कन्दाय नमः' या मंत्रांनी नंदिकेश्वर वृषभ व स्कंद यांची व उत्तरेस 'दैव्यै नमः', 'चण्डाय नमः' या मंत्रांनी चंडद्वारपालाची क्रमाने पूजा करावी.

यागमंदिरात प्रवेश केल्यावर वास्तुदेवतेची पूजा करून भूतशुद्धी करावी. पूजासामग्रीस प्रोक्षित करावे. यज्ञभूमीवर संस्कार करावा. कुश, दूर्वा, फुले हातात घेऊन 'नमः' आदी उच्चार करून त्यास अभिमन्त्रित

करावे. 'मी सर्वांचं आदिकरण सर्वज्ञ शिव आहे. यज्ञ माझी प्रधानता आहे' अशा भावनेने भगवान शिवांचे ध्यान करावे. यज्ञमंडपात सर्वत्र पंचगव्य शिंपडावे. ईशानकोणात वर्धनी व कलश यांच्या स्थापनेसाठी आसन तयार करावे. नैर्ऋत्यकोणात वास्तुदेव व द्वारावर लक्ष्मी यांची पूजा करावी. पश्चिमाभिमुख कलश सप्तधान्यांवर स्थापित करून प्रणवाचा उच्चार करावा व भावना धरावी की, हा शिवरूप कलश नंदिकेश्वर वृषभाच्या वर आरूढ आहे. वर्धनी सिंहावर आहे. कलशावरील भगवान शिवांची व वर्धनीवरील अस्त्राची पूजा करावी. दिक्पालांची व ब्रह्मा-विष्णूंचीही पूजा करावी.

असा विधी सविस्तर या अध्यायात सांगितला आहे. 'ॐ अग्नये स्वाहा । ॐ सोमाय स्वाहा । ॐ अग्निष्टोमाभ्यां स्वाहा । ॐ अग्नये स्विष्टकृते स्वाहा' या तीन मंत्रांच्या आहुत्या सांगितल्या आहेत. अग्निकुंडात आराध्यदेवांची, शिवाची पूजा, कलशस्थ शिवांची पूजा आहे. 'शान्तिकलात्मने नमः । विद्याकलात्मने नमः । निवृत्तिकलात्मने नमः । प्रतिष्ठाकलात्मने नमः । शान्त्यतीतकलात्मने नमः' या कलामंत्रांनी पवित्रकांना अभिमंत्रित करावे. प्रणवमंत्र व मूलमंत्र यांनी षड्न्यास करून 'नमः', 'हुं', 'फट्' यांचे उच्चार करून क्रमशः हृदय, कवच, अस्त्र यांची योजना करावी. त्यानंतर पवित्रकांना सूत्रांनी आवेष्टित करून 'नमः', 'स्वाहा', 'वषट्', 'हुं', 'वौषट्' व 'फट्' या अंगमंत्रांनी त्यांचे पूजन करावे. त्यांना भक्तिभावाने जगदीश्वरांना समर्पित करावे. पुष्प, दीप यांनी पूजा झाल्यावर गुरूस भक्तिपूर्वक पवित्रक द्यावे. नंतर आचमन करून रात्री संगीताची व्यवस्था करावी. शंकरांचे स्मरण करून चटईवर झोपावे.

पुढल्या अध्यायात पवित्रारोपणाच्या विधीचा सविस्तर परिचय करून दिला आहे. स्नानसंध्या, यज्ञमंडपात प्रवेश, देवेश्वर शिवांचे विसर्जन, सूर्य, दिक्पाल, कलश, ईशान, शिव यांचे पूजन, मंत्रतर्पण, प्रायश्चित्तहोम; इत्यादी विधी सांगितला आहे. सूर्यदेव, द्वारपाल, दिक्पाल, कलश, वर्धनी इत्यादींना पवित्रक अर्पण करावे. शिवांच्या समोर बसून आत्मा, गुरू, गण, अग्नी यांना पवित्रक अर्पण करावे, 'ॐ

पूरय पूरय मखव्रतं नियमेश्वराय स्वाहा ' या मंत्राचा उच्चार करावा. ' ॐ पद्मयोनि पालितात्मतत्त्वेश्वराय प्रकृतिलयाय ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा उच्चार करून पवित्रकाने भगवान शिवांची पूजा करावी. ' विष्णुकारणपालितविद्यातत्त्वेश्वराय ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा उच्चार करून पवित्रक चढवावे. ' रुद्रकारणपालितशिवतत्त्वेश्वराय शिवाय ॐ नमः शिवाय ' या मंत्राने भगवान शिवांना पवित्रक द्यावे. ' सर्वकारणपालाय शिवाय लयाय ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा उच्चार करून भगवान शिवांना ' गंगावतारक ' नावाचे सूत्र अर्पण करावे.

मुमुक्षू पुरुषाने आत्मतत्त्व, विद्यातत्त्व, शिवतत्त्व यांसाठी मंत्रोच्चार करून पवित्रक अर्पण करावे. भोगाभिलाषी पुरुषाने क्रमशः शिवतत्त्व, विद्यातत्त्व, आत्मतत्त्व यांचे अधिपती शिवांना मंत्रपूर्वक पवित्रक अर्पण करावे. मुमुक्षु पुरुषाने मंत्राच्या शेवटी स्वाहा म्हणावे. भोगाभिलाषी पुरुषाने नमः म्हणावे. ' स्वाहान्त ' मंत्राचे स्वरूप असे आहे. ' ॐ हां आत्मतत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां विद्यातत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां शिवतत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां सर्वतत्त्वाधि-पतये शिवाय स्वाहा ' गंगावतरक अर्पण केल्यावर शिवांना हात जोडून प्रार्थना करावी. जप, स्तुती, नमस्कार, नियमग्रहण, क्षमाप्रार्थना, प्रायश्चित्तहोम, पूर्णाहुती, व्याहृतिहोम; इत्यादी विधी करावेत. ' ॐ हां भूः स्वाहा । ॐ हां भुवः स्वाहा । ॐ हां स्वः स्वाहा । ॐ हां भूर्भुवः स्वः स्वाहा ' हे व्याहृतिहोमाचे मंत्र आहेत. ' ॐ हां अग्नये स्वाहा । ॐ हां सोमाय स्वाहा । ॐ अग्निष्टोमाभ्यां स्वाहा । ॐ हां अग्नये स्विष्टकृते स्वाहा ' या आहुतिमंत्रांनी अग्निदेवास संतुष्ट करावे. गुरुची वस्त्र-भूषणांनी पूजा करावी.

त्यानंतर अस्त्रमंत्राने प्रायश्चित्तहोम करून पूर्णाहुती द्यावी. भगवान शिवांना आपले सर्व समर्पित करावे. अणुसमूहाचा हृदयात न्यास करून अग्निदेवाचे विसर्जन करावे. भगवान शिवांची प्रार्थना करावी. लोकपालादिकांचे विसर्जन करावे. पवित्रक घेऊन ते चंडकेश्वरास त्याची पूजा करून समर्पित करावे. शिवनिर्माल्यही त्यालाच समर्पित करावे. चंडेश्वराची प्रार्थना करावी. देवेश्वर चंडाचेही विसर्जन करून निर्माल्य

टाकून द्यावे. शुद्धभावनेने शिवांना स्नान घालून त्यांची पूजा करावी.

## दमनकारोपणाचा विधी

ऐंशीव्या अध्यायात महेश्वरांनी स्कंदास दमनकारोहणविधीचे वर्णन केले आहे. प्राचीन काली भगवान शिवांच्या कोपाने भैरवाची निर्मिती झाली. भैरवाने देवतांचे दमन सुरू केले. हे पाहून त्रिपुरारी शिव रुष्ट झाले व त्यांनी भैरवास शाप दिला, 'तू वृक्ष हो.' भैरवाने क्षमा मागितली, तेव्हा शिव म्हणाले, 'जो मनुष्य तुझ्या पानांनी पूजा करील त्याला मनोवांच्छित फलं प्राप्त होतील.' सप्तमी वा त्रयोदशीस पुरुषाने संहितामंत्रांनी दमनकवृक्षाची पूजा करावी, भगवान शिवांच्या वाक्याचे स्मरण देऊन म्हणावे,

हरप्रसादसम्भूत त्वमत्र संनिधीभव
शिवकार्यं समुद्दिश्य नेतव्योऽसि शिवाज्ञया ।।

'दमनका, तू भगवान शिवांच्या कृपाप्रसादानं प्रकट झाला आहेस. तू इथं संनिहित हो. भगवान शिवांच्या आज्ञेनं त्यांच्या कार्यासाठी मला तुझी साथ आवश्यक आहे.' घरी त्या वृक्षास अभिमंत्रित करावे. सायंकाळी अधिवासनकर्म करावे. विधिपूर्वक सूर्य, शंकर व अग्नी यांची पूजा करावी. इष्टदेवतेच्या पश्चिमभागी त्या वृक्षाची स्थापना करावी. वामदेवमंत्र वा शिरोमंत्रांनी पूजा करावी. दमनकास अंजलीत घेऊन म्हणावे, 'ॐ हां आत्मतत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां विद्यातत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां शिवतत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा । ॐ हां सर्वतत्त्वाधिपतये शिवाय स्वाहा ' या चार मंत्रांनी दमनक शिवांना वाहून पूजा करावी. चौथी अंजली देऊन म्हणावे, 'ॐ हौं महेश्वराय मखं पूरय पूरय शूलपाणये नमः ।'

अशी शिव व अग्नी यांची पूजा झाल्यावर गुरूचे पूजन करून प्रार्थना करावी, 'भगवन्, माझ्या दमनकद्वारे पूजेत जी न्यूनता वा अधिकता असेल ती सर्व आपल्या कृपेनं परिपूर्ण व्हावी.' असे हे दमनकारोहणकर्म संपादन करून मनुष्याने चैत्रमासजनित संपूर्ण फलाची प्राप्ती

करून अंती स्वर्गास जावे.

## समयाचारदीक्षेचा विधी

एक्यांशिव्या अध्यायात महेश्वरांनी स्कंदास भोग व मोक्ष देणारा व सर्व पापांना नष्ट करणारा एक विधी सांगितला आहे. ज्यामुळे शिष्यास ज्ञानाची प्राप्ती होते. त्यास 'दीक्षा' म्हणतात. ही भोग व मोक्ष देणारी असते. पशू (पाशबद्ध जीव) शुद्ध विधीच्या द्वारे अनुग्राह्य बनतो. हा पशू तीन प्रकारचा असतो. पहिला विज्ञानाकल, दुसरा प्रलयाकल व तिसरा सकल.

विज्ञानाकल पशू केवळ मलरूप पाशाने युक्त असतो. दुसरा प्रलयाकल पशू मल व कर्म या पाशांनी आबद्ध असतो. तिसरा सकल पशू कला आदीपासून भूमीपर्यंत सर्वतत्त्व समूहांनी बद्ध असतो.

या पाशांतून मुक्त होण्यासाठी जीवास आचार्यांकडून मंत्राराधनेची दीक्षा घ्यावी लागते. ही दीक्षा दोन प्रकारची आहे. एक 'निराधारा' व दुसरी 'साधारा.' विज्ञानाकल व प्रलयाकल पशूंना निराधारा दीक्षा सांगितली असून सकल पशूंसाठी साधारा दीक्षा आहे. आचार्यांची अपेक्षा न करता शंभुद्वारे शक्तिपात करून जी दीक्षा दिली जाते तीसही 'निराधारा' म्हटले जाते. आचार्यांच्या शरीरात स्थिर होऊन भगवान शंकर आपल्या मंदा, तीव्रा इत्यादी शक्तींनी जी दीक्षा देतात तिला 'साधारा' म्हणतात. ही साधारा दीक्षा सबोजा, निर्बीजा, साधिकारा, अनधिकारा; अशा चार भेदांनी युक्त असते.

समर्थ पुरुषास समयाचाराने युक्त अशी जी दीक्षा दिली जाते तीस 'सबींजा' म्हणतात. असमर्थ पुरुषास दिली जाणारी समयाचारशून्य दीक्षा 'निर्बीजा' म्हणून ओळखली जाते. ज्या दीक्षेने साधक व आचार्य यांना नित्यनैमित्तिक काम्य कर्मांत अधिकार प्राप्त होतात ती 'साधिकारा दीक्षा' असते. 'निर्बीजा दीक्षे'त दीक्षित होणाऱ्या लोकांना व समयाचारादी दीक्षेत दीक्षित होणाऱ्यांना नित्यकर्ममात्राचे अधिकारी होण्यामुळे जी दीक्षा दिली जाते तीस 'निराधिकारा दीक्षा' म्हणतात. साधारा व निराधारा या दीक्षांचे प्रत्येकी दोन भेद आहेत. एक क्रिया-

वती दीक्षा. या विधीत कुंड व मंडल यांची स्थापना व पूजा असते. दुसरी ज्ञानवती दीक्षा. ही मानसिक व्यापाराने साध्य होते.

असे हे अधिकारप्राप्त आचार्यद्वारे संपादन झालेले दीक्षा-कर्म होय. गुरूने नित्यकर्माचे विधिवत अनुष्ठान करून शिष्यास दीक्षा द्यावी. प्रणवाचा जप करून गुरूने आपल्या करकमलात अर्घ्यजल घेऊन द्वार-पालांची पूजा करावी. विघ्नांचे निवारण करून द्वारदेहलीवर अस्त्रन्यास करून आसनावर बसावे. भूतशुद्धी विधीनुसार करावी. तिळ, तांदूळ, सरस, कुश, दूर्वांकुर, जव, दूध, जल यांचा विशेष अर्घ्य तयार करावा. या जलाने सर्व पूजाद्रव्य शुद्ध करावे. पूजन, मंत्रशोधन, पंचगव्य प्राशन करावे. लाह्या, चंदन, सारस, भस्म, दूर्वा, अक्षत, कुश व पुन्हा शुद्ध लाह्या या सर्व वस्तू ' विकिर ', पसरून टाकता येण्यासारख्या आहेत. या सर्व वस्तू एकत्रित करून सात वेळा अस्त्रमंत्राने अभिमंत्रित कराव्यात. मंत्रद्वारे अभिमंत्रित करून त्यांचे प्रक्षेपण करावे. कवचमंत्राने अवगुंठित करावे. विघ्नसमूहांचा नाश करणारी ही शस्त्रे, अस्त्रे आहेत, अशी भावना दृढ धरावी.

त्यानंतर प्रादेशमात्र लांब कुशाचे बत्तीस दलांनी वेणीरूप बोधमय उत्तम खड्ग बनवून त्याला सात वेळा शिवमंत्राने अभिमंत्रित करावे. त्याला शिवस्वरूप मानून आपल्या हृदयात स्थापित करावे. जगदाधार शिवांचे ध्यान व चिंतन करावे. ' मी साक्षात शिव आहे ' अशी भावना करून शिरावर मूलमंत्राने अभिमंत्रित करून भूषण धारण करावे व आपल्या शरीरास गंध, पुष्प यांनी अलंकृत करावे. त्यानंतर गुरूने आपल्या उजव्या हातावर सुगंधी द्रव्य वा कुंकू याने मंडल तयार करावे. विधियुक्त शिवांची पूजा करावी. यामुळे हा हात ' शिवहस्त ' होतो. हा हात आपल्या मस्तकावर ठेवून ' मी शिवांहून अभिन्न व सर्वांचा कर्ता साक्षात परमात्मा शिव आहे,' अशी भावना करावी. तेव्हा तो यज्ञ-मंडपात कर्मांचा साक्षी, कलशात यज्ञाचा रक्षक, अग्नीत होमाचे अधिष्ठान, शिष्यात अज्ञानमय पाशाचा उच्छेद करणारा व अंतरात्म्यात अनुग्रहीत; या प्रकारे अभिव्यक्त होऊत ईश्वररूप होतो. या प्रकारे गुरु साक्षात परमात्माच होतो.

त्यानंतर ज्ञानरूपी खड्ग हातात घेऊन गुरु यज्ञमंडपात नैर्ऋत्य-कोणात उत्तराभिमुख होऊन स्थित होतो. अर्घ्य, जळ, पंचगव्य यांनी भूमी प्रोक्षित करतो. विकरणीय द्रव्यांनी भूमी पवित्र करतो. ईशानकोणात स्थापित वार्धानी (जलपात्र)त त्यांना स्थान देतो. नैर्ऋत्यकोणात वास्तु-देवतांचे व पश्चिमेस लक्ष्मीचे पूजन करावे. या वेळी अशी भावना असावी की, ही मंडपरूपिणी लक्ष्मी रत्नभांडाराने यज्ञमंडपास परिपूर्ण करीत आहे. असे ध्यान करून, आवाहन करून ' नमः ' व 'लक्ष्म्यै नमः ' या मंत्रांनी तिची पूजा करावी. ईशान्यकोणातील सप्तधान्यांवर स्थापन केलेल्या वस्त्रवेष्टित पंचरत्नयुक्त व जलपूर्ण पश्चिमाभिमुख कलशावर भगवान शंकरांचे पूजन करावे. त्यानंतर दक्षिणभागी सिंहा-सनावर विराजमान झालेल्या, पश्चिमाभिमुखी शक्ती खड्गरूपिणी वार्धानीचे पूजन करावे.

त्यानंतर इंद्रादी दिक्पाल, भगवान विष्णू यांचे पूजन करावे. ' इंद्राय नमः ', ' विष्णवे नमः ' म्हणून त्यांची प्रार्थना करावी. त्यानंतर पूर्वोक्त वार्धानीस हातात घेऊन प्रदक्षिणा करून अविच्छिन्न धारा पडेल असे करावे. मूलमंत्राचा उच्चार करावा. लोकपालक व शिव यांची प्रार्थना करावी. कलशावर त्या वार्धानीची स्थापना करावी. त्यानंतर सुस्थिर आसनावरील भगवान शंकरांची सांग पूजा करावी. वार्धानी-मधील अस्त्रांची पूजा करावी. या पूजेचे मंत्र असे आहेत. ' ॐ हः अस्त्रासनाय हूं फट् नमः । ॐ ॐ अस्त्रमूर्तये हूं फट् नमः । ॐ हूं फट् पाशुपतास्त्राय नमः । ॐ ॐ हृदयाय हूं फट् नमः ', ' ॐ श्रीं शिरसे हूं फट् नमः । ॐ यं शिखायै हूं फट् नमः । ॐ शुं कवचाय हूं फट् नमः । ॐ हूं फट् अस्त्राय हूं फट् नमः '

यानंतर पाशुपतास्त्राचे स्वरूपचिंतन करावे. त्याला चार मुखे आहेत. प्रत्येक मुखात दाढा आहेत. त्याच्या हातांत शक्ती, मुद्गर, खड्ग व त्रिशूल आहे. त्याची प्रभा कोटयवधी सूर्यांसारखी आहे. असे ध्यान करून लिंगमुद्रा करावी. भर्गलिंगाशी समायोग करावा. हृदयमंत्राचा (नमः) उच्चार करून अंगठयाने कलशास स्पर्श करावा. मुठीने खड्-रूपिणी वार्धानीस स्पर्श करावा. यामुळे भोग व मोक्ष यांची प्राप्ती होते.

कलशाच्या मुखभागाचे रक्षण व्हावे म्हणून याच्यावर पूर्वोक्त ज्ञानखड्ग अर्पण करावे. मूलमंत्राचा एकशे आठ वेळा जप करावा. तो कलशास निवेदन करावा. त्याचा दशांश जप वार्धानीस अर्पण करावा. नंतर भगवान शिवांची रक्षणासाठी प्रार्थना करावी. 'संपूर्ण यज्ञाचं रक्षण करणाऱ्या भगवान जगन्नाथा, मी मोठ्या प्रयत्नानं हे यज्ञमंदिर तयार केलं आहे. आपण याचं रक्षण करावं.'

यानंतर वायव्यकोणात प्रणवमय आसनावर विराजमान होऊन चार भुजाधारी गणेशांचे पूजन करावे. वेदीवर शिवांची पूजा करून अर्घ्य हातात घेऊन साधकाने यज्ञकुंडापाशी जावे. तेथे बसून मंत्रदेवतेच्या तृप्तीसाठी डाव्या भागास अर्घ्य, गंध, घृत इत्यादी वस्तू व उजव्या भागात समिधा, कुश, तिल आदी ठेवून, कुंड, अग्नी, स्रुक् घृत आदींचा संस्कार करून हृदयात ऊर्ध्वमुख अग्नीचे चिंतन करावे. अग्नीत भगवान शिवांचे पूजन करावे. अग्निजिव्हांची नावे घेऊन आहुत्या द्याव्यात. अग्नीच्या सात जिभांची सात बीजे आहेत. या सात बीजांचे मंत्र य्रूं, ल्रूं, व्रूं, श्रँ्, ष्रुं, स्रं्, ह्रूं असे आहेत. हिरण्या, कनका, रक्ता, कृष्णा, सुप्रभा, अतिरिक्ता, व बहुरूपा; अशी या सात जिभांची नावे आहेत. ईशान, पूर्व, अग्नी, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य, मध्यदिशा, यांकडे त्यांची क्रमशः मुखे आहेत.

शांतिक व पौष्टिक कर्मांत खीर आदी मधुर पदार्थांनी होम करावा. अभिचारकर्मात सरसाची साल, सातू, जवाची कांजी, मीठ, राई, मठ्ठा, कडूतेल, काटयांच्या समिधा इत्यादींचे हवन क्रोधपूर्वक भाष्यमंत्रांनी करावे. कदंबाच्या कळयांनी होम केल्यास निश्चयाने यक्षिणी सिद्ध होते. वशीकरण व आकर्षणसिद्धीसाठी बंधूक (सुपारी) व पलाश यांच्या पुष्पांनी हवन करावे. राज्यलाभासाठी बिल्वफल व लक्ष्मीच्या प्राप्तीसाठी पाटल व चाफा या फुलांचा होम करावा. चक्रवर्ती सम्राटपदासाठी कमलांचा व संपत्तीसाठी भक्ष्य-भोज्य पदार्थांचा होम करावा. दूर्वांचे हवन केल्यास सर्व व्याधी दूर होतील. सर्व जीवांना वश करण्यासाठी प्रियंगू व कदली यांच्या पुष्पांचे हवन करावे. आंब्यांच्या पानांचा होम ज्वराचा नाश करतो.

मृत्युंजयदेवाच्या मंत्राचा उपासक मृत्यूवर विजय मिळवितो. तिळाचा होम करणारा मनुष्य अभ्युदयास प्राप्त होतो. रुद्रशांती सर्व दोषांना दूर करते. एकशेआठ आहुत्यांनी मूलास व दशांश आहुत्यांनी अंगांना तर्पण करावे. पूर्णाहुती द्यावी. शिष्याला दीक्षा देण्यासाठी त्याच्याकडून मूलमंत्राचा शंभरदा जप करवून घ्यावा. शुभनिमित्तांसाठी दोनशे आहुत्या द्याव्यात. 'ॐ हूं शिवाय स्वाहा' इत्यादी मंत्रांनी तर्पण करावे. 'ॐ ॐ शिवाय हूं फट्' इत्यादी दीपनमंत्र आहेत. शिष्याच्या दीक्षाविधीचे आणखीही विस्तृत वर्णन पुढे आले आहे. अनेक प्रकारचे न्यास, अनेक मुद्रा, अनेक होम, प्राणायाम, नाडीसंधान; इत्यादी विधींनी शिष्य समयदीक्षेस संस्कारयोग्य होतो.

## निर्वाणदीक्षेच्या अंतर्गत अधिवासनविधी

यानंतर ब्याऐंशीव्या अध्यायात समयदीक्षेच्या अंतर्गत असलेल्या संस्कारदीक्षेचे वर्णन आले आहे. त्र्याऐंशीव्या अध्यायात निर्वाणदीक्षेच्या अंतर्गत अधिवासनाचा विधी वर्णन केला आहे. निर्वाणदीक्षेत पाशबंधनशक्तीसाठी मूलमंत्रादींचे दीपन करावे. त्या वेळी प्रत्येकासाठी एक एक वा तीन तीन आहुत्या देऊन मंत्रांनी दीपनकर्म संपन्न करावे. आदीमध्ये प्रणव व अंती 'हूँ फट्' लावून मध्ये बीज, गर्भ, शिखाबंधनस्वरूप तीन 'हूं'चा उच्चार करावा. यामुळे मूलमंत्राचे दीपन होते. 'ॐ हूं हूं हूं हूं फट्' या मंत्राने हृदयाचे दीपन होते. 'ॐ हूं हूं हूं हूं फट् हृदयाय नमः', 'ॐ हूं हूं हूं हूं फट् शिरसे स्वाहा' या मंत्रांनी हृदय व शिर इत्यादी अंगांचे दीपन होते. सर्व क्रूरकर्मांत या प्रमाणे मूलादिकांचे दीपन करणे उचित आहे. शांतिकर्म, पुष्टिकर्म, वशीकरण आदीत प्रवणमंत्राच्या अंती 'वषट्' जोडून मंत्र म्हणावा. 'वषट्' व 'वौ षट्' यांनी युक्त मंत्रांनी सर्व काम्यकर्मांच्यावर असलेल्या शम्बर मंत्रांनी सर्व कर्मांत हवन करावे.

त्यानंतर भगवान शिवांनी शक्तिसंनिधानासाठी आहुतींचे मंत्र सांगितले आहेत. नंतर 'ॐ हां तत्त्वाध्वने नमः। ॐ हां पदाध्वने नमः। ॐ हां वर्णाध्वने नमः। ॐ हां मंत्राध्वने नमः। ॐ हां कलाध्वने नमः।

ॐ हां भुवनाध्वने नमः।' या मंत्रांनी अध्वांचा न्यास करून अस्त्रमंत्रद्वारे अभिमंत्रित जळाने शिष्यावर प्रोक्षण करावे. पुष्पाने शिष्याच्या हृदयास ताडण करावे. हंसबीजात स्थित असलेल्या जीवचैतन्यास अस्त्रमंत्र म्हणून तेथून विलग करावे. त्यानंतर 'ॐ हः हूं फट' या शक्तिसूत्राने व 'हां हां स्वाहा' या मंत्राने संहारमुद्रा करून जीवचैतन्यास नियुक्त करावे. 'ॐ हां हां हामात्मने नमः,' या मंत्राचा जप करून जीवात्मा व्यापक होत आहे, अशी भावना करावी. हृदयमंत्राने तीन आहुत्या द्याव्यात.

त्यानंतर विद्यादेहाचा न्यास करून त्यात शान्त्यतीतकलेचे अवलोकन करावे. 'ॐ हूं शान्त्यतीतकलापाशाय नमः' या मंत्राने कलेचे अवलोकन करावे. दोन तत्त्वे, एक मंत्र, एक पद, सोळा वर्ण, आठ भुवने, क, ख, आदी बीजे, नाडी, दोन कला, विषय, गुण व एकमात्र कारणभूत सदाशिव; या सर्वांचा श्वेतवर्णा शान्त्यतीतकलेत अंतर्भाव करून 'ॐ हूं शान्त्यतीतकलापाशाय हूं फट्' या मंत्राने प्रताडन करावे. संहारमुद्रा करून कलापाशास घेऊन सूत्रास मस्तकावर धारण करावे. त्याची पूजा करावी. त्यानंतर त्याच्या सान्निध्यासाठी पूर्ववत तीन आहुत्या द्याव्यात. शान्त्यतीतकलेचे बीज आहे 'हूं.' दोन तत्त्वे, दोन अक्षरे, बीज, नाडी, क, ख. दोन गुण, दोन मंत्र, कमलासनस्थ एकमात्र कारणभूत ईश्वर, बारा पाद, सात लोक, एक विषय या सर्वांचे कृष्णवर्णा शान्तिकलेच्या आत चिंतन करावे. पूर्ववत ताडन करून सूत्राच्या मुखभागात या सर्वांचे नियोजन करावे. सान्निध्यासाठी बीजमंत्राच्या तीन आहुत्या द्याव्यात. शांतिकलेचा बीजमंत्र आहे 'हूं हूं.'

सात तत्त्वे, एकवीस पदे, सहा वर्ण, एक शम्बर, पंचवीस लोक, तीन गुण, एक विषय, रुद्ररूप कारणतत्त्व, बीज, नाडी, क, ख, या दोन कला; या सर्वांचा अत्यंत रक्तवर्णाच्या विद्याकलेत अंतर्भाव करावा. आवाहन व संयोजनपूर्वक पूर्वोक्त सूत्रास हृदयभागात स्थापित करून मंत्राने त्याची पूजा करावी. संनिधीसाठी तीन आहुत्या द्याव्यात. आहुतीसाठी बीजमंत्र आहे 'हूं हूं हूं.' चोवीस तत्त्वे, पंचवीस वर्ण, बीज, नाडी, क, ख या दोन कला, बावीस पदे, साठ लोक, साठ कला, चार गुण, तीन मंत्र, एक विषय व कारणरूप श्रीहरींच्या शुक्लवर्णाचा

प्रतिष्ठाकलेत अंतर्भाव करून ताडन आदी करावे. पूर्वोक्त सूत्रानें या सर्वांचे नाभिभागात संयोजन करुन संनिधिकरणासाठी तीन आहुत्या द्याव्यात. यासाठी बीजमंत्र आहे 'हूं हूं हूं हूं.' एकशेआठ भुवने, अठ्ठावीस पदे, बीज, नाडी व समीराच्या दोन दोन संख्या, दोन इंद्रिये, एक वर्ण, एक तत्त्व, एक विषय, पांच गुण, कारणरूप कमलासन ब्रह्मा व चार शम्बर या सर्वांचा पीतवर्णा निवृत्तिकलेत अंतर्भाव करावा व ताडन करावे. यांना ग्रहण करून सूत्राच्या चरणभागात स्थापित केल्यावर त्यांची पूजा करावी. त्यांच्या सान्निध्यासाठी तीन आहुत्या द्याव्यात. बीजमंत्र हू हूं हूं हूं हूं असा आहे.

अशा प्रकारे सूत्रगत पांच कलांना घेऊन शिष्याच्या शरीरात त्यांचे संयोजन करावे. सबीजा दीक्षेत समयाचारपाशाने, देहारंभक धर्माने, मंत्रसिद्धीच्या फलाने व इष्टापूर्तीदी धर्माने भिन्न चैतन्यरोधक सूक्ष्म प्रबंधकाचे कलांच्यात चिंतन करावे. मंत्रद्वारे तीन तीन आहुत्या द्याव्यात. तर्पण व दीपन करावे: 'ॐ हूं शान्त्यतीतकलापाशाय स्वाहा' इत्यादी मंत्रांनी तर्पण करावे. 'ॐ हूं हूं शान्त्यतीतकलापाशाय हूं हूं फट्' इत्यादी मंत्रांनी दीपन करावे. पूर्वोक्त सूत्रास व्याप्तिबोधासाठी पांच कलास्थानांत सुरक्षित ठेवून त्यावर कुंकुमादी अर्पून सांगशिवांचे पूजन करावे. कला मंत्रांच्या शेवटी 'हूं फट्' या पदांना जोडून उच्चारण करावे. क्रमशः पाशांचे भेदन करून नमस्कारान्त कलामंत्रांच्याद्वारे त्यांच्यांत प्रवेश करावा. 'ॐ हूं हूं हूं शान्त्यतीतकलां गृह्णामि बध्नामि च' इत्यादी मंत्रांच्याद्वारे कलांचे ग्रहण व बंधन होत असते. पाश आदींचे वशीकरण, ग्रहण, बंधन, सर्व व्यापारांचा निषेध, ही प्रत्येक कलेची आवश्यक कर्तव्ये आहेत.

त्यानंतर शिष्यास बसवून, पूर्वोक्त सूत्रास त्याच्या खांद्यावरून त्याच्या हातात द्यावे. पापांचा नाश व्हावा म्हणून शंभरदा मूलमंत्राचे हवन करावे. शिष्यानें करावयाचा विधीही सांगोपांग या अध्यायात आला आहे. शेवटी 'ॐ ह्लिी ह्लिी शूलपाणेय नमः स्वाहा' या मंत्रानें पंचगव्य व चरू यांचे प्राशन करून दंतधावन करावे. आचमन करावे. भगवान शिवांचे ध्यान करावे. पवित्र शय्येवर येऊन दीक्षागत क्रिया-

कांडाचे स्मरण करून शयन करावे. असा हा दीक्षाधिवासनाचा विधी संक्षेपाने आहे.

## निर्वाणदीक्षेच्या अंतर्गत निवृत्तिकला-शोधनविधी

चौऱ्याऐंशिव्या अध्यायात भगवान शंकरांनी स्कंदास निवृत्तिकला शोधनविधी समजावून दिला आहे. प्रातःकाली स्नान वगैरे उरकून गुरूने शिष्यांना त्यांच्या स्वप्नांबद्दल विचारावे. स्वप्नात दही, ताजे कच्चे मांस, मद्य आदींचे दर्शन उत्तम मानले गेले आहे. असे स्वप्न शुभसूचक असते. स्वप्नात हत्ती, घोडा, यांवर चढणे, श्वेतवस्त्राचे दर्शन शुभ मानले गेले आहे. स्वप्नात तेल लावणे आदी अशुभ मानले गेले आहे. त्याच्या शांतीसाठी अघोरमंत्राचा होम करणे अगत्याचे आहे. नित्यविधी झाल्यावर अध्वशुद्धी करून स्वतःवर शिवहस्त ठेवावा. नंतर कलशस्थ शिवांचे पूजन करून दिक्कपालांचीही पूजा करावी. मंडलावर व वेदीवर भगवान शिवांचे पूजन करावे. नंतर तर्पण, अग्निपूजन, पूर्णाहुतीपर्यंत होम व मंत्रतर्पण विधी करावा.

दुःस्वप्नदोषाच्या निवारणासाठी 'हूं' सम्पुटित अस्त्रमंत्र (हूं फट् हूं) उच्चारून एकशेआठ आहुत्या द्याव्यात व मंत्रदीपन करावे. वेदी व कलश यांच्यामध्ये अन्तर्बलीचे अनुष्ठान करून शिष्यांच्या प्रवेशासाठी इष्टदेवतेची आज्ञा घेऊन गुरूने मंडपाच्या बाहेर जावे. समयदीक्षेप्रमाणे मंडलारोपण करावे. संपातहोम व सुषुम्नानाडीरूप कुशास शिष्याच्या हातात देऊन संबद्ध कार्याचे संपादन करावे. निवृत्तिकलेच्या सान्निध्या-साठी मूलमंत्राने तीन आहुत्या देऊन कुंभस्थ शिवांची पूजा करावी. त्यांना कमलपाशमय सूत्र समर्पित करावे. शिष्यास पाशनिवेश करून त्याच्या मनात निवृत्तिकलेच्या व्याप्तीचे दर्शन करावे. त्यातील एकशे-आठ भुवने जाणण्यास योग्य अशी आहेत, ती अशी—

१) कपाल, २) अज, ३) अहिर्बुध्न्य, ४) वज्रदेह, ५) प्रभर्दन, ६) विभूति, ७) अव्यय, ८) शास्ता, ९) पिनाकी, १०) त्रिदशाधिप, ११) अग्निभद्र, १२) हुताश, १३) पिङ्गल, १४) खादक, १५) हर, १६) ज्वलन, १७) दहन, १८) बभ्रु, १९) भस्मान्तक, २०) क्षपान्तक,

२१) दम्य, २२) मृत्युहर, २३) धाता, २४) विधाता, २५) कर्ता, २६) काळ, २७) धर्म, २८) अधर्म, २९) संयोक्ता, ३०) वियोजक, ३१) नैर्ऋत्य, ३२) मारुत, ३३) हन्ता, ३४) क्रूरदृष्टि, ३५) भयानक, ३६) ऊर्ध्वकेश, ३७) विरूपाक्ष, ३८) धूम्र, ३९) लोहित, ४०) दंष्ट्री, ४१) बल, ४२) अतिबल, ४३) पाशहस्त, ४४) महाबल, ४५) श्वेत, ४६) जयभद्र, ४७) दीर्घबाहु, ४८) जलान्तक. ४९) वडवास्य, ५०) भीम, ५१) शीघ्र, ५२) लघु, ५३) वायुवेग, ५४) सूक्ष्म, ५५) तीक्ष्ण, ५६) क्षमान्तक, ५७) पञ्चात्तक, ५८) पञ्चशिख, ५९) कपर्दी, ६०) मेघवाहन, ६१) जटामुकुटधारी, ६२) नानारत्नधर, ६३) निधीश, ६४) रूपवान, ६५) धन्य, ६६) सौम्यदेह, ६७) प्रसादकृत्, ६८) प्रकाम, ६९) लक्ष्मीवान् ७०) कामरूप, ७१) विद्याधर, ७२) ज्ञानधर, ७३) सर्वज्ञ, ७४) वेदपारग, ७५) मातृवृत्त, ७६) पिङ्गाक्ष, ७७) भूतपाल, ७८) बलिप्रिय, ७९) सर्वविज्ञाविधाता ८०) सुखदुःखकर, ८१) अनन्त, ८२) पालक, ८३) धीर ८४) पातालाधिपति, ८५) वृष, ८६) वृषधर, ८७) वीर, ८८) ग्रसन, ८९) सर्वतोमुख, ९०) लोहित, ९१) शम्भु, ९२) विभु, ९३) गणाध्यक्ष, ९४) त्र्यक्ष, ९५) त्तिदशवन्दित, ९६) संवाद, ९७) विवाह, ९८) नभ, ९९) लिप्सु, १००) विचक्षण, १०१) हूहुक, १०२) कालाग्निरुद्र, १०३) हाटक, १०४) कूष्माण्ड, १०५) सत्य, १०६) ब्रह्मा, १०७) विष्णु, १०८) रुद्र.

यांचप्रमाणे अठ्ठावीस पदे आहेत. ती अशी– १) सद्भावेश्वर, २) महातेज, ३) योगाधिपती, ४) मुञ्च मुञ्च, ५) प्रमथ प्रमथ, ६) शर्व शर्व, ७) भव भव, ८) भवोद्भव, ९) सर्वभूतसुखप्रद, १०) सर्वसान्निध्यकर, ११) ब्रह्मविष्णुरुद्रपर, १२) अनर्चितानर्चित, १३) असंस्तुतासंस्तुत, १४) पूर्वस्थित पूर्वस्थित, १५) साक्षिन् साक्षिन् १६) तुरु तुरु, १७) पतंग पतंग, १८) पिङ्ग पिङ्ग, १९) ज्ञान ज्ञान, २०) शब्द शब्द, २१) सूक्ष्म सूक्ष्म, २२) शिव, २३) सर्व, २४) सर्वद, २५) ॐ नमो नमः, २६) ॐ नमः, २७) शिवाय, २८) नमो नमः

व्यापक आकाश मन्त्र आहे. 'ॐ नमो वौषट्' हा अभीष्ट मंत्रवर्ण

आहे. अकार व लकार (अं लं) ही दोन बीजे आहेत. इडा व पिंगला या दोन नाड्या आहेत. प्राण व अपान हे दोन वायू आहेत. घ्राण व उपस्थ ही दोन इंद्रिये आहेत. गंधास विषय म्हटले आहे. यात गंधादी पांच गुण आहेत. हा पृथ्वीतत्त्वाशी संबंधित आहे, त्याचा रंग पिवळा आहे त्याची मंडलाकृती चौकोनी असून तो चारही बाजूंनी वज्रानें अंकित आहे. या पार्थिव मंडलाचा विस्तार शंभर कोटी योजनें मानला गेला आहे. चौदा योनींनाही यातच अंतर्गत केले पाहिजे.

प्रथम सहा योनी मृग आदींच्या असून आठ देवयोनी आहेत. मृग पहिली योनी, दुसरी पक्षी, तिसरी पशू, चौथी सर्प आदी, पांचवी स्थावर, सहावी मनुष्याची होय. आठ देवयोनींत प्रथम पिशाचांची, दुसरी राक्षसांची, तिसरी यक्षांची, चौथी गंधर्वांची, पांचवी इंद्राची, सहावी सोमाची, सातवी प्रजापतीची व आठवी योनी ब्रह्मदेवांची असते. पार्थिव तत्त्वावर या आठांचा अधिकार मानला गेला आहे. लय प्रकृतीत होतो. भोग बुद्धीत व ब्रह्मा कारण होतो. त्यानंतर जागृत अवस्थेपर्यंत समस्त भुवनादींनी गर्भित निवृत्तिकलेचे ध्यान करून तिचा मंत्रात विनियोग करावा. तो मंत्र असा आहे. ‘ॐ हां ल्हां हां निवृत्तिकलापाशाय हूं फट् स्वाहा’ यानंतर ‘ॐ हां ल्हां हों निवृत्तिकलापाशाय हं फट्’ या मंत्रानें अंकुशमुद्रा करावी. पूरक प्राणायाम करून त्या कलेचे आकर्षण करावे.

त्या नंतर ‘ॐ हूं हां ल्हां हां हूं निवृत्तिकलापाशाय हूं फट्’ या मंत्रानें संहारमुद्रा व कुंभक प्राणायाम करून नाभीच्या खालील स्थानापासून ‘ॐ हां निवृत्तिकलापाशाय नमः’ या मंत्रानें उद्भवमुद्रा धारण करावी. रेचक प्राणायाम करावा. तिला कुंडात कोठलातरी आधार घेऊन स्थापित करावे. त्यानंतर ‘ॐ हां निवृत्तिकलापाशाय नमः’ या मंत्राने अर्घ्यदानपूर्वक पूजन करून ‘स्वाहा’ म्हणून तर्पण करावे. सान्निध्यासाठी तीन तीन आहुत्या द्याव्यात. नंतर ‘ॐ हां ब्रह्मणे नमः’ या मंत्राने ब्रह्मदेवांना आवाहान करावे. त्यांचे पूजन करून, त्यांना तीन आहुत्या देऊन तृप्त करावे. त्यांना प्रार्थना करावी, ‘ब्रह्मन्, मी या मुमुक्षूस आपल्या अधिकारात दीक्षित करीत आहे. आपण नेहमी याच्याशी अनुकूल असावे.’

त्यानंतर रक्तवर्ण वागीश्वरीदेवीस मनातल्या मनात हृदयमंत्राने आवाहन करावे. ही देवी इच्छा, ज्ञान व क्रियारूपिणी आहे. सहा प्रकारच्या अध्वांची ही एकमात्र कारण आहे. पूर्वोक्त प्रकाराने हिचे पूजन व तर्पण करावे. सर्व योगिनींना विक्षुब्ध करणाऱ्या व हृदयात विराजमान असणाऱ्या वागीश्वरदेवाचेही पूजन करावे. तर्पण करावे. प्रारंभी बीज व शेवटी ' हूं फट् ' यांनी युक्त अशा अस्त्रमंत्राने विधानवेत्त्या गुरूने शिष्याच्या हृदयास ताडण करावे. हृदयातील अग्निकणसमान प्रकाशमान असे शिष्याचे जीवचैतन्य निवृत्तिकलेत स्थित असून पाशांनी बद्ध असते. त्याला जेष्ठाद्वारे विभक्त करावे. या विभाजनाचा मंत्र असा आहे. ' ॐ हां हूं हः हूं फट्। ॐ हां स्वाहा ' या मंत्राने पूरक प्राणायाम व अंकुशमुद्रा करून त्या जीवचैतन्यास हृदयात आकृष्ट करून, आत्मामंत्राने पकडून, आपल्या आत्म्यात योजित करावे. हा मंत्र असा आहे. ' ॐ हां हां हामात्मने नमः ' यानंतर असेच हृदयमंत्र, शिरोमंत्र, शिवमंत्र, कवचमंत्र, अस्त्रमंत्र, इत्यादी मंत्रांचा उल्लेख आहे. कलाशस्त्राने छेदनाचा मंत्र असा आहे ' ॐ हां हां हां निवृत्तिकलापाशाय हः हूं फट्.'

बंधनाच्या निवृत्तीसाठी अस्त्रमंत्राने दोन्ही हातांनी घुसळून, गोलाकार करून पाशास तुपाने भरलेल्या स्रुवात टाकावे. नंतर कलामय अस्त्राने अथवा अस्त्रमंत्राने त्याला जाळून भस्म करावे. त्यानंतर पाशांकुराच्या निवृत्तीसाठी पांच आहुत्या द्याव्यात. या वेळी ' ॐ हः अस्त्राय हूं फट् स्वाहा ' असा मंत्र असतो. अस्त्रमंत्राने आठ आहुत्या देऊन प्रायश्चित्तकर्म करावे. त्यानंतर विधात्यांस आवाहन करावे. त्यांचे पूजन करून तर्पण करावे. नंतर ' ॐ हां शब्दस्पर्शौ शुल्कं ब्रह्मन् गृहाण स्वाहा ' या मंत्राने तीन आहुत्या द्याव्यात. व शिष्यास अधिकार द्यावा. ब्रह्मदेवांना या वेळी भगवान शिवांची आज्ञा ऐकवावी. ' ब्रह्मन्, या बालकाचे संपूर्ण पाश दग्ध झाले आहेत. आता त्याला पुन्हा बधनात घालण्यासाठी इथं राहू नये.'

असे म्हणून ब्रह्मदेवांना पाठवून द्यावे. नंतर संहारमुद्रा करून, कुंभक प्राणायाम करून राहुमुक्त अशा चंद्रमंडलाच्या सदृश आत्म्यास

तत्संबंधी मंत्राचा उच्चार करून दक्षिणनाडीद्वारे धीरे धीरे रेचक प्राणायाम व 'उद्भव' नावाची मुद्रा करून पूर्वोक्त सूत्रात योजित करावे. नंतर त्याची पूजा करून गुरूने अर्घ्यपात्रातील अमृतोपम जल-बिंदू घेऊन शिष्याची पुष्टी व तृप्ती राखावी. त्यानंतर माता-पित्यांचे विसर्जन करून 'वौषडन्त' अस्त्रमंत्राच्या द्वारे विधीच्या पूर्णाहुतीसाठी होम करावा. असे करण्याने निवृत्तिकलेची शुद्धी होते. पूर्णाहुतीचा पूर्ण मंत्र असा आहे. 'ॐ हूं हां अमुक आत्मनो निवृत्तिकलाशुद्धिरस्तु स्वाहा फट् वौषट्.'

## निर्वाणदीक्षेच्या अंतर्गत प्रतिष्ठाकलेचा शोधनविधी

पंच्याऐंशीव्या अध्यायात प्रतिष्ठा कलेचा शोधनविधी आला आहे. शुद्ध व अशुद्ध कलांचे शांत व नादान्त संज्ञक ऱ्हस्वदीर्घ प्रयोगाने संधान करावे. 'ॐ ह्रीं ल्हां ल्हीं हां' हा या संधानाचा मंत्र आहे. प्रतिष्ठाकलेतील जल, तेज, वायू, आकाश, पांच तन्मात्रा, दहा इंद्रिये, बुद्धी, तीन गुण, चोविसावा अहंकार, पुरुष या पंचवीस तत्त्वांचे व 'क' पासून 'य' पर्यंत पंचवीस अक्षरांचे चिंतन करावे. प्रतिष्ठाकलेत छपन्न भुवने आणि त्याच नामांचे रुद्र असतात. त्यांची नामावली अशी आहे.

१) अमरेश, २) प्रभास, ३) नैमिष, ४) पुष्कर, ५) आषाढी, ६) डिण्डी, ७) भारभूती, ८) लकुलीश, ९) हरिश्चंद्र, १०) श्री-शैल, ११) जल्प, १२) आम्रातकेश्वर, १३) महाकाल, १४) मध्यम, १५) केदार, १६) भैरव, १७) गया, १८) कुरुक्षेत्र, १९) नाल, २०) कनखल, २१) विमल, २२) अट्टहास, २३) महेन्द्र, २४) भीम, २५) वस्त्रापद, २६) रुद्रकोटी, २७) अविमुक्त, २८) महालय, २९) गोकर्ण, ३०) भद्रकर्ण, ३१) स्वर्णाक्ष, ३२) स्थाणु, ३३) अजेश, ३४) सर्वज्ञ, ३५) भास्वर, ३६) तदनन्तर, ३७) सुबाहू, ३८) मन्त्र-रूपी, ३९) विशाल, ४०) जटिल अथवा रौद्र, ४१) पिङ्गलाक्ष, ४२) कालदंष्ट्री, ४३) विधुर, ४४) घोर, ४५) प्राजापत्य, ४६) हुताशन, ४७) कालरूपी, ४८) कालकर्ण, ४९) भयानक, ५०)

पतङ्ग, ५१) पिङ्गल, ५२) हर, ५३) धाता, ५४) शङ्कुकर्ण, ५५) श्रीकण्ठ, ५६) चन्द्रमौली.

यानंतर बत्तीस पदे अशी आहेत; १) व्यापिन्, २) अरूपिन्, ३) प्रथम, ४) तेज, ५) ज्योति, ६) अरूप, ७) पुरुष, ८) अनग्ने, ९) अधूम, १०) अभस्मन्, ११) अनादे, १२) नाना नाना, १३) धूधू धूधू, १४) ॐ भूः, १५) ॐ भुवः, १६) ॐ स्वः, १७) अनिधन, १८) निधन, १९) निधनोद्भव, २०) शिव, २१) शर्व, २२) परमात्मन्, २३) महेश्वर, २४) महादेव, २५) सद्भाव, २६) ईश्वर, २७) महातेजा, २८) योगाधिपते, २९) मुञ्च, ३०) प्रमथ, ३१) सर्व, ३२) सर्वसर्व. दोन बीजे, तीन मंत्र, वामदेव, शिर, शिखा, गांधारी, सुषुम्ना, दोन नाड्या, समान व उदान हे दोन प्राणवायू, रसना व पायू ही दोन इंद्रिये, रस नावाचा विषय, रूप, शब्द, स्पर्श, रस; हे चार गुण कमलाने अंकित, श्वेत, अर्धचंद्राकार मंडल, सुषुप्ती अवस्था, प्रतिष्ठेस कारणभूत भगवान विष्णू आणि भुवनादी सर्व तत्त्वे यांचे प्रतिष्ठेत चिंतन करून प्रतिष्ठाकलेसंबंधी मंत्राने शिष्याच्या शरीरात भावनेच्या द्वारे प्रवेश करावा.

'ॐ हां हीं हां प्रतिष्ठाकलापाशाय हूं फट् स्वाहा' या मंत्राने पूरक प्राणायाम करावा. अंकुशमुद्रेने उक्त कलापाशाचे आकर्षण करावे. त्यानंतर 'ॐ हूं हां हीं हां हूं प्रतिष्ठाकलापाशाय हूं फट्' या मंत्राने संहारमुद्रा करावी. कुंभक प्राणायाम करून तिला हृदयाखाली नाडीसूत्रासहित घेऊन 'ॐ हूं हीं हां प्रतिष्ठाकलापाशाय नमः' या मंत्राने उद्भवमुद्रा व रेचक प्राणायाम करून कुंडात स्थापन करावे. नंतर 'ॐ हां हां हीं हां प्रतिष्ठाकलाद्वाराय नमः' या मंत्राने अर्घ्य द्यावा. पूजन करावे. स्वाहान्तमंत्राने तीन आहुत्या द्याव्यात. संतर्पण करून 'ॐ हां विष्णवे नमः' या मंत्राने विष्णूचे आवाहन व पूजन करावे. संतर्पण करून प्रार्थना करावी. त्यांच्या अधिकाराने मुमुक्षूस दीक्षा द्यावी. त्यानंतर वागीश्वरी देवी, वागीश्वर देव यांना आवाहन करून त्यांची पूजा करावी. तर्पण करून शिष्याच्या छातीस ताडन

करावे. 'ॐ हां हं हः हूं फट्' हा ताडनाचा मंत्र. या मंत्रानें शिष्याच्या हृदयात प्रवेश करावा. पाशबद्ध चैतन्यास अस्त्रमंत्राने व अंकुशमुद्रेनें त्याला पाशापासून वेगळे करावे. 'ॐ हां हं हः फट्' या मंत्राच्या अंती 'नमः स्वाहा' लावून संपुटितमंत्राने जीवचैतन्यास आत्म्यात नियोजित करावे. या नियोजनाचा मंत्र आहे 'ॐ हां हां हामात्मने नमः.'

त्यानंतर जीवचैतन्यास पित्याशी संयुक्त होण्याची भावना करून वामा उद्भवमुद्रेच्या द्वारे त्याला देवीच्या गर्भात स्थापन करावे. या वेळी 'ॐ हां हां हामात्मने नमः' असा मंत्र म्हणावा. देहोत्पत्तीसाठी हृदयमंत्राने पांच आहुत्या द्याव्यात. अधिकारप्राप्तीसाठी शिखामंत्राने, भोगसिद्धीसाठी कवचमंत्राने, लयासाठी अस्त्रमंत्राने, स्रोतःसिद्धीसाठी शिवमंत्राने, तत्त्वशुद्धीसाठी हृदयमंत्राने पांच पांच आहुत्या द्याव्यात. पाशाच्या शिथिलतेसाठी व निष्कृती (प्रायश्चित्ता) साठी शिरोमंत्राच्या शंभर आहुत्या द्याव्यात. मलशक्तीच्या निरोधनासाठी (निवारणासाठी) स्वाहान्त अस्त्रमंत्राने पांचदा हवन करावे.

पाशवियोग झाल्यावर सात वेळा अस्त्रमंत्राच्या कलाबीजाने युक्त अस्त्रमंत्राने त्या कलापाशास कापावे. 'ॐ ह्रीं प्रतिष्ठाकलापाशाय हूं फट्' हा मंत्र या वेळी म्हणावा. पाशांकुशाच्या निवृत्तीसाठी अस्त्रमंत्राच्या पांच आहुत्या द्याव्यात. प्रायश्चित्तनिवारणासाठी आठ आहुत्यांचे हवन करावे. या वेळी 'ॐ हः अस्त्राय हूं फट्' असा मंत्र म्हणावा. यानंतर हृदयमंत्राने हृषीकेशास आवाहन करून पूर्वोक्त विधीने त्याचे पूजन व तर्पण करावे. अधिकार समर्पणासाठी 'ॐ हां विष्णो रसं शुल्कं गृहाण स्वाहा' हा मंत्र म्हणावा. त्यानंतर भगवान शिवांची आज्ञा ऐकवावी. म्हणावे, 'हरे, या पशूचा पाश पूर्णतः दग्ध झाला आहे. आपण आता याला बन्धनकारक होऊ नये.' नंतर रौद्रीनाडीद्वारे गोविंदांचें विसर्जन करून राहुमुक्त चंद्रमंडलाच्या समान आत्म्यास नियोजित करावे. संहारमुद्रेने त्याला आत्मस्थ करून उद्भवमुद्रेनें सूत्रात त्याची संयोजना करावी. त्यानंतर पूर्ववत जलबिंदूसदृश त्या आत्म्यास शिष्याच्या शिरात स्थापन करावे. विधिपूर्तीसाठी विधानपूर्वक पूर्णाहुती प्रदान करावी. असे करण्याने शिष्याकलेचे

शोधन होते.

## निर्वाणदीक्षेच्या अंतर्गत विद्याकलेचे शोधन

शहाऐंशिव्या अध्यायात भगवान शिवांनी स्कंदास विद्याकलेच्या शोधनासाठी माहिती दिली आहे. पूर्ववर्ती कलाप्रतिष्ठेच्या बरोबर विद्याकलेचे संधान करावे. 'ॐ हां हीं हूं हां' हा या संधानाचा मंत्र आहे. राग, शुद्धविद्या, नियति, कला, काल, माया व अविद्या; ही सात तत्त्वे, र, ल, व, श, ष, स; हे सहा वर्ण विद्याकलेच्या अंतर्गत सांगितले आहेत. प्रणवादी एकवीस पदे खालीलप्रमाणे आहेत.

'ॐ नमः शिवाय सर्वप्रभवे शिवाय ईशानमूर्ध्ने सत्पुरुषवक्त्राय अघोरहृदयाय वामदेवगुह्याय सद्योजातमूर्तये ॐ नमो नमः गुह्यातिगुह्याय गोप्त्रे अनिधनाय सर्वयोगाधिकृताय सर्वयोगाधिपाय ज्योतीरूपाय परमेश्वराय अचेतन अचेतन व्योमन् व्योमन् ।'

आता रुद्र व भुवनें यांचे स्वरूप असे आहे. रुद्र व भुवनें पंचवीस आहेत. १) प्रमथ, २) वामदेव, ३) सर्वदेवोद्भव, ४) भवोद्भव, ५) वज्रदेह, ६) प्रभु, ७) धाता, ८) क्रम, ९) विक्रम, १०) सुप्रभ, ११) बुद्ध, १२) प्रशांतनामा, १३) ईशान, १४) अक्षर, १५) शिव, १६) सशिव, १७) बभ्रु, १८) अक्षय, १९) शम्भु, २०) अदृष्टरूपनामा, २१) रूपवर्धन, २२) मनोन्मन, २३) महावीर, २४) चित्राङ्ग, २५) कल्याण.

विद्याकलेत अघोरमंत्र आहे. 'म' व 'र' बीजे आहेत. पूजा व हस्तिजिव्हा या दोन नाड्या आहेत. व्यान व नाद हे दोन प्राणवायू आहेत. एकमात्ररूप हा विषय आहे. पाय व नेत्र ही इंद्रिये आहेत. शब्द, स्पर्श, रूप, हे तीन गुण आहेत. सुषुप्ती अवस्था आहे. रुद्रदेव कारण आहे. भुवनादी समस्त वस्तूंना भावनेच्या द्वारे विद्येच्या अंतर्गत पाहावे. 'ॐ हूं हैं हां' हा यासाठी संधानमंत्र आहे. रक्तवर्ण व स्वस्तिक चिन्हाने अंकित अशा त्रिकोणाकार मंडलाचे चिंतन करावे. शिष्याच्या वक्षास ताडन, कलापाशाचे भेदन, शिष्याच्या हृदयात प्रवेश, त्याच्या जीवचैतन्याच्या पाशबंधापासून वियोजन, हृदयप्रवेश करून जीवचैतन्य

व विद्याकला यांचे आकर्षण ग्रहण करावे.

यानंतर जीवचैतन्यास आत्म्यात स्थापन करून कलापाशाचे संग्रहण व कुंडात स्थापन पूर्वोक्त पद्धतीनें करावे. कारणरूप रुद्रदेवांचे आवाहन, पूजन आदी करून शिष्यास बंधनकारक न होण्यासाठी त्यांना प्रार्थना करावी. पिता-मातेस आवाहन करून शिशूच्या म्हणजे शिष्याच्या हृदयावर ताडन करावे. पूर्वोक्त विधीनुसार प्रथम हृदयमंत्राच्या द्वारे हृदयात प्रवेश करून जीवचैतन्यास कलापाशापासून मुक्त करावे. नंतर त्याला आत्म्यात सयोजित करावे. नंतर वामा उद्‌भवमुद्रेद्वारे वागीश्वरी-देवीच्या गर्भात त्याला स्थापित करण्याची भावना करावी. त्यानंतर देहसंपादन करावे. जन्म, अधिकार, भोग, लय, स्रोत:शुद्धी, तत्त्वशुद्धी, नि:शेष मलकर्मादिकांचे निवारण, पाशबंधनाची निवृत्ती, यांसाठी स्वाहान्त अस्त्रमंत्राच्या शंभर आहुत्या द्याव्यात. सर्व विधी झाल्यावर रुद्रदेवांना रूप व गंध समर्पण करून त्यांचे पूजन करावे. त्या वेळी 'ॐ ह्रां रूपगंधौ शुल्कं रुद्र गृहाण स्वाहा ' हा मंत्र म्हणावा.

त्यानंतर या देवास विसर्जित करावे. जीवचैतन्यास आत्म्यात स्थापित करून त्याला पाशसूत्रात निवेशित करावे. नंतर जलबिंदुस्वरूप त्या चैतन्याचा शिष्याच्या शिरावर न्यास करून मातापित्यांचे विसर्जन करावे. त्यानंतर विविध पूर्ती करणाऱ्या पूर्णाहुतीचे हवन करावे. विद्येस ताडनादी कार्ये पूर्वोक्त विधीनें करावे. हे सर्व विधान पूर्ण केल्यावर विद्याकलेचे शोधन होते.

## गौरीच्या प्रतिष्ठेचा विधी

यानंतर सत्त्याऐंशिव्या व अठ्ठ्याऐंशिव्या अध्यायांत शांतिकलेचे शोधन व निर्वाणदीक्षेच्या अवशिष्ट विधीचे वर्णन आले आहे. एकोण-नव्वदाव्या अध्यायात एकतत्त्वदीक्षेचा विधी समजावून दिला आहे. नव्वदाव्या अध्यायात अभिषेकविधीचे व एक्क्याण्णवाव्या अध्यायात देवार्चनाचा विधी व विविध मंत्र व मंडले यांच्या वर्णनाचा विषय आला आहे. यापुढील काही अध्यायांत प्रतिष्ठेच्या अंगभूत शिलान्यास-विधी, वास्तुपूजाविधी, शिलान्यासविधी, प्रतिष्ठाकालसामग्री, प्रतिष्ठेत

अधिवासविधी, शिवप्रतिष्ठेचा विधी; आदी विषय थोड्याफार फरकानें पुन्हा सत्याण्णवाव्या अध्यायापर्यंत आले आहेत. अठ्ठ्याण्णवाव्या अध्यायात गौरीप्रतिष्ठेच्या विधीचे वर्णन आले आहे.

गौरीच्या प्रतिष्ठेसाठी पूर्ववत मंडपाची रचना करावी. देवीची स्थापना व शय्याधिवासन करावे. पूर्वोक्तमंत्र, मूर्त्यादिकांत न्यास करून आत्मतत्त्व, विद्यातत्त्व, शिवतत्त्व यांना परमेश्वरात स्थापित करावे. नंतर पराशक्तीचा न्यास, होम, जप करून, क्रियाशक्तिरूपिणी पिंडीचे संधान करावे. सर्वव्यापिनी पिंडीचे ध्यान करून तेथे रत्नादींचा न्यास करावा. ही देवी परमशक्तिस्वरूपा आहे. तिला सृष्टिन्यास करून स्थापन करावें. सर्वशक्तिमान शक्तीस आवाहन करून देवीच्या प्रतिमेत तिचे नियोजन करावे. ‘ शिवा ’ नावाच्या अंबिकादेवीचे पूजन करावे. पूजेचे मंत्र असे आहेत. ‘ ॐ आं आधारशक्तये नमः । ॐ कूर्माय नमः । ॐ कन्दाय नमः । ॐ ह्रीं नारायणाय नमः । ॐ ऐश्वर्याय नमः । ॐ अधश्छदनाय नमः । ॐ पद्मासनाय नमः ’

यानंतर ‘ ॐ ह्रीं कर्णिकायै नमः ’, ‘ ॐ क्षं पुष्कराक्षेभ्यो नमः ’ या मंत्रांनी कर्णिका व कमलाक्षांचे पूजन करावे. यानंतर ‘ ॐ ह्रां पुष्टै नमः । ॐ ह्रीं ज्ञानायै नमः । ॐ ह्रूं क्रियायै नमः ’ या मंत्रांनी पुष्टी, ज्ञाना व क्रियाशक्ती यांचे पूजन करावे. ‘ ॐ नालाय नमः । ॐ रं धर्माय नमः । ॐ रुं ज्ञानाय नमः । ॐ वैराग्याय नमः । ॐ अधर्माय नमः । ॐ रं अज्ञानाय नमः । ॐ अवैराग्याय नमः । ॐ अनैश्वर्याय नमः ’ या मंत्रांनी नालादींचे पूजन करावे. ‘ ॐ हूं वाचे नमः । ॐ हुं रागिण्यै नमः । ॐ हुं ज्वालिन्यै नमः । ॐ ह्रौं शमायै नमः । ॐ हूं ज्येष्ठाय नमः । ॐ ह्रौं रौं क्रौं नवशक्त्तै नमः ’ या मंत्रांनी वाक् आदी शक्तींची पूजा करावी.

‘ ॐ गौं गौर्यासनाय नमः ’. ‘ ॐ गौं गौरीमूर्तये नमः ’ हे गौरीचे मूलमंत्र आहेत. ‘ ॐ ह्रीं सः महागौरि रुद्रदयिते स्वाहा गौर्यै नमः । ॐ गां हृदयाय नमः । ॐ गीं शिरसे स्वाहा । ॐ गूं शिखायै वषट् । ॐ गैं कवचाय हुम् । ॐ गौं नेत्रत्रयाय वौषट् । ॐ गः अस्त्राय फट् । ॐ गौं विज्ञानशक्तये नमः ’ या मंत्रांनी शिखादींची पूजा करावी. ‘ ॐ गूं

क्रियाशक्तये नमः' या मंत्राने क्रियाशक्तीची पूजा करावी. 'ॐ सुं सुभगायै नमः' या मंत्राने सौभाग्याची, ॐ ह्रीं ललितायै नमः' या मंत्राने ललितेची पूजा करावी. 'ॐ ह्रीं कामिन्यै नमः' 'ॐ हुं काममालिन्यै नमः' या मंत्रांनी गौरीची प्रतिष्ठा, पूजा केल्यास उपासकास सर्व काही प्राप्त होते.

## प्रासादांचे विविध प्रकार

नव्याण्णवव्या अध्यायात सूर्यदेवाच्या स्थापनेचा विधी, शंभराव्या अध्यायात द्वारप्रतिष्ठाविधी, एकशेएकाव्या अध्यायात प्रासादप्रतिष्ठा, एकशेदोनाव्या अध्यायात ध्वजारोपण, एकशेतिनाव्या अध्यायात शिवलिंगादींचा जीर्णोद्धारविधी, एकाशेचाराव्या अध्यायात प्रासादाची लक्षणे इत्यादी विषय आले आहेत. वैराज, पुष्पक, कैलास, मणिक, त्रिविष्टप असे प्राकारांचे मुख्य मुख्य भेद सांगून सर्व मिळून पंचेचाळीस प्राकारांचे भेद निवेदन केले आहेत. मेरू, मंदर, विमान, भद्र, सवर्तोभद्र, रुचक, नंदक, वर्धमान नंदी व श्रीवत्स हे नऊ प्रासाद 'वैराज' कुलातील आहेत.

वलभी, गृहराज, शालागृह, मंदिर, विशालचमस, ब्रह्ममंदिर, भुवन, प्रभव, शिविका-वेश्म हे नऊ प्रासाद 'पुष्पक'प्रकारात येतात. वलय, दुंदुभी, पद्म, महापद्म, वर्धनी, उष्णीव, शंख, कलश, खवृक्ष; हे नऊ वृत्ताकार प्रासाद 'कैलास'कुलात येतात. गज, वृषभ, हंस, गरुत्मान ऋक्षनायक, भूषण, भूधर, श्रीजय, पृथ्वीधर हे नऊ प्रासाद वृत्तायत असून त्यांचे 'मणिक' कुल आहे. वज्र, चक्र, स्वस्तिक, वज्रस्वस्तिक (अथवा वज्रहस्तक), चित्र, स्वस्तिक-खड्ग, गदा, श्रीकंठ, विजय हे नऊ प्रासाद 'त्रिविष्टप'मध्ये प्रकट होतात. याच संज्ञा नगर, लाट यांनाही आहेत.

यानंतर शिखराची, वेदीची, कंठाची, पिंडिकेची इत्यादींची प्रमाणे सांगितली आहेत. उंची, रुंदी, लांबी यांचीही प्रमाणे दिली आहेत. प्रासादावर द्वारपालाची स्थापना करावी. उरलेल्या भागांवर स्त्रीपुरुषांच्या जोडया आकृतींनी विभूषित कराव्यात. द्वारासमोरचा स्तंभ पडला तर 'स्तंभभेद' नावाच्या दोषाचा असेल तर गृहस्वामीस दास्यत्व

येते. वृक्षाचा वेध असेल तर ऐश्वर्याचा नाश होतो. कूपाचा वेध झाला तर भयाची प्राप्ती आणि क्षेत्रवेधानें धनाची हानी होते. प्रासाद, गृह, शाला यांच्याही वर्णनाचा भाग आला आहे.

## नगर, गृह आदींची वास्तुप्रतिष्ठा

एकशेपांचाव्या अध्यायात नगर, ग्राम, दुर्ग, गृह, प्रासाद यांची माहिती भगवान शंकरांनी स्कंदाला दिली आहे. नगर, ग्राम इत्यादींत गृह वा प्रासाद, यांची वृद्धी व्हायची असेल तर या सिद्धीसाठी एक्याऐंशी पदांचे वास्तुमंडल बनवावे. त्यात वास्तुदेवतेची पूजा करावी. 'शांता, यशोवती, कान्त, विशाला, प्राणवाहिनी, सती, वसुमती, नंदा, सुभद्रा, मनोरमा; या पूर्वाभिमुखी दहा रेखा दहा नाड्यांची प्रतीके आहेत. यांशिवाय हरिणी, सुप्रभा, लक्ष्मी, विभूती, विमला, प्रिया, जया (विजया), ज्वाला, विशोका याही रेखामय नाड्या आहेत. दहा रेखा पश्चिमेकडून पूर्वेकडे व दहा दक्षिणेकडून उत्तरेकडे कल्पिल्यास एक्याऐंशी पदे तयार होतात.

ईशादी आठ आठ देवतांचे 'अष्टक तयार होते. त्यांची चारही दिशांना पूजा व्हावी. ईश, घन(पर्जन्य), जय(जयन्त), शक्र(इंद्र), अर्क (आदित्य वा सूर्य) सत्य, भृश, व्योम (आकाश); या आठ देवतांचे वास्तुमंडलात पूर्व दिशांच्या पदांत पूजन करावे. हव्यवाक् (अग्नी), पूषा, वितथ, सौम (सोमपुत्र गृहक्षत), कृतान्त (यम), गंधर्व, भृंगराज, व मृग या आठ देवतांचे दक्षिणदिशेस पूजन करावे. पितर, द्वारपाल, सुग्रीव, पुष्पदन्त, वरुण, दैत्य (असुर), शेष (अथवा शोष) यक्ष्मा (पापयक्ष्मा) या आठांना पश्चिमदिशेकडील पदांत पूजित करावे. रोग, अही (नाग), मुख्य, भल्लाट, सोम, शैलऋषी, अदिती, दिती या आठांना उत्तरदिशेस पूजावे. याचप्रमाणे ब्रह्मदेव, आपवत्स, मरीची, अग्नी, सविता, सावित्री, विवस्वान, पितर, विष्णू, इंद्र, वरुण, धराधर, चरकी, स्कंद, विदारीविकट, पूतना, जंभ, पापा, पिलिपिच्छ(पिलिपित्स); इत्यादी देवतांची व बालग्रहांची स्थानें पूजेसहित सांगितली आहेत.

असे हे एक्याऐंशी पदांचे वास्तुचक्र असते. एक शतमंडपही असतो.

त्यातही पूर्ववत देवतांची पूजा व्हायला हवी. शतपदचक्राच्या मध्यवर्ती सोळा पदांत ब्रह्मदेवांची पूजा व्हावी. ब्रह्मदेवांच्या चारही दिशांना मरीची, विवस्वान, मित्र, पृथ्वीधर यांची दहा दहा पदांत पूजा व्हावी. ईशानादी कोणांत दैत्यमाता दिती, ईश, अग्नी, मृग (पूषा), पितर, पापयक्ष्मा व अनिल (रोग) या सर्वांची दीड दीड पदात स्थिती असते. यानंतर शिवांनी यज्ञमंडपाचे वर्णन केले आहे. त्याच्या लांबीरुंदीचे, उंचीचे प्रमाण दिले आहे. भद्र नावाचा प्रासाद, द्वारवीथी, श्रीजयप्रासाद, उपवीर्य, यमसूर्यक, सुक्षेत्र इत्यादींची वर्णनेही याच अध्यायात आलेली आहेत. 'विशाल'गृह, पक्षघ्नगृह इत्यादींचे संदर्भ देऊन ध्वजादी आठ गृहांचा निर्देश केला आहे. ध्वज, धूम, सिंह, श्वान, वृषभ, खर, हत्ती, करक; हे आठ ध्वज आहेत. स्नानगृह, स्वयंपाकगृह, शय्यागृह, शस्त्रागार, कोषागार, अन्नागार, पशुशाला, दीक्षाभवन; इत्यादींची स्थाने सांगितली आहेत.

पूर्वेकडून पश्चिमेकडे व उत्तरेकडून दक्षिणेकडे बाजारात गृहपंक्ती असावी. एकेका भवनासाठी प्रत्येक दिशेस आठ आठ द्वारे असावीत. या द्वारांची फलेही पृथक पृथक आहेत. भय, नारीची चंचलता, जय, वृद्धी, प्रताप, धर्म, कलह, निर्धनता; अशी काही फले असून दाह, दुःख, सहृन्नाश, धननाश, मृत्यू, धन, शिल्पज्ञान, पुत्रप्राप्ती; अशी दक्षिणदिशेच्या आठ द्वारांची आहेत, आयू, संन्यास, सस्य, धन, शांती, अर्थनाश, शोषण, भोग, संतानप्राप्ती ही पश्चिम द्वारांची फले आहेत. रोग, मद, आर्ती, मुख्यता, अर्थ, आयू, कृशता, मान; ही उत्तरदिशेकडील द्वारांची क्रमशः फले आहेत. यानंतर एकशेसहाव्या अध्यायात नगरादी वास्तूचे वर्णन आले आहे.

## गयायात्रेचा विधी

एकशेपंधराव्या अध्यायात अग्निदेवांनी गयेच्या यात्रेचा विधी विस्ताराने समजावून दिला आहे. एकशेसोळाव्या अध्यायात गयेत करावयाच्या श्राद्धाचा विधी दिला आहे. एकशेसत्राव्या अध्यायात संपूर्ण श्राद्धकल्प समजावून दिला आहे. गयेस जाणाऱ्या माणसाने तीर्थयात्रीचा

वेष धारण करून स्वत:च्या गावाची प्रदक्षिणा करावी. प्रतिदिन पायीच यात्रा करावी. मन व इंद्रिये यांना स्वाधीन ठेवावे. कोणाचे दान घेऊ नये. गयेस निघताना पावलोपावली पितरांना स्वर्गासाठी शिडी वाढत असते. पितरांच्या श्राद्धासाठी गेलेल्या पुत्राला ब्रह्मज्ञानाची किंमत काय ? कुरुक्षेत्रात निवास करण्याची जरूरी काय ? गायीला संकटातून सोडविण्यासाठी प्राणाची किंमत देण्याची काय आवश्यकता ? पुत्र गयेस पोचला हे पाहून पितरांचा उत्सव सुरू होतो. ब्रह्मज्ञान, गयेत केलेले श्राद्ध, गोशालेत मरण, कुरुक्षेत्रात निवास; ही मनुष्याच्या मुक्तीची चार साधने आहेत.

ब्रह्मज्ञानं गयाश्राद्धं गोगृहे मरणं तथा ।
वासः पुंसां कुरुक्षेत्रे मुक्तिरेषा चतुर्विधा ।।

(११५.५–६)

मुंडन व उपवास हे तीर्थासाठी साधारण विधी आहेत. गयातीर्थात कालाचे बंधन नसते. तेथे प्रतिदिन पिंडदान होते. जो तेथे दीड महिना (तीन पक्ष) निवास करतो तो सात पिढ्यांपर्यंत पितरांना तर्पण करतो. अष्टका* तिथींना, अभ्युदायिक कार्यांत, पितर आदींच्या क्षयाहातिथीस गयेत मातेसाठी पृथक श्राद्ध करावे. अन्य तीर्थात स्त्रीचे श्राद्ध तिच्या पतीसह होत असते. गयेत पितर आदींचे क्रमशः 'नवदेवताक' अथवा 'द्वादशदेवताक' श्राद्ध करणे अगत्याचे आहे°.

पहिल्या दिवशी उत्तरमानसतीर्थात स्नान करावे. यामुळे आयुष्य वाढून आरोग्याची वृद्धी होते. सर्व पापराशींचा नाश होतो. मोक्षाची सिद्धी होते. स्नानानंतर प्रथम देव व नंतर पितर यांना तर्पण करून

*मार्गशीर्ष पौर्णिमेनंतर ज्या चार कृष्णपक्षाच्या अष्टमी तिथी येतात त्यांना 'अष्टका' म्हणतात. पौष कृष्ण अष्टमीस ऐन्द्री, माघ कृष्ण अष्टमीस वैश्वदेवी, फाल्गुन कृष्ण अष्टमीस प्राजापत्य, चैत्र कृष्ण अष्टमीस पित्र्या; अशी नावे आहेत.

° पिता, पितामह, प्रपितामह, माता, पितामही, प्रपितामही, मातामह, प्रमातामह, वृद्ध प्रमातामह; या नऊ देवता आहेत. यांच्यासाठी केलेले श्राद्ध 'नवदेवताक' वा 'नवदैवत्य' अशा नावांनी ओळखले जाते. मातामही, वृद्ध प्रमातामही इत्यादींनी पृथक पिंड दिल्यास ते 'द्वादशदेवताक' श्राद्ध होते.

पिंडदान करावे. सूर्यदेवास नमस्कार करून मौन मानवाने दक्षिणमानस-तीर्थास जावे. येथेही पितरांसाठी स्नान करावे. श्राद्ध व पिंडदान करून भगवान सूर्याला नमस्कार करावा. त्याची प्रार्थना करावी. त्यानंतर महा-नदीत स्थित असलेल्या उत्तम फल्गुतीर्थावर जावे. येथे नाग, जनार्दन, कूप,वट या गोष्टी उत्तरमानसापेक्षा उत्कृष्ट आहेत. याला गयांचा शिरो-भाग म्हटले आहे. गयाच्या शिरासच 'फल्गुतीर्थ' असे नाव आहे. हे मुण्डपृष्ठ व नगादी तीर्थांपेक्षा श्रेष्ठ आहे. यालाच 'आभ्यंतरतीर्थ' म्हटले आहे. यात लक्ष्मी, कामधेनू, जल, पृथ्वी फलदायक होतात. फल्गुतीर्थात स्नान केल्यानें मनुष्यास भगवान गदाधरांचे दर्शन होते.

श्राद्ध करणाऱ्या पुरुषानें स्नान केल्यावर भगवान ब्रह्मदेवांना प्रणाम करावा. त्यांची प्रार्थना करावी. त्यानंतर गदाधरांचे दर्शन घ्यावे. दुसऱ्या दिवशी धर्मारण्यतीर्थाचे दर्शन घ्यावे. तेथे मतंगमुनींच्या आश्रमात मतंगवापीत स्नान करून पिंडदान करावे. तेथे मतंगेश्वराची प्रार्थना करावी. त्यानंतर ब्रह्मतीर्थात स्नान, तर्पण, श्राद्ध आदी करून धर्मात्मा पुरुषानें, महाबोधिवृक्षास नमस्कार करावा. तिसऱ्या दिवशी व्रतधारी पुरुषाने 'ब्रह्मसरोवरात' स्नान करावे. तर्पण व पिंडदान करावे. वृक्षांना पाणी द्यावे. ब्रह्मदेवांनी स्थापिलेल्या यूपास प्रदक्षिणा केल्यास वाजपेययज्ञाचे फल प्राप्त होते. येथे एक मुनी राहात होते. ते जलाचा घडा व कुशाचा अग्रभाग हातात घेऊन झाडास पाणी देत असत. आम्रवृक्षासही पाणी मिळाले. त्यांचे पितर तृप्त झाले. एकच क्रिया अशी दोन सिद्धी देणारी ठरली.

**एको मुनिः कुम्भकुशाग्रहस्त आम्रस्य मूले सलिलं ददाति।**
**आम्राश्च सिक्ताः पितरश्च तृप्ता एक क्रिया द्व्यर्थकरी प्रसिद्धा ॥**
**(११५.४०)**

चौथ्या दिवशी मनुष्यानें फल्गुतीर्थात स्नान करून देवतादींना तर्पण करावे. नंतर 'गयाशीर्षा'वर स्नान करावे. तेथे स्नान व पिंडदान करावे. गयेचे क्षेत्र पांच कोसांचे आहे. त्यात एक कोस केवळ 'गया-शीर्ष' आहे. त्यावर पिंडदान केल्यास मनुष्याच्या शंभर पिढ्यांचा

उद्धार होतो. परम बुद्धिमान महादेवांनी मुंडपृष्ठावर आपला पाय ठेविला आहे. मुंडपृष्ठावरच गयासुराचे शिर आहे. म्हणून त्याला 'गयाशिर' म्हणतात. येथेच फल्गुतीर्थ आहे. फल्गू अमृताची धार आहे. येथे पितरांसाठी केलेले दान अक्षय होते. गयाशीर्षावर शमीच्या पानांसह पिंड दिल्यास नरकात पडलेले पितर मोक्षास जातात. येथे खीर, आटा, सातू, चरू, तांदूळ यांनी पिंडदान करावे. तिलमिश्रित गव्हांनी रुद्र-पादावर पिंडदान करावे.

याच प्रकारे 'विष्णुपदी'वरही श्राद्ध व पिंडदान करणारा मनुष्य पितृऋणापासून मुक्त होतो. ब्रह्मपदात स्नान करणारा मनुष्य आपल्या पितरांना ब्रह्मलोकात पाठवितो. दक्षिणाग्नी, गार्हपत्यअग्नी, आहवनीय अग्नी येथें स्नान करणारा मनुष्य यज्ञफलाचा धनी होतो. आवसथ्याग्नी, चंद्रमा, सूर्य, गणेश, अगस्त्य, कार्तिकेय इत्यादींत स्नान करणारा मनुष्य आपल्या कुलाचा उद्धार करतो. मनुष्यानें सूर्याच्या रथास नमस्कार करून कर्णादित्यास वंदन करावे. कनकेश्वराच्या पदास प्रणाम करून गयाकेदारतीर्थास नमस्कार करावा. यामुळे मनुष्याची सर्व पापे दूर होतात.

या गयेत पिंडदान केल्यानें विशाल नावाच्या राजपुत्रास त्याच्या पितरांचे दर्शन झाले. गयेंत पुण्यकारक पिंडदान केल्याने प्रेतराजास सर्व प्रेतांसह मुक्ती मिळाली. पुरुषानें पांचव्या दिवशी 'गदालोल' नावाच्या तीर्थास स्नान करावे. त्या वेळी प्रार्थना करावी, 'भगवान्, जिथं आपल्या गदेचं प्रक्षालन झालं त्या पावन 'गदालोल'तीर्थात स्नान करून मी संसाररूपी रोगास शांत केलं आहे.' अक्षय स्वर्ग देणाऱ्या अक्षयवटास नमस्कार करावा. त्यामुळे पापाचा क्षय होईल. वटाच्या खाली श्राद्ध करून ब्राह्मणांना भोजन घालावे. येथे एका ब्राह्मणास भोजन घातल्यास कोटी ब्राह्मणांच्या भोजनाचे पुण्य मिळते. पितरांसाठी जे दिले जाते ते अक्षय होते. गयेत अन्नदान करणाऱ्या पुत्रामुळे पितर संतुष्ट होतात. वटेश्वरास नमस्कार करून आपल्या प्रपितामहाचे पूजन करावे. असे केल्यानें मनुष्य अक्षयलोकात जातो. गयेची यात्रा महान फल देणारी आहे.

गायत्रीमंत्राने महानदीत स्नान करून संध्योपासना करावी. सूर्योदयी व मध्यान्हकाली गीत व वाद्य यांनी सावित्रीदेवीची उपासना करावी. तिच्यासमोर संध्या करून नदीच्या तटावर पिंडदान करावे. त्यानंतर अगस्त्यपदावर पिंडदान करावे. त्यानंतर योनिद्वारातून (ब्रह्म-योनीतून) प्रवेश करून बाहेर पडावे. नंतर मातेच्या योनीतून जन्म घ्यावा लागत नाही. तो पुनर्जन्मापासून मुक्त होतो. त्यानंतर काकशिलेवर बली देऊन कुमार कार्तिकेयास प्रणाम करावा. यानंतर स्वर्गद्वार, सोम-कुंड, वायुतीर्थ या स्थानी पिंडदान करावे. आकाशगंगा, कपिलातट, कपिलेश्वर येथेही पिंडदान करावे. कोटितीर्थ, अमोघपर्व, गदालोल, वानरक, गोप्रचारतीर्थ येथेही पिंडदान करावे. वैतरणीत गायीस नमस्कार करून दान द्यावे. या नदीच्या तटावरही श्राद्ध व पिंडदान करावे. त्यानंतर क्रौंचपादावर पिंड द्यावा. तृतीयेस विशाला, निश्चिरा, ऋणमोक्ष, पापमोक्ष या तीर्थांवर पिंडदान करावे. भस्मकुंडावर भस्माने स्नान केल्यास मनुष्य पापातून मुक्त होतो. गयेत साक्षात भगवान विष्णू पितृदेवाच्या स्वरूपात विराजमान असतात. त्यांना नमस्कार करावा.

त्यानंतर मार्कंडेयेश्वर, गृध्रेश्वर, मूलक्षेत्रधारा, गृध्रकूट, गृध्रवट, धौतपाद येथेही पिंडदान करावे. पुष्करिणी, कर्दमाल, रामतीर्थ या तीर्थांवर पिंड द्यावेत. नंतर प्रभासेश्वरास प्रणाम करून प्रेतशिलेवर पिंडदान करावे. वसिष्ठेश्वरास नमस्कार करून गयानाभी, सुषुम्ना, महाकोष्ठीत पिंडदान करावे. गदाधरांच्या पुढील मुंडपृष्ठावर देवीच्या समीप पिंडदान करावे. मुंडपृष्ठास नमस्कार केल्याने भयाचा नाश होतो. विष व रोग यांचा कुप्रभाव दूर होतो. सुभद्रा, बलभद्र, भगवान पुरुषोत्तम यांचे पूजन केल्याने मनुष्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. भगवान हृषिकेशास नमस्कार करून त्यांच्यापुढे पिंडदान करावे. श्रीमाधव, भगवती महालक्ष्मी, गौरी, मंगलमयी सरस्वती यांची पूजा करावी. श्रीकपर्दिविनायक व कार्तिकेय यांची पूजा करून निर्विघ्नता-पूर्वक सिद्धी प्राप्त करून घ्यावी. सोमनाथ, कालेश्वर, केदार, प्रपितामह, सिद्धेश्वर, रुद्रेश्वर, रामेश्वर, ब्रह्मकेश्वर; या आठ गुप्तलिंगांचे पूजन करून मनुष्यास सर्व काही मिळते. लक्ष्मीच्या प्राप्तीसाठी भगवान

नारायण, वराह, नृसिंह यांना नमस्कार करावा. ब्रह्मा, विष्णू, त्रिपुर-नाशक महेश्वर यांनाही प्रणाम करावा. ते सर्व कामना पूर्ण करतात.

सीता, राम, गरुड, वामन, फलगुचंडी, अंगारकेश्वर, हंसतीर्थं, कोटितीर्थं, पांडुशिलानद, अग्निधारा, मधुश्रवा, इंद्रेश्वर, किलकिलेश्वर, वृद्धिविनायक, यांना नमस्कार करून धेनुकारण्यात पिंडदान करावे. सरस्वतीतीर्थास जाऊन पिंडदान करावे. गयेची परिक्रमा करून तेथील ब्राह्मणांचे पूजन करावे. भगवान गदाधरांची प्रार्थना करावी. गयेत पितरांचे श्राद्ध अक्षय होते. अक्षय ब्रह्मलोकाची प्राप्ती होते.

## ज्योतिःशास्त्राचे कथन

एकशेएकविसाव्या अध्यायापासून अग्निदेवांनी ज्योतिषशास्त्राचे कथन सुरू केले आहे. शुभ-अशुभाचे वर्णन करणारे ज्योतिषशास्त्र आहे. चार लक्ष श्लोकांच्या विशाल ज्योतिषशास्त्राचा हा सारभूत अंश आहे. हे जाणल्याने मनुष्य सर्वज्ञ होऊ शकतो. या अध्यायात संस्कारमुहूर्त, रोगमुक्त स्नान, मंत्रप्रयोग, भाव व तारा, विविध मुहूर्त, क्रयविक्रयमुहूर्त, गृहप्रवेश, नौकानिर्माण, नृपदर्शन, युद्धयात्रा, कृषिकर्ममुहूर्त; आदी विषयांचे विशेष वर्णन आले आहे. भरणी, आश्लेषा, धनिष्ठा, तीन पूर्वा व कृत्तिका या नक्षत्रांवर खरेदी केलेली वस्तू हानिकारक असते. अश्विनी, स्वाती, चित्रा, रेवती, शतभिषा, श्रवण या नक्षत्रांवर खरेदी केली तर ती वस्तू लाभदायक होते. भरणी, तीन पूर्वा, आर्द्रा, आश्लेषा, मघा, स्वाती, कृत्तिका, ज्येष्ठा, विशाखा; या नक्षत्रांवर स्वामीची सेवा करण्यास आरंभ करू नये. या नक्षत्रांवर दुसऱ्यांना द्रव्य देणे, व्याजी लावणे अशी कार्ये करू नयेत.

तीन उत्तरा, श्रवण व ज्येष्ठा या तीन नक्षत्रांवर राज्याभिषेक करावा. चैत्र, ज्येष्ठ, भाद्रपद, आश्विन, पौष, माघ या मासांना सोडून उरलेल्या मासांत गृहप्रवेश करावा. अश्विनी, रोहिणी, मूल, तीन उत्तरा, मृगशिरा, स्वाती, हस्त, अनुराधा; ही नक्षत्रे, मंगळवार व रविवार सोडून इतर दिवशी गृहारंभ, तडाग, वापी, प्रासाद यांना आरंभ करावा. श्रवणाच्या पांच नक्षत्रांत तृण, काष्ठे यांचा संग्रह

केल्यास अग्निदाह, भय, रोग, राजपीडा, धनक्षती यांचा त्रास होतो. धनिष्ठा, तीन उत्तरा, शताभिषा; या तीन नक्षत्रांवर गृहप्रवेश करावा. द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, त्रयोदशी; या तिथींना नौका बांधाव्यात. धनिष्ठा, हस्त, रेवती, अश्विनी; या नक्षत्रांवर राजाचे दर्शन घ्यावे. तीन पूर्वा, धनिष्ठा, आर्द्रा, कृत्तिका, मृगशिरा, विशाखा, आश्लेषा, अश्विनी या नक्षत्रांवर केलेली युद्धयात्रा संपत्तीचा लाभ करून देणारी व सिद्धिदायिनी होते. अष्टमी, सिनीवाली (अमावास्या), चतुर्दशी, तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण, हस्त, चित्रा या नक्षत्रांवर विकण्यासाठी पशू गोशालेच्या बाहेर काढू नये. खरेदी केलेल्या पशूंना गोशालेत प्रवेशही करू देऊ नये. स्वाती, तीन उत्तरा, रोहिणी, मृगशिरा, मूल, पुनर्वसू, पुष्य, हस्त, श्रवण; या नक्षत्रांवर कृषिकर्म करावे. पुनर्वसू, तीन उत्तरा, स्वाती, पूर्वाफाल्गुनी, मूल, ज्येष्ठा, शताभिषा; या नक्षत्रांवर रवी, सोम, गुरू, शुक्र; या वारी कृषिकर्म करावे. रेवती, रोहिणी, ज्येष्ठा, कृत्तिका, हस्त, अनुराधा, तीन उत्तरा; या नक्षत्रांवर, शनिवारी व मंगळवारी हे मुहूर्त सोडून इतर दिवशी संपत्ती प्राप्त करण्यासाठी बीजवपन करावे.

## युद्धजयासाठी ज्योतिषशास्त्र

याचप्रकारे धान्यभरणीचे मुहूर्त, धान्यवृद्धीसाठी मंत्र यांचेही विवेचन येथे आहे. 'ॐ धनदाय सर्वधनेशाय देहि मे धनं स्वाहा', 'ॐ नवे वर्षे हलादेवि, लोकसंवर्द्धिनी, कामरूपिणि, देहि मे धनं स्वाहा' या मंत्रांची अक्षरे भोजपत्रावर लिहून धान्याच्या राशीत ठेवल्यास धान्याची वृद्धी होते. देवादींची प्रतिष्ठा, भगवानांचे शयन, पार्श्वपरिवर्तन, जागरणउत्सव, त्रिपुष्करयोग, चंद्रबल, ताराशुद्धी, क्षीण व पूर्णचंद्र, महाज्येष्ठी, ग्रहणात दानमहत्त्व, रोगस्थितीचा विचार, रोगशांतीचा उपाय; यांचीच चर्चा या अध्यायात आली आहे.

यानंतर एकशेबाविसाव्या अध्यायात कालगणना व पंचांगसाधन हा विषय संक्षेपाने सांगितला आहे. एकशेतेविसाव्या अध्यायात युद्धजयवर्णन व विविध योग यांचा परिचय आला आहे. पुढल्या अध्यायात युद्धजयाचा

ज्योतिषशास्त्र दृष्टीने विचार केला आहे. व्यावहारिक कालासंबंधी म्हटले आहे. नाडीच्या स्फुरणावर हे माप आहे. त्यासाठी एक उदाहरण घेतले आहे. ४० × ६० = २४००. याला अकराने भागल्यावर २१९ भागाकार येतो. याला सहाने गुणल्यास १३१४ गुणाकार येतो. याला पुन्हा अकराने भागल्यास ११९ भागाकार येतो. उरलेले पांच सोडून द्यायचे. या ११९ ला तीनानें गुणायचे. गुणाकार ३५८ येतो. याला ३६० च मानायचे. अर्थात करमूलक नाडीचे स्फुरण ३६० वेळा होते.

असे तीनदा स्फुरण झाले की एक 'उच्छ्वास' होतो. यालाच अणू म्हटले आहे. सहा उच्छ्वासांचा एक 'पल', साठ पलांचा एक 'लिप्ता' अर्थात एक 'दंड' होतो. साठ दंडांचा एक अहोरात्र होते. अ, इ, उ, ए, ओ हे पांच स्वर होत. यांची क्रमाने बल, कुमार, युवा, वृद्ध, मृत्यू अशा संज्ञा मिळाल्या आहेत. यांचा उदयकाल व अस्तकाल अहोरात्र अर्थात साठ दंडांच्या एकादशअंशाच्या समान असतो. ६० ला ११ ने भागल्यास ५ दंड व सत्तावीस पळे लब्धी होते. म्हणून ५ दंड व २७ पळे या स्वरांचा उदयास्तमान होय. यानंतर शनिचक्राचे वर्णन, कूर्मपृष्ठावर शनिबिंबाचे क्षेत्रफळ, राहुचक्राचे वर्णन, तिथीस अनुसरून भद्रनिवासाच्या दिशेचे वर्णन, 'विष्टी', 'कराली', 'घोरा' या भद्रातिथी, पंधरा सुमुहूर्त, त्यांची नावे व कार्ये इत्यादींचेही वर्णन याच अध्यायात आले आहे.

रौद्र, श्वेत, मैत्र, सारभट, सावित्र, विरोचन, जयदेव, अभिजित, रावण, विजय, नंदी, वरुण, यम, सौम्य, भव; हे पंधरा मुहूर्त होत. रौद्र मुहूर्तास भयानक कार्य करावे. श्वेतास स्नानादिक कार्य करावे. मैत्रास कन्येचा विवाह शुभ होतो. सारभरमुहूर्तावर शुभ कार्य करावे. सावित्री-मुहूर्तास देवांची स्थापना करावी. विरोचनमुहूर्तावर राजकीय कार्य करावे. जयदेवमुहूर्तास विजयाचे काम करावे. रावणमुहूर्तावर संग्रामाचे कार्य करावे. विजयमुहूर्तास कृषिकर्म, व्यापारादी कार्य करावे.

नंदीस षट्कर्मे, वरुणास तडागादी कामे, यममुहूर्तास विनाशादी कार्य करावे. सौम्यमुहूर्तावर सौम्य कार्य करावें. भवमुहूर्त शुभकार्यासाठी आहे. यानंतर राहूच्या दिशासंचाराचे वर्णन आले आहे.

याच अध्यायात औषधींच्या लेपद्वारे विजयाचे वर्णन आले आहे. चंडी, इंद्राणी (सिंधुवार), वाराही (वाराहीकंद), मुशली (तालमुला), गिरिकर्णिका (अपराजिता), बला (कुट), अतिबला (कंघी), क्षीरी (सिरखोला), मल्लिका (मोतिया), जाती (चमेली), यूथिका (जुई), श्वेतार्क (शुभ्रमंदार), शतावरी, बचनाग, गुरुच, वागुरी; या दिव्य औषधी आहेत. या धारण केल्यास युद्धात विजय होतो.

'ॐ नमो भैरवाय खड्गपरशुहस्ताय ॐ ह्रूं विघ्नविनाशाय ॐ ह्रूं फट्' या मंत्राने शिखा बांधून संग्रामात विजय प्राप्त करावा. या विजयासाठी तिलक, अंजन, धूप, उपलेपन, स्नान, पान, तैल, योगचूर्ण इत्यादी पदार्थांचे वर्णन आले आहे. सुभगा (नील दूर्वा), मन:शिला, ताल (हरताळ) यांना लाक्षारसात मिसळून स्त्रीच्या दुधात घोटावे. याचा तिलक ललाटावर लावल्यास शत्रू वश होतो. विष्णुक्रान्ता (अपराजिता), सर्पाक्षी (महिषकंद), सहदेवी, रोचना, यांना बकरीच्या दुधात मिसळून त्याचा तिलक कपालावर लावला की शत्रू वश होतो. प्रियंगू (नागकेशर), कुंकुम, कुष्ठ, मोहिनी (चमेली), तगर, घृत यांचा तिलकही शत्रूस वश करणारा होतो. रोचना, रक्तचंदन, निशा, (हळद), मन:शिला, ताल, प्रियंगू, सर्षप (सरस), चमेली, हरिता (दूर्वा), विष्णुक्रान्ता, सहदेवी, शिखा (जटामांसी) यांना मातुलुंगाच्या रसात मिसळून त्याचा तिलक लावला तर शत्रू वश होतो. मंजिष्ठ, रक्तचंदन, कटुकंदा (सहिजन), विलासिनी, पुनर्नवा, यांच्या लेपाने सूर्यही वश होतो. मलयचंदन, नागपुष्प (चंपा), मंजिष्ठ, तगर, वच, लोध्र, प्रियंगू, रजनी (हळद), जटामांसी यांच्या मिश्रणाचे तेल वशकारक असते.

या पुढच्या एकशेचोविसाव्या अध्यायात अग्निदेवांनी युद्धजयासाठी ज्योतिषाच्या दृष्टीने वेळ, मंत्र, औषधी वस्तू यांचे वर्णन केले आहे. शंकरांनी पार्वतीस हे शुभाशुभ कार्यांचे वर्णन सांगितले आहे. मूलदेवाच्या म्हणजे परमात्म्याच्या इच्छेनुसार पंधरा अक्षरांची एक शक्ती तयार झाली. तिच्यापासून सर्व चराचर सृष्टी झाली. या शक्तीच्या आराधनेने मनुष्यास सर्व ज्ञान होते. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद,

या चारी वेदांना प्रथम मंत्र म्हणतात. सद्योजातादी मंत्र द्वितीय मंत्र आहेत. ब्रह्मा, विष्णू, रुद्र हे तृतीय मंत्राचे स्वरूप आहे. शंकर, सात शिखांचा अग्नी, इन्द्रादी देवता, हे चौथ्या मंत्राचे स्वरूप आहे. अ, इ, उ, ए, ओ हे पांच स्वर म्हणजे पांचवा मंत्र आहे. या स्वरांना मूलब्रह्म असेही म्हणतात.

या पांच स्वरांची उत्पत्ती, त्यांचे शरीरात स्थान, विद्यापीठाचे स्वरूप इत्यादींचेही वर्णन याच अध्यायात आले आहे. लाकडात जसा अग्नी गुप्त असतो. ते जळाल्याशिवाय त्याची प्रचीती येत नाही, त्याचप्रमाणे शरीरातील विद्यमान शिवशक्तीची प्रतीती ज्ञानाशिवाय होत नाही. प्रथम ॐकारस्वराने विभूषित अशी शक्ती उत्पन्न झाली. त्यानंतर बिंदू 'एकार' रूपात परिणत झाला. पुन्हा ओंकारात शब्द तयार झाला. त्याला 'उकार' म्हणतात. हाच उकार हृदयात शब्द करतो. अर्धचंद्र मोक्षदाता असलेल्या हकाराचा प्रादुर्भाव आहे. त्यानंतर भोग व मोक्ष देणारा 'अकार' निर्माण झाला. हा अकार सर्वशक्तिमान व प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचा द्योतक आहे. 'अ' स्वर शरीरात प्राण वा श्वासरूपाने राहतो. यालाच 'इडा' असे नाव आहे. 'इकार' प्रतिष्ठा नामाने रसरूपात असतो. यालाच 'पिंगला' म्हणतात. 'ई' स्वरास 'क्रूरा शक्ती' म्हणतात. 'हरबीज' (उकार) शरीरात अग्निरूपाने राहतो. हीच 'समानबोधिका विद्या' आहे. हिलाच 'गांधारी' असे नाव आहे. हिच्यात 'दहानात्मिका' नावाची शक्ती असते. 'एकार' शरीरात मलरूपाने राहातो. त्याच्यात शांतिक्रिया असून 'ओकार' शरीरात वायुरूपाने असतो. तोच अपान, व्यान, उदान आदी पांच रूपांत गतिशील राहतो. पांच स्वरांचे सम्मिलित सूक्ष्म रूप 'ओंकार' आहे. यालाच 'शान्त्यतीत' असे नाव आहे. शब्दगुणाने युक्त होऊन तो आकाशरूपात राहातो. या पांच स्वरांचे म्हणजे (अ, इ, उ, ए, ओ) यांचे, क्रमशः मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनी हे स्वामी आहेत. हेच या जगताचे मूल कारण आहेत.

विद्यापीठाचे स्वरूप पाहा. यात 'ओंकार' शिवरूप मानला गेला

आहे. ' उमा ' स्वतः सोम वा अमृतरूपात असते. हिलाच वामा, ज्येष्ठा, रौद्री शक्तीही म्हणतात. ब्रह्मा, विष्णू व रुद्र या तीन गुणांनी सृष्टीचे उत्पादन, पालन व संहार होतो. शरीराच्या आत तीन रत्ननाड्या आहेत. त्यांची नावे स्थूल, सूक्ष्म व परा अशी आहेत. त्यांचा वर्ण श्वेत आहे. यांतून सतत अमृत झिरपत असते. आत्मा सदैव यानें आप्लावित असतो. त्याचे ध्यान करणारा साधक शिवसायुज्याच्या प्राप्तीसाठी अजर होतो. प्रथम अंगुष्ठ आदींत, नेत्रांत, देहात अंगन्यास करून मृत्युंजयाची अर्चना करणारा संग्रामात विजयी होतो. आकाश शून्य व निराधार आहे. ते शब्दगुणाचे आहें. वायूत स्पर्शगुण आहे. रूपाची म्हणजे अग्नीची ऊर्ध्वंगती सांगितली आहे. जलाची अधोगती आहे. गंधवती पृथ्वी सर्वांना आधार देते.

नाभीच्या मूलात, मेरुदंडाच्या मूलस्थानी कंदाच्या स्वरूपात श्रीशिव सुशोभित असतात. तेथेच शक्तिसमुदायात सूर्य, चंद्र, भगवान विष्णू यांचा निवास असतो. पंचतन्मात्रांच्यासह दहा प्रकारचे प्राणही राहातात. शिवांची मूर्ती कालग्नीप्रमाणे सदैव चमकत असते. तीच चराचर जीवलोकाचा प्राण आहे. या मंत्रपीठास नष्ट केले तर वायु-स्वरूप जीवाचा नाश होतो.

## युद्धजयासाठी अनेक चक्रे

एकशेपंचविसाव्या अध्यायात शंकरांनी युद्धजयासाठी काही मंत्र वा चक्रे सांगितली आहेत. ' ॐ ह्रीं कर्णमोटनि बहुरूपे बहुदंष्ट्रे ह्रूं फट्, ॐहः, ॐ ग्रस ग्रस, कृन्त कृन्तच्छक च्छक ह्रूं फट् नमः ' या मंत्राचे नाव ' कर्णमोटी महाविद्या ' असे असून तो सर्व वर्णांचे रक्षण करणारा आहे. हा मंत्र म्हणताच मनुष्य क्रोधाविष्ट होतो. त्याचे नेत्र लाल होतात. मारण, पातन, मोहन, उच्चाटण यांसाठी हा मंत्र उपयोगी पडतो.

स्वरोदयाबरोबर पांच प्रकारच्या वायूंची स्थाने निर्माण होतात. नाभीपासून हृदयापर्यंत ज्या वायूचा संचार होतो त्याचे ' मारुतचक्र ' असे नाव आहे. होमकार्यात रमणारा क्रोधी साधक याच्या साह्याने संग्रामादी

कार्यात उच्चाटनकर्म करतो. कानांपासून नेत्रांपर्यंत जो वायू आहे त्याच्या साह्याने प्रभेदनकार्य करावे. हृदयापासून गुदापर्यंत जो वायू आहे त्याच्या योगाने ज्वरदाह व शत्रूंना मारण्याचे कार्य करावे. याच वायूस 'वायुचक्र' म्हणतात. हृदयापासून कंठापर्यंत जो वायू असतो त्याला 'रस' म्हणतात. यालाच 'रसचक्र' असेही नाव आहे. शांतीसाठी याचा उपयोग होतो. त्याचा गुण पौष्टिक रसासारखा आहे. भुवयांपासून नाकाच्या अग्रभागापर्यंत असणाऱ्या वायूचे नाव 'दिव्य' असून त्याला 'तेजश्चक्र' म्हणतात. गंध हा याचा गुण असून याने स्तंभन, आकर्षण इत्यादी कार्ये होतात. नासिकाग्रावर मन स्थिर करून साधक स्तंभन व कीलन कर्म करतो. उपर्युक्त वायुचक्रातील चंडघंटा, कराली, सुमुखी, दुर्मुखी, रेवती, प्रथमा व घोरा यांची अर्चना करावी. उच्चाटण करणाऱ्या शक्ती तेजश्चक्रात असतात. सौम्या, भीषणी, देवी, जया, विजया, अजिता, अपराजिता, महाकोटी, महारौद्री, शुष्ककाया, प्राण-हरा; या अकरा शक्ती रसचक्रात राहातात.

विरूपाक्षी, परा, दिव्या, अकरा आकाश-मातृका, संहारी, जातहारी, दंष्ट्राला, शुष्करेवती, पिपीलिका, पुष्टिहरा, महापुष्टी, प्रवर्धना, भद्रकाली, सुभद्रा, भद्रसोमा, सुभद्रिका, स्थिरा, निष्ठुरा, दिव्या, निष्कम्पा, गदिनी, रेवती; अशा बत्तीस मातृका चारही चक्रांत (मारुत, वायू, रस व दिव्य) आठ आठांच्या क्रमाने स्थित होतात. सूर्य व चंद्र हे एकच असून त्यांच्या शक्तीही भूतभेदाने एक आहेत.

आता पंचवर्गाच्या बलाने युद्धात विजय कसा होतो ते पाहा. अ, आ, क, च, ट, त, प, य, श– हा प्रथमवर्ग. इ, ई, ख, छ, ठ, थ, फ, र, ष– हा द्वितीयवर्ग. उ, ऊ, ग, ज, ड, द, ब, ल, स– हा तृतीय वर्ग. ए, ऐ, घ, झ, ढ, ध, भ, व, ह– हा चौथा वर्ग. ओ, औ, अं, अः, ङ, ञ, ण, न, म– हा पांचवा वर्ग होय. ही पंचेचाळीस अक्षरे मनुष्याचा अभ्यु-दय करणारी आहेत. या वर्गांच्या क्रमाने बाल, कुमार, युवा, वृद्ध व मृत्यू ही पांच नामे झाली आहेत.

यानंतर तिथी, वार, नक्षत्र यांच्या योगाने होणाऱ्या कालज्ञानाचे वर्णन आले आहे. आत्मपीड, शोषक, उदासीन; असे तीन प्रकारचे

काल आहेत. मंगळवारी प्रतिपदा तिथी व कृत्तिका नक्षत्र असेल तर प्राण्यासाठी ते लाभदायक असते. मंगळवारी षष्ठी तिथी व मघा नक्षत्र असेल तर पीडा होते. मंगळवारी एकादशीतिथी व आर्द्रा नक्षत्र असेल तर तो योग मृत्युदायक होतो. बुधवार, द्वितीया तिथी, मघा नक्षत्र; अथवा बुधवार, सप्तमी तिथी, आर्द्रा नक्षत्र; असा योग लाभदायक असतो. बुधवार, भरणी नक्षत्र असेल तर योग हानिकारक असतो. बुधवार व श्रवण नक्षत्र यांच्या योगास 'कालयोग' म्हणतात. बृहस्पतिवार, तृतीया तिथी, पूर्वाफाल्गुनी नक्षत्र यांचा योग लाभदायक होतो. बृहस्पतिवार, अष्टमी तिथी, धनिष्ठा, व आर्दा नक्षत्र; आणि गुरुवार, त्रयोदशी तिथी, आश्लेषा नक्षत्र हा योग मृत्युकारक असतो. शुक्रवार, चतुर्थी तिथी, पूर्वाभाद्रपदा नक्षत्र यांचा योग श्रीवृद्धी करणारा असतो. शुक्रवार, नवमी तिथी, पूर्वाषाढा नक्षत्र यांचा योग दुःखप्रद होतो. शुक्रवार, द्वितीया तिथी, भरणी नक्षत्र यांचा योग यमदंडाप्रमाणे हानिकारक असतो. शनिवार, पंचमी तिथी, कृत्तिका नक्षत्र यांचा योग लाभदायक होतो. शनिवार, दशमी तिथी, आश्लेषा नक्षत्र यांचा योग पीडाकारक होतो. शनिवार, पौर्णिमा तिथी, मघा नक्षत्र यांचा योग मृत्युकारक असतो.

आता दिशा, तिथी, दिन यांच्या योगांचे हानिलाभ पाहू. पूर्व, उत्तर, अग्नी, नैर्ऋत्य, दक्षिण, वायव्य, पश्चिम, ईशान्य या एकमेकांकडे पाहात असतात. प्रतिपदा व नवमी आदी तिथींत मेषादी राशींबरोबर रवी आदी वार आले की तो योग कार्यसिद्धी करणारा असतो. पूर्व दिशा, प्रतिपदा तिथी, मेष लग्न, रविवार; हा योग पूर्व दिशेसाठी युद्ध आदी कार्यासाठी सिद्धिदायक होतो. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, कुंभ या लग्नांनी पूर्ण विजय होतो. उरलेल्या राशी मृत्युकारक असतात. सूर्यादी ग्रह, रिक्ता, पूर्णा आदी तिथी यांचा क्रमशः न्यास करावा. सूर्यासंबंधी युद्धासाठी उत्तम फल नाही. सोमाचा संबंध संधीसाठी उपयुक्त होतो. मंगळाचा संबंध कलहकारी असतो. बुधाचा संबंध संग्रामात अभीष्ट साधनाची प्राप्ती करून देणारा असतो. गुरूच्या संबंधाने विजय प्राप्त होतो. शुक्राच्या संबंधाने अभीष्टाचा लाभ होतो.

शनीच्या संबंधाने युद्धात पराजय होतो.

आता पिंगला (पक्षी) चक्राचे शुभाशुभ पाहा. एका पक्ष्याचा आकार लिहून त्याचे मुख, नेत्र, ललाट, शिर, हस्त, कुक्षी, चरण, पंख यांत सूर्याच्या नक्षत्राची तीन तीन नक्षत्रे लिहावीत. पायांच्या तीन नक्षत्रांत रण केले तर मृत्यू होतो. पंखधारी तीन नक्षत्रांत युद्ध केले तर धनाचा नाश होतो. मुखधारी तीन नक्षत्रांत पीडा होते. शिरधारी तीन नक्षत्रांत कार्याचा नाश होतो. कुक्षिधारी तीन नक्षत्रांत रणावर उत्तम फल मिळते. आता राहुचक्राचे फल पाहा. पूर्वेपासून नैर्ऋत्यकोणापर्यंत, नैर्ऋत्यकोणापासून उत्तरेपर्यंत, उत्तरेपासून अग्निकोणापर्यंत अग्निकोणापासून पश्चिमेपर्यंत, पश्चिमेपासून वायव्येपर्यंत, वायव्येपासून उत्तरेपर्यंत चार चार दंडपर्यंत राहूचे भ्रमण असते. राहूची पुष्टी पाहून रण केल्यास विजय प्राप्त होतो. राहूच्या सम्मुख राहिल्यास मृत्यू येतो.

यानंतर शिवांनी पार्वतीसाठी तिथिराहूचे वर्णन केले आहे. पौर्णिमेनंतर कृष्णपक्षाच्या प्रतिपदेपासून अग्निकोणापासून ईशानकोणापर्यंत अर्थात कृष्णपक्षाच्या अष्टमीपर्यंत राहू पूर्वदिशेस असतो. त्या दिशेस युद्ध केल्यास जय होतो. याप्रमाणे ईशान्येपासून अग्निकोणापर्यंत व नैर्ऋत्येपासून वायव्यकोणापर्यंत राहूचे भ्रमण होत असते. असेच भद्रातिथीचेही वर्णन आले आहे. कृष्णपक्षातील तृतीया, सप्तमी, दशमी, व चतुर्दशी या 'भद्रा' असतात. शुक्लपक्षातील चतुर्थी, एकादशी, अष्टमी, पौर्णिमा 'भद्रा' असतात. भद्रेचा निवास अग्निकोणापासून वायव्यकोणापर्यंत असतो. अ, क, च, ट, त, प, य, श या आठ वर्गांचे स्वामी क्रमश: सूर्य, चंद्रमा, मंगळ, बुध, बृहस्पती, शुक्र, शनी, राहू हे ग्रह असतात. या ग्रहांची वाहने अनुक्रमे गृध्र, उलूक, बाज, पिंगल, कौशिक (उलूक), सारस, मयूर, गोरंक नावाचा पक्षी, अशी असतात. हवन करून प्रथम मंत्रसिद्धी करावी. उच्चाटनात मंत्रांचा प्रयोग पल्लवरूपाने असावा.

वश्य, ज्वर, आकर्षण यांत पल्लवाचा प्रयोग सिद्धिकारक असतो. शांती व मोहनप्रयोगात 'नमः' म्हणावे. पुष्टी व वशीकरणात

'वौषट्' म्हणावे. मारण व प्रीतिविनाशाच्या प्रयोगांत 'हुम्' म्हणावे. विद्वेषण व उच्चाटणात 'फट्' म्हणावे. पुत्रादी प्राप्तीसाठी 'वषट्' म्हणावे.

यानंतर सर्व प्रकारचे रक्षण करणाऱ्या औषधी याच अध्यायात आल्या आहेत. महाकाली, चंडी, वाराही, ईश्वरी, इंद्राणी (सिंधुवार); यांना शरीरात धारण केले तर धारकाचे संरक्षण होते. बला (कुट), अतिबला (कंघी), भीरु (शतावरी वा कंटकारी), मुसली (तालमूली), सहदेवी, जाती, (चमेली), मल्लिका (मोतिया), यूथी (जुई), गारुडी, भृंगराज, चक्ररूपा; या औषधी धारण केल्यास युद्धात विजय मिळतो. ग्रहणात या औषधींना उखडणे शुभदायक असते.

हत्तीची सर्वांगसुंदर मातीची मूर्ती बनवावी. तिच्या पायांशी शत्रूचे स्वरूप राखावे. स्तंभनप्रयोग करावा. ज्या पर्वतावर एकच वृक्ष असेल त्याच्या खाली, जेथे वीज पडली असेल तेथे, वारुळाच्या मातीनें एक स्त्रीची प्रतिकृती बनवावी. नंतर 'ॐ नमो महाभैरवाय विकृतदंष्ट्रोग्ररूपाय पिंगलाक्षाय त्रिशूलखड्गधराय वौषट्' या मंत्रानें त्या मृत्तिकामयी देवीची पूजा करावी. याने शस्त्रसमूहाचे स्तंभन होते.

यानंतर संग्रामात विजय देणाऱ्या अग्निकार्याचे वर्णन आले आहे. रात्री स्मशानात जाऊन नागवे उघडे, शेंडी सोडून, दक्षिणाभिमुख बसून जळणाऱ्या चितेतील मनुष्याचे मांस, रुधिर, हाडे यांना मिळवून पुढील मंत्राने शंभरदा शत्रूंचे नाव घेऊन हवन करावे. 'ॐ नमो भगवति कौमारि लल लल लालय लालय घण्टादेवि । अमुकं मारय मारय सहसा नमोऽस्तु ते भगवति विद्ये स्वाहा' या मंत्राने शत्रू आंधळा होतो.

सर्व प्रकारच्या सफलतेसाठी हनुमानाचा मंत्र जपावा. तो असा आहे– 'ॐ वज्रकाय वज्रतुण्ड कपिलपिङ्गल करालवदनोर्ध्वकेश महाबल रक्तमुख तडिज्जिव्ह महारौद्र दंष्ट्रोत्कट कटकरालिन् महादृढप्रहार लङ्केश्वरसेतुबन्ध शैलप्रवाह गगनचर, एह्येहि भगवन्महाबलपराक्रम भैरवी ज्ञापयति, एह्येहि महारौद्र दीर्घलाङ्गूलेन अमुकं वेष्टय वेष्टय जम्भय जम्भय खन खन वैते हूं फट्।' या मंत्राचा जप ३८०० केल्यास हनुमान सर्व प्रकारच्या कार्यांत सिद्धी देतात. कपड्यावर हनुमानाची

मूर्ती काढून दाखविल्यास शत्रूचा नाश होतो.

## विविध मंडले, विविध ग्राम

एकशेसव्विसाव्या अध्यायात नक्षत्रासंबंधी पिंडाचे वर्णन आले आहे. यातच कुंभचक्र, सर्पाकार राहुचक्र, अर्धयामेश, त्रिपुष्करयोग, नक्षत्रांच्या स्वक्ष, मध्याक्ष, मन्दाक्ष, अंधाक्ष या संज्ञांची प्रयोजने, गडान्त-निरूपण इत्यादी विषय आले आहेत. एकशेसत्ताविसाव्या अध्यायात विभिन्न बलांचे वर्णन आले आहे. ' विष्कुंभयोग ', ' शूलयोग ', ' अति-गंडयोग ', ' व्याघात ', ' वज्रयोग ', ' परिघ ', ' व्यतिपात ',' वैधृती ', इत्यादी योग त्याज्य आहेत. यांत यात्रा, युद्धादी कार्ये करू नयेत. मेषादी राशी व ग्रह यांची शुभाशुभ फलेही यात सांगितली आहेत. राशींचा भोगकाल, चरादी संज्ञा इत्यादींचे वर्णन यात आले असून पुढल्या एकशेअठ्ठाविसाव्या अध्यायात कोटचक्राचे वर्णन आले आहे. पुढे एकशेएकतीस अध्यायापर्यंत अर्घकांडप्रतिपादन, विविध मंडलांचे वर्णन, घातचक्रादींचे वर्णन, इत्यादी विषय आले आहेत.

कृत्तिका, मघा, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, विशाखा, भरणी, पूर्वाभाद्रपदा; या नक्षत्रांना 'आग्नेय मंडल ' म्हणतात. या मंडलात जर विशेष वायूचा प्रकोप झाला, सूर्यचंद्रास परिवेष लागला, भूकंप झाला, देशाची क्षती झाली, चंद्र-सूर्याचे ग्रहण आले, धूमज्वाला दिसू लागली, दिशांना दाहाचा अनुभव येऊ लागला, केतू म्हणजे पुच्छलतारा दिसू लागला, रक्तवृष्टी झाली, अधिक गर्मीचा अनुभव आला, पत्तर पडू लागले, तर जनतेस नेत्राचा रोग, अतिसार, अग्निभय वाढते, गायी कमी दूध देऊ लागतात, वृक्षांना फुले, फळे कमी आली. उपज कमी होते. वर्षा स्वल्प होते. चारही वर्ण दुःखी होतात. मनुष्ये भुकेने व्याकुळ बनतात. अशी परिस्थिती ' आग्नेय मंडला 'ची होते. असे उत्पात झाल्यावर सिंधु-यमुनाची खोरी, गुजरात, भोज, बाल्हीक, जालंधर, काश्मीर, उत्तरा-पथ हे देश नष्ट होतात.

हस्त, चित्रा, मघा, स्वाती, मृगशिरा, पुनर्वसू, उत्तराफाल्गुनी, अश्विनी या नक्षत्रांचे ' वायव्य मंडल ' असून यातही पूर्वोक्त उत्पात

होऊन सर्वत्र हाहाकार होतो. सारी प्रजा नष्ट होते. त्रिपुर, कामरूप, कलिंग, कोशल, अयोध्या, उज्जैन, कोकण, आंध्र असे देश नष्ट होतात. आश्लेषा, मूळ नक्षत्रांना 'वारुण मंडल' म्हणतात. यात गायी अधिक दूध देतात. वृक्षांना फुले, फळे अधिक येतात. प्रजा आरोग्यपूर्ण असते. पृथ्वी धान्याने परिपूर्ण होते. अन्नाचा भाव स्वस्त होतो. देशात सुकाळ होतो. परंतु राजे लोकांत मात्र परस्पर युद्धे होतात. ज्येष्ठा, रोहिणी, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, उत्तराषाढा, अभिजित, या नक्षत्रांना 'माहेंद्र मंडल' म्हणतात. यात प्रजा प्रसन्न होते. कोणत्याच प्रकारचा रोग नसतो. राजे आपापसांत संधी करतात.

ग्राम दोन प्रकारचे असतात. पहिल्याचे नाव 'मुखग्राम' व दुसऱ्याचे नाव 'पुच्छग्राम' असते. चंद्र, राहू, सूर्य जेव्हा एकाच राशीत असतात, त्याला 'मुखग्राम' म्हणतात. राहूपासून सातव्या स्थानास 'पुच्छग्राम' म्हणतात. सूर्याच्या नक्षत्रापासून पंधराव्या नक्षत्रात चंद्रमा येतो, तेव्हा तिथिसाधनानुसार 'सोमग्राम' होतो. अर्थात ही पूर्णिमा तिथी असते.

## आणि विविध चक्रे

घातचक्राचे वर्णन केल्यानंतर युद्धातील जयाचे, पराजयाचे वर्णन आले आहे. सेनापतीच्या नावातील पहिले अक्षर जर 'दीर्घ' असेल, त्याच्या बाजूचा विजय संग्रामात होतो. पण तेच जर 'ऱ्हस्व' असेल तर त्याचा मृत्यू होतो. 'आदित्याचा' जय होईल, गुरूचा पराजय होईल. याचप्रमाणे 'नरचक्रा'चेही वर्णन आले आहे. नक्षत्रपिंडाच्या आधारावर हे वर्णन आले आहे. प्रथम मनुष्याचा एक आकार बनवावा. त्यावर मग नक्षत्रांचा न्यास करावा. पहिली तीन नक्षत्रे शिरावर, एक मुखात, दोन नेत्रात, चार हातांत, दोन कानांत, पांच हृदयात, सहा पायांत लिहून नामनक्षत्राचा स्पष्टरूपाने चक्राच्यामध्ये न्यास करावा. नेत्र, शिर, उजवा हात, दोनही पाय, हृदय, ग्रीवा, डावा हात, गुह्यांग यांत जेथे शनी, मगळ सूर्य, व राहू नक्षत्रे असतील, तर युद्धात त्या त्या अंगास घात होईल.

याचप्रमाणे जयचक्राचे वर्णनही याच एकशेएकतिसाव्या अध्यायात आले आहे. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत दक्षिणउत्तर अशा तेरा रेखा आखाव्यात. त्यांत अ– पासून ह– पर्यंत अक्षरे ओळीने लिहावीत. १०, ९, ७, १२, ४, ११, १५, २४, १८, ४, २७, २४ या अंकांचाही न्यास करावा. अंक वरच्या ओळीत पश्चिमेकडून पूर्वेकडे लिहावेत. आणि अकारादी अक्षरे खाली लिहावीत. शत्रूच्या नामाक्षराच्या स्वर वा व्यंजन वर्णाच्यासमोर जे अंक असतील त्यांना जोडून पिंड बनवावा. त्याला साताने भागावे. एक आदी शेषाच्या अनुसार सूर्यादी ग्रहांनी भागावे. १ शेषात सूर्य, २ मध्ये चंद्र, ३ मध्ये भौम, ४ मध्ये बुध, ५ मध्ये गुरू, ६ मध्ये शुक्र, ७ मध्ये शनी असतो. जेव्हा सूर्य, शनी, मंगळ यांचा भाग येईल तेव्हा संग्रामात विजय होईल. शुभ ग्रहाच्या भागात संधी होतो.

जयचक्र

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | ९ | ७ | १२ | ४ | ११ | १५ | २४ | १८ | ४ | २७ | २४ |
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऌ | ॡ | ऐ | ओ |
| औ | अं | अः | क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ |
| य | ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | न | प |
| फ | ब | भ | म | य | र | ल | व | श | ष | स | ह |

आता या जयचक्रानुसार एक उदाहरण घेऊ. कोणाचे तरी नाव देवदत्त आहे. या नावातील अक्षरे व त्यांनुसार अंकांचा क्रम असा होईल. १८ + ४ + २४ + १८ + १५ = ७९. यांची बेरीज ७९ येईल. त्याला साताने भागल्यास $\frac{७९}{७}$ ११ हा भागाकार व २ हा अंक शिल्लक राहील. या शेषाच्या अनुसार सूर्यापासून गणून चंद्राचा भाग झाला. म्हणून संधी होईल. देवदत्त या माणसाचा संग्रामात कधीच पराजय होणार नाही. असेच आणखीही एक जयचक्र याच अध्यायात आले आहे.

पुढल्या एकशेबत्तिसाव्या अध्यायात अशाच सेवाचक्राचा विचार झालेला आहे. या चक्रावरून सेवकास सेव्याकडून होणारा हानिलाभ

समजून येतो. पिता, माता, बंधू, स्त्री-पुरुष या लोकांसाठी या चक्राचा विचार विशेषरूपानें होऊ शकतो. हे सेवाचक्र कसे तयार होते ? पूर्वेकडून पश्चिमेकडे सहा रेखा उभ्या व उत्तरेकडून दक्षिणेकडे आठ रेखा आडव्या माराव्यात. अशा तऱ्हेनें पस्तीस कोष्टकांचे सेवाचक्र तयार होईल. वरच्या पांच कोष्टकांत पांच स्वर लिहावेत. नंतर स्पर्शवर्ण लिहावेत. क-पासून ह-पर्यंत वर्णांचा न्यास करावा. ङ ञ, ण या वर्णांना सोडून द्यावे. खालील कोष्टकात क्रमानें सिद्ध, साध्य, सुसिद्ध, शत्रू व मृत्यू असे लिहावे. या प्रमाणे सेवाचक्र सर्वांगपूर्ण होते. या चक्रास शत्रू व मृत्यू नावांच्या कोष्टकात जो स्वर व जे अक्षर असेल, त्याचा प्रत्येक कार्यात त्याग करावा. सिद्ध, साध्य, प्रसिद्ध, शत्रू, मृत्यू नावांच्या कोष्टकात जर सेव्य व सेवकाच्या नावांचे आदी अक्षर पडेल तर ते सर्वथा शुभ होते. यात दुसरे कोष्टक पोषक, तिसरे धनदायक, चौथे आत्मनाशक, पांचवे मृत्युदायक असते. या चक्रानें मित्र, नोकर, बांधव यांच्यापासून लाभाचा विचार करावा.

**सेवाचक्र**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अ | इ | उ | ए | ओ |
| क | ख | ग | घ | च |
| छ | ज | झ | ट | ठ |
| ड | ढ | त | थ | द |
| ध | न | प | फ | ब |
| भ | म | य | र | ल |
| व | श | ष | स | ह |
| १ सिद्ध | २ साध्य | ३ सुसिद्ध | ४ शत्रू | ५ मृत्यू |

अशाच रीतीने या अध्यायात अकारादी वर्ग व तारा यांच्या द्वारे सेव्य-सेवकांचा विचार झाला आहे. अ वर्गाचा स्वामी देवता, क-वर्गाचा दैत्य, च-वर्गाचा नाग, ट-वर्गाचा गंधर्व, स-वर्गाचा ऋषी, प-वर्गाचा राक्षस, य-वर्गाचा पिशाच, श-वर्गाचा स्वामी मनुष्य मानला गेला आहे. यांत देवतापेक्षा बलवान दैत्य, दैत्यापेक्षा बलवान सर्प,

सर्पापेक्षा बलवान गंधर्व, गंधर्वापेक्षा बलवान ऋषी, ऋषीपेक्षा बलवान राक्षस, राक्षसापेक्षा बलवान पिशाच व पिशाचापेक्षा बलवान मनुष्य मानला गेला आहे. यात बलवानाने दुर्बलाशी व्यवहार करू नये. असेच 'ताराचक्रा 'चेही वर्णन आले आहे.

नामाक्षरांच्या स्वरांच्या संख्येनुसारही लाभहानीचा विचार झालेला आहे. सेव्यसेवक यांतील ज्याच्या नामाक्षरांत अल्प स्वर असतील तर तो ऋणी होतो. 'धन ' स्वर मित्रतेसाठी व 'ऋण ' स्वर दास्यासाठी मानला गेला आहे. मेष-मिथुन राशींत प्रीती, मिथुन-सिंह राशींत मैत्री, तुला-सिंह राशींत महामैत्री असते. धनु-कुंभ राशींत मैत्री नसते. मीन-वृष, वृष-कर्क, कर्क-कुंभ, कन्या-वृश्चिक, मकर-वृश्चिक, मीन-मकर या राशींत मैत्री व मिथुन-कुंभ, तुला-मेष राशींत महामैत्री असते. वृष-वृश्चिकात परस्पर वैर असते. मिथुन-धनु, कर्क-मकर, मकर-कुंभ, कन्या-मीन या राशींत परस्पर प्रीती राहते.

## नाना प्रकारच्या बलांचा विचार

एकशेतेहतिसाव्या अध्यायात शंकरांनी सूर्यादी ग्रहांच्या राशींत जन्मलेल्या नवजात शिशूच्या जन्मफलाचा विचार क्षेत्राधिपतीच्या अनुसार केला आहे. सूर्यगृह, सिंहलग्न यांत उत्पन्न झालेला बालक समकाय, कृशांग वा स्थूलांग, गौरवर्ण, पित्तप्रकृती, लाल नेत्रांचा, गुणवान व वीर असतो. चंद्रगृह व कर्कलग्न यांतील बालक भाग्यवान व कोमल शरीराचा असतो. मंगलगृह व मेष वा वृश्चिक लग्न असेल तर बालक वातरोगी व अत्यंत लोभी होईल. बुधगृह व मिथुन वा कन्या लग्न असेल तर बालक बुद्धिमान, सुंदर व मानी होईल. गुरुगृह व धनु वा मीन लग्न असेल तर बालक सुंदर व अत्यंत क्रोधी असेल. शुक्राचे गृह व तुला वा वृष लग्न असेल तर तो त्यागी, भोगी व सुंदर शरीराचा होईल. शनिगृह व मकर वा कुंभ लग्न असेल तर तो बुद्धिमान, सुंदर व मानी होईल. सौम्य लग्नाचा सौम्य होईल. क्रूर लग्नाचा क्रूर स्वभावाचा होईल.*

---

*मेष, मिथुन, सिंह, तुला, धनू, कुंभ; या राशी वा लग्न क्रूर व वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर, मीन; या राशी वा लग्न सौम्य असतात.

यानंतर नामराशीस अनुसरून सूर्यादी ग्रहांचे दशाफल सांगितले आहे. सूर्याच्या दशेत हत्ती, घोडा, धनधान्य, प्रबल राज्यलक्ष्मी यांची प्राप्ती होईल. चंद्राच्या दशेत दिव्य स्त्रीची प्राप्ती होईल. मंगळाच्या दशेत भूमिलाभ व सुख राहील. बुधाच्या दशेत भूमिलाभाबरोबर धन-धान्याची प्राप्ती होईल. गुरूच्या दशेत घोडा, हत्ती व धन प्राप्त होईल. शुक्राच्या दशेत खाद्यान्न, गोदुग्धपान, धन यांचा लाभ होईल. शनीच्या दशेत नाना रोग निर्माण होतील. राहूचे दर्शन होताच, ग्रहणकालात निश्चित स्थानावर निवास, दिवसा ध्यान, व्यापार अशी कामे करावीत.

जर वाम श्वास चालू असताना नामाची अक्षरे विषम संख्येची असतील तर त्या वेळी मंगळ, शनी, राहू यांचा निवास असतो. यात युद्ध केल्यास विजय होतो. दक्षिण श्वास चालू असताना जर नामातील अक्षरांची संख्या सम असेल तर ती वेळ सूर्याची असते. हीत व्यापार-कार्य निष्फल होते. पण या वेळी रणभूमीवर संग्राम केल्यास विजय होईल. पण हे युद्ध पायी करावे. स्वार होऊन केल्यास मृत्यू होईल.

'ॐ हूं, ॐ हूं, ॐ स्फें, अस्त्रं मोटय, ॐ चूर्णय, चूर्णय, ॐ सर्वशत्रुं मर्दय, मर्दय ॐ ऱ्हं, ॐ ऱ्हः फट्' या मंत्राचा सात वेळा न्यास करावा. ज्यांना चार, दहा, वीस भुजा आहेत, ज्यांच्या हातांत त्रिशूल, खट्वांग, खड्ग, कटचार अशी आयुधे आहेत, जे आपल्या सेनेस विमुख व शत्रु-सेनेचे भक्षण करणारे आहेत, त्या भैरवांचे आपल्या हृदयात ध्यान करून शत्रुसेनेच्या संमुख या मंत्राचा एकशे आठ वेळा जप करावा. त्यानंतर डमरूचा शब्द केल्यास शत्रुसेना शस्त्र टाकून पळून जाईल.

शत्रुसेनेच्या पराभवाचा आणखी एक उपाय आहे. स्मशानातील कोळशांची राख काक व उल्लूच्या विष्ठेत मिसळून तिने कपड्यावर शत्रूची प्रतिमा काढावी. त्याच्या शिरावर, मुखावर, ललाटावर, हृदया-वर, गुह्यावर, पायांवर, पृष्ठावर, बाहूवर, मध्यभागी शत्रूचे नाव नऊ वेळा लिहावे. या कपड्याची घडी घालून संग्रामाच्या वेळी ते आपल्या जवळ ठेवावे. पूर्वोक्त मंत्र म्हटल्यास विजय प्राप्त होईल.

विजय प्राप्त होण्यासाठी त्रिमुखाक्षर 'तार्क्ष्यचक्र'ही येथे सांगितले आहे. 'क्षिप ॐ स्वाहा तार्क्ष्यात्मा शत्रुरोग विषादिनुत्' या

मंत्रास 'तार्क्ष्यचक्र' म्हटले आहे. याच्या अनुष्ठानाने भूतबाधा, ग्रह-बाधा, अनेक प्रकारचे क्लेश नष्ट होतात. या गरुडमंत्राने सर्व कार्ये सिद्ध होतात. महातार्क्ष्याचे ध्यानही करावे.

यानंतर मंत्रसाधनाने होणारी 'पिच्छिका-क्रिया' पाहा. 'ॐ हूं पक्षिन् क्षिप, ॐ हूं सः महाबल-पराक्रम सर्वसैन्यं भक्षय भक्षय, ॐ मर्दय मर्दय, ॐ चूर्णय चूर्णय, ॐ विद्रावय विद्रावय, ॐ हूं खः, ॐ भैरवो ज्ञापयति स्वाहा' असा 'पिच्छिकामंत्र' चंद्रग्रहणात जपावा. साधकास शत्रूवर विजय मिळेल. सिंहारूढ होऊन तो शत्रूस मारू शकेल.

केवळ मंत्रोच्चारामुळे शत्रूचा नाश होईल. यासंबंधीही एक उपाय आहे. कालरात्रीस (आश्विन शुक्ल अष्टमीस) मातृकांना चरू प्रदान करावा. स्मशानातील भस्म, मालतीपुष्प, चामरी, कापसाचे मूळ यांच्याद्वारे शत्रूस दुरूनच संबोधित करून पुढील मंत्र म्हणावा. 'ॐ अहे हे महेन्द्रि । ॐ अहे महेन्द्रि भञ्ज हि । ॐ जहि मसानं खाहि खाहि, लिलि लिलि, ॐ हूं फट् ।' या भंगविद्येचा जप करून शत्रूचा पराजय करता येतो.

आणखी एक सर्वार्थसाधक मंत्र भोजपत्रावर वृत्ताकार लिहून बारा मातृकांत साकार करावा. या विद्येस प्रथम ब्रह्मा, विष्णु, रुद्र व इंद्र यांनी धारण केले होते. याच विद्येद्वारे बृहस्पतीने देवासुरसंग्रामात देवांचे रक्षण केले होते. हा मंत्र असा आहे– 'ॐ किलि किलि विकिलि इच्छाकिलि भूतहनि शंखिनी, उमे दंडहस्ते रौद्रि माहेश्वरी, उल्कामुखि ज्वालामुखि शंकुकर्णे शुष्कजंघे अलंबुषे हरहर, सर्वदुष्टान् खन खन, ॐ यन्मान्निरीक्षयेद् देवि ताँस्तान् मोहय, ॐ रुद्रस्य हृदये स्थिता रौद्रि सौम्येन भावेन आत्मरक्षां ततः कुरु स्वाहा।'

यानंतर रक्षामंत्राचे वर्णन केले आहे. रक्षारूपिणी नारसिंही, शक्तिरूपा भैरवी व त्रैलोक्यमोहिनी गौरीने देवासुरसंग्रामात देवांचे रक्षण केले होते. अष्टदलकमलाच्या कर्णिकेत व दलात गौरीच्या ऱ्हीं मंत्राने संपुटित आपले नाम लिहावे. पूर्व दिशेपासून प्रथमादी दलात पूजेस अनुसरून गौरीच्या अंगदेवतांचा न्यास करावा. असे हे रक्षायंत्र तयार होते. यानंतर मृत्युंजयमंत्र, आणखी एक रक्षायंत्र, भेलखी विद्या,




रक्षायंत्राचे स्वरूप

इत्यादी विषयही या अध्यायात आले आहेत. भेलखीविद्येचा मंत्र असा आहे– 'ॐ वातले वितले विडालंमुखि इन्द्रपुत्रि उद्भवो वायुदेवेन खीलि आजी हाजा मथि वाह इहादिदु:खनित्यकण्ठोच्चैर्मुहूर्त्तान्विया अह मां यस्माहमुपाहि ॐ भेलखि ॐ स्वाहा.' नवरात्रीच्या समयी या सिद्धमंत्राचा संग्रामात जप सात वेळा केला तर शत्रूचे मुखस्तंभन होते. 'ॐ चण्डि, ॐ हूं फट् स्वाहा' या मंत्राचा संग्रामात सात वेळा जप केला तर खड्गयुद्धात विजय होतो.

## त्रैलोक्यविजय-विद्या

समस्त यंत्रमंत्रांना नष्ट करणारी 'त्रैलोक्यविजयाविद्या' भगवान महेश्वरांनी एकशेचौतिसाव्या अध्यायात सांगितली आहे. या विद्येचे स्वरूप असे आहे.

'ॐ हूं क्षूं ह्रूं ॐ नमो भगवति दंष्ट्रिणी भीमवक्त्रे महोग्ररूपे हिली हिली, रक्तनेत्रे किलि किलि, महानिस्वने कुलु, ॐ विद्युज्जिव्हे कुलु, ॐ निर्मांसे कट कट, गोनसाभरणे चिलि चिली, शवमालाधारिणि द्रावय, ॐ महारौद्रि सार्द्रचर्मकृताच्छदे विजृम्भ. ॐ नृत्यासिलता-

धारिणि भ्रुकुटीकृतापाङ्गे विषमनेत्रकृतानने वसामेदोविलिप्तगात्रे कह कह, ॐ हस हस, क्रुध्य क्रुध्य, ॐ नीलजीमूतवर्णेऽभ्रमालाकृताभरणे विस्फुर, ॐ घण्टारवाकीर्णदेहे, ॐ सिंसिस्थेऽरुणवर्णे, ॐ ह्रां ह्रीं ह्रूं. रौद्ररूपे ह्रीं ह्रूं क्लीं, ॐ ह्रीं ह्रूंमोमाकर्ष, ॐ धून धून, ॐ हे हः खः, वज्रिणि हूं क्ष क्षां क्रोधरूपिणि प्रज्वल प्रज्वल, ॐ भीमभीषणे भिन्द, ॐ महाकाये छिन्द, ॐ करालिनि किटि किटि, महाभूतमातः सर्वदुष्ट-निवारिणि जये, ॐ विजये ॐ त्रैलोक्यविजये हूं फट् स्वाहा ॥'

या त्रैलोक्यविजयविद्यामंत्राचा अर्थ असा, 'ॐ हूं ह्रूं ॐ, मोठ-मोठ्या दाढांनी तिची आकृती अत्यंत भयंकर आहे. त्या महोग्ररूपिणी भगवतीस नमस्कार असो. ती रणांगणावर स्वेच्छापूर्वक क्रीडा करते. लाल नेत्रवाली, किलकारी कर. किलकारी कर. भीमनादिनी कुलु, ॐ विद्युज्जिव्हे, कुलु. ॐ मांसहीने, शत्रूंना आच्छादित कर. आच्छादित कर. भुजंगमालिनी, वस्त्राभूषणांनी अलंकृत हो, अलंकृत हो. शवमाला-विभूषिते, शत्रूंचे मर्दन कर. ॐ शत्रूंच्या रक्ताने माखलेल्या कातड्याचे कपडे घालणारी महाभयंकरी, आपले मुख उघड. ॐ नृत्यमुद्रेत तलवार धारण करणारी, वक्र भुवयांनी युक्त अशा तिरप्या नेत्रांनी बघणारी, विषम नेत्रांनी विकृत मुख धारण करणारी, तू स्वतःच्या अंगावर मज्जा व मांस लपेटलेले आहेस. ॐ अट्टहास कर. अट्टहास कर. हास हास. क्रुद्ध हो, क्रुद्ध हो. ॐ नीलवर्णाच्या मेघासमान वर्णवाली, मेघमालेस आभरणरूपात धारण करणारी, विशेषरूपाने तू प्रकाशित हो.

'ॐ घंटेच्या ध्वनीने शत्रूंच्या शरीरांना विदीर्ण करणारी, ॐ सिंसिस्थिते, रक्तवर्णे, ॐ ह्रां ह्रीं ह्रूं रौद्ररूपे, ह्रूं ह्रीं क्लीं ॐ ह्रीं ह्रूं ॐ शत्रूंना तू आकर्षित कर. त्यांना थरकाप वाटू दे. त्यांना हलू दे. ॐ हे हः खः वज्रहस्ते, ह्रूं क्षूं क्षां क्रोधरूपिणी, प्रज्वलित हो. प्रज्वलित हो. ॐ महाभयंकरास भीती दाखविणारी, त्यांना चिरून टाक. ॐ विशाल शरीराच्या देवी, त्यांना मारून टाक. ॐ करालरूपे, शत्रूंना भीती दाखीव. भीती दाखीव. महाभयंकर भूतांची जननी, सर्व दुष्टांचा विनाश करणाऱ्या जये, ॐ विजये, ॐ त्रैलोक्यविजये, हूं फट् स्वाहा।'

विजयाच्या हेतूने नीलवर्णा, प्रेताधिरूढा, त्रैलोक्यविजयाविद्येची

वीस हात उंचीची प्रतिमा बनवून तिची पूजा करावी. पंचांगन्यास करून रक्तपुष्पांचे हवन करावे. या त्रैलोक्यविजयाविद्येच्या पाठाने समरभूमीवरील शत्रूंच्या सेना पलायन करतात.

'ॐ नमो बहुरूपाय स्तम्भय स्तम्भय ॐ मोहय, ॐ सर्वशत्रून् द्रावय, ॐ ब्रह्मणमाकर्षय, ॐ विष्णुमाकर्षय, ॐ महेश्वरमाकर्षय, ॐ इन्द्रं टालय, ॐ पर्वतांश्चालय, ॐ सप्तसागराञ्शोषय, ॐ चिछन्द चिछन्द बहुरूपाय नम: '—' ॐ अनेक रूपास नमस्कार असो. शत्रूचे स्तंभन करावे. स्तंभन करावे. ॐ सम्मोहन करावे. ॐ सर्व शत्रूंचे मर्दन करावे. ॐ ब्रह्मदेवांना आकर्षित करावे. ॐ विष्णूंना आकर्षित करावे. ॐ महेश्वरांना आकर्षित करावे. ॐ इंद्राला भयभीत करावे. ॐ पर्वतांना विचलित करावे. ॐ सात समुद्रांना सुकवून टाकावे. ॐ कापून टाकावे. कापून टाकावे. अनेकरूपास नमस्कार असो.

मातीची मूर्ती बनवून तीत शत्रूला स्थापित करावे. त्या मूर्तीतील शत्रूचे नाव भुजंग असते. 'ॐ बहुरूपाय' या मंत्राने अभिमंत्रित करून त्याचा नाश करावा. या मंत्राचा जप करावा. यामुळे शत्रूचा नाश होईल.

## आणि अशी संग्रामविजयविद्या

एकशेपस्तिसाव्या अध्यायात संग्रामात विजय देणारी विद्या एका मंत्राच्या रूपात महेश्वरांनी दिलेली आहे. तो मंत्र असा—

'ॐ ऱ्हीं चामुण्डे श्मशानवासिनि खट्वाङ्गकपालहस्ते महाप्रेत- समारूढे महाविमानसमाकुले कालरात्रि महागणपरिवृते महामुखे बहुभुजे घण्टाडमरुकिङ्किणि अट्टाट्टहासे किलि किलि, ॐ हूं फट्, दंष्ट्राघोरान्ध कारिणि नादशब्दबहुले गजचर्मप्रावृतशरीरे मांसदिग्धे लेलिहानोग्राजिव्हे महाराक्षसि रौद्रदंष्ट्राकराले भीमाट्टाट्टहासे स्फुरद्विद्युत्प्रभे चल चल, ॐ चकोरनेत्रे चिलि चिलि, ॐ ललल्लाज्जहे, ॐ भीं भृकुटीमुखि हुंकारभयत्रासनि कपालमालावेष्टितजटामुकुटशशांकधारिणि, अट्टाट्टहासे किलि किलि, ॐ ऱ्हू दंष्ट्राघोरान्धकारिणि, सर्वविघ्नविनाशिनि, इदं कर्म साधय साधय, ॐ शीघ्रं कुरु कुरु, ॐ फट्, ओमङ्कुशेन शमय, प्रवेशय,

ॐ रङ्ग रङ्ग, कम्पय, कम्पय, ॐ चालय, ॐ रुधिरमांसमद्यप्रिये हन हन; ॐ कुट्ट कुट्ट, ॐ छिन्द, ॐ मारय ओमनुक्रमय, ॐ वज्रशरीरं पातय, ॐ त्रैलोक्यगतं दुष्टमदुष्टं वा गृहीतमगृहीतं वाऽऽवेशय, ॐ नृत्य, ॐ वन्द, ॐ कोटराक्ष्यूर्ध्वकेश्युलूकवदने करङ्किणि, ॐ करङ्कमालाधारिणि दह, ॐ पच पच, ॐ गृण्ह, ॐ मण्डलमध्ये प्रवेशाय, ॐ किं विलम्बसि ब्रह्मसत्येन विष्णुसत्येन रुद्रसत्येनर्षिसत्येनावेशय, ॐ किलि किलि, ॐ खिलि खिलि, विलि विलि, ॐ विकृतरूपधारिणि कृष्णभुजंगवेष्टित-शरीरे सर्वग्रहावेशिनि प्रलम्बौष्ठिनि भ्रूमङ्गलग्ननासिके विकटमुखि कपिलजटे ब्राह्मि भञ्ज, ॐ ज्वालामुखि स्वन, ॐ पातय, ॐ रक्ताक्षि घूर्णय, भूमिं पातय, ॐ शिरो गृण्ह, चक्षुर्मीलय, ॐ हस्तापादौ गृण्ह, मुद्रां स्फोटय, ॐ फट्, ॐ विदारय, ॐ त्रिशूलेन च्छेदय, ॐ वज्रेण हन, ॐ दण्डेन ताडय ताडय, ॐ चक्रेण च्छेदय च्छेदय, ॐ शक्त्या भेदय, दंष्ट्रया कीलय, ॐ कर्णिकया पाटय, ओमङ्कुशेन गृण्ह, ॐ शिरोऽक्षिज्वमैकाहिकं, द्वयाहिकं त्र्याहिकं चातुर्थिकं डाकिनिस्कन्दग्रहान् मुञ्च मुञ्च, ॐ पच, आमुत्सादय, ॐ भूमिं पातय, ॐ गृण्ह, ॐ ब्रह्माण्येहि, ॐ माहेश्वर्येहि, ॐ कौमार्येहि, ॐ वैष्णव्येहि, ॐ वाराह्येहि, ओमैन्द्रयेहि, ॐ चामुण्ड एहि, ॐ रेवत्येहि, ओमकाशरेवत्येहि, ॐ हिमवच्चारिण्येहि, ॐ रुरुमर्दिन्यसुरक्षयंकर्याकाशगामिनि पाशेन बन्ध बन्ध, अङ्कुशेन कट कट, समये तिष्ठ, ॐ मण्डलं प्रवेशय, ॐ गृण्ह, मुखं बन्ध, ॐ चक्षुर्बन्ध, हस्तपादौ च बन्ध, दुष्टग्रहान् सर्वान् बन्ध, ॐ दिशो बन्ध, ॐ विदिशो बन्ध, अ स्ताद्बन्ध, ॐ सर्वं बन्ध, ॐ भस्मना पानीयेय वा मृत्तिकया सर्षपैर्वा सर्वानावेशय, ॐ पातय, ॐ चामुण्डे किलि किलि, ॐ विच्चे हुं फट् स्वाहा ॥"

या संग्रामविजयविद्येचा भावार्थ असा– 'ॐ ह्रीं चामुंडेदेवी, तू स्मशानात वास करणारी आहेस. तुझ्या हातात खट्वांग व कपाल शोभा पावतात. तू महान प्रेतावर आरूढ झाली आहेस. तू मोठमोठ्या विमानांनी घेरली आहेस. तूच कालरात्री आहेस. मोठमोठे पार्षदगण तुझ्याभोवती आहेत. तुझे मुख विशाल आहे. तुला पुष्कळ भुजा आहेत.

घंटा, डमरू, घुंघरू वाजवून विकट हास्य करणाऱ्या देवी, क्रीडा कर. क्रीडा कर. ॐ हूं फट्. तू तुझ्या दाढांनी घोर अंधकार प्रकट करतेस. तू गंभीर घोष व शब्द अधिक मात्रांत अभिव्यक्त करतेस. तुझें शरीर हत्तीच्या चामड्यानें वेष्टित आहे. तू शत्रूंच्या मांसानें परिपुष्ट झाली आहेस. तुझी भयानक जीभ लपलप करते आहे. महाराक्षसी, भयंकर दाढांमुळे तुझी आकृती मोठी विकराळ वाटते. तुझा अट्टहासही भयानक आहे. तुझी कांती चमकणाऱ्या विजेसारखी आहे. तू संग्रामात विजय देण्यासाठी चल चल. ॐ चकोरनेत्रे, चिलि चिलि. ॐ ललजिव्हे (लपलप करणाऱ्या जिव्हेस धारण करणारी) ॐ भीं वाकड्या भुवयांनी युक्त मुख धारण करणारी, तुझ्या हुंकारमात्रानें भय व त्रास निर्माण होतात. तू नरमुंडांच्या मालेनें वेष्टित जटामुकुटात चंद्रन्यास धारण करतेस. विकट अट्टहास करणाऱ्या देवी, किलि किलि (रणभूमीवर क्रीडा कर क्रीडा कर.) ॐ हूं दाढांनी घोर अंधकार प्रकट करणारी, संपूर्ण विघ्नांचा नाश करणाऱ्या देवी, तू माझ्या या कार्याची सिद्धी कर. सिद्धी कर. ॐ शीघ्र कर. शीघ्र कर. ॐ फट्.

'ॐ अंकुशानें शांत कर. प्रवेश कर. ॐ रक्तानें रंग, रंग थरकाप उडीव. थरकाप उडीव. ॐ विचलित कर. ॐ रुधिरमांसमद्यप्रिये, शत्रूंचा नाश कर. नाश कर. ॐ विपक्षी योद्ध्यांना कुटून काढ. कुटून काढ. ॐ कापून काढ. ॐ मारून टाक. ॐ त्यांचा पाठलाग कर. ॐ वज्रतुल्य शरीर धारण करणाऱ्यांना मारून टाक. ॐ त्रिलोकात विद्यमान असणारा शत्रू, तो दुष्ट असो, अदुष्ट असो, पकडला गेला असेल वा नसेल, तू त्याला आविष्ट कर. ॐ नृत्य कर. ॐ वन्दन असो, ॐ कोटराक्षी, ऊर्ध्वकेशी, उलूकवदने, हाडांची माळ धारण करणारी, चामुंडे, तू शत्रूंना जाळून टाक. ॐ त्यांना शिजव शिजव. ॐ त्यांना पकड. ॐ मडलाच्या आत प्रवेश कर. ॐ आता तू विलंब का करतेस? तू ब्रह्मदेवांना सत्यानें, विष्णूंना सत्यानें, रुद्रांना सत्यानें, ऋषींना सत्यानें आविष्ट कर. ॐ किलि किलि. ॐ खिलि खिलि. विलि विलि. ॐ विकृत रूप धारण करणारी देवी, तुझ्या शरीरावर काळे सर्प लपेटून आहेत. तू सर्व ग्रहांना आविष्ट करतेस. तुझे लांब लांब ओठ लटकत आहेत.

तुझ्या वक्र भुवया नाकापर्यंत आल्या आहेत. तुझे मुख विकट आहे तुझ्या जटा कपिलवर्णाच्या आहेत. तू ब्रह्माची शक्ती आहेस. तू शत्रूचा भग करावास. ॐ ज्वालामुखी, गर्जना कर. ॐ तू शत्रूंना मार. ॐ लाल लाल नेत्रांच्या देवी, तू शत्रूंना मारून टाक. त्यांना धाराशायी कर. ॐ शत्रूंची शिरे उतरून टाक. त्यांचे डोळे बंद कर. ॐ त्यांचे हात-पाय घे. त्यांच्या अंगमुद्रा फोडून टाक. ॐ फट् ॐ विदीर्ण कर. ॐ त्रिशूलाने छेद कर. ॐ वज्राने हनन कर. ॐ दंडचाने पिटून काढ. पिटून काढ. ॐ चक्राने तू त्यांना छिन्न भिन्न कर. ॐ शक्तीने भेदन कर. दाढेने चिरडून टाक. ॐ तू त्यांना कात्रीने चिरून टाक. त्यांना अंकुशाने मारून टाक.

'ॐ शिराचे रोग, नेत्रांची पीडा, प्रतिदिन येणारा ज्वर, चौथ्या दिवशी येणारा ज्वर, डाकिनी यांना कुमारग्रहांसहित शत्रुसेनेवर सोड. सोड. त्यांना शिजव. शत्रूंचे उन्मूलन कर. त्यांना भूमीवर पाड. त्यांना पकड. ॐ ब्रह्माणी, ये. ॐ माहेश्वरी ये. ॐ कौमारी ये. ॐ वैष्णवी, ये. ॐ वाराही, ये. ॐ ऐंद्री ये. ॐ चामुंडे, ये. ॐ रेवती, ये. ॐ आकाश-रेवती, ये. ॐ हिमालयावर फिरणारी देवी, तू ये. ॐ रुरुमर्दिनी, असुर-क्षयंकारी, आकाशगामिनी देवी, विरोधकांना तू पाशाने बांध. बांध. अंकुशाने आच्छादित कर. आच्छादित कर. ॐ शत्रूंना पकड. त्यांच्या मुसक्या बांध. ॐ त्यांचे नेत्र बांध. हात-पायही बांध. आम्हांस सताव-णाऱ्या समग्र दुष्ट ग्रहांना बांधून टाक. ॐ दिशांना बांधून टाक. ॐ विदिशांना बांध. खालून बांध. ॐ सर्व बाजूंनी बांध. ॐ भस्माने, जलाने, मातीने अथवा सरसांनी सर्वांना आविष्ट कर. ॐ खाली पाड. ॐ चामुंडे, किलि किलि. ॐ विच्चे हुं फट् स्वाहा.'

ही अशी 'जया' नावाची पदमाला आहे. ती सर्व कर्मांची सिद्धी करते. हिच्या पाठाने युद्धात विजय मिळतो. अठ्ठावीस भुजांनी युक्त असणाऱ्या चामुंडादेवीचा विजय असो. तिचे ध्यान करावे. तिच्या दोन हातांत तलवार व खेटक आयुधे आहेत. दुसऱ्या दोन हातांत गदा व दंड आहेत. अन्य दोन हातांत धनुष्य व बाण आहेत. आणखी दोन हातांत मुष्टी व मुद्गर आहेत. दुसऱ्या दोन हातांत शंख व खड्ग

आहेत. अन्य दोन हातांत ध्वज व वज्र आहेत. आणखी दोन हातांत चक्र व परशू आहेत. अन्य दोन हातांत डमरू व दर्पण आहेत. आणखी दोन हात शक्ती व कुंद यांनी शोभतात. अन्य दोन हातांत हल व मुसल आहेत. आणखी दोन हातांत पाश व तोमर आहेत. अन्य दोन हातांत ढक्का व पणव आहेत. दुसऱ्या दोन हातांत अभयाची मुद्रा आहे. उरलेल्या दोन हातांत मुष्टिक शोभून दिसतो. ती महिषासुरास भागावते व त्याचा वध करते. अशा प्रकारे तिचे ध्यान करून शत्रूंवर विजय मिळविता येतो. तूप, मध, साखरमिश्रित तिल यांचे हवन करावे. या संग्रामविजयविद्येच्या उपदेशानें काय काय मिळणार नाही ?

## त्रिनाडीचक्र वा फणीश्वरचक्र

यानंतर एकशेछत्तिसाव्या अध्यायात नक्षत्रांच्या त्रिनाडीचक्राची वा फणीश्वरचक्राची माहिती दिली आहे. त्रिनाडीचक्र यात्रादी प्रसंगी उपयुक्त असते. अश्विनी आदी नक्षत्रांत तीन नाड्यांनी भूषित चक्र अंकित करावे. प्रथम अश्विनी, आर्द्रा, पुनर्वसू अंकित करावीत नंतर उत्तराफाल्गुनी, हस्त, ज्येष्ठा, मूल, शतभिषा, पूर्वाभाद्रपदा; या नक्षत्रांना लिहावे. ही प्रथम नाडी म्हटली जाते. दुसरी नाडी अशा प्रकारची आहे. भरणी, मृगशिरा, पुष्य, पूर्वाफाल्गुनी, चित्रा, अनुराधा, पूर्वाषाढा, धनिष्ठा, उत्तराभाद्रपदा. तिसऱ्या नाडीची नक्षत्रे अशी आहेत– कृत्तिका, रोहिणी, आश्लेषा, मघा, स्वाती, विशाखा, उत्तराषाढा, श्रवण व रेवती. सारांश त्रिनाडीचे स्वरूप थोडक्यात असे आहे;

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ अश्विनी | आर्द्रा | पुनर्वसू | उत्तरा-फाल्गुनी | हस्त | ज्येष्ठा | मूल | शता-भिषा | पूर्वा-भाद्रपदा |
| २ भरणी | मृग-शिरा | पुष्य | पूर्वा-फाल्गुनी | चित्रा | अनु-राधा | पूर्वा-षाढा | धनिष्ठा | उत्तरा-भाद्रपदा |
| ३ कृत्तिका | रोहिणी | आश्लेषा | मघा | स्वाती | विशाखा | उत्तरा-षाढा | श्रवण | रेवती |

या तीन नाड्यांच्या नक्षत्रांद्वारे सेवित ग्रहांच्या अनुसार शुभा-

शुभ फल प्राप्त होते. या त्रिनाडीचक्रासच 'फणीश्वरचक्र'ही म्हणतात. या चक्रगत नक्षत्रावर जर सूर्य, मंगळ, शनैश्चर व राहू असतील तर अशुभ योग समजावा. अन्य ग्रहांवर अधिष्ठित झाल्यावर नक्षत्र शुभ होते. देश, ग्राम, बंधू, भार्या यांनी आपल्या नावांच्या आद्य अक्षरांनुसार एक नाडीचक्रात पडते तर ते शुभकारक होते.

अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशिरा, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वाफाल्गुनी, उत्तराफाल्गुनी, हस्त, चित्रा, स्वाती विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शतभिषा, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा व रेवती; अशी एकूण सत्तावीस नक्षत्रे आहेत.

## महामारीविद्येचे वर्णन

एकशेसदतिसाव्या अध्यायात महेश्वरांनी देवीस महामारीविद्या समजावून दिली आहे. ही विद्या शत्रूंचे मर्दन करणारी आहे. या विद्येचा मंत्र असा आहे. 'ॐ ह्रीं महामारि रक्ताक्षी कृष्णवर्णे यमस्याज्ञाकारिणि सर्वभूतसंहारकारिणि अमुक हन हन, ॐ दह दह, ॐ पच पच, ॐ चिछन्द चिछन्द, ॐ मारय मारय, ओमुत्सादयोत्सादव, ॐ सर्वसत्त्ववशकरि सर्वकामिने हूं फट् स्वाहा' ॐ ह्रीं लाल नेत्रांची, काळ्या रंगाची महामारी, तू यमराजाची आज्ञा मानणारी आहेस. सर्व भूतांचा संहार करणारी आहेस. माझ्या अमुक शत्रूंचे तू हनन कर, हनन कर. ॐ त्यांना जाळून टाक. जाळून टाक. ॐ त्यांना शिजव शिजव. ॐ त्यांना कापून टाक, कापून टाक. ॐ त्यांना मार, मार. ॐ उखडून फेक, उखडून फेक. ॐ सर्व प्राण्यांना वश करणारी व सर्व कामना पूर्ण करणारी देवी, हूं फट् स्वाहा.

ॐ मारी, ॐ महामारी, ॐ कालरात्री, ॐ कृष्णवर्णी, ॐ तारकाक्षी, विद्युज्जिव्हा, सर्वतत्त्वभयंकरी, ॐ महामारी, सर्व भूतदमनी, महाकाली इत्यादी नावांनी अंगन्यास करावेत. साधकाने या वेळी मुड्यावरील वस्त्र चौकोनी आकारात फाडावे. त्याची लांबीरुंदी तीन तीन हातांची असावी. त्या वस्त्रावर अनेक रंगांनी देवीचे एक चित्र

काढावे. त्याला तीन मुखे व चार भुजा असाव्यात. तिच्या हातांत धनुष्य, शूल, कात्री, खट्वांग अशी आयुधे असावीत. तिचे एक मुख पूर्वेस, दुसरे दक्षिणेकडे असावे. तिची जीभ लाल असावी. ती पाहाण्यास भयानक असावी. तिचे विकराल मुख दाढांनी अत्यंत उत्कट व भयंकर दिसते. ती जिभेने दोनही गालांवर चाटीत असते. ती दृष्टीस पडताच घोडयादिकांनाही खाऊन टाकते. देवीचे तिसरे मुख पश्चिमेकडे असते. त्याचा रंग शुभ्र असतो. समोरचा हत्ती खाण्यासाठी ती उत्सुक असते. गंध, पुष्प, तूप, मद्य इत्यादींनी तिची पूजा करावी.

पूर्वोक्त मंत्राचे स्मरण केल्यास नेत्र व मस्तक आदींचे रोग नाहीसे होतात. यक्ष व राक्षसही वश होतात. शत्रूंचा नाश होतो.

## तंत्रविषयक सहा संप्रदाय

यानंतर महादेवांनी पार्वतीस शांती, वश्य, स्तंभन, द्वेष, उच्चाटण, मारण हे सहा तंत्रविषयक मंत्र वा कर्मे सांगितली आहेत. या सहा कर्मानुसार सहा संप्रदाय वा विन्यास होतात ते असे. पल्लव, योग, रोधक, सम्पुट, ग्रन्थन, विदर्भ; हे ते सहा संप्रदाय आहेत. भोजपत्रादी घेऊन ज्याचे उच्चाटण करायचे असेल त्याचे नाव त्यावर लिहावे. त्यानंतर उच्चाटणासंबंधी मंत्र लिहावा. हा 'पल्लव' नावाचा विन्यास वा संप्रदाय होय. हा उच्चकोटीचा एक महान उच्चाटनकारी प्रयोग आहे प्रथम मंत्र लिहावा. नंतर व्यक्तीचे नाव लिहावे. अशाच प्रकारे सहाही मंत्रांचे वर्णन केले आहे.

शत्रूंचा संहार करण्यासाठी 'योग' नावाचा संप्रदाय आहे. स्तंभनासाठी 'रोधक' संप्रदाय आहे. वशीकरणासाठी 'सम्पुट' संप्रदाय आहे. अशाच प्रकारे इतर संप्रदायाची माहिती या एकशेअडतिसाव्या अध्यायात आली आहे. या मंत्रांचे अनुष्ठान केव्हा, कसे करावे या संबधीही मार्गदर्शन आहे तापशांती व वृद्धिकर्मात 'नमः'चा उपयोग व्हावा. पौष्टिककर्म, आकर्षण, वशीकरण यांत 'वषट्कारा'चा प्रयोग करावा. विद्वेषण, उच्चाटण, मारण आदी अशुभ कर्मांत 'फट्' या पदाची योजना करावी. मंत्राची दीक्षा देणाऱ्या आचार्याने यमराजाची

प्रार्थना करावी. 'प्रभो, आपण यम आहात. यमराज आहात. कालरूप आहात. धर्मराज आहात, आपण या माझ्या शत्रूस त्वरित मारावं.' श्वेतकमलावर यमराजाची पूजा होमपूर्वक करावी. स्वत:मध्ये भैरवाची भावना करून आपल्या अंत:करणातील कुलेश्वरी भैरवीची भावना करावी. असे केल्यास रात्री शत्रूचा सर्व भावी वृत्तान्त ध्यानात येतो. 'दुर्गरक्षिणि दुर्गे,' या मंत्रानें दुर्गेची पूजा करावी. 'ह स क्ष म ल व र यु म्' या भैरवीमंत्राचा जप केल्यास साधक शत्रूचा वध करू शकतो.

## मुख्य संवत्सरे व त्यांची फळे

एकशे एकोणचाळिसाव्या अध्यायात महादेवांनी साठ संवत्सरांपैकी प्रमुख अशी संवत्सरांची शुभाशुभ फले पार्वतीस सांगितली आहेत. 'प्रभव 'संवत्सरात यज्ञकर्मांची बहुलता असते. 'विभव 'मध्ये प्रजा सुखी असते. 'शुक्ल 'मध्ये सर्व प्रकारची धान्ये विपुल प्रमाणात निर्माण होतात. 'प्रमोद 'मध्ये सर्व प्रमुदित होतात. 'प्रजापती 'संवत्सरात वृद्धी होते. 'अंगिरा 'मध्ये भोगांची वृद्धी होते. 'श्रीमुख 'संवत्सरात जनसंख्या वाढते. 'भाव ' नावाच्या संवत्सरात प्राण्यांत सद्भाव निर्माण होतो. 'युवा ' संवत्सरात मेघ प्रचुर वृष्टी करतात. 'धाता ' संवत्सरात औषधी वनस्पती खूप निर्माण होतात. 'ईश्वर ' संवत्सरात क्षेम व आरोग्य यांची प्राप्ती होते. 'बहुधान्य 'संवत्सरात अधिक अन्न उत्पन्न होते. 'प्रमाथी ' वर्ष मध्यम असते. 'विक्रम 'संवत्सरात अन्नसंपदा अधिक होते. 'वृष 'संवत्सरात सर्व प्रजांचे पोषण होते. 'चित्रभानु '-संवत्सरात विचित्रता व 'सुभानु ' संवत्सरात आरोग्य यांची प्राप्ती होते. 'तारण 'संवत्सरात मेघ शुभकारक असतात.

'पार्थिव 'मध्ये सस्यसंपत्ती, 'अव्यय 'मध्ये अतिवृष्टी, 'सर्वजित '-मध्ये उत्तम वृष्टी, 'सर्वधारीत 'त धान्यादिकांची वृद्धी, 'विरोधी 'मध्ये मेघांचा नाश व अनावृष्टी, 'विकृति 'मध्ये भय, 'खर 'मध्ये पुरुषांत शौर्यसंचार, 'नंदन 'मध्ये प्रजेचा आनंद, 'विजय 'मध्ये शत्रुनाश, 'जय 'मध्ये रोगांचे मर्दन; अशी फले आहेत. 'मन्मथ ' मध्ये विश्व जरेनें पीडित होते. 'दुष्कर 'मध्ये प्रजा दुष्कर्मांत प्रवृत्त होते. 'दुर्मुख '-

मध्ये मनुष्य कटुभाषी होतो. 'हेमलंब'मध्ये संपत्तीची प्राप्ती होते. 'विलंब'मध्ये अन्नाची प्रचुरता होते. 'विकारी'त शत्रू कुपित होतात. 'शार्वरी' सर्वप्रदा असते. 'प्लव'मध्ये जलाशयांची वाढ होते. 'शोभन' व 'शुभकृत्'मध्ये प्रजा संवत्सरांच्या नामानुकूल गुणाने युक्त होते.

'राक्षस'मध्ये लोक निष्ठुर होतात. 'आनल'मध्ये विविध धान्यांची निर्मिती होते. 'पिंगल'मध्ये उत्तम वृष्टी व 'कालयुक्त'मध्ये धनहानी होते. 'सिद्धार्थ'मध्ये सर्व कार्यांची सिद्धी होते. 'रौद्र' मध्ये विश्वात रौद्रभावाचा प्रादुर्भाव होतो. 'दुर्मती' नावाच्या संवत्सरात मध्यम वृष्टी, 'दुन्दुभि'मध्ये मंगल व धनधान्य यांची उपलब्धी होते. 'रुधिरोद्गारी' व 'रक्ताक्ष' नावांची संवत्सरे रक्तपान करणारी असतात. 'क्रोधन' वर्ष विजयप्रद असते. 'क्षय'मध्ये प्रजेचे धन क्षीण होते. अशी काही संवत्सरांची फले होत.

## असा अपराजितामंत्र

एकशेचाळिसाव्या अध्यायात वश्य आदी योगांचे वर्णन आले आहे. भृंगराज, सहदेवी, जीवक, अधःपुष्पा, रुद्रदन्ती, कुमारी, रुद्रजटा, विष्णुक्रान्ता, श्वेतार्क, लज्जालुका, मोहलता, गोरक्षकर्कटी, मेषशृंगी इत्यादी औषधींना सोळा कोष्टकांच्या चक्रात अंकित करावे. वन्ही, नाग, पक्ष, मुनी, मनू, शिव, वसू, दिशा, शर, वेद, ग्रह, ऋतू यांना सांकेतिक व संख्यात्मक नाम यांनी संबोधित करावे. अशा विविध औषधांचे उपयोग या अध्यायात सांगितले आहेत. पुढल्या एकशेएके-चाळिसाव्या अध्यायात छत्तीस पदांत सांगितलेल्या औषधांचा उपयोग निशितदें केला आहे. नऊ नऊ औषधांच्या समुदायांचे एकूण चार नवक आहेत. त्यानंतर एकशेबेचाळिसाव्या अध्यायात मंत्रचक्रे व औषधचक्रे यांचे वर्णन आले आहे. चोर व जातक यांचा संबंधही याच अध्यायात सांगितला आहे. शनिदृष्टी, दिनराहू, फणिराहू, तिथिराहू, विष्टिराहू यांचेही वर्णन याच अध्यायात आले आहे.

हा अपराजिता मंत्र असा आहे, 'ॐ नमो भगवति वज्रशृंखले हन, हन ॐ भक्ष भक्ष, ॐ खाद खाद, ॐ अरे रक्तं पिब कपालेन

रक्ताक्षि रक्तपटे भस्मांगि भस्मलिप्तशरीरे वज्रायुधे वज्रप्राकारनिचिते पूर्वां दिशं बन्ध बन्ध, ॐ दक्षिणां दिशं बन्ध बन्ध, नागान् बन्ध बन्ध, नागपत्निर्बन्ध, ॐ असुरान् बन्ध बन्ध, ॐ यक्षराक्षसपिशाचान् बन्ध बन्ध, ॐ प्रेतभूतगन्धर्वादयो ये केचिदुपद्रवास्तेभ्यो रक्ष रक्ष, ॐ ऊर्ध्वं रक्ष रक्ष, ॐ अधो रक्ष रक्ष, ॐ क्षुरिकं बन्ध बन्ध, ॐ ज्वल महाबले घटि घटि, ॐ मोटि मोटि, सटावलिवज्राग्नि वज्रप्राकारे हुं फट्, ह्रीं ह्रूँ श्रीं फट् ह्रीं हः फूं फें फः सर्वग्रहभ्यः सर्वव्याधिभ्यः सर्वदुष्टोपद्रवेभ्यो ह्रीं अशेषोभ्यो रक्ष रक्ष'

असा हा मंत्र ग्रहपीडा, ज्वरादी पीडा व भूतबाधा यांचे निवारण करतो.

## कुब्जिकासंबंधी न्यास व पूजाविधी

एकशेंत्रेचाळिसाव्या अध्यायात महादेवांनी कुब्जिकेच्या पूजाविधी-संबंधी माहिती दिली आहे. 'कुब्जिका' शक्तीच्या साह्याने राज्यावर बसणाऱ्या देवांनी शस्त्रास्त्रादींनी असुरांवर विजय मिळविला होता. मायाबीज 'ह्रीं' व हृदयादी सहा मंत्रांचा क्रमशः न्यास गुह्यांग व हात यांत करावा. 'काली काली'–हा हृदयमंत्र आहे. 'दुष्ट चाण्डालिका' हा शिरोमंत्र आहे. 'ह्रीं स्फें' ह स ख क छ ड 'ओंकारो भैरवः' हा शिखा-मंत्र आहे. 'भेलखी दूती' हा कवचमंत्र आहे.' 'रक्तचंडिका' हा नेत्र-मंत्र असून 'गुह्यकुब्जिका' हा अस्त्रसंबंधीमंत्र आहे.

मंडलाच्या अग्निकोणात कूर्चबीज (हूं), ईशानकोणात शिरोमंत्र (स्वाहा), नैर्ऋत्यकोणात शिखामंत्र (वषट्), वायव्यकोणात कवचमंत्र (हुम्) मध्यभागात नेत्रमंत्र (वोषट्) व मंडळाच्या सर्व दिशांना अस्त्र-मंत्र (फट्) यांचा उल्लेख व पूजा करावी. बत्तीस अक्षरांनी युक्त अशा बत्तीस दलांच्या कमलकर्णिकेत 'स्त्रों ह स क्ष म ल न व ब ष ट स च' आणि आत्मबीजमंत्र (आम्) यांचे न्यासपूर्वक पूजन करावे. कमलाच्या सर्व दिशांना क्रमशः ब्रह्माणी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, माहेन्द्री, चामुंडा, चंडिका (महालक्ष्मी) यांची न्यासपूर्वक पूजा करावी.

त्यानंतर ईशान, पूर्व, अग्नी, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम या दिशांना

क्रमशः र, व, ल, क, स व ह यांचे न्यासपूर्वक पूजन करावे. याच दिशांना क्रमशः कुसुममाला व पांच पर्वतांची स्थापना करून पूजन करावे. जालंधर, पूर्णगिरी, कामरूप आदी पर्वतांची नावे आहेत. नंतर वायव्य, ईशान, अग्नी नैर्ऋत्यकोणात व मध्यभागी वज्रकुब्जिकेचे पूजन करावे. नंतर वायव्य, ईशान, नैर्ऋत्य, अग्नी, उत्तरशिखर यांवर क्रमशः अनादी विमल, सर्वज्ञ विमल, प्रसिद्ध विमल, संयोग विमल, समय विमल; या पांच विमलांची पूजा करावी. या शृंगांवर कुब्जिकेच्या प्रसन्नतेसाठी क्रमशः खिंकिनी, षष्ठा, सोपन्ना, सुस्थिरा, रत्नसुंदरी यांचे पूजन करावे. ईशानकोणातील शिखरांवर आठ आदिनाथांची स्थापना करावी.

अग्निकोणवर्ती शिखरावर मित्राची, पश्चिमवर्ती शिखरावर औडीशवर्षाची, वायव्यकोणवर्ती शिखरावर षष्ठीवर्षाची पूजा करावी. पश्चिमदिशावर्ती शिखावर गजरत्न व कवचरत्न यांची अर्चना करावी. वायव्य, ईशान, अग्निकोणात 'ब्रुं' बीजसहित 'पंचनामा' नावाच्या मत्र्यांची पूजा करावी. दक्षिणदिशा व अग्निकोण यांत 'पंचरत्ना'ची अर्चना करावी. ज्येष्ठा, रौद्री, अन्तिका या तीन संध्यांच्या अधिष्ठात्री देवींचीही पूजा करावी. पांच महावृद्धेंची पूजा करावी.

चौकोनी मंडलात उजव्या बाजूस गणपतीची व डाव्या बाजूस बटुकाची पूजा करावी. 'ॐ एं गं क्रमगणपतये नमः' या मंत्राने क्रमगणपतीची व 'ॐ वटुकाय नमः' या मंत्राने बटुकाची पूजा करावी. वायव्यादी कोणांत चार गुरूंचे व अठरा षट्कोणांत सोळा नाथांचे पूजन करावे. मंडलाच्या चारही दिशांना ब्रह्मा आदी आठ देवतांची व मध्यभागी नववी कुब्जिका म्हणजे कुलटादेवीची पूजा करावी.

पुढल्या एकशेचव्वेचाळिसाव्या अध्यायात कुब्जिकादेवीचा पूजाविधी समजावून दिला आहे. कुब्जिकामंत्र असा आहे. 'ॐ ऐं ह्रीं श्रीं खैं ह्रें हसक्षमलवयं भगवति अम्बिके ह्रां ह्रीं क्षीं क्षौं क्ष्रूं क्रीं कुब्जिके ह्राम् ॐ ङञ नणमेऽ अघोरमुखि व्रां छ्रां छीं किलि किलि क्षौं विच्चे ख्यो श्रीं क्रोम्, ॐ ह्रोम्, ऐं वज्रकुब्जिनी स्त्रीं त्रैलोक्यकर्षिणि ह्रीं कामाङ्गद्राविणि ह्रीं स्त्रीं महाक्षोभकारिणि ऐं ह्रीं क्ष्रौं ऐं ह्रीं श्रीं फें क्षौं नमो भयवति क्ष्रौं कुब्जिके ह्रों ह्रों क्रैं ङञणनमे अघोरमुखि छ्रां छां

विच्चे, ॐ किलि किलि।' करन्यास व अंगन्यास करून संध्या वंदन करावे. वामा, ज्येष्ठा, रौद्री अशा क्रमशः तीन संध्या आहेत.

यानंतर कौली गायत्रीचा पूजाविधी येथेच सांगितला आहे. विद्या, देवी, गुरू या तिघांच्या शुद्धीचा 'त्रिशुद्धि' समजावून दिला आहे. गगानानन्द, चटुली, आत्मानंद, पद्मानंद, मणी, कला, कमल, माणिक्य-कंठ, गगन, कुमुद, श्रीपद्म, भैरवानंद, कमळदेव, शिव, भव व कृष्ण; असे सोळा नूतनसिद्ध आहेत. चंद्रपूर, गुल्म, शुभकाय, अतिमुक्तक, वीरकंठ, प्रयोग, कुशल, देवभोगक, विश्वदेव, खड्गदेव, रुद्र, धाता, असि, मुद्रास्फोट, वंशपूर, भोज; असे सोळा सिद्ध आहेत. अनंत, महान, शिवपादुका, महाव्याप्ती, शून्य, पंचतत्त्वात्मक मंडल, श्रीकंठनाथपादुका, शंकर व अनंत यांचेही पूजन करावे. सदाशिव, पिंगल, भृग्वानंद, नाथ-समुदाय, लांगूलानंद, संवर्त या सर्वांना मंडलात स्थान देऊन त्यांचे पूजन करावे, गगनान्ददेव, वर्गसहित स्वर्गानन्ददेव, परमानन्ददेव, सत्या-नन्ददेव, नागनन्ददेव यांचीही पूजा करावी.

सुरनाथ, समयकोटीश्वर, विद्याकोटीश्वर, कोटीश्वर, बिंदुकोटी-श्वर, सिद्धकोटीश्वर, अमरीश्वर, चक्रीशेश्वर, कुरंगेश्वर, वृत्रेश्वर, चंद्रनाथ वा चंद्रेश्वर, वेद, कंदर्पनाथ, यांचीही पूजा करावी. कुब्जिकेच्या पादुकांचे पूजन करावे. 'ॐ ऱ्हां ऱ्हीं कुब्जिकायै नमः' या नवाक्षर-मंत्राचा, पांच प्रणवरूपमंत्राने जप करावा. ब्रह्मा, इंद्र, अग्नी, यम, निर्ऋती, अनंत, वरुण, वायू, कुबेर, ईशान या दहा दिग्पालांची पूजा करावी. सहस्रनेत्रधारी इंद्र, अनवद्य विष्णू व शिव यांचीही पूजा करावी. ब्रह्माणी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, ऐन्द्री, चामुंडा व महालक्ष्मी यांचीही पूजा करावी. डाकिनी, राकिनी, लाकिनी, काकिनी, शाकिनी, याकिनी यांचीही पूजा करावी. नंतर ध्यानपूर्वक कुब्जिकादेवीची पूजा करून 'ऱ्हीं'चा बीजरूपाने उच्चार करावा. 'ॐ ॐ ॐ ॐ ॐ कुब्जिकायै नमः' अथवा 'ॐ ऱ्हीं कुब्जिकायै नमः'

ही देवी नीलकमलाप्रमाणे श्याम आहे. तिला सहा मुखे आहेत. त्यांची मुखकांतीही सहा प्रकारांची आहे. ती चैतन्यस्वरूपा आहे. अष्टादशाक्षरमंत्राने तिचे प्रतिपादन होते. तिला बारा भुजा आहेत.

ती सुखपूर्वक सिंहासनावर विराजमान आहे. ती प्रेतपद्मावर बसली आहे. 'कर्कोटक' नाग तिची मेखला आहे. तिच्या मस्तकावर 'तक्षक' नाग आहे. 'वासुकी' नाग तिच्या गळ्यातील हार आहे. तिच्या दोनही कानांत 'कुलिक' व 'कूर्म' नावांची दोन कुंडले आहेत. दोन भुवयांत 'पद्म' व 'महापद्म' या नागांची स्थिती आहे. तिच्या डाव्या हातात नाग, कपाल, अक्षसूत्र, खट्वांग, शंख व पुस्तक आहे. उजव्या हातांत त्रिशूल, दर्पण, खड्ग, रत्नमाला, अंकुश, धनुष्य अशी आयुधे आहेत.

तिच्या चरणतलावर ब्रह्मदेव, भगवान विष्णू जघनस्थलात, रुद्र हृदयात, ईश्वर कंठात, सदाशिव ललाटात, शिव तिच्या वरच्या भागात स्थित आहेत. कुब्जिकादेवी चमकत असते.

## त्रिखंडीमंत्र, पीठस्थानावर पूजनीय शक्ती, आठ अष्टकांतील देवी

यानंतर एकशेपंचेचाळिसाव्या अध्यायात मालिनीआदी मंत्रांचा परिचय आला आहे. यातच शाम्भव, शाक्त, यामल; असे तीन प्रकारचे न्यास सांगितले आहेत. मालिनी, त्रिविधा, अघोर्यष्टक, द्वादशाङ्गन्यास, षडंगन्यास, अस्त्रचंडिका इत्यादी न्यासांचे वर्णन आहेत. क्लीं (क्रीं) ह्रीं, क्लीं, श्रीं, क्रूं, फट् या सहा बीजमंत्रांचे सहा न्यास आहेत. यांतील तिसरा 'यामलन्यास' होय. चौथा 'श्रीं' बीजाचा न्यास सर्व मनोरथांची सिद्धी देणारा आहे.

यानंतर एकशेसेहचाळिसाव्या अध्यायात त्रिखंडीमंत्र, पूजनीय शक्ती, अष्टदेवी, इत्यादींची माहिती आली आहे. प्रथम त्रिखंडीचे वर्णन आले आहे. 'ॐ नमो भगवते रुद्राय नमः । नमश्चामुण्डे नमश्चाकाशतृणां सर्वकामार्थसाधनीनामजरामरीणां सर्वत्राप्रतिहस्तगतीनां स्वरूपपरिवर्तिनीनां सर्वतत्त्ववशीकरणोत्सादनोन्मूलनसमस्तकर्मप्रवृत्तानां सर्वमातृगुह्यं हृदयं परमसिद्धं परकर्मच्छेदनं परमसिद्धिकरं मातृणां वचनं शुभम्' या ब्रह्मखण्डपदात रुद्रमंत्रासंबंधी एकशेएकवीस अक्षरे आहेत.

आता विष्णुखंड पाहा– 'ॐ नमश्चामुण्डे ब्रह्माणि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा । ॐ नमश्चामुण्डे माहेश्वरि अघोरे अमोघे वरदे

विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे कौमारि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे वैष्णवि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे वाराहि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे इण्द्राणि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे चण्डि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा। ॐ नमश्चामुण्डे ईशानि अघोरे अमोघे वरदे विच्चे स्वाहा.'

आता महेश्वरखंड पाहा– 'ॐ नमश्चामुण्डे ऊर्ध्वकेशि ज्वलितशिखरे विद्युज्जिव्हे तारकाक्षि पिंगलभ्रुवे विकृतदंष्ट्रे क्रुद्धे, ॐ मांसशोणितसुरासवप्रिये हस हस. ॐ नृत्य नृत्य. ॐ विजृम्भय विजृम्भय ॐ मायात्रैलोक्यस्वरूपसहस्रपरिवर्तिनीनामों बन्ध बन्ध, ॐ कुट्ट कुट्ट चिरि चिरि हिरि हिरि भिरि भिरि त्रासनि त्रासनि भ्रामणि भ्रामणि, ॐ द्रावणि द्रावणि क्षोभणि क्षोभणि मारणि मारणि संजीवनि संजीवनि हेरि हेरि गेरि गेरि घेरि, घेरि, ॐ सुरि सुरि ॐ नमो मातृगणाय नमो नमो विच्चे ।।

या तीन खंडांना 'त्रिखंडी' म्हणतात. या मंत्रांच्या आदीअंती 'हें धों' व पांच प्रणव जोडून पूजन करावे. 'हें धों श्रीकुब्जिकायै नमः' असा हा मंत्र सिद्ध होतो. 'ॐ क्ष्रौं शिखाभैरवाय नमः' हा शिखामंत्र भैरवाचा आहे. 'स्खां स्खीं स्खें' ही तीन बीजाक्षरे आहेत. 'ऱ्हां ऱ्हीं ऱ्हें' ही निर्बीज अक्षरे आहेत. विलोमक्रमाने 'क्ष' पासून 'क' पर्यंत बत्तीस अक्षरांची वर्णमाला 'अकुला' नावाने ओळखली जाते. अनुलोमक्रमानें गणना केल्यास ती 'सकुला' होते. शशिनी, भानुनी, पावनी, शिव, गंधारी, 'ण' पिंडाक्षी, चपला, गजजिव्हिका, 'म' मृषा, भयसारा, मध्यमा, 'फ' अजरा, 'य' कुमारी, 'न' कालरात्री, 'द' संकटा, 'ध' कालिका, 'फ' शिवा, 'ण' भवघोरा, 'ट' बीभत्सा, 'त' विद्युता, 'ठ' विश्वंभराय आणि शंसिनी अथवा 'उ' विश्वंभरा, 'आ' शंसिनो, 'द' ज्वालामालिनी, कराली, दुर्जया, रंगी, वामा, ज्येष्ठा, रौद्री, 'ख' काली, 'क' कुलालंबी, अनुलोमा, 'द' पिंडिनी, 'आ' वेदिनी, 'ह' रूपी, 'वै' शांतिमूर्ती व कलाकुला, 'ऋ' खंगिनी, 'उ' वलिता, 'लृ' कुला, 'लृ' सुभगा, वेदवादिनी, कराली, 'अं' मध्या,

'अः' अपेतरया; या शक्तींचे योगपीठावर क्रमशः पूजन करावे.

'स्खां स्खीं स्खौं महाभैरवाय नमः' हा भैरवाचा पूजामंत्र आहे. अक्षोद्या, ऋक्षकर्णी, राक्षसी, क्षपणा, क्षया, पिंगाक्षी, अक्षया व क्षेमा; या शक्ती ब्रह्माणीच्या अष्टकदलात स्थित असतात. दला, लीलावती, नीला, लंका, लंकेश्वरी, लालसा, विमला, माला; या माहेश्वरी अष्टकात असतात. हुताशना, विशालाक्षी, ऱ्हूंकारी, वडवामुखी, हाहारवा. क्रूरा, क्रोधा, खरानना; या आठ शक्ती कौमारीच्या शरीरातून प्रकट झाल्या. सर्वज्ञा, तरला, तारा, ऋग्वेदा, ह्यानना, सारासारा, स्वयंग्राहा, शाश्वती, या आठ शक्ती वैष्णवीच्या कुलातील आहेत. तालुजिव्हा, रक्ताक्षी, विद्युज्जिव्हा, करंकिणी, मेघनादा, प्रचंडोग्रा, कालकर्णी, कलिप्रिया; या वाराहीच्या कुलातील होत. चंपा, चंपावती, प्रचंपा, ज्वलितानना, पिशाची, पिचुवक्त्रा, लोलुपा; या इंद्राणीच्या कुलातील शक्ती होत. पावनी, याचनी, वामनी, दमनी, बिंदुवेला, बृहत्कुक्षी, विद्युता, विश्वरूपिणी; या चामुंडाकुलातील होत. यमजिव्हा, जयंती, दुर्जया, यमान्तिका, बिडाली, रेवती, जया व विजया; या महालक्ष्मीच्या कुलातील होत. अशी ही आठ अष्टके.

## ग्रहांचे अयुत लक्षकोटी हवनवर्णन

यानंतर एकशेसत्तेचाळिसाव्या अध्यायात गुह्यकुब्जिका, नवा त्वरिता, दूतींचे मंत्र, न्यासपूजन इत्यादी विषय आले आहेत. एकशे-अठ्ठेचाळिसाव्या अध्यायात संग्रामविजयदायक सूर्यपूजेचा विधी वर्णन केला आहे. एकशेएकोणपन्नासाव्या अध्यायात होमाचे प्रकार, त्यांच्या विविध फलांचे वर्णन केले आहे. एकशेएकावन्नाव्या अध्यायात वर्ण व आश्रम यांचे सामान्य धर्म, जातींचे विशेष धर्म, एकशेबावन्नाव्या अध्यायात गृहस्थाचा जीवनक्रम, एकशेत्रेपन्नाव्या अध्यायात संस्कारांचे वर्णन व ब्रह्मचारीचे धर्म आले आहेत. यानंतर विवाह, आचार, द्रव्य-शुद्धी, मरणाशौच, पिंडपान, दाहसंस्कार, गर्भस्त्रावसंबंधी अशौच, असंस्कृतादींची शुद्धी; इत्यादींचे वर्णन एकशेएकोणसाठाव्या अध्याया-पर्यंत आले आहे. नंतर वानप्रस्थआश्रम, संन्याशाचा धर्म, धर्मशास्त्राचा

उपदेश, श्राद्धकल्पवर्णन, नवग्रहहवनवर्णन, विभिन्न धर्मांचे वर्णन, वर्णाश्रमधर्म* ग्रहांसाठी अयुत-लक्ष-कोटी हवनांचे वर्णन; इत्यादी महत्त्वाचे विषय आले आहेत. फक्त ग्रहयज्ञाचे वर्णन येथे संक्षेपाने पाहू.

एकशेसदुसष्टाव्या अध्यायात हा विषय विस्ताराने आला आहे. शांती, समृद्धी, विजय, आदीसाठी ग्रहयज्ञ करावयाचा असतो. ग्रहयज्ञ 'अयुतहोमात्मक', 'लक्षहोमात्मक', 'कोटिहोमात्मक' अशा तीन प्रकारांचा असतो. अग्निकोणाच्या ईशाणकोणनिर्मित वेदीवर अष्टदलपद्मात्मक मंडल बनवून त्यावर ग्रहांना आवाहन करावे. उत्तरेस गुरू, ईशानदिशेस बुध, पूर्वेस शुक्र, अग्नयेस चंद्र, दक्षिणेस भौम, मध्यभागी सूर्य, पश्चिमेस शनी, नैर्ऋत्येस राहू आणि वायव्येस केतू यांची स्थापना करावी. शिव, पार्वती, कार्तिकेय, विष्णू, ब्रह्मा, इंद्र, यम, काल, चित्रगुप्त; हे 'अधिदेवता' आहेत. अग्नी, वरुण, भूमी, विष्णू, इंद्र, शचीदेवी, प्रजापती, सर्प, ब्रह्मा, या 'प्रत्यधिदेवता' आहेत. गणेश, दुर्गा, वायू, आकाश व अश्विनीकुमार या 'कर्मसाद्गुण्यदेवता' आहेत. या सर्वांचे पूजन वैदिक बीजमंत्रांनी करावे. आक, पलाश, खदिर, अपामार्ग, पिंपळ, गूलर, शमी, दूर्वा, कुशा; या क्रमशः नवग्रहांच्या समिधा आहेत. यांना मध, घृत, दही यांनी शतसंख्येनें आठ वेळा होम करावा. एक, आठ, चार कुंभ पूर्ण करून पूर्णाहुती व वसुधारा द्यावी. नंतर ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. यजमानाचा अभिषेक चार कलशांनी भरलेल्या जलाने मंत्रोच्चारपूर्वक व्हावा.

अभिषेक करताना म्हणावे, 'ब्रह्मा, विष्णू, महेश्वर आदी देवता अभिषेक करतात. वासुदेव, जगन्नाथ, भगवान संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध तुम्हांस विजय प्रदान करोत. देवराज इंद्र, भगवान अग्नी, यमराज, निर्ऋती, वरुण, पवन, धनाध्यक्ष कुबेर, शिव, ब्रह्मा, शेषनाग व समस्त दिक्पाल सदा तुमचे रक्षण करतील. कीर्ती, लक्ष्मी, धृती, मेधा, पुष्टी, श्रद्धा, क्रिया, मती, बुद्धी, लज्जा, वपू, शांती, तुष्टी, कांती या लोकजननी धर्माच्या पत्नी तुमचे रक्षण करोत. आदित्य चंद्रमा,

*यापूर्वीच्या पुराणग्रंथांतून या विषयांचे विस्ताराने विवेचन आले असल्याने येथे त्यांचा फक्त निर्देश केला आहे.

भौम, बुध, बृहस्पती, शुक्र, सूर्यपुत्र शनी, राहू व केतू हे ग्रह परितृप्त होऊन तुमचा अभिषेक करतील. देवता, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, सर्प, ऋषी, मनू, गायी, देवमाता, देवांगना, वृक्ष, नाग, दैत्य, अप्सरांचे समुदाय, अस्त्रशस्त्र, राजा, वाहन, औषधी, रत्न, कालविभाग, नदीनद, समुद्र, पर्वत, तीर्थ, व मेघ; हे सर्व अभीष्ट कामनांच्या सिद्धीसाठी तुमचा अभिषेक करतील.'

त्यानंतर यजमानाने अलंकृत होऊन सुवर्ण, गाय, अन्न, भूमी, आदींचे दान मंत्रांनी करावे. दक्षिणायुक्त अयुतहोमात्मक ग्रहयज्ञ युद्धात विजय प्राप्त करून देणारा आहे. विवाह, उत्सव, यज्ञ, प्रतिष्ठादी कर्मे यांत हा प्रयोग होतो. लक्षहोमात्मक व कोटिहोमात्मक हे दोन ग्रहयज्ञ सर्व कामनांची सिद्धी करणारे आहेत. लक्षहोमानंतर 'वसुधारा' देऊन शय्या व आभूषण दान द्यावे. या होमात दहा वा आठ ऋत्विज असतात. दक्षिणायुक्त लक्ष होमाने साधकास पुत्र, अन्न, राज्य, विजय, भोग, मोक्ष यांची प्राप्ती होते. कोटिहोमात्मक ग्रहयज्ञ शत्रूंचा विनाश करणारा आहे. यास बारा ऋत्विज लागतात.

कोटिहोम करणारा सर्व कामना पूर्ण पावून विष्णुलोकास जातो. ग्रहमंत्र, वैष्णवमंत्र, गायत्रीमंत्र, आग्नेयमंत्र, शैवमंत्र, वैदिकमंत्र यांनी हवन करावे. तिल, यव, घृत, धान्य यांनी हवन करणारा मनुष्य अश्वमेध यज्ञाचे फल मिळवितो. विद्वेषण आदी अभिचारकर्मांत त्रिकोणी कुंड विहित असते. यात रक्तवस्त्रधारी व उन्मुक्तकेश मंत्र-साधकास शत्रूच्या विनाशाचे चिंतन करून डाव्या हाताने श्येनपक्ष्याच्या लक्ष अस्थींनी व समिधांची हवन करावे लागते. हवनाचा मंत्र असा आहे– 'दुर्मित्रियास्तस्मै सन्तु यो द्वेष्टि हूं फट्' यानंतर सुरीने शत्रूच्या प्रतिमेस कापावे व पिष्ठमय शत्रूची अग्नीत आहुती द्यावी. अशा प्रकारे अत्याचारी शत्रूच्या विनाशासाठीं यज्ञ करणारा स्वर्गलोकी जातो.

## सर्वोत्कृष्ट दीपदान

यानंतरच्या एकशे अडुसष्टाव्या अध्यायात महापातकांचे वर्णन आले आहे. पुढल्या एकशेएकोणसत्तराव्या अध्यायात ब्रह्महत्यादी

पापांच्या प्रायश्चित्ताचे विधी वर्णन केले आहेत. यापुढल्याही अध्यायात विविध प्रायश्चित्तांचेच वर्णन आहे. पुढल्या अध्यायात गुह्यपापांच्या प्रायश्चित्ताचे वर्णन आहे. त्यानंतर एकशेबहात्तराव्या अध्यायात समस्त पापनाशक स्तोत्र दिले आहे. ते आपण शेवटच्या 'स्तोत्रमंजूषा' या विभागात पाहाणार आहोत. यापुढच्याही अध्यायात अनेकविध प्रायश्चित्तांचे विवेचन असून पुढल्या एकशेचौऱ्याहत्तराव्या अध्यायातही हाच विषय चालू आहे. पुढल्या अध्यायात व्रतांच्या संबंधी महत्त्वाच्या बाबी निवेदन केल्या आहेत. यानंतरच्या पुढल्या काही अध्यायांत प्रतिपदा तिथीचे व्रत, द्वितीया तिथीचे व्रत, तृतीया तिथीचे व्रत, चतुर्थी तिथीचे व्रत, पंचमी तिथीचे व्रत, षष्टी तिथीचे व्रत, सप्तमी तिथीचे व्रत, अष्टमी तिथीचे व्रत, नवमी तिथीचे व्रत, दशमी तिथीचे व्रत, एकादशी तिथीचे व्रत, द्वादशी तिथीचे व्रत, श्रावणद्वादशीव्रतवर्णन, अखंडद्वादशीव्रतवर्णन, त्रयोदशी तिथीचे व्रत, चतुर्दशी तिथीचे व्रत, शिवरात्रीव्रत, अशोकपूर्णिमा आदी व्रते, वारसंबंधी व्रते, नक्षत्रव्रते, दिनसंबंधी व्रते, मासासंबंधी व्रते, संक्रांतव्रत; इत्यादी अनेक व्रतांचा निर्देश एकशेनव्याण्णवाव्या अध्यायापर्यंत आलेला आहे.

दोनशेव्या अध्यायात दीपदानव्रताचा महिमा सांगून विदर्भ-राजकुमारी ललिताचे उपाख्यान आले आहे. दीपदान करणारा मनुष्य सौभाग्ययुक्त होऊन स्वर्गलोकी देवांकडून पूजिला जातो. विदर्भराजकुमारी ललिता दीपदानानेंच राजा चरुधर्मांची पत्नी झाली व त्याच्या शंभर राण्यांत प्रमुख बनली. त्या साध्वीनें एकदा विष्णुमंदिरात सहस्र दीपांचे दान केले होते. आपल्या सवतींनी विचारले, म्हणून एकदा तिनें सांगितले,

'फार पूर्वीची गोष्ट आहे. सौवीरराजाच्या घरी मैत्रेय नावाचा पुरोहित होता. त्यानं देविकानदीच्या तटावर भगवान विष्णूचं मंदिर बनविलं. कार्तिकमासात त्यानं दीपदान केलं. एकदा उंदरीनं दिव्याची वात वाढविली. दीपक प्रज्वलित झाला. मृत्यूनंतर ती उंदरीण राज-कुमारी झाली. राजा चारुधर्माची पट्टराणी झाली. त्या पुण्याईचं फल मीही भोगते आहे. म्हणून मी नेहमी दीपदान करते. एकादशीस दीपदान

करणारा स्वर्गास पोचतो. मंदिरातील दीप चोरणारा मुका व मूर्ख होतो. तो नक्कीच 'अन्धतामिस्त्र' नावाच्या नरकास जातो. त्याला यमदूत फार त्रास देतात.'

ललिताच्या सवतींनी हे दीपदानमाहात्म्य ऐकले व त्या प्रभावित झाल्या. त्यामुळे त्यांनाही स्वर्गवास लाभला. म्हणून दीपदान सर्व व्रतांत विशेष फलदायक आहे, असे अग्निदेवांनी नमूद केले आहे.

## नवव्यूहार्चनविधी

दोनशे एकाव्या अध्यायात नवव्यूहार्चनाचा विधी समजावून दिला आहे. अग्निदेवांनी वसिष्ठांना सांगितले की, हा विधी भगवान श्रीहरींनी नारदांना समजावून दिला आहे. पद्मसंडलात 'अं' बीजाने युक्त अशा वासुदेवांची पूजा करावी. 'अं वासुदेवाय नमः' असा मंत्र असावा. 'आं' या बीजाने युक्त संकर्षणाचे अग्निकोणात, 'अं' बीजाने प्रद्युम्नाचे दक्षिणेस, 'अः' बीजाने अनिरुद्धाचे नैर्ऋत्यकोणात, प्रणव-युक्त नारायणाचे पश्चिमेस, ब्रह्मदेवांचे वायव्यकोणात, 'ह्रूं' बीजाने विष्णूंचे व 'क्ष्रौं' बीजाने युक्त उत्तरेस नृसिंहाचे पूजन करावे. पृथ्वी व वराह यांचे ईशानकोणात, पश्चिमद्वारात पूजन करावे,

'कं टं सं सं' या बीजांनी युक्त पूर्वाभिमुख गरुडाचे दक्षिण-दिशेस पूजन करावे. 'खं छं बं हुं फट्' व 'खं ठं फं शं' या बीजांनी युक्त गदेची चंद्रमंडलात पूजा करावी. 'बं णं मं क्षं' आणि 'शं धं टं भं हं' या बीजांनी श्रीदेवीचे पूजन करावे. 'गं डं बं शं' या बीजांनी पुष्टिदेवीची अर्चना करावी. पीठाच्या पश्चिमभागी 'धं वं' या बीजांनी वनमालेचे पूजन करावे. 'सं हं लं' या बीजांनी श्रीवत्साची पश्चिमेस पूजा करावी. 'छं तं यं' या बीजांनी कौस्तुभाचे जलात पूजन करावे.

## देवपूजेस योग्य व अयोग्य पुष्पे

पुढल्याच दोनशेदोनाव्या अध्यायात देवास योग्य व अयोग्य पुष्पांचे वर्णन आले आहे. भगवान श्रीहरी पुष्प, गंध, धूप, दीप, नैवेद्य यांनी प्रसन्न होतात. पूजेत मालतीपुष्प उत्तम आहे. तमालपुष्प भोग व

मोक्ष देणारे आहे. मल्लिकार (मोतिया) समस्त पापांचा नाश करणारे पुष्प आहे. यूथिका (जुई) विष्णुलोक देणारी आहे. अति-मुक्तक (मोगरा) व लोध्रपुष्प विष्णुलोक मिळवून देणारे आहे. करवीर कुसुमांनी पूजन करणारा वैकुंठास जातो. पावन्ती, कुब्जक, तगर या पुष्पांनी विष्णुलोक प्राप्त होतो. कर्णिकार (कण्हेर)पुष्प अर्पण केल्यानें वैकुंठ मिळतो. कमल, कुंद, केतकी या पुष्पांनी परम गतीची प्राप्ती होते. बाणपुष्प, बर्बरपुष्प, कृष्णतुळस यांनी श्रीहरिलोक मिळतो. अशोक, तिलक, आटरूष या पुष्पांनी मनुष्यास मोक्ष मिळतो. बिल्वपत्र व शमी यांनी परम गती मिळते. तमालदल व भृंगराज कुसुम यांनी विष्णुलोक प्राप्त होतो. कृष्ण तुळस, शुक्ल तुळस, कल्हार, उत्पल, पद्म, कोकनद; ही पुष्पे पुण्यप्रद आहेत.

भगवान श्रीहरी शंभर कमलांची माला अर्पण करण्याने प्रसन्न होतात. नीप, अर्जुन, कदंब, बकुल (मौलसिरी), किंशुक (पलाश), मुनी (अगस्त्य), गोकर्ण, नागकर्ण (रक्त एरंड), रंजनी, केतकी, कूष्माण्ड, ग्रामकर्कटी, कुश, कास इत्यादी सुगधित पत्रांनी पूजन केल्यास श्रीहरी प्रसन्न होतात. लक्ष स्वर्णभारापेक्षा पुष्प उत्तम मानले गेले आहे पुष्पमाला आणखी श्रेष्ठ आहे. वन्यपुष्पांचे फल तिप्पट असते झटकन पडणाऱ्या, मलिन पुष्पानें श्रीहरींची पूजा करू नये. कचनार, धत्तूर, गिरिकर्णिका, कुटज, शाल्मली, शिरीष या पुष्पांनी श्रीविष्णूंची अर्चना करू नये. सुगंधित रक्तकमल व नीलकमल कुमुद यांनीच भगवानांचे पूजन होते. भगवान शिवांचे पूजन मदार, धत्तूर यांनी करावे. पण कुटज, कर्कटी व केतकी (केवडा) यांनी त्यांचे पूजन करू नये. कूष्मांड व निंब यांची गंधहीन पुष्पे 'पैशाच' मानली गेली आहेत.

अहिंसा, इंद्रियसंयम, क्षमा, ज्ञान, दया, स्वाध्याय या आठ भाव-पुष्पांनी देवांचे पूजन केल्यास मनुष्य मोक्षास पावतो. अन्य पुष्पेपूजेचे बाह्य स्वरूप आहे. जल वारुण पुष्प आहे. घृत, दूध, दही ही सौम्य पुष्पे आहेत. अन्नादी प्राजापत्य पुष्पे आहेत. धूप, दीप आग्नेय पुष्पे आहेत. फलपुष्पादी वानस्पत्य पुष्पे आहेत. कुशमूलादी पार्थिव पुष्पे आहेत. गंध चंदन वायव्य कुसुम आहे, श्रद्धादी भाव वैष्णव कुसुमे आहेत.

या आठ पुष्पिका सर्व काही देणाऱ्या आहेत.

## भीष्मपंचकव्रत

यानंतर दोनशे तीन या अध्यायात विविध नरकांचे वर्णन केले आहे. महावीची, ताम्रकुंभ, महारौरव, तामिस्र, महातामिस्र, असितपत्रवन, करम्भवालुका, कुट्टल, तैलपाक, वज्रकटाह, महाज्वाळ, क्रकच, गुडपाक, प्रतुद, क्षुरधार, अंबरीश, वज्रशस्त्र, परीताप, कालसूत्र, उग्रगंध, दुर्धर, अप्रतिष्ठ, पूतिवक्त्र, कराल, महाप्रेत, शाल्मल. इत्यादी नरकांचे प्रकार यात वर्णन केले आहेत. यानंतरच्या अध्यायात मासोपवासव्रत आले असून पुढल्या दोनशे पांचव्या अध्यायात भीष्मपंचकव्रत वर्णन केले आहे. कार्तिक शुक्ल एकादशीस हे व्रत घ्यावे. पांच दिवसपर्यंत तीन वेळा स्नान करून पांच तिल व यव यांनी देवांना व पितरांना तर्पण करावे. मौन राहून भगवान श्रीहरींची पूजा करावी. श्रीविष्णूंना पंचगव्य व पंचामृत यांनी स्नान घालावे. त्यांना चंदन, सुगंधी द्रव्ये यांचे आलेपन करावे.

प्रातःकाळी व रात्री श्रीविष्णूंना दीपदान करावे. उत्तम भोज्य पदार्थांचा नैवेद्य दाखवावा. व्रती पुरुषानें ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' या द्वादशाक्षरमंत्राचा एकशेआठ वेळा जप करावा. त्यानंतर घृतासिक्त तिल व जल यांनी ' स्वाहा 'नें द्वादशाक्षरमंत्रानें हवन करावे. प्रथम दिवशी भगवानांच्या चरणकमलांची पुष्पांनी, दुसऱ्या दिवशी दोन मांड्या व गुढगे यांची बिल्वपत्रांनी, तिसऱ्या दिवशी नाभीची भृंगराजानें, चौथ्या दिवशी बाणपुष्प, बिल्वपत्र, जपापुष्पे व पांचव्या दिवशी मालती पुष्पांनी सर्वांगाची पूजा करावी. व्रतधारी पुरुषानें भूमीवर शयन करावे. एकादशीस गोमय, द्वादशीस गोमूत्र, त्रयोदशीस दधी, चतुर्दशीस दुग्ध, शेवटी पंचगव्य यांचा आहार घ्यावा. पौर्णिमेस नक्त व्रतानें राहावे.

या व्रताने मनुष्यास भोग व मोक्ष यांची प्राप्ती होते. भीष्मपितामह हेच व्रत करून भगवान श्रीहरीस मिळाले. म्हणून या व्रताचे नाव ' भीष्मपंचक ' आहे. पांच उपवासांनी हे व्रत युक्त असते.

## अगस्त्यांना अर्घ्यदान, त्यांचे पूजन

महर्षी अगस्त्य साक्षात भगवान विष्णूंचे रूप आहेत. त्यांचे पूजन केल्याने मनुष्यास श्रीहरींची प्राप्ती होते. सूर्य कन्याराशीस आला नाही तोपर्यंत ३ $\frac{1}{3}$ दिवस उपवास करून अगस्त्यांचे पूजन करावे. त्यांना अर्घ्य द्यावा. व्रतारंभी प्रदोषकालात अगस्त्यमुनींची काश-पुष्पमयी मूर्ती कलशावर स्थापित करावी. त्यांचा आवाहन मंत्र असा आहे.

अगस्त्य मुनिशार्दूल तेजोराशे महामते ।
इमां मम कृतां पूजां गृण्हीष्व प्रियया सह ।।

'मुनिश्रेष्ठ अगस्त्य, आपण तेजःपुंजमय व महाबुद्धिमान आहात. आपली पत्नी लोपामुद्रेसह आपण माझ्या पूजेचा स्वीकार करावा.' त्यानंतर त्यांना गंध, पुष्प, फल, जल आदींनी अर्घ्यदान द्यावे. नंतर त्यांचे चंदनादी उपचारांनी पूजन करावे. दुसऱ्या दिवशी कलशस्थ अगस्त्यांची मूर्ती जलाशयापाशी नेऊन खालील मंत्राने त्यांना अर्घ्य समर्पित करावा.

काशपुष्पप्रतीकाश अग्निमारुतसम्भव ।
मित्रावरुणयोः पुत्र कुम्भयोने नमोऽस्तु ते ।
आतापिर्भक्षितो येन वातापिश्च महासुरः ।।
समुद्रः शोषितो येन सोऽगस्त्यः सम्मुखोऽस्तु मे ।
अगस्ति प्रार्थयिष्यामि कर्मणा मनसा गिरा ।।
अर्चयिष्याम्यहं मैत्रं परलोकामिकाङ्क्षया ।

अगस्त्य, आपली कांती काशपुष्पासारखी उज्ज्वल आहे. अग्नी, वायू यांना प्रादुर्भूत, मित्रावरुणांचे पुत्र, कुंभापासून प्रकट होणारे अगस्त्य, आपणास नमस्कार असो. ज्यांनी राक्षसराज आतापीस व वातापीस भक्षण केले होते, ज्यांनी समुद्र सुकविला होता, ते अगस्त्य माझ्यासमोर प्रकट झाले आहेत. मी मन, कर्म, वचन यांनी त्यांची पूजा करतो. उत्तम लोकाच्या आकांक्षेने मी त्यांचे पूजन करतो.

यानंतर चंदनदान, पुष्पमाळ, धूप, फल, अर्घ्य; इत्यादी उपचार समर्पून अगस्त्यांची वैदिक मंत्रांनी प्रार्थना करावी. लोपामुद्रेस अर्घ्यदान

करताना म्हणावे,

राजपुत्रि नमस्तुभ्यं मुनिपत्नि महाव्रते ।
अर्घ्यं गृण्हीष्व वेदेशि लोपामुद्रे यशस्विनी ।।

महान व्रताचे पालन करणारी राजपुत्री अगस्त्यपत्नी देवेश्वरी, लोपामुद्रे, आपणांस नमस्कार असो. यशस्विनी, या अर्घ्यास ग्रहण कर.

अगस्त्यांसाठी पंचरत्न, सुवर्ण, रजताने युक्त, सप्तधान्यांनी भरलेले पात्र, दधिचंदनमिश्रित अर्घ्य समर्पित करावा. स्त्रिया व शूद्र यांनी 'काशपुष्पप्रतीकाश' या पौराणिक मंत्रांनी अर्घ्य द्यावा. शेवटी विसर्जन करताना म्हणावे,

अगस्त्य मुनिशार्दूल तेजोराशे च सर्वदा ।
इमां मम कृतां पूजां गृहीत्वा व्रज शांतये ।।

मुनिश्रेष्ठ अगस्त्य, आपण तेजःपुंजाने प्रकाशित आहात. आपण सर्व काही देणारे आहात. मी केलेली ही पूजा आपण शांतिपूर्वक स्वीकारावी. अगस्त्यांचे असे विसर्जन करून त्यांच्या उद्देशाने कोणते तरी एक धान्य, फल, रस यांचा त्याग करावा. ब्राह्मणास घृतमिश्रित खीर व लाडू यांचे भोजन द्यावे. सुवर्ण घालून कलश द्यावा. सात वर्षे अशी अगस्त्यपूजा केल्यास सर्व काही प्राप्त होते. स्त्री, सौभाग्य, पुत्र, कन्या, पती, राजा, यांची प्राप्ती या व्रताने होते.

## आणि असे कौमुदव्रत

या व्रताचा आरंभ आश्विनाच्या शुक्लपक्षात करावा. व्रतधारीनें एकदशीस उपवास करून एक मासापर्यंत श्रीहरींचे पूजन करावे. व्रतीनें खालील मंत्राचा संकल्प करावा.

आश्विनें शुक्लपक्षेऽहमेकाहारो हरिं जपन् ।
मासमेकं भुक्तिमुक्तैः करिष्ये कौमुदं व्रतम् ।।

मी आश्विनच्या शुक्लपक्षात एकदाच भोजन करून श्रीहरींचा मंत्र जपून भोग व मोक्ष यांच्या प्राप्तीसाठी एक मासपर्यंत कौमुदीव्रताचे अनुष्ठान करीन. व्रताची समाप्ती झाली की एकादशीस उपवास करावा.

द्वादशीस भगवान विष्णूंचे पूजन करावे. त्यांना चंदन, अगरू, केशर यांचे अनुलेपन लावावे. कमल, उत्पल, कल्हार, मालती या पुष्पांनी त्यांची पूजा करावी. व्रत करणाऱ्याने वाणीवर संयम राखावा. तैलपूर्ण दीपक प्रज्वलित करावा. दोनही समयी खीर, लाडू इत्यादींचा नैवेद्य दाखवावा. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या द्वादशाक्षरमंत्राचा निरंतर जप करावा. शेवटी ब्राह्मणास भोजन देऊन क्षमाप्रार्थनापूर्वक व्रताचे विसर्जन करावे. 'देवजागरणी' अथवा 'हरिप्रबोधिनी' एकादशीपर्यंत एक मासभर उपवास केल्याने 'कौमुदीव्रत' पूर्ण होते.

## धनाचे प्रकार, दानविधीचे वर्णन

यानंतर पुढल्या दोनशेआठाव्या अध्यायात सामान्य व्रते, दाने यांची माहिती अग्निदेवांनी वसिष्ठांना दिली आहे. यानंतर पुढल्याच प्रकरणात धनप्रकार, देशकालपात्रविचार, दानविधी; इत्यादींचे वर्णन आले आहे. दानात 'इष्ट' व 'पूर्त' असे दोन भेद आहेत. विहीर, आड, तलाव, देवमंदिर, अन्नसत्र, उद्याने इत्यादींची निर्मिती 'पूर्त'धर्मात गणली गेली आहे. अग्निहोत्र, सत्यभाषण, वेदांचा स्वाध्याय, अतिथिसत्कार, बलिवैश्वदेव; यांना 'इष्टधर्म' असे नाव आहे. ग्रहणकालात, सूर्य-संक्रांतीस, द्वादशी आदी तिथींना जे दान दिले जाते ते 'पूर्त' असून हे स्वर्ग प्रदान करणारे आहे.

सूर्याचे उत्तरायण व दक्षिणायन यांत प्रवेश करण्याचा समय, विषुवकाल, व्यतिपात, तिथिक्षय, युगारंभ, संक्रांती, चतुर्दशी, अष्टमी, पूर्णिमा, द्वादशी, अष्टकाश्राद्ध, यज्ञ, उत्सव, विवाह, मन्वान्तरारंभ, वैधृतियोग, दुःस्वप्नदर्शन, या निमित्तांनी ब्राह्मणास दान दिले जाते. दोन अयने, दोन विषुवे, या चार संक्रांती, 'षडशीतिमुखा' नावांच्या चार संक्रांती, 'विष्णुपदा' नावांच्या चार संक्रांती; या दान देण्यासाठी उत्तम आहेत. कन्या, मिथुन, मीन व धनू या राशींत ज्या सूर्याच्या संक्राती होतात त्यांना 'षडशीतिमुखा' म्हणतात.

कार्तिक शुक्लपक्षातील नवमीस कृतयुग व वैशाख शुक्लपक्षाच्या तृतीयेस त्रेतायुग प्रारंभ होते. माघमासाच्या पौर्णिमेस द्वापरयुग व

भाद्रपदाच्या कृष्णपक्षाच्या त्रयोदशीस कलियुग सुरू होते. मार्गशीर्षाच्या पूर्णिमेनंतर ज्या तीन अष्टमी तिथी येतात त्यांना तीन ‘अष्टका’ म्हणतात. अष्टमीस अष्टका असे नाव आहे. या अष्टकांत दिलेले दान अक्षय होते. गया, गंगा, प्रयाग आदी तीर्थांत वा मंदिरांत दान दिल्यास उत्तम. दात्याने पूर्वाभिमुख होऊन दान द्यावे व घेणाऱ्याने उत्तराभिमुख होऊन घ्यावे. दान देणाऱ्याचे आयुष्य वाढते. पण घेणाऱ्याचे क्षीण होत नाही. आपले व प्रतिगृहीताचे नाव व गोत्र उच्चारून दान द्यावे.

स्नान व पूजन करून हातात जल घेऊन संकल्पपूर्वक दान करावे. सुवर्ण, अश्व, तिल, हत्ती, दासी, रथ, भूमी, गृह, कन्या व कपिला यांचे दान ‘महादान’ मानले गेले आहे. विद्या, पराक्रम, तपस्या, कन्या, यजमान, शिष्याकडून मिळालेले दान शुल्करूप समजावे. व्याज, शेती, वाणिज्य, दुसऱ्यावर उपकार करून घेतलेले धन, चोरी, द्यूत यांत मिळालेले धन, कपट करून प्राप्त झालेले धन; अशी तीन प्रकारची धनें अनुक्रमे सात्त्विक, राजस व तामस मानली गेली आहेत. विवाहासमयी मिळालेले, माहेराकडून मिळालेले, पतीकडून मिळालेले, भावाकडून मिळालेले, मातेकडून मिळालेले, पित्याकडून मिळालेले धन हे ‘स्त्री-धन’ म्हणून ओळखले जाते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या अनुग्रहाने दान शूद्रास मिळते. गाय, गृह, शय्या, स्त्री ही दानें अनेक व्यक्तींना देता येत नाहीत. प्रतिज्ञा करूनही दान न दिल्यास प्रतिज्ञाकर्ता शंभर कुळांचा नाश करतो.

लाभाच्या इच्छेनें दिलेले दान निष्फल होते. धर्माची सिद्धी श्रद्धेने होते. श्रद्धेने दिलेले जलही अक्षय दान होते. दान कोणी, कोणास, कसे द्यावे हेही या अध्यायात सांगितले आहे.

## विविध प्रकारची दाने

पुढल्या दोनशे दहाव्या अध्यायात सोळा महादानें, दहा मेरुदानें, दहा धेनुदाने व विविध गोदानांचे वर्णन आले आहे. महादाने सोळा आहेत. तुलापुरुषदान, हिरण्यगर्भदान, ब्रह्माण्डदान, कल्पवृक्षदान, सहस्र-गोदान, स्वर्णमयी कामधेनुदान, स्वर्णनिर्मित अश्वदान, स्वर्णमय अश्व-

युक्त रथदान, स्वर्णरचित हस्तिरथाचे दान, पांच हलांचे दान, भूमिदान, विश्वचक्रदान, कल्पलतादान, सप्तसमुद्रदान, रत्नधेनुदान, जलपूर्ण कुंभदान अशी सोळा महादानें आहेत. मेरुदान, धेनुदान, कृष्णाजिन, धेनुदान इत्यादींचेही वर्णन या अध्यायात आले आहे. या नंतर पुढल्या अध्यायात नाना प्रकारच्या दानांचे वर्णन आले आहे. या पुढल्या अध्यायात काम्यदान व मेरुदान यांचे वर्णन विस्ताराने आले आहे. पुढल्या अध्यायात पृथ्वीदान व गोदान यांचा महिमा वर्णन केला आहे.

## नाडीचक्राचे वर्णन

दोनशे चौदाव्या अध्यायात नाडीचक्राचे वर्णन अग्निदेवांनी केले आहे. नाभीच्या अधोभागी मूलाधारापासून अंकुरांप्रमाणे नाड्या निघाल्या आहेत. नाभीच्या मध्यभागी बहात्तर हजार नाड्या आहेत. इडा, पिंगला, सुषुम्ना, गांधारी, हस्तिजिव्हा, पृथा, यशा, अलम्बुशा, कुहू, शंखिनी; या दहा नाड्या प्रमुख आहेत. दहा प्राणांचे वहन या नाड्यांतून होते. प्राण, अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकर, देवदत्त, धनंजय; हे दहा प्राणवायू या दहा नाड्यांतून वाहातात. प्रथम वायू, प्राण दहांचा स्वामी आहे. सर्व वायूंचे वर्णन करण्यात आले आहे. संक्रांती, विषुव, दिन, रात्र, अयन, अधिमास, ऋण, ऊनरात्र व धन या सूर्यगतींनी होणाऱ्या दहा दशा शरीरातही होतात.

साधकानें आपल्या उदरात वायू भरून घ्यावा. देहास पूर्ण करणारा हा वायू 'पूरक' प्राणायाम आहे. यानंतर कुंभक, रेचक, अजपामंत्र, कुंडलिनीशक्ती, शिवांची दोन रूपे– एक सकल व दुसरे दुष्कल, इत्यादींचेही वर्णन आले आहे. सगुण, साकार देहात विराजणारा शिव 'सकल' व देहरहित 'निष्कल' होय. 'हंस' नाव 'सदाशिवां'चे आहे. ज्याप्रमाणे तिळांत तेल, पुष्पांत गंध, त्याच प्रकारे अंतर्यामी पुरुषांत, आत्म्यात आत व बाहेर सदाशिव राहातात. ब्रह्मदेवांचे स्थान हृदयात, भगवान विष्णूंचे कंठात, तालूच्या मध्यभागी रुद्र, ललाटात महेश्वर, प्राणांच्या अग्रभागी सदाशिवांचे स्थान असते. त्यांच्या शेवटी परात्पर ब्रह्म विराजमान होते. ब्रह्मा, विष्णू, रुद्र, महेश्वर, सदाशिव

या पांच रूपांत 'सकल' (साकार वा सगुण) परमात्मा असतो. याखेरीजचा परमात्मा निर्गुण, निराकाररूप असल्यानें त्याला 'निष्कल' म्हटले आहे.

## संध्याविधी, गायत्रीमहिमा

जो पुरुष ओंकारास जाणतो तो योगी व विष्णुस्वरूप आहे, असे दोनशे पंधराव्या अध्यायाच्या प्रारंभीच सांगून ॐकाराच्या अभ्यासाचे महत्त्व पटवून दिले आहे. ॐकाराने युक्त भू: भुव: स्व: या तीन शाश्वत महाव्याहृती व 'तत्सवितुर्वरेण्यं, भर्गो देवस्य धीमहि, धियो यो नः प्रचोदयात्' या तीन पदांचा गायत्रीमंत्र यांना ब्रह्मदेवांचे मुख मानले पाहिजे. जो मनुष्य नित्य तीन वर्षेपर्यंत गायत्रीचा जप करतो, तो वायुभूत व आकाशरूप होऊन परब्रह्मास जातो. एकाक्षर ॐकारच परब्रह्म आहे. प्राणायामही परम तप आहे. गायत्रीमंत्रापेक्षा श्रेष्ठ काही नाही. मौन राहाण्यापेक्षा सत्य भाषण श्रेष्ठ आहे.

> एकाक्षरं परं ब्रह्म प्राणायामः परं तपः ।
> सावित्र्यास्तु परं नास्ति मौनात् सत्यं विशिष्यते ।।
>
> (२१५.५)

गायत्रीच्या सात आवृत्त्या केल्या की पाप दूर होते. दहा आवृत्त्यांनी जपकर्ता स्वर्गास जातो. वीस आवृत्त्या केल्या की तो सावित्रीबरोबर ईश्वरलोकात जातो. साधकानें गायत्रीच्या एकशेआठ आवृत्त्या केल्या की, तो संसारसागर तरून जातो. रुद्रमंत्र, कूष्मांडमंत्र यांहून गायत्रीमंत्र श्रेष्ठ आहे. व्याहृतिहोमासारखा दुसरा होम नाही. हा गायत्रीचा जप कसा करावा, यासंबंधीही मार्गदर्शन आहे.

गायत्रीच्या एक एक अक्षरानें आपल्या विविध अंगांचा क्रमशः न्यास करावा. गायत्रीच्या चोवीस अक्षरांचा वर्णही क्रमाने असा सांगितला आहे. पीत, श्याम, कपिल, मरकतमणिसदृश, अग्नितुल्य, रुक्मसदृश, विद्युत्प्रभ, धूम्र, कृष्ण, रक्त, गौर, इंद्रनीलमणिसदृश, स्फटिकमणितुल्य, स्वर्णिम, पांडु, पुखराजतुल्य, अखिलद्युती, हेमाभधूम्र,

रक्तनील, रक्तकृष्ण, सुवर्णाभ, शुक्ल, कृष्ण व पलाशवर्ण; हे ते रंग. गायत्रीचे ध्यान सर्व पापांचा नाश करणारे आहे. हवन केल्यास सर्व अभीष्ट कामना सफल होतात.

अशा या गायत्रीचे आवाहन करून ॐ काराचा उच्चार करावा. शेंडी बांधावी. आचमन करून हृदय, नाभी, दोन खांदे यांना स्पर्श करावा. प्रणवाचे ऋषी ब्रह्मा, छंद गायत्री, देवता अग्नी अथवा परमात्मा होय. खालील मंत्राने गायत्रीचे ध्यान करावे.

शुक्ला चाग्निमुखी दिव्या कात्यायनसगोत्रजा ।
त्रैलोक्यवरणा दिव्या पृथिव्याधारसंयुता ।।
अक्षसूत्रधरा देवी पद्मासनागता शुभा ।।

पुढील मंत्राने गायत्रीचे आवाहन करावे. 'ॐ तेजोऽसि महोऽसि बलमसि भ्राजोऽसि देवानां धामनामाऽसि विश्वमसि विश्वायु: सर्वमसि सर्वायु: ओम् भूमि भू:

आगच्छ बरदे देवि जपे मे संनिधौ भव ।
गायन्तं त्रायसे यस्माद् गायत्री त्वं ततः स्मृता ।।

सप्तव्याहृतीचे क्रमशः ऋषी असे आहेत. विश्वामित्र, जमदग्नी, भरद्वाज, गौतम, अत्री, वसिष्ठ व कश्यप. त्यांच्या देवता अशा आहेत. अग्नी, वायू, सूर्य, बृहस्पती, वरुण, इंद्र व विश्वदेव. गायत्री, उष्णिक् अनुष्टुप्, बृहती, पङ्क्ती, त्रिष्टुप्, जगती; हे क्रमशः सात व्याहृतींचे छंद आहेत. या व्याहृतींचा प्राणायाम व होम यांत विनियोग होतो.

ॐ आपो हि ष्ठा मयोभुवः
ॐ ता न ऊर्जे दधातत
ॐ महेरणाय चक्षसे
ॐ यो वः शिवतमो रसः
ॐ तस्य भाजयतेह नः
ॐ उशतीरिव मातरः

ॐ तस्मा अरं गमाम वः
ॐ यस्य क्षयाय: तिन्वथ
ॐ आपो जनयथा च नः

या तीन ऋचा व 'ॐ द्रुपदादिव मुमुचानः स्विन्नः स्नातो मलादिव । पूतं पवित्रेणेवाज्यमापः शन्धन्तु मैनसः' या मंत्राचा 'हिरण्यवर्णाः शुचयः' इत्यादी पावमानी मंत्रांनी उच्चारण करावे. जलाचे आठ शितोडे वर टाकावेत. यामुळे जीवनातील पाप नाहीसे होते. जलात 'ऋतं च०' या अघमर्षणमंत्राचा तीन वेळा जप करावा, 'आपो हि ष्ठा' आदी तीन ऋचांना सिंधुद्वीप ऋषी, गायत्री छंद व जलदेवता, मानले गेले आहे. ब्राह्मस्नानाच्या वेळी मार्जनात यांचा विनियोग केला जातो.

'ॐ आपो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भवः स्वरोम्' हा गायत्री-मंत्राचा शिरोभाग आहे. त्याचा प्रजापती ऋषी आहे. छंदरहित यजुमंत्र आहे. कारण यजुर्वेदाचा मंत्र कोणत्याच अक्षरात्मक छंदाने आबद्ध नसतो. शिरोमंत्राच्या देवता ब्रह्मा, अग्नी, वायू व सूर्य मानल्या गेल्या आहेत. प्राणायामाने वायू, वायूने अग्नी व अग्नीने जलाची उत्पत्ती होते. त्याच जलाने शुद्धी होते. म्हणून जलाचे आचमन करताना म्हणावे, 'अन्तश्चरसि भूतेषु गुहायां विश्वमूर्तिषु । तपो यज्ञो वषट्कार आपो ज्योती रसोऽमृतम् ।'

'उदुत्यं जातवेदसं०' या मंत्राचे प्रस्कण्व ऋषी मानले जातात. याचा छंद गायत्री व देवता सूर्य आहे. अतिरात्र व अग्निष्टोमयागात यांचा उपयोग होतो. 'चित्रं देवानां०' या ऋचाचे ऋषी कौत्स, छंद त्रिष्टुप् व देवता सूर्य असून याचाही उपयोग सूर्योपस्थानाच्या वेळी होतो. दोनशेसोळाव्या अध्यायात गायत्रीमंत्राचा तात्पर्यार्थ समजावून दिला आहे. पुढल्या दोनशेसतराव्या अध्यायात गायत्रीने निर्वाणस्वरूप कसे प्राप्त होते ते सांगितले आहे.

कोठल्यातरी दुसऱ्या वसिष्ठाने गायत्रीमंत्रपूर्वक लिंगमूर्ती शिवांची स्तुती करून निर्वाणरूप परब्रह्माची प्राप्ती करून घेतली होती. या वसिष्ठाने कनकलिंग, वेदलिंग, परमलिंग, आकाशलिंग, सहस्रलिंग,

वन्हिलिंग, पुराणलिंग, वेदलिंग, पाताललिंग, ब्रह्मलिंग, सप्तद्वीपोर्ध्वलिंग, सर्वात्मलिंग, सर्वलोकाङ्गलिंग, अव्यक्तलिंग, बुद्धिलिंग, अहंकारलिंग, भूतलिंग, इंद्रियलिंग, तन्मात्रलिंग, पुरुषलिंग, भावलिंग, रजोर्ध्वलिंग, सत्त्वलिंग, भवलिंग, यज्ञांगलिंग, यज्ञलिंग, तत्त्वलिंग, देवानुगतलिंगरूप, या रूपांत शंकरांना वसिष्ठानें वारंवार नमस्कार केला आहे. त्याला भगवान शंकर प्रसन्न झाले व त्याला वर देऊन अंतर्धान पावले.

## राजाचा अभिषेकविधी

यानंतर दोनशेअठरा व दोनशेएकोणीस या अध्यायांत राजाच्या राज्याभिषेकविधीचा सविस्तर वृत्तान्त आला आहे. पूर्वी परशुरामास पुष्करानें हा विधी समजावून दिला होता. त्याने संपूर्ण राजधर्माचे वर्णन केले. राजास प्रजेचा रक्षक, शत्रूंचा नाशक व दंडाचा उचित उपयोग करणारा म्हटले आहे. 'धर्म मार्गावर असलेल्या सर्वांचं मी रक्षण करीन' अशी खात्री त्यानें प्रजेला द्यावी. राजाजवळ वर्षफल सांगणारा ज्योतिषी व एक ब्राह्मण पुरोहित नेंहमी असावा. राजशास्त्रीय विषय, आत्म्याचे ज्ञान जाणणारे मंत्री, धार्मिक लक्षणांनी संपन्न अशा राजमहिषी, त्याच्याजवळ असाव्यात.

राजभार ग्रहण केल्यावर एका वर्षानंतर राजानें सर्व सामग्री एकत्रित करावी व नीट मुहूर्त पाहून समारंभानें अभिषेक करावा. पहिल्या राजाचा मृत्यू होताच त्वरित राजासन ग्रहण करणे उचित आहे. ज्योतिषी वा पुरोहित यांच्या साह्यानें तिल, सर्षप आदी सामग्रीने राजानें स्नान करावे. भद्रासनावर बसल्यावर सर्व राज्यभर त्याचा विजय घोषित करावा. अभयाची घोषणा करून राज्यातील सर्व कैदी मुक्त करावेत. राज्याभिषेक होण्यापूर्वी पुरोहितानें इंद्रदेवतेची शांती करावी. अभिषेकाच्या दिवशी राजानें उपवास करून वेदीवर स्थापन केलेल्या अग्नीत मंत्रपाठपूर्वक हवन करावे. विष्णू, इंद्र, सविता, विश्वेदेव, सोम यांच्या संबंधी वैदिक ऋचांचा पाठ करावा. स्वस्त्ययन, शांती, आयुष्य व अभय देणाऱ्या मंत्रांचे पाठ इत्यादी करावेत.

त्यानंतर राजाने अग्नीच्या दक्षिण बाजूस अपराजिता देवी व

सुवर्णकलश यांची स्थापना करून त्यांची चंदन, फुले यांनी पूजा करावी. या अग्नीचे विस्तृत वर्णन आले आहे. त्यानंतर ऋग्वेदी विद्वानांनी कलशातील जलाने राजास अभिषेक करावा. ब्राह्मणांनी वेदमंत्र म्हणावेत. पुरोहिताने अभिषेक करावा, 'या ओषधी:०' या मंत्राने औषधींचा, 'अथेत्युक्त्वा:०' या मंत्रांनी गंधद्वारे, 'पुष्पवती०' आदी मंत्रांनी फुलांचा, 'ब्राह्मण:०' इत्यादी मंत्रांनी बीजद्वारे 'आशु: शिशान:०' आदी मंत्रांनी रत्नांचा, 'ये देवा:०' इत्यादी मंत्रांनी कुशयुक्त जलांचा अभिषेक करावा. यजुर्वेदी व अथर्ववेदी ब्राह्मणांनी 'गन्धद्वारां दुराधर्षा–' इत्यादी मंत्रांनी गोरोचनाचा टिळक राजाच्या कपाळी, कंठस्थानी लावावा.

काही लोकांनी गीत, वाद्य, पंखे, चवऱ्या यांनी शोभा आणावी. सर्वौषधींचा कलश घेऊन राजाच्या पुढे उभे राहावे. राजाने प्रथम कलशाला पाहावे. नंतर दर्पण, घृत आदी मंगलदायक वस्तूंना पाहावे. त्यानंतर विष्णू, ब्रह्मा, इंद्र, ग्रहपती यांचे पूजन करून राजाने व्याघ्रचर्मयुक्त आसनावर बसावे. पुरोहितांनी मधुपर्क आदी देऊन राजाच्या मस्तकावर मुकुट बांधावा. पांच प्रकारच्या चर्मासनांवर राजाने बसावे. 'ध्रुवाद्यै:०' इत्यादी मंत्रांनी आसने ग्रहण करावीत. वृष, वृषभांश, वृक, व्याघ्र, सिंह अशा पांचांच्या चर्मांचा उपयोग व्हावा. अभिषेकानंतर प्रतीहार, अमात्य व सचिव यांना दाखवून प्रजाजनास त्यांचा परिचय करून द्यावा. त्यानंतर राजाने गाय, बकरी, मेंढा, गृह इत्यादींचे दान करून ज्योतिषी व पुरोहित यांचे पूजन करावे. पृथ्वी, गाय, अन्य वस्तू देऊन ब्राह्मणांची पूजा करावी. अग्नीस प्रदक्षिणा करून राजाने गुरूस प्रणाम करावा. नंतर बैलाच्या पाठीस स्पर्श करून सवत्स गायीचे पूजन करावे. नंतर अभिमंत्रित अश्वावर आरूढ व्हावे. हत्तीची पूजा करावी. सेनेसहित दूरपर्यंत यात्रा करावी. नंतर सर्वांना दाने देऊन राजाने परत राजधानीत यावे.

पुढल्या अध्यायात या अभिषेकाच्या वेळी म्हणण्याच्या मंत्रांचा निर्देश केला आहे. देवांगना, वनस्पती, दिव्य अप्सरा, चौदा विद्या, पवित्र नद्या यांनी राजाचे रक्षण करावे, असा भावार्थ या मंत्रात आहे.

## राजाचे साहायक व त्यांची कामे

पुढल्या दोनशेविसाव्या अध्यायात राजाभोवतीच्या परिवाराची माहिती आली आहे. पुष्करानें सांगितले आहे की, अभिषेक झाल्या-नंतर राजानें मंत्र्यांशी विचार करून शत्रूंवर विजय मिळवावा. ब्राह्मण वा क्षत्रिय, जो कोणी नीतिशास्त्र जाणणारा असेल त्यास सेनापती नेमावे. द्वारपालही नीतिज्ञ असावा. दूत मृदुभाषी, अत्यंत बलवान, सामर्थ्यवान असावा.

राजाला पान देणारा सेवक पुरुष वा स्त्रीही असेल. तो राज-भक्त, क्लेशसहिष्णू व स्वामीचे प्रिय चाहाणारा असावा. संधी, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव, समाश्रय या सहा गुणांनी युक्त सांधिविग्रहिक (परराष्ट्रसचिव) असावा. राजाचे रक्षण करणाऱ्या प्रहरीच्या हातात सतत तलवार असावी. सारथ्यास सेनेची माहिती चांगली असावी. पाकगृहाचा अधिपती राजाचा हितैषी, चतुर असावा.

राजसभेचे सदस्य धर्माचे ज्ञाते असावेत. लेखन करणारा मनुष्य अक्षरांचा ज्ञाता असावा. धनाध्यक्षास रत्नादिकांची चांगली परीक्षा असावी. धन वाढविण्याचे मार्ग त्याला माहीत असावेत. राजवैद्यास आयुर्वेदाचे ज्ञान पूर्ण असावे. गजाध्यक्षास गजविद्येचे ज्ञान असावे. माहुत थकणारा नसावा. घोड्यांचा अध्यक्ष अश्वविद्या जाणणारा असावा. दुर्गांचा अध्यक्ष बुद्धिमान असावा शिल्पी वा कारागीर वास्तु-विद्येचा ज्ञाता असावा. राणिवसाचा अध्यक्ष वृद्ध पुरुष असावा. पन्नास वर्षांपुढील स्त्रिया व सत्तर वर्षांपुढील पुरुष अंतःपुरातील सर्व कामे करण्यासाठी नेमावेत. शस्त्रागारातील अधिकारी सतत पाहारा देणारा असावा. धर्माच्या कार्यात धर्मात्मा पुरुष, युद्धभूमीवर वीरपुरुष, धनोपार्जनासाठी अर्थकुशल व्यक्ती यांची नेमणूक व्हावी.

स्त्रियांची देखभाल नपुंसकांनी करावी. कठोर कर्मासाठी तीक्ष्ण स्वभावाची माणसे नियुक्त करावीत. राजानें कामांची वाटणी परीक्षा करून, माणसे नेमून करावी. राजानें गुप्तचरांद्वारे परदेशी माणसांची नीट चौकशी करावी. शत्रू, अग्नी, विष, साप, तलवार या वस्तू एका बाजूस व दुष्ट स्वभावाचा भृत्य दुसऱ्या बाजूस समजावा. राजास चार

चक्षू असावेत. गुप्तचरांकडून त्याला सर्व काही समजावे. हे गुप्तचर कसे असावेत, याचीही माहिती या अध्यायात आहे. राजाच्या भृत्यांनी, अनुजीवियांनी राजाशी कसे वागावे याचेही मार्गदर्शन दोनशेएक-विसाव्या अध्यायात आहे.

## राजाचे दुर्ग, साध्वी स्त्रीची कर्तव्ये

पुढल्या अध्यायात दुर्ग, कर्तव्ये, साध्वी स्त्रीचे धर्म इत्यादी महत्त्वाचे विषय आले आहेत. राजाने दुर्गदेशात निवास करावा. बरोबर राहाणाऱ्या मनुष्यांत वैश्य व शूद्र यांची संख्या अधिक असावी. शत्रूचा जोर राहाणार नाही, अशा ठिकाणी राजाचे दुर्ग असावेत. दुर्गात थोडेसे ब्राह्मण असावेत. राजास राहाण्यासाठी श्रेष्ठ देश कसा असावा ? तेथे खूप कामे करणारी माणसे असावीत. पाण्यासाठी तेथे पावसाची वाट पाहावी लागू नये. नदी, तलाव यांत खूप जल असावे. शत्रूची पीडा तेथे नसावी. तो देश फुलांनी, फळांनी, धन-धान्यांनी संपन्न असावा. शत्रु-सेना, सर्प, लुटारू यांना तेथे प्रवेश नसावा.

बलवान राजासाठी सहा प्रकारचे दुर्ग असावेत. धन्वदुर्ग, मही-दुर्ग, नरदुर्ग, वृक्षदुर्ग, जलदुर्ग, पर्वतदुर्ग; हे ते सहा प्रकार होत. यांतील पर्वतदुर्ग सर्वांत उत्तम होय. दुर्ग हेच राजाचे पूर वा नगर होय. तेथे हाटबाजार व देवमंदिर असणे अगत्याचे आहे. ज्याच्या चारही दिशांना यंत्रे बसविली आहेत, जो शस्त्रास्त्रांनी भरलेला आहे, ज्यात पाण्याची सोय उत्तम आहे, तो दुर्ग उत्तम समजावा.

राजाचे रक्षण कसे करावे ? राजा पृथ्वीचे पालन करणारा आहे. म्हणून विषादी प्रकारांपासून त्याचे रक्षण करावे. विषाचे निवारण कसे करावे, याचाही निर्देश येथे आहे. दुर्गात राहूनही राजाने देवांचे पूजन, प्रजेचे पालन, दुष्टांचे दमन, दान इत्यादी कर्मे करावीत. देवाचे धन हरण करणारा राजा एक कल्पपर्यंत नरकात पडतो. त्याने देवमंदिरेही तयार करावीत. देवालयांचे रक्षण व देवांची स्थापना; ही राजाची कर्तव्ये आहेत. देवमंदिरात चित्रे बनवावीत. गाण्याचे, नृत्याचे कार्यक्रम करावेत. देवास तेल, तूप, मध, दूध यांनी न्हाऊ घालावे. ब्राह्मणांचे

पालन करावे. त्यांचा सन्मान करावा. त्यांचे धन हिरावून घेऊ नये. राजाने ब्राह्मणाचा द्वेष करू नये. ब्राह्मणाच्या हत्येपेक्षा दुसरे मोठे पाप नाही. म्हणून त्याला नेहमी नमस्कार करावा.

राजाच्या अत्याचारानें कोणा ब्राह्मणीस रडू आले तर राजाचे कुल, राज्य या सर्वांचा नाश होतो. धर्मपरायण राजानें साध्वी स्त्रियांचे नीट पालन करावे. स्त्रीनें घरातील काम चतुराईनें व प्रसन्नतेनें करावे. प्रत्येक घरातील सामानसुमान स्वच्छ राखावे. खर्च करण्यात तिचा हात ढिला नसावा. कन्येस ज्याच्या हाती पिता दान करील तो तिचा पती होय. तिनें स्वतःच्या पतीची सेवा उत्तम करावी. स्वामीच्या मृत्यनंतर ब्रह्मचर्य पाळणारी स्त्री स्वर्गलोकी जाते. तिनें दुसऱ्याच्या घरी राहाणे पसंत करू नये. झगड्यापासून दूर राहावे. जिचा पती परदेशात असेल तिनें शृंगार करू नये. सदा आपल्या स्वामीच्या हितचिंतनात राहून देवदेवतांची आराधना करावी. केवल मंगलप्रसंगीच तिनें सौभाग्य-चिन्हांच्या रूपांत एकदोन आभूषणे घालावीत.

जी स्त्री स्वामी मरण पावल्यावर त्याच्या चितेच्या अग्नीत प्रवेश करते, तिला स्वर्गलोकी प्राप्ती होते. लक्ष्मीची पूजा, घराची स्वच्छता; इत्यादी कामे गृहिणीनें करावीत. कार्तिकी द्वादशीस विष्णूंची पूजा करून तिनें सवत्स गायीचे दान करावे. सावित्रीने आपल्या सदा-चाराने, व्रताच्या प्रभावाने पतीची मृत्यूपासून सुटका केली, हे ध्यानात ठेवावे. मार्गशीर्ष शुक्ल सप्तमीस सूर्याची पूजा केल्यानें स्त्रीस पुत्राची प्राप्ती होते.

## राष्ट्राचे रक्षण, प्रजेपासून कर इत्यादी

दोनशेतेविसाव्या अध्यायात राज्याची व्यवस्था कशी असावी, यासंबंधी पुष्करानें विवेचन केले आहे. राजाने प्रत्येक गावास एक एक अधिपती नियुक्त करावा. नंतर दहा दहा गावांचा, शंभर शंभर गावांचा अध्यक्ष नियुक्त करावा. त्या सर्वांच्यावर एक पुरुष असावा. त्याने सर्व राष्ट्राचा कारभार पाहावा. या सर्व कार्यांसाठी त्यांना पृथक पृथक

भरणपोषणासाठी वेतन असावे. प्रतिदिन गुप्तचरांकडून त्यांच्या कार्याची देखभाल राजाने करावी. जर कोठल्या गावात दोष उत्पन्न झाला, काही अडचण आली तर ग्रामाधिपतीने ती निवारण करावी, ते जर त्याला शक्य झाले नाही तर त्याने दहा गावांच्या अधिपतीस सर्व समजावून सांगावे. तो सर्व दोष दूर करील.

राष्ट्राचे नीट रक्षण झाले, ते सुरक्षित राहिले तरच राजाला त्याच्यापासून धनाची प्राप्ती होईल. धनवान राजा धर्माचे उपार्जन करतो. धनवानच कामसुखाचा उपभोग घेतो. उन्हाळ्याच्या दिवसांत जसे नदीचे पाणी सुकून जाते, त्याप्रमाणे धनाविना सर्व कामे थंडावतात. जगात पतित व निर्धन मनुष्य यांत फारसे अंतर नसते. लोक पतित मनुष्याच्या हातून काही घेत नाहीत. दरिद्री तर स्वतः होऊन काहीच देऊ शकत नाही. धनहीनाची स्त्रीही त्याच्या आज्ञेत राहात नाही. राष्ट्रास पीडा देऊन त्याला कंगाल बनविणारा राजा शेवटी नरकास जातो. गर्भवती आपल्या सुखाचा विचार सोडून गर्भस्थ जीवाचे सुख पाहाते, त्याप्रमाणे राजाने सदा प्रजेचे सुख पाहावे.

ज्याची प्रजा सुरक्षित नाही, त्या राजाच्या यज्ञाचा, तपाचा काय लाभ ? ज्याने प्रजेचे रक्षण नीट केले आहे, त्याला स्वर्गलोक स्वतःच्या घरासारखाच वाटतो. ज्याची प्रजा असुरक्षित आहे, त्या राजाचे स्थान नरकात असते. राजाने आपल्या प्रजेच्या पुण्याचा आणि पापाचा एक-षष्ठांश भाग घ्यावा. त्याने प्रजेचे रक्षण केले तर त्याला प्रजेच्या पुण्याचा अंश मिळेल. नाही तर तो लोकांच्या पापांचा धनी होईल. परस्त्रीलंपट पुरुषांपासून घाबरलेल्या पतिव्रता स्त्रीचे रक्षण करणे हा एक धर्मच आहे. त्याचप्रमाणे राजाने प्रिय व्यक्ती, चोर, राजकीय कर्मचारी यांच्याद्वारे पीडित होणाऱ्या प्रजेचे रक्षण करावे. राजाने जर प्रजेचे रक्षण केले नाही तर तोही याच लोकांचा ग्रास बनेल. म्हणून राजाने दुष्टांचे दमन करावे. शास्त्रांत सांगितले आहे, त्याप्रमाणे त्याने वागावे.

राज्यातील अर्धी आवक राजाने सतत खजिन्यात राखून ठेवावी. अर्धी ब्राह्मणांना द्यावी. त्या ब्राह्मणाने त्या निधीपैकी चौथा, आठवा,

सोळावा भाग क्षत्रिय, वैश्य व शूद्रांस द्यावा. धनास धर्मानुसार सुपात्राच्या हातात देणे अगत्याचे आहे. खोटे बोलणाऱ्या मनुष्यास दंड व्हावा. राजाने त्याच्या धनाचा आठवा भाग दंड म्हणून वसूल करावा. ज्या धनाचा स्वामी बेपत्ता आहे, त्याच्या धनाचा स्वामी राजाने तीन वर्षांपर्यंत सांभाळ करावा. तीन वर्षांनंतर जर पहिला धनी आला तर त्याने तो निधी त्याला द्यावा. जर अधिक काळ जाऊनही तो आला नाही तर राजा त्या धनाचा स्वत: स्वामी बनेल. धन आपले आहे असे म्हणणाऱ्या पुरुषाने त्या धनाचे रूप, त्याची संख्या राजास सांगावी. धन जर छोटया बालकाच्या वाटयाचें असेल तर राजाने त्या धनाचा सांभाळ बालकाचा समावर्तनसंस्कार होईपर्यंत करावा. स्त्रियांचेही असेच रक्षण व्हावे. विधवा, रोगी स्त्री यांचेही रक्षण राजाने करावे. जर कोणी तिचा जातवाला तिचे धन हरण करीत असेल तर राजाने त्याला चोर समजून दंड करावा. चोरी न होताच चोरी झाली जो म्हणतो त्यालाही दंड व्हायला हवा. त्याला राज्यातून बाहेर हाकलून द्यावे.

आपल्या राज्यात जितकी दुकानें असतील त्यांच्या मिळकतीच्या विसावा हिस्सा राजाने कर म्हणून घ्यावा. व्यापारी तुटीत येणार नाही, एवढाच कर त्यानें घ्यावा. जर कोणा अधिकाऱ्यानें विसाव्या भागापेक्षा अधिक कर घेतला तर राजानें त्यालाही दंड करावा. स्त्रिया, साधु-संन्याशी यांच्या नावेची सेवा घेऊ नये. राजानें गहू, जव आदी धान्यांचा सहावा भाग घ्यावा. चणे, मटार, इत्यादींचा आठवा भाग घ्यावा. पशूंचा पांचवा व सुवर्णाचा सहावा भाग राजानें कर म्हणून घ्यावा. गंध, औषधी, रस, फूल, मूल, फल, पत्र, शाक, तृण, बाँस, वेणू, चर्म, फत्तरांची भांडी, मध, मांस, तूप यांचा सहावा भाग राजानें कर म्हणून घ्यावा.

ब्राह्मणाकडून एखादी प्रिय वस्तू वा कर घेता कामा नये. ज्या राजाच्या राज्यात श्रोत्रिय ब्राह्मण भुकेने कष्ट पावतात ते राज्य रोग-राई, दुष्काळ, लुटारू यांनी नेहमी पीडित होते. म्हणून ब्राह्मणांची विद्या व आचरण जाणून त्यांच्या जीविकेची व्यवस्था राजाने नीट करावी. राजापासून सुरक्षित असून जो प्रतिदिन धर्माचे अनुष्ठान

करतो, त्या ब्राह्मणाच्या धर्माने राजाचे आयुष्य वाढते. त्याच्या कोशाची वृद्धी होते. शिल्पकारादिकांनी एक दिवस महिन्यातून वेतन न घेता राजाचे काम करावे.

## राजाचे अंतःपुर

दोनशेचोविसाव्या अध्यायात पुष्कराने अंतःपुरासंबंधी विशेष माहिती दिलेली आहे. धर्म, अर्थ, काम; हे तीन पुरुषार्थ 'त्रिवर्ग' म्हणून प्रसिद्ध आहेत. हे एकमेकांचे रक्षण करीत असल्याने राजाने स्त्रीसहित त्यांचे सेवन करीत असावे. 'त्रिवर्ग' एका महान वृक्षाप्रमाणे आहे. 'धर्म' त्याचे मूळ आहे 'अर्थ' त्याच्या शाखा आहेत. 'काम' त्याचे फळ आहे. मूळासहित या वृक्षाचे जतन केले तरच राजाला चांगल्या फळाची प्राप्ती होईल. स्त्रिया कामाच्या अधीन असल्यामुळे त्यांच्यासाठी रत्नांचा संग्रह वाढतो. विषयसुखाची इच्छा करणाऱ्या राजाने स्त्रियांचे सेवन करावे. अधिक सेवन मात्र निषिद्ध आहे. आहार, मैथुन, निद्रा यांच्या अधिक सेवनाने रोग उत्पन्न होतात. जी आपणांवर अनुराग दाखविते त्याच स्त्रीला पलंगावर बसवावे. ज्या स्त्रीचे आचरण दुष्ट असेल, जिला स्वतःचा पती आवडत नसेल, उलट जी त्याच्या शत्रूंना सामील राहते, जी उद्दण्डतापूर्वक गर्व धारण करते, चुंबन घेतल्यावर जी आपले मुख पुसते वा धुते, स्वामीने दिलेल्या वस्तूचा जी आदर करीत नाही, पतीच्या आधी जी झोपते, तरीही पतीनंतर जी झोपून उठते, जी स्पर्श करताच कापू लागते, एक एक अंगावर अवरोध उपस्थित करते, जी राजाच्या प्रिय वचनांना कमीच मान देते, कोणत्याही दिलेल्या वस्तूवर जी दृष्टी टाकत नाही, आपला कटिभाग लपवून जी पतीचा स्पर्श टाळते, स्वामीस पाहाताच जिचे मुख उतरते, जी त्याच्या मित्रांनाही विमुख असते, जी शृंगाराच्या समयी शृंगार धारण करीत नाही, ती स्त्री 'विरक्त' मानावी. तिचा परित्याग करून राजाने अनुरागिणीचे सेवन करावे.

अशी अनुरागवती स्त्री स्वामीला पाहाताच प्रसन्नतेने फुलून खुलते. तोंड दुसरीकडे असले तरी ती तिरप्या नजरेने पाहाते, स्वामीने

पाहिले तर ती आपली चंचल नजर दूर करते. पण पूर्ण रीतीनें नाही दूर करीत. आपल्या गुप्त अंगांसही कधी कधी ती व्यक्त करते. शरी-राचा जो अंश सुंदर नाही, त्याला ती प्रयत्न करून लपविते. स्वामीस पाहाताच ती छोट्या मुलांना आलिंगन देते, त्यांची चुंबनें घेते. बातचीती-मध्ये भाग घेऊन ती सत्य बोलते. स्वामीचा स्पर्श होताच तिच्या अंगावर रोमांच उमटतात. स्वेद प्रकट होतो. स्वामीनें थोडे जरी दिले तरी ती प्रसन्न असते. त्याचे नाव घेताना ती आनंदित होते. विशेष आदर करते. स्वामीसाठी आपल्या बोटांच्या चिन्हांनी युक्त असे फळ पाठविते. स्वामीनें पाठविलेली कोणतीही वस्तू ती आदरपूर्वक आपल्या छातीशी लावते. जणू आपल्या आलिंगनानें ती स्वामीच्या शरीरावर अमृताचा लेप करते. स्वामी झोपल्यावर ती झोपते. त्याच्या आधी ती जागी होऊन स्वामीच्या मांड्यांना स्पर्श करून ती त्याला जागवते.

यानंतर दूध, दही, तूप, खाद्यपदार्थ, रस, गंध यांची माहिती, सुगंधी पदार्थ, त्यांचे गुण इत्यादी वर्णनें येऊन हा अध्याय संपला आहे. वेलदोडा, लवंग, कंकोळ, जायफळ, कर्पूर, केशर, कस्तुरी, सुपारी यांच्या चूर्णाच्या गोळ्या बनवाव्यात. या सुगंधी गोळ्या मुखात ठेव-ल्यास मुखासंबंधी रोग होत नाहीत. दात, कसे स्वच्छ करावेत, हेही सांगितले आहे. राजानें स्त्रियांवर कधी विश्वास ठेवू नये. पुत्राच्या मातेवर तर मुळीच विश्वास ठेवू नये. सर्व रात्र स्त्रीच्या मंदिरात झोपू नये. तिनें दिलेला विश्वास बनावट असू शकतो.

## अपराधानुसार दंडनीती

दोनशेपंचविसाव्या अध्यायात राजधर्म, राजपुत्रलक्षण इत्यादी संबंधी माहिती आलेली आहे. त्यानंतरच्या अध्यायात पुरुषार्थाची प्रशंसा आली आहे. साम, दाम, दंड, भेद, माया, उपेक्षा इत्यादींचे विवेचन आले आहे. अपराधांना अनुसरून दंड कसा करावा हे पुढल्या दोनशेसत्ताविसाव्या अध्यायात आले आहे. नाना प्रकारचे अपराध व नाना प्रकारचे दंड यांचे यात दर्शन घडते. तीन जवांचा एक 'कृष्णल' पांच कृष्णलांचा एक 'माष', साठ कृष्णल वा बारा माष म्हणजे 'अर्धा

कर्ष' सोळा माषांचा एक 'सुवर्ण' होतो. चार सुवर्णांचा एक 'निष्क' होतो. दहा निष्कांचा एक 'धरण' होतो. हा सोनें, चांदी वा तांब्याचा बनतो. तांब्याच्या 'कर्षा'स 'कार्षिक' वा 'कर्षापण' म्हणतात. एकशेपन्नास पण (पैसे) 'प्रथम साहस' दंड मानला आहे. पांचशे पण म्हणजे 'मध्यम साहस' व एक हजार पण म्हणजे 'उत्तम साहस' दंड मानला गेला आहे.

चोरी न होताच जो चोरीस गेलेल्या वस्तूंची खोटीच मागणी करतो, त्याच्याकडून तितकेच धन मागून त्यास दंड करावा. खोटी साक्ष देणारा क्षत्रिय, वैश्य व शूद्र या तीन वर्णांना कठोर दंड सांगितला आहे. ब्राह्मणास मात्र राज्याबाहेर घालवून द्यावे. ज्यानें एखाद्याची ठेव बळकावली असेल तर त्यालाही नियमानुसार दंड व्हावा. कारण त्याने धर्माची हानी केलेली असते. जर एखाद्यानें नकळत दुसऱ्याची संपत्ती विकली असेल तर तो निर्दोष आहे. पण जाणून बुजून ज्याने हे कृत्य केले असेल तर त्याला चोराप्रमाणे दंड व्हावा. देण्याची प्रतिज्ञा करतो, पण जो देत नाही, त्याला राजानें सुवर्णाचे सोळा माष दंड करावेत. जो मजुरी घेतो, पण काम नाही करीत, त्याकडून आठ कृष्णलांचा दंड घ्यावा. भलत्याच वेळी भृत्याचा त्याग केल्यावर राजानें त्याग करणाऱ्यास दंड करावा.

वराचे दोष न सांगता जर कन्येचें लग्न झाले तर ती कन्या त्याला न दिल्यासारखीच मानावी. राजानें त्या व्यक्तीस दोनशेंचा दंड बसवावा. एकास कन्या देतो, असे म्हणून जो दुसऱ्यास देतो, त्यालाही एक हजार पण दंड लावावा. जो गवळी गाय नीट पाळणार नाही त्यालाही राजानें शंभर सुवर्णांचा दंड करावा. जो भय दाखवून घर, तलाव, उद्यान, शेत यांना लुबाडण्याचा प्रयत्न करतो, त्याला राजानें पाचशेंचा दंड करावा.

यानंतर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या अपराधांच्या दंडांबद्दल विवेचन आले आहे. ब्राह्मणाला उपदेश करणारा शूद्र दंडास प्राप्त होतो. श्रेष्ठ पुरुषांवर जो नेहमी आक्षेप घेतो तोही दंडास पात्र आहे. माता, पिता, ज्येष्ठ भ्राता, सासरा व गुरू यांना आक्षेप करणारा,

त्यांना वाट न देणारा शंभराच्या दंडास पात्र होतो. जो मनुष्य ज्या अंगाने दुसऱ्याचा अपराध करील ते अंग कापून टाकण्याचाही दंड आहे. जो घमेंडीत येऊन श्रेष्ठ पुरुषावर थुंकेल त्याला राजाने दंड करावा. तो जर त्याच्या पुढे राहून मूत्रविधी करील, शौचविधी करील तर त्याच्या लिंगास व गुदास शासन करावे. दुसऱ्याच्या झाडाची फळे तोडणारा दंडास पात्र आहे. जो रस्ता, शेत वा जलाशय यांना नष्ट करून जातो, त्याबद्दलची नुकसानभरपाई द्यायला हवी.

नाना अपराध व त्यांच्यासाठी नाना प्रकारचे दंड हा एक महत्त्वाचा विषय या अध्यायात आला आहे. गायीस मारणाऱ्या आततायी पुरुषांचा राजाने वध करावा. दुसऱ्याच्या स्त्रीशी संभाषण करू नये, तिच्या घरीही जाऊ नये. नीच वर्णाचा पुरुष उंच वर्णाच्या स्त्रीशी गमन करील तर त्याला वधाची शिक्षा आहे. जी स्त्री आपल्या स्वामीचा अनादर करून व्यभिचार करते, तिला कुत्र्यांकडून चावरावे. सजातीय परपुरुषाशी संबंध आल्यामुळे जी दूषित झाली व जिला संपत्ती काही उरली नसेल तिला निर्वाहापुरते अन्न द्यावयास हवे. पतीच्या ज्येष्ठ बंधूशी दूषित कर्म करणाऱ्या स्त्रीच्या मस्तकाचे केस काढून टाकावेत. शूद्रेशी व्यवहार करणारे क्षत्रिय व वैश्य यांना दीडशे पण दंड करावा. जर वेश्या एका पुरुषाचे वेतन घेऊन लोभवश होऊन दुसऱ्याशी रमली तर त्या स्त्रीने दुप्पट धन परत करावे. तिला दंडही दुप्पट करावा. स्त्री, पुत्र, दास, शिष्य, सहोदर बंधू जर अपराधी असतील तर त्यांना छडीने मार द्यावा. प्रहार पाठीवर करावा. मस्तकावर करू नये.

जर कोण्या मंत्र्याने, न्यायाधिशाने विपरीत कार्य केले तर राजाने त्याचे सर्वस्व घ्यावे. त्यांना आपल्या राज्यातून बाहेर घालवावे. गुरु-पत्निगामीच्या शरीरावर भगचिन्हाने अंकित करावे. सुरापान करणाऱ्या पापींच्या अंगावर शराबखान्याच्या झेंड्यास चित्रित करावे. चोरी करणाऱ्याच्या अंगावर कुत्र्याचे नाव गोंदवावे. ब्रह्महत्या करणाऱ्याच्या भालावर नरमुंडक्याचे चिन्ह अंकित करावे. गावातील जे लोक चोरास भोजन देतात, चोरीचा माल ठेवण्यासाठी जागा देतात, त्या सर्वांचा वध करावा. राज्यातील अधिकारी सामंत जर पापकर्मी झाले तर

त्यांचा अधिकार काढून घ्यायला हवा. जो रात्री भिंतीला भोक पाडून चोरी करील त्याचे हात राजाने कापावेत. त्याला सुळावर द्यावे.

देवमंदिर व एखादा तलाव नष्ट करणाराही प्राणदंडास पात्र होतो. जो कसलेच कारण नसताना मूत्रत्याग, मलत्याग सडकेवर करील त्यावर दंड लावावा. त्याच्याकडूनच ती अपवित्र घाण फेकवून देऊन ती जागा शुद्ध करावी. प्रतिमा वा जिना तोडणाऱ्यास पाचशे कर्षांचा दंड व्हावा. जो आपणांशी समान वर्तन करणाऱ्यास विषमतेचे वर्तन करतो, जो एखाद्या वस्तूची किंमत लबाडीने लावतो, त्याला पांचशे कर्ष दंड करावा. जो व्यापाऱ्याकडून किंमतवान वस्तू घेतो व तिची किंमत देत नाही, त्याला राजाने एक हजार कर्षांचा दंड करावा. जर वैश्याने ग्राहकास खराब माल दिला, भेसळयुक्त वस्तू दिल्या, तर त्याला पांचशे कर्ष दड व्हावा. अभक्ष्य-भक्षण करणारा ब्राह्मण दंडास पात्र होतो. जो तराजूवर वजन करण्यात लबाडी करतो, ग्राहकांचे नुकसान करतो, त्यालाही चांगला दंड करावा.

जी स्त्री विष देणारी, आग लावणारी, पती, गुरू, ब्राह्मण, संतान इत्यादींची हत्या करते, तिचे हात, कान, नाक, ओठ कापून तिला बैलाच्या पाठीवर बसवून गावाबाहेर हाकलून द्यावे. शेत, घर, गाव, जंगल नष्ट करणारे व राजाच्या पत्नीशी कुकर्म करणारे अग्नीत जळून जाण्यास योग्य आहेत. न्यायासमोर पराजित होऊनही स्वतःस जो अपराजित मानतो, त्याला दुप्पट दंड करावा. जो आमंत्रित नाही, त्या पुरुषाचा वध करावा.

## दंड, उपेक्षा, माया, साम इत्यादी

दोनशेअठ्ठाविसाव्या अध्यायात या युद्धाचेसंबंधी विचार असून पुढल्या अध्यायात शुभ व अशुभ स्वप्नांचा विचार केला आहे. पुढल्याच अध्यायात शुभ व अशुभ शकुनांची चर्चा आली आहे. या शकुनांचाच विचार पुढल्या दोनशेएकतिसाव्या अध्यायातही आला आहे. विविध प्राण्यांचे दर्शन व त्यांची शुभाशुभ फले यांचे वर्णन येथे आहे. कावळे, कुत्री, गायी, घोडी, हत्ती इत्यादींच्या दर्शनाने होणारे शुभाशुभ घटनांचे

वर्णन पुढल्या दोनशेबत्तिसाव्या अध्यायात आले आहे.

दोनशेतेहतिसाव्या अध्यायात यात्रेचा मुहूर्त व द्वादश राजमंडळ हा विषय आला आहे. राजा, मंत्री, दुर्ग, कोश, दंड, मित्र, जनपद; ही राज्याची सात अंगे आहेत. राजानें आपल्या मंडलात यांची वृद्धी करावी. स्वत:चे मंडल त्यानें पहिले महत्त्वाचे मानावे. या मंडलाचे शत्रू, सामंत व इतर नरेश असतात. 'विजिगीषु' राजाचा सीमावर्ती सामंत हा त्याचा शत्रू असतो. या प्रकारे शत्रू, मित्र, अरिमित्र, मित्रमित्र, अरिमित्रमित्र; हे पांच मंडलांच्या पुढे राहाणारे आहेत. मागे राहणाऱ्यांत पहिला 'पार्ष्णिग्राह' त्याच्यामागे 'आक्रन्द', त्याच्यामागे 'आसार' त्याच्यामागे 'पार्ष्णिग्राहासार' व 'आक्रन्दासार' असा क्रम असतो. कुल्य, अनन्तर व कृत्रिम असे शत्रूंचे तीन भेद याच अध्यायात सांगितले आहेत.

दोनशेचौतिसाव्या अध्यायात साम, भेद, दाम, दंड यांची आणखी थोडी अधिक माहिती आली आहे. शत्रूंच्या देशात यांचा उपयोग कसा करावा याची माहिती पुष्कर सांगत आहे. 'गुप्त' व 'प्रकाश' हे दोन दंडाचे प्रकार आहेत. लुटणे, गर्दन मारणे, शेती नष्ट करणे, आकार लावणे, याला 'प्रकाशदंड' म्हणतात. विष देणे, दुसऱ्याकडून माणसाचा वध करणे, सत्पुरुषांवर दोष लावणे, पाणी दूषित करणे; हे 'गुप्तदंड' होत. आता 'उपेक्षा' संबंधी थोडे पाहा. राजानें जर असे समजले की, युद्धात माझे कोणाशीच वैर नाही, विरोध नाही, व्यर्थ ताण अनर्थाचे कारण होईल, सामाचा प्रयोग येथे केला, पण उपयोग नाही झाला. दाम, भेद, दंड यांचाही काही लाभ झाला नाही. अशी मनाची अवस्था म्हणजे उपेक्षा होय.

आता मायामाय कपटपूर्ण वर्णन पाहा. राजाने खोटेच उत्पात करून त्या प्रदर्शनानें शत्रूस उद्वेग उत्पन्न करावा. शत्रूच्या छावणीत राहाणाऱ्या स्थूल पक्ष्यास पकडून त्याच्या शेपटीत जळता भाग लावन शत्रूस उल्कापाताची भीती दाखवावी. मदारी, ज्योतिषी, तपस्वी यांनी जाऊन शत्रूला सांगावे, 'तुमचा नाश होण्याचा योग आला आहे.' अशा अनेक उपायांनी शत्रूस भयभीत करावे. आपणांवर देवाची कृपा आहे,

असाही आभास निर्माण करावा. समयानुसार इंद्राची मायाही निर्माण करावी. आपल्या साह्यासाठी चतुरंगसेना देवांनी पाठविली आहे, असे भासवावे. शत्रुसेनेवर रक्ताची वृष्टी करावी. अशी माया करावी की, शत्रूला स्वत:ला स्वत:चे मस्तक त्याच्या महालाच्या वर दिसावे.

संधी, विग्रह, यान, आसान, द्वैधीभाव, संश्रय या सहा गुणांचेही वर्णन आले आहे. काही शर्तीवर शत्रूशी तह करणे म्हणजे 'संधी.' युद्धात त्याला हानी पोचविणे हा 'विग्रह.' विजयाभिलाषी राजाने शत्रूवर जी चढाई केलेली असते तिला 'यात्रा' वा 'यान' असे नाव आहे. विग्रह सोडून आपल्याच देशात राहाणे याला 'आसन' म्हणतात. अर्ध्याच सेनेसह युद्धाची यात्रा करणे यास 'द्वैधीभाव' म्हणतात. उदासीनतेस 'संश्रय' म्हटले आहे.

## राजाची नित्यचर्या

दोनशेपस्तिसाव्या अध्यायात राजाच्या नित्यचर्येचा परिचय करून दिला आहे. जेव्हा दोन घडी रात्र राहिली असेल तेव्हा राजाने नाना प्रकारची वाद्ये, बंदीजनांनी केलेली स्तुती, मंगलगीतांचा ध्वनी ऐकून आपली सुखनिद्रा संपवावी. त्यानंतर गुप्तचरांची भेट घ्यावी. गुप्तचर असे असावेत की, ते राजाचे सेवक आहेत, असे कोणास वाटू नये. त्यानंतर विधिपूर्वक राजाने आयव्ययाचा हिशेब पाहावा. नंतर शौचादी विधी करून राजाने स्नानगृहात प्रवेश करावा. तेथे नरेशाने प्रथम दंतधावन करावे. नंतर स्नान करावे. त्यानंतर संध्योपासना करून भगवान वासुदेवांचे पूजन करावे. नंतर राजाने पवित्रतापूर्वक अग्नीस आहुत्या द्याव्यात. जल घेऊन पितरांना तर्पण करावे. ब्राह्मणांकडून आशीर्वाद ऐकावेत. त्यांना राजाने सुवर्णासहित दूध देणारी गाय द्यावी.

यानंतर राजाने चंदन, आभूषणे धारण करून दर्पणात आपले मुख पाहावे. सुवर्णयुक्त घृतातही मुख पाहावे. नंतर दैनिक कथा ऐकाव्यात. त्यानंतर वैद्याने दिलेल्या औषधांचे सेवन करावे. मांगलिक वस्तूंना स्पर्श करावा. गुरूंपाशी जाऊन त्यांचे दर्शन घ्यावे. त्यांचा आशीर्वाद घेऊन राजसभेत प्रवेश करावा. सभेत विराजमान होऊन

राजाने ब्राह्मण, अमात्य, मंत्री यांची भेट घ्यावी. द्वारपालाने सूचना दिलेल्या प्रजेस दर्शन द्यावे. इतिहास श्रवण करून नंतर राजकार्य करावे. आवश्यक कार्यांचा प्रथम निश्चय करावा. काही मामल्यांबद्दल त्याने मंत्र्यांशी गुप्त चर्चा करावी. मंत्री एक एक पाहून चर्चा करावी. मूर्ख, अविश्वसनीय माणसाशी राजाने चर्चा करू नये. ती सदा गुप्तरूपाने करावी.

त्यानंतर राजाने रथ आदी वाहने हाकण्याचा आणि शस्त्रे चालविण्याचा अभ्यास करून काही कालपर्यंत व्यायामही करावा. युद्धादीप्रसंगी त्याने स्नान करून मनोभावे भगवान विष्णूंची पूजा करावी. अग्निदेवास हवन द्यावे. ब्राह्मणांना उचित धन द्यावे. त्यानंतर राजाने चांगली परीक्षा घेऊन भोजन करावे. त्यानंतर पान खाऊन डाव्या कुशीवर थोडी विश्रांती घ्यावी. प्रतिदिन शास्त्रांचे चिंतन करून योद्धे, अन्नभांडार, शस्त्रागार यांचे त्याने निरीक्षण करावे. दिनाच्या अंती सायंसंध्या करून आवश्यक अशा कामांसाठी गुप्तचरांना पाठवावे. रात्रीचे भोजन झाल्यावर राजाने अंतःपुरात जावे. तेथे संगीत व वाद्ये यांनी त्याचे मनोरंजन करावे.

## राजाची रणयात्रा

यानंतर दोनशेछत्तिसाव्या अध्यायात रणयात्रेचा विधी पुष्कराने सांगितला आहे. संग्रामाच्या उचित कर्तव्यांचाही उल्लेख यात आहे. राजाची युद्धयात्रा एक सप्ताहाची असावी. प्रथम भगवान विष्णूंची व शंकरांची पूजा करावी. मोदकांचा नैवेद्य दाखवून गणपतीचे पूजन करावे. दुसऱ्या दिवशी दिक्पालांचे पूजन करून राजाने शयन करावे. 'भगवान शिव, आपण तीन नेत्रांनी विभूषित आहात. आपण रुद्र नावानं प्रसिद्ध आहात. वरदायक, वामन, विकटरूपधारी, स्वप्नाचे अधिष्ठाते, आपणांस वारंवार नमस्कार असो. आपण देवाधिदेवांचे स्वामी आहात. आपण त्रिशूलधारी व वृषभावर स्वारी करून हिंडणारे आहात. सनातन परमेश्वरा, मी झोपी जाईन तेव्हा स्वप्नात मला आपण असं सुचवावं की हे युद्ध मला इष्ट वा अनिष्ट आहे ?' या वेळी

पुरोहिताने 'यज्जाग्रतो दूरमुदैति०' (यजु० ३४.१) या मंत्राचा उच्चार करावा.

तिसऱ्या दिवशी दिशांचे रक्षण करणाऱ्या रुद्रांची व दिशांच्या अधिपतींची पूजा करावी. चौथ्या दिवशी ग्रहांची, पांचव्या दिवशी अश्विनीकुमारांची पूजा करावी. मार्गात देवी, देवता, नदी भेटल्यास त्यांचीही पूजा करावी. द्युलोक, अंतरिक्ष, भूमी येथे निवास करणाऱ्या देवतांना बली अर्पण करावेत. रात्री भूतगणांनाही बली द्यावेत. भगवान वासुदेव आदी देव, भद्रकाली व लक्ष्मी आदी देवता, यांचेही पूजन करावे. सहाव्या दिवशी राज्याभिषेकाप्रमाणे विजयस्नान करून सातव्या दिवशी त्रिविक्रम वामनांची पूजा करावी. ब्राह्मणांच्या मुखातून 'पुण्याह' 'जय' आदीसह पुढील अर्थाच्या मंत्राचे श्रवण करावे. 'राजन्, द्युलोक, अंतरिक्ष, भूमी यांवर निवास करणाऱ्या देवता तुला दीर्घायू प्रदान करतील. तुला देवतांची सिद्धी प्राप्त होईल. तुझी ही यात्रा देवतांसाठी असल्यानं सर्व देवदेवता तुझं रक्षण करतील.'

असा आशीर्वाद ऐकून राजाने यात्रा पुढे चालू ठेवावी. 'धन्वना गा०' (यजु. २.३९) इत्यादी मंत्रद्वारे धनुष्यबाण हाती घेऊन 'तद्विष्णोः०' (यजु. ६.५) या मंत्राचा जप करून शत्रूच्यापुढे उजवा पाय पुढे करून बत्तीस पावले पुढे जावे. पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर या दिशांना जाण्यासाठी क्रमशः हत्ती, रथ, घोडे तयार ठेवावेत. एक कोस गेल्यावर थांबावे. देवब्राह्मणांची पूजा करावी. मागून येणाऱ्या आपल्या सेनेचे रक्षण करीत राजाने दुसऱ्याच्या देशात यात्रा करावी. विदेशात गेल्यावरही आपल्या देशाचा आचार पाळणे राजाचे कर्तव्य आहे. त्याने प्रतिदिन देवांची पूजा करावी. त्याने कुणाचे उत्पन्न बुडवू नये. तेथील मनुष्यांचा अपमानही करू नये. विजय मिळवून पुन्हा परत आपल्या देशात आल्यावरही राजाने देवांची पूजा करावी. दान द्यावे.

दुसऱ्या दिवशी संग्राम सुरू होणार असेल तर आदल्या दिवशी हत्ती, घोडे, आदी वाहनांना न्हाऊ घालावे. भगवान नृसिंहांचे पूजन करावे. रात्री छत्र आदी राजचिन्हे, शस्त्रास्त्रे, भूतगणांची अर्चना, इत्यादी करून भगवान नृसिंहांच्या वाहनाची सकाळी पूजा करावी. पुरोहिता-

कडून हवन करून अग्निदेवाचे दर्शन घ्यावे. त्याला आहुती देऊन ब्राह्मणांचा सत्कार करावा. त्यानंतर धनुष्य-बाण हातांत घेऊन हत्ती.-आदीवर स्वार होऊन राजाने युद्धासाठी सिद्ध व्हावे. शत्रूच्या देशात अदृश्य राहून युद्धाची योजना आखावी. जर सैनिक थोडे असतील तर त्यांना चांगले संघारित करून युद्धप्रवृत्त करावे.

सैनिक थोडे असले व शत्रूचे सैन्य अधिक असले तर ' सूचीमुख ' नावाचा व्यूह करावा. व्यूह दोन प्रकारचे असतात. एक प्राण्यांच्या शरीराप्रमाणे व दुसरा द्रव्यरूप. गरुडव्यूह, मकरव्यूह, चक्रव्यूह, श्येन-व्यूह, अर्धचंद्रव्यूह, वज्रव्यूह, शकटव्यूह, सर्वतोभद्रमंडलव्यूह व सूचीव्यूह असे नऊ व्यूह प्रसिद्ध आहेत. सर्व व्यूहांत सैनिकांना पांच भागांत विभक्त करावे. एक-दोन भागांतून युद्ध करावे व उरलेल्या तीन भागांनी त्यांचे रक्षण करावे. स्वतः राजाने व्यहात राहू नये. कारण राजाच सर्वांचे मूळ आहे. तेच जर जाईल तर सर्व राज्य संपेल. म्हणून स्वतः राजाने युद्धप्रवृत्त होऊ नये. सेनेच्या मागे त्याने एक कोसभर असावे. युद्धासाठी शिपायांना त्याने उत्साहित करावे. त्यांना धैर्य द्यावे. शत्रू व्यूहात घुसू शकणार नाही, असा व्यूह असावा. हत्तींच्या पायांचे रक्षण व्हावे म्हणून चार रथ नियुक्त करावेत. रथांच्या रक्षणासाठी चार घोडेस्वार, त्यांच्या रक्षणासाठी तितकेच ढाल-तलवारीधारी शिपाई असावेत. सैन्याच्या पुढे ढाल धारण करणारे योद्धे असावेत. त्यांच्या मागे ढालधारी, त्यांच्या मागे धनुर्धर योद्धा, त्याच्या मागे घोडेस्वार, त्यांच्या मागे रथ व त्यांच्या मागे राजाचे हस्तिदळ असावे.

पायदळ, हत्तीस्वार घोडेस्वार यांनी धर्मानुसार युद्धात भाग घ्यावा. भित्र्या पुरुषास पुढे ठेवू नये. शूरवीर पुढे राहिले तर भीरू पुरुषासही ताकद येईल. रणभूमीवर जे वीर मरतील, घायाळ होतील, त्यांना युद्धभूमीपासून हटवावे. युद्धात हत्तींना पाणी पाजावे. पायदळ शिपायांनीही कामे करावीत. युद्धात शत्रूच्या वीरांना मारणे हे धनुर्धराचे कार्य आहे. संगठित व्यूह जोडणे, तोडलेला जोडणे, तोरण-मंडळाचा नाश करणे; ही कामे हत्ती चांगली करतात. व्यूहाची रचना झाली की, सूर्याभिमुख होऊन शुक्र, शनैश्चर, दिक्पाल यांना अनुकूल

करावे. मंद मंद वायू येत असावा. त्या वेळी उत्साहपूर्वक युद्ध करावे. योद्ध्यांना उत्तेजन द्यावे. युद्धात एक तर विजय मिळवून उत्तम भोगांची प्राप्ती करून घ्यावी, अथवा मरून स्वर्गसुख भोगावे, अशा निष्ठेने युद्ध करावे. युद्धात प्राणत्याग केल्याने मोक्ष मिळतो. शूरवीराच्या शरीरातून जेव्हा रक्त निघते तेव्हा पापही वाहू लागते. युद्धात शस्त्रप्रहार स्वीकारणे हीच मोठी तपस्या आहे. रणांगणावर प्राणत्याग करणाऱ्या शूरवीरासमोर सुंदर अप्सरा चालतात. युद्धात पाठ दाखविणाऱ्याचे सारे पुण्य नष्ट होते. युद्धात पाय मागे न घेणारा अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त करून घेतो.

राजा धर्मावर दृढ असेल तर त्याचा विजय होतो. धर्मयुद्धाचे नियम ही तेथे सांगितले आहेत. कपटयुद्धाचाही उल्लेख आहे. विजय प्राप्त करून नगरात जाताना युद्धात जी रत्नसामग्री सापडेल ती राजाच्या स्वाधीन करावी. शत्रूच्या स्त्रीवर कोणाचाच अधिकार नसतो. तिचेही रक्षण करावे. आश्रयास येणाऱ्या शत्रूचे रक्षण करावे. नगरात येताच ध्रुवनक्षत्राच्या मुहूर्तावर राजमंदिरात प्रवेश करावा. देवांचे पूजन करून सैनिकांच्या भरणपोषणाची व्यवस्था करावी. शत्रूकडून मिळालेल्या धनाचा काही भाग भृत्यांनाही द्यावा.

## श्रीरामांची राजनीती

यानंतरच्या दोनशेसदतिसाव्या अध्यायात इंद्राने राजलक्ष्मीच्या स्थिरतेसाठी जे स्तोत्र दिले आहे ते शेवटी स्तोत्रमंजूषेत भावार्थासह दिले आहे, या स्तोत्राचा पाठ ऐकून भगवती लक्ष्मीने त्याच्या राज्याची संपत्तीची स्थिरता राखली. यानंतर अध्याय क्रमांक दोनशेअडतीस, दोनशे एकोणचाळिस यांत श्रीरामचंद्रांची राजनीती समजावून दिली आहे. श्रीरामांनी ही विजयदायिनी नीती लक्ष्मणास सांगितली होती. धनाचे अर्जन न्यायाने करावे. अर्जित धनाची वृद्धी करावी. स्वजन व परजन यांच्यापासून तिला राखून सत्पात्री तिचे नियोजन करावे. शास्त्र-ज्ञान, आठ गुणांनी युक्त बुद्धी (ऐकण्याची इच्छा, ऐकणे, ग्रहण करणे, धारण करणे, अर्थविज्ञान, वितर्क (ऊह), अपोह (युक्तायुक्तविचार)

व तत्त्वज्ञान हे बुद्धीचे सहा गुण होत.) धृती, दक्षता, प्रगल्भता, धारणशीलता, उत्साह, प्रवचनशक्ती, दृढता, प्रभाव, शुचिता, मैत्री, त्याग, सत्य, कृतज्ञता, कुल, शील, दम; हे संपत्तीचे हेतुभूत गुण आहेत. काम, क्रोध, लोभ, हर्ष, मान, मद हे 'षड्वर्ग' होत. राजानें यांचा सर्वथा त्याग करावा.

राजा विनयगुणानें संपन्न असावा. आन्वीक्षिकी (आत्मविद्या व तर्कविद्या), वेदत्रयी, वार्ता (कृषी, वाणिज्य, पशुपालन), दंडनीती या चार विद्यांची राजानें नेहमी तज्ज्ञांबरोबर चर्चा करावी. कधी कोणाची हिंसा करू नये. कोणाला कष्ट देऊ नयेत. मधुर वचन बोलावे. सत्य भाषण करावे. अंतर्बाह्य पवित्र असावे. दीनांसाठी दयाभाव असावा. चारही वर्णांच्या धर्मांचे राजानें रक्षण करावे. सदाचार नेहमी पाळावा. मधुर वाणी, दीनांवर दया, सत्पात्री दान, दीन व शरणागतांचे रक्षण व सत्पुरुषांचा संग; हे सत्पुरुषाचे आचार होत. हा आचार प्रजासंग्रहासाठी उपयोगी होतो. तो देशहितकारक असतो.

राजानें आपल्या सुखासाठी दीनांना दुःखी न करावे. हेच कष्टी जन राजाचा घातास तयार होतात. कल्याणमयी राजानें दुष्टांनाही आदर दाखवावा. प्रिय बोलणारा देव व कठोर बोलणारा पशू मानला गेला आहे. शुद्ध अंतःकरणानें राजानें देवदेवतांचे पूजन करावे. गुरुजन व सुहृद यांचा सत्कार करावा. अनूचाना(सांगवेदाचा अभ्यासा)नें विद्यावृद्ध सत्पुरुषाचा सत्कार होतो. सुकृत कर्मांनी देवही अनुकूल होतात. स्त्रीस प्रेमानें व भृत्यास दानानें वश करावे. इतरांच्या कृत्यांची निंदा करू नये. वर्णाश्रमास धरून धर्माचे निरंतर पालन करावे. दीनांवर दया दाखवावी. लोकव्यवहारात सर्वांशी गोड बोलावे.घरी येणाऱ्या मित्रास अत्यंत स्नेहानें वागवावे. आवश्यकता असल्यास त्याला थोडेफार धन द्यावे. दुसऱ्याचा अभ्युदय पाहून आपल्या मनात ईर्ष्या वाटू नये. इतरांना ताप देणारी गोष्ट बोलू नये. मौन व्रत धारण करून (वाचाळता सोडून) बंधुजनांशी अतूट संबंध राखावा.

राजा, अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश, बळ, युद्ध अशी सात अंगे राज्यावर उपकार करणारी आहेत. राज्यात राजा व मंत्री यांच्या-

शिवाय राष्ट्र प्रधान अर्थाचे साधन आहे. म्हणून त्याचे पालन नीट करावे. कुलीनता, सत्त्व, युवावस्था, शील, दाक्षिण्य, शीघ्रकारिता, अविसंवादिता, सत्य, वृद्धसेवा, कृतज्ञता, दैवसंपन्नता, बुद्धी, अक्षुद्रपरिवारिता, शक्यसामन्तता, दृढभक्तिता, दीर्घदर्शिता, उत्साह, शुद्धचित्तता, स्थूललक्षता, विनीतता, धार्मिकता हे धर्माचे चांगले गुण. या गुणांनी राजा श्रेष्ठ असतो.

प्रसिद्ध कुलात जन्म, क्रूरतारहित अशा गुणवान पुरुषांचा संग्रह करणारा राजा मग आपला परिवार तयार करतो. वाग्मी (उत्तम वक्ता) प्रगल्भ, स्मृतिमान, उदग्र, बलवान, वशी, दंडनेता, निपुण, कृतविद्य, स्ववग्रह, समर्थ, संधिविग्रह तत्त्ववित गूढमंत्रप्रचारक, देशकालची विभागणी करणारा, क्रोध–लोभ–भय–द्वेष–द्रोह–चपलता या अवगुणांपासून दूर राहाणारा, वृद्धजनांचा उपदेश मानणारा, मधुदर्शनाची आकृती दाखविणारा, गुणानुरागी, मितभाषी हे सर्व राजाचे आत्मगत गुण मानावेत.

उत्तम कुळांत उत्पन्न झालेले, शुद्ध व संपन्न, विद्या जाणणारे असे लोक राजाचे अमात्य असावेत. बुद्धिमान राजा शास्त्रज्ञान व शिल्पकर्म यांचा ज्ञाता असतो. कुलीनता, जन्मस्थान व अवग्रह या तीन बाबींत त्यानें माहिती प्राप्त करून घ्यावी. प्रगल्भता, प्रतिभा वाग्मिता, सत्यवादिता. या चार प्रसंगी हसून राजानें बातचीत करावी. उत्साह, प्रभाव, क्लेष सहन करणारी क्षमता, धैर्य, अनुराग व स्थिरता या गुणांची परीक्षा, राजाविषयी गुणांची व व्यवहारांची सांगड घालावी.

आसपासच्या व शेजारच्या लोकांचे बळ, सत्त्व, विपत्तीतधैर्य, आरोग्य, शील व अस्त्रबद्धता, अचापल्य, वैर न करण्याचा स्वभाव, भद्रता, क्षुद्रता यांना प्रत्यक्ष न पाहाणे असे राजाचे गुण असावेत. शेतांत धान्यांची निपज अधिक झाली, भिन्न वस्तूंच्या खाणी निघाल्या, खनिजपदार्थ उत्तम निघू लागले, गायींसाठी चराऊ रानें असतील, पाण्याची सोय चांगली असेल, तर भूमी ऐश्वर्यशालिनी होईल.

जेथे जलाची अधिकता असेल, ज्यास पर्वताचा शेजार प्राप्त झाला असेल, जेथे शूद्र, वैश्य व कारागीर अधिक असतील, जेथे किसान

उद्योगशील असतील, असे गाव या जानपद राजासाठी अत्यंत प्रशस्त होय. मुख्य लोक मूर्ख व व्यसनी असतील तरी चालतील. कारण ते आंदोलन करणार नाहीत. ज्याच्या सीमा मोठ्या आहेत, विस्तृत आहेत, ज्याच्या भोवती परकोट व गोपुरे उभी आहेत, पर्वत, नदी, मरु-भूमी, जंगल अशांनी वेढलेल्या दुर्गात राजाने राहावे. येथे जल, धान्य, धन यांची विपुलता असावी. जलमय, पर्वतमय, वृक्षमय, ऐरिण (वैराण स्थानावरील) व धान्वन (वालुकामय जमिनीवरील) असे दुर्गांचे पांच प्रकार होत.

राजाने लक्ष्मीच्या प्राप्तीसाठी लक्ष्मी, कुबेर आदींचे पूजन नेहमी करावे. सैनिकाची निवड कशी करावी हेही येथे सांगितले आहे. त्याग, विज्ञान, सत्त्व या तीन गुणांनी युक्त जो आहे, जो प्रियंवद आहे, अद्वंध आहे अशास राजाने आपला मित्र बनवावा. राजसेवक सेवाकार्यात तत्पर असावेत. दक्षता, भद्रता, दृढता, क्षमा, क्लेशसहिष्णुता, संतोष, शील व उत्साह या गुणांनी सेवक संपन्न असावेत. राजा जर अनुचित कर्म करीत असेल तर, बंधू, मित्र, ज्येष्ठ सेवक यांनी त्याला समजवावे. राजा मेघाप्रमाणे सर्व जातींना जीवप्रदान करतो. जो उद्योगसंपन्न असेल त्यालाच सर्व कार्यांचा अध्यक्ष बनवावे. शेती, व्यापार, जलमार्ग, पर्वत व दुर्ग, सेतुबंध, कुंजरबंधन (हत्ती पकडण्याचे स्थान), सोन्या-चांदीच्या खाणी, वनातील वृक्ष व वनस्पती या सर्वांना 'अष्टवर्ग' म्हटले आहे. या अष्टवर्गास राजाने क्षमा करावी.

आयुक्तक (रक्षाधिकारी राजकर्मचारी), चोर, शत्रू, राजाचे प्रियसंबंधी, राजाच्या लोभातले यांच्यापासून प्रजेला नेहमी भय असते. या भयाचे निवारण करून राजाने उचित समयी प्रजेपासून कर घ्यावेत. राजाचे दोन भेद आहेत. एक 'आभ्यन्तर' म्हणजे राजाचे शरीर व राष्ट्र वा जनपद म्हणजे त्याचे बाह्य राज्य, यांचे रक्षण करावे. जो पापी राजाचा प्रिय असूनही राज्यास हानी पोचवितो, तो दंडनीय आहे. राजाने त्या सर्वांना दंड करावा. राजाने विषादीपासून स्वतःचे रक्षण करावे. स्त्रियांवर, पुत्रांवर, शत्रूंवर कधी विश्वास धरू नये.

## द्वादश राजमंडलचिंतन

राजानें मुख्य द्वादश राजमंडलाचे चिंतन करावे. १) अरी, २) मित्र, ३) अरिमित्र, ४) मित्रमित्र, ५) अरिमित्रमित्र हे क्रमशः विजिगीषूच्या पुढले राजे होत. त्यांच्यामागे क्रमशः चार राजे होतात. त्यांची नावे अशी— १) पार्ष्णिग्राह, २) आक्रन्द, ३) पार्ष्णिग्रहासार, ४) आक्रंदासार. अरी व विजिगीषू या दोहोंची सीमा जेथे मिळते तो राजा 'मध्यम' म्हणून ओळखला जातो. या सभामंडलाच्या बाहेर अधिक बलशाली, शक्तिवान राजा असेल तर त्याला 'उदासीन' अशी संज्ञा आहे. थोडक्यात द्वादश राजमंडल असे—




यानंतर रामानें लक्ष्मणास संधी, विग्रह, यान व आसन इत्यादी विषय समजावून दिले आहेत. आपल्या कल्याणासाठी संधी केव्हा करावा? १ कपाल, २ उपहार, ३ संतान, ४ संगत, ५ उपन्यास, ६ प्रतिकार, ७ संयोग, ८ पुरुषान्तर, ९ अदृष्टनर, १० आदिष्ट, ११ आत्माभिष, १२ उपग्रह, १३ परिक्रय, १४ उच्छिन्न, १५ परदूषण व १६ संधोपमेय असे संधीचे सोळा भेद सांगितले आहेत. ज्यांच्याशी संधी करायचा त्याला 'संधेय' म्हणतात. त्याचे दोन भेद आहेत. १) अभियोक्ता व २) अनभियोक्ता. उपन्यास, प्रतिकार, संयोग हे तीन संधी

अनभियोक्ता म्हणजे अनाक्रमणकारी आहेत. बाकी सर्व अभियोक्ता म्हणजे आक्रमणकारी आहेत. परस्परोपकार, मैत्र, सम्बन्धज, उपहार असे आणखी संधीचे चार प्रकार सांगितले आहेत.

बालक, वृद्ध, चिरकाल रोगी, बंधुबांधवांपासून बहिष्कृत, भित्रे, लोभी, लालची सेवकांनी घेरलेला, अमात्यांपासून वंचित, अत्यंत विषयासक्त, लोकांसमोर मंत्र प्रकट करणारा, देवांची व ब्राह्मणांची निंदा करणारा, दैवावर भार ठेवून स्वत: उद्योग न करणारा, सत्य व धर्म यांपासून भ्रष्ट झालेला यांच्याबरोबर संधी करू नये. केवळ विग्रह करावा. अपकाराने मनुष्यात विग्रह वा कलह होतो. या विग्रहाची कारणे कोणती ? सप्तांग राज्य, स्त्री, जनपदातील स्थानविशेष, राष्ट्राचा एक भाग, ज्ञानदात्या उपाध्यायाचे अपहरण, मद, मान, जनपदाची पीडा, ज्ञानविघात, अर्थविघात, शक्तिविघात, धर्मविघात, सिद्धी, माननीयांचा अपमान, बंधुवर्गाचा विनाश, भूतानुग्रहविच्छेद, मंडलभूषण इत्यादी अनेक कारणांनी विग्रह होतो. पांच प्रकारची वैरेही येथे सांगितली आहेत. त्यानंतर आणखी सोळा प्रकारचे विग्रह निवेदन केले आहेत.

विगृह्यगमन, संघायगमन, सम्भूयगमन, प्रसंगत: गमन, उपेक्षापूर्वक गमन हे पांच भेद यानाचे म्हणून सांगितले आहेत. यानाचे आणखीही पांच भेद आहेत. १ विगृह्य आसन, २ संधाय आसन, ३ सम्भूय आसन, ४ प्रसंगासन, ५ उपेक्षासन; अशा आसनांचे प्रकार या अध्यायात आले आहेत.

## मंत्रविकल्प

दोनशेएकेचाळिसाव्या अध्यायात रामचंद्रांनी लक्ष्मणास मंत्रशक्तीचे महत्त्व पटवून दिले आहे. प्रभावशक्ती, उत्साहशक्ती यांच्यापेक्षा मंत्रशक्ती श्रेष्ठ आहे. शुक्राचार्यांपासून देवपुरोहित बृहस्पतीने ही मंत्रशक्ती जिंकून घेतली. अविज्ञात (परोक्ष), विज्ञाताचा निश्चय, समाधान, शेष हे सर्व मंत्रीगणास अधीन असतात. सहायक, कार्यसाधनेचा उपाय, देश, कालाचा विभाग, विपत्तीचे निवारण, कर्तव्याची

सिद्धी; ही मंत्रांची पांच अंगे आहेत. मनाची प्रसन्नता, श्रद्धा, क्षमता, सहायसपत्ती, उत्थानसंपत्ती यांना मंत्रद्वारे आरंभ करावा.

मद (मदिरेची नशा), प्रमाद, काम, स्वप्नावस्थेतील प्रताप; इत्यादी प्रकार मंत्राचा भेद करून होतात.

सभेत निर्भयपणाने बोलणारा, स्मरणशक्ती धारण करणारा, प्रवचनकुशल, शास्त्री, शास्त्रांत कुशल, असे पुरुष राजदूत होण्यासाठी योग्य असतात. या दूतांचेही तीन भेद सांगितले आहेत. प्रकाश (प्रकट) व अप्रकाश (गुप्त) असे दोन प्रकारचे चर असतात. यांतील प्रकाशास दूत म्हणतात व अप्रकाशास चर म्हणतात. वाणी, किसान, मुंडित वा जटाधारी तपस्वी, भिक्षुक, अध्यापक; यांच्यासाठी संस्था असाव्यात. यांच्यासाठी वृत्तीची म्हणजे उपजीविकेची व्यवस्था असावी.

दूताचे प्रयत्न विफल झाले व शत्रू व्यसनग्रस्त झाला की, त्याच्यावर चढाई करावी. व्यसनें दोन प्रकारची असतात. एक मानुष व दुसरे दैवी. अग्नी, जल, रोग, दुष्काळ, महामारी; ही व्यसने दैवी होत. उरलेली सर्व मानुषी. मंत्र (कार्याचा निश्चय), मंत्रफलाची प्राप्ती, अनुष्ठान, भावी उन्नतीचे संपादन, आयव्यय, दंडनीती, शत्रूचे निवारण, व्यसन म्हणजे संकट टाळण्याचा उपाय, राजा व राज्याचे रक्षण; ही सर्व अमात्यची कार्ये आहेत. अमात्य जर व्यसनग्रस्त असेल तर ही सर्व कामे नष्ट होतील. सुवर्ण, धान्य, वस्त्र, वाहन, इतर द्रव्यांचा संग्रह, ही जनपदवासी प्रजेची कर्मे होत. प्रजाही व्यसनग्रस्त नसावी.

आपत्तिकालात प्रजेचे रक्षण, कोश, सेनेचे रक्षण, गुप्त वा प्रकट युद्ध, आपत्तिग्रस्त लोकांचे रक्षण; संकटात पडलेल्यांचे रक्षण, अमित्रांचा संग्रह, सामंत व वनवासी यांच्यामुळे होणाऱ्या बाधेचे निवारण; इत्यादी बाबी दुर्गामुळे साधतात, भृत्याचे भरणपोषण, दानकर्म, भूषण, हत्ती-घोडे आदींची खरेदी, स्थिरता, शत्रुपक्षाची क्षुब्ध प्रकृती धन देऊन वळविणे, दुर्गाचा संस्कार, सेतुबंध, वाणिज्य, प्रजा व मित्र यांचा संग्रह, धर्म, अर्थ व काम यांची सिद्धी; इत्यादी सर्व कार्ये कोशानेच संपादित होतात.

कठोर वचन बोलून दुसऱ्यास दुःख देणे, अत्यंत कठोर दंड करणे,

मदिरापान, स्त्रीविषयक आसक्ती, शिकारीचा खेळ अधिक काळ करणे, द्यूत खेळणे; ही राजाची व्यसने होत. आळस, स्तब्धता, दर्प, प्रमाद, विनाकारण वैर, कठोर वचन; ही सर्व सचिवाची व्यसनै होत. असे हे राजा व राजपरिवार यांच्यासंबंधीचे वर्णन आणखीही विस्तारानें आले आहे. अर्थदूषण, वाणीची कठोरता, दंडविषयक क्रूरता, ही क्रोधज व्यसनै होत. मृगया, द्यूत, मद्यपान, स्त्रीसंग; ही कामज व्यसनै होत. या सर्व व्यसनांचे, त्यांच्या परिणामांचेही वर्णन या अध्यायात आले आहे साम, दाम, दंड, भेद, उपेक्षा, इंद्रजाल, माया; या सात उपायांचा प्रयोग करून शत्रूस वश करून घ्यावे.

सामाचे पाच भेद आहेत. दुसऱ्यावरील उपकाराचे वर्णन, आपल्या नातेवाईकांचा उच्चार, मधुरवाणीनें गुणकीर्तन, भावी उन्नतीचे प्रकाशन, मी आपलाच आहे, ही आत्मसमर्पणाची भावना, असे हे सामाचे प्रकार आहेत. असेच आणखीही उपायांचे भेद व त्यांची वर्णनें आली आहेत.

## सैन्याचे भेद, व्यूहप्रकार

दोनशेबेचाळिसाव्या अध्यायात सेनेंचे सहा भेद, त्यांचे बलाबल, सहा अंगे इत्यादींचे वर्णन लक्ष्मणासाठी श्रीरामांनी केले आहे. मौल, भृत, श्रेणी, सुहृद, शत्रू व आटविक; असे सैन्यभेद सहा प्रकारचे आहेत. सेनानायकाने कसे वागावे, व्यूहाची रचना कशी करावी, सैन्याचे विभाग कोणते, त्यांचे अधिकारी कोण असतात? व्यूहाची उरस्य, कक्ष, पक्ष, ही तीन अंगें, युद्धासबंधी यंत्रे, आयुधे, औषधे, उपकरणे, यांची स्थाने वर्णन केली आहेत. हृदयस्थानी (मध्यभागी) प्रचंड हत्तींचे दळ ठेवावे. कक्षिस्थानात रथ ठेवावेत. पक्ष्यस्थानात घोडे ठेवावेत. रथ, पायदळ, अश्व, हत्ती यांची स्थाने सेनेत निश्चित असावीत.

व्यूहाचेही नाना प्रकार सांगितले आहेत. अतभेदी, आवाप, प्रकृतिव्यूह, भोग, मंडल, दंडव्यूह असे काही व्यूह. एकट्या दडव्यूहाचेच सतरा भेद आहेत. प्रदर, दृढक, असह्य, चाप, चापकुक्षी, प्रतिष्ठ, सुप्रतिष्ठ, श्येन, विजय, संजय, विशालविजय. सूची, स्थूणाकर्ण, चमूमुख, झषास्य, वलय, सुदुर्जय; असे हे व्यूह. गोमूत्रिका, अहिसंचारी, शकट,

मकर, परिपतंतिक हे भोगाचे पांच भेद आहेत. मार्गाने गाय जात असताना तिच्या मूत्राने जी आकृती उमटते तो 'गोमूत्रिका' व्यूह मानला गेला. सर्पाप्रमाणे गतिमान राहिलेली आकृती 'अहिसंचारी' व्यूह झाला. सर्वतोभद्र व दुर्जय हे मंडलव्यूहाचे दोन भेद. यांचे आणखीही प्रकार आहेत. दंडासंबंधी सतरा, मंडलाचे दोन, असंहतेचे सहा व भोगाचे पांच भेद आहेत.

## अशी पुरुषलक्षणे

यानंतर दोनशेत्रेचाळिसाव्या अध्यायात पुरुषलक्षणाचे वर्णन आले आहे. पूर्वी ही लक्षणे भगवान समुद्राने गर्गमुनींना सांगितली होती. एकाधिक, द्विशुक्ल, त्रिगंभीर, त्रित्रिक, त्रिप्रलंब, त्रिकव्यापी, त्रिवली-युक्त, त्रिविनत, त्रिकालज्ञ, त्रिविपुल पुरुष शुभलक्षणांचा मानला जातो. चतुर्लेख, चतुस्सम, चतुष्किष्कु, चतुर्दंष्ट्र, चतुष्कृष्ण, चतुर्गंध, चतुर्ह्रस्व, पंचसूक्ष्म, पंचदीर्घ, षडुन्नत, अष्टवंश, सप्तस्नेह, नवामल, दशपद्म, दशव्यूह, न्यग्रोधपरिमंडल, चतुर्दशसमद्वंद्व व षोडषशाक्ष पुरुष प्रशस्त असतो.

धर्म, अर्थ, काम यांनी संयुक्त धर्म 'एकाधिक' मानला गेला आहे. तारकाहीन नेत्र व उज्ज्वल दंतपंक्ती यांनी सुशोभित पुरुष 'द्विशुक्ल' म्हणून ओळखला जातो. ज्याचे स्वर नाभी म्हणजे सत्त्वादींनी गंभीर आहेत तो 'त्रिगंभीर' होतो. निर्मत्सरता, दया, क्षमा, सदा-चरण, शौच, स्पृहा, औदार्य, अनायास, शूरता यांनी विभूषित पुरुष 'त्रित्रिक' मानला जातो. ज्या पुरुषाचे वृषण (लिंग) व भुजयुगल लांब असतील तो 'त्रिप्रलंब' या नावाने ओळखला जातो. जो आपले तेज, यश आणि आपली कांती यांनी सर्व दिशांना व्यापतो तो 'त्रिकव्यापी' म्हणून ओळखला जातो. ज्याच्या उदरावर तीन रेखा असतात तो 'त्रिवलीमान्' या नावाने ओळखला जातो. देव, ब्राह्मण, गुरुजन यांना विनीत असणारा 'त्रिविनत' होतो. धर्म, अर्थ, काम यांच्या समयाचे ज्ञान असणारा 'त्रिकालज्ञ' असतो. ज्याचे वक्षःस्थळ, ललाट, मुख विस्तारयुक्त असेल तो 'त्रिविपुल' होतो. ज्याचे हस्तयुगल

व चरणयुगल ध्वज छदादींनी चिन्हित असेल तो पुरुष 'चतुर्लेख' या नावानें ओळखला जातो. अंगुली, हृदय, पुष्ठ व कटी ही चारही अंगे समान असल्यास तो 'चतुष्सम' असतो. ज्याची उंची शहाण्णव अंगुले असेल तो 'चतुष्किष्कु' असतो. ज्याच्या चारही दाढा चंद्राप्रमाणे प्रकाशमान असतील तो 'चतुर्दंष्ट्र' असतो.

ज्याचे नयनतारक, भ्रूयुगल, श्मश्रू व केस कृष्ण असतात तो 'चतुष्कृष्ण' म्हणून ओळखला जातो. नाक, मुख, कक्षयुग्म यांना उत्तम गंध असेल तर 'चतुर्गंध' या नावानें तो मनुष्य ओळखला जातो. लिंग, ग्रीवा, जंघायुगल र्‍हस्व असतील तर तो 'चतुर्‍हस्व' होतो. अंगुलिपर्व, नख, केस, दंत, त्वचा सूक्ष्म असतील तो पुरुष 'पञ्चसूक्ष्म' होतो. हनुवटी, नेत्र, ललाट, नाक व वक्षःस्थल विशाल असेल तर तो 'पञ्चदीर्घा' या नावानें ओळखला जातो. वक्षःस्थल, कक्ष, नख, नाक, मुख व कृकाटिका (घशातील गाठ) ही सहा अंगे उन्नत व त्वचा, केस, दंत, रोम, दृष्टी, नख व वाणी हे सात स्निग्ध असल्यास शुभ. जानुद्वय, ऊरुद्वय, पृष्ठ, हस्तद्वय, नासिका मिळून 'आठ वंश' होतात. नेत्रद्वय, नासिकाद्वय, कर्णयुगल, शिश्न, गुदा व मुख ही स्थाने निर्मळ असतील तर पुरुष 'नवामल' होतो. जीभ, ओठ, तालू, नेत्र, हात, पाय, नखे शिश्नाग्र व मुख ही दहा अंगे पद्माच्या समान कांतियुक्त असतील तर चांगली होत. हात, पाय, मुख, ग्रीवा, कर्ण, हृदय, शिर, ललाट, उदर, पृष्ठ हे दहा बृहदाकार असतील तर सन्मानित होतील.

ज्या पुरुषाची उंची हात वर करून दोनही मध्यमा अंगुलींच्या मध्यमान्तराच्या समान असेल तर तो 'न्यग्रोधपरिमंडल' नावानें ओळखला जातो. ज्याचे चरण, गुल्फ (घोटे), नितंब, पार्श्व, वङ्क्षण, वृषण, स्तन, कर्ण, ओष्ठ, ओष्ठान्त, जंघा, हस्त, बाहू, नेत्र ही अंगयुग्मे समान असतील तर तर तो 'चतुर्दशसमद्वंद्व' म्हणून ओळखला जातो. जो आपल्या दोनही नेत्रांनी चौदा विद्यांना अवलोकन करतो तो 'षोडशाक्ष' म्हटला जातो. दुर्गंधयुक्त, मांसहीन, रुक्ष, शिरांनी व्याप्त शरीर अशुभ मानले गेले आहे. धन्य पुरुषाची वाणी मधुर, चाल हत्ती-सारखी असते. प्रत्येक रोमकूपातून एक एक रोम निघत असतो. आश

पुरुषाचे रक्षण भयापासून वारंवार होते.

## आणि अशी स्त्रीलक्षणे

दोनशे चव्वेचाळिसाव्या अध्यायात समुद्राने गर्गमुनींना स्त्रीची लक्षणे निवेदन केली आहेत. जिचे संपूर्ण अंग मनोहर असेल, जी मत्त गजाप्रमाणे मंद गतीने चालते, जिचे ऊरू व जघन (नितंबदेश) भारी असतील, नेत्र उन्मत्त पारावतासमान मदभरे, जिचे केस सुंदर नील-वर्णाचे असतील, ती स्त्री उत्तम श्रेणीची समजावी. तिचे शरीर सड-पातळ, अंग रोमरहित व तिला पाहाताच मन मोहून जाते. जिचे दोन पाय समतल भूमीस पूर्णरूपाने स्पर्श करतात, दोनही स्तन परस्परांस भिडलेले असतात. नाभी दक्षिणावर्ती असेल, योनी पिंपळाच्या पानाच्या आकाराची असेल, दोन गुल्फ (घोटे) आत झाकलेले असतील, नाभी आंगठयाच्या बरोबर असेल, पोट लांब व सुटलेले नसेल तर ती श्रेष्ठ समजावी.

रोमावलींनी रुक्ष शरीराची रमणी चांगली मानली गेली नाही. नक्षत्र, वृक्ष, नद्या यांच्यावरून जिचे नाव ठेविले असेल, जिला सदा कलह प्रिय असेल ती स्त्री चांगली नसते. जी लोलुप नसेल, कटुवचन बोलणारी नसेल अशी नारी देवांकडून पूजित होऊन 'शुभलक्षणा' बनते. जिचे कपोल मधूकपुष्पांप्रमाणे गोरे असतात ती शुभ नारी असते. जिच्या शरीरातील शिरा दिसत असतात, जिच्या अंगावर अधिक रोम असतात, ती नारी चांगली मानली गेली नाही. जिच्या कुटिल भुवया परस्परांशी बिलगल्या आहेत, ती नारीही चांगली नसते. जिचे प्राण पतीभोवती असतात, जी पतीस प्रिय होते, अशी नारी लक्षणांनी रहित असली तरी शुभलक्षणसंपन्न मानली गेली आहे. जेथे सुंदर आकृती आहे तेथे शुभ गुण असतात. जिच्या पायाची कनिष्ठिका अंगुली धरतीस स्पर्श करते, ती मृत्युरूपा मानली गेली आहे.

## चामर, धनुष्य, बाण व खड्ग

दोनशे पंचेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी वसिष्ठास चामर,

धनुष्य, बाण, खड्ग इत्यादींची लक्षणे सांगितली आहेत. सुवर्णदंडभूषित चामर उत्तम असते. राजासाठी हंस, मयूर, शुक यांच्या पंखांनी तयार केलेली छत्रे प्रशस्त मानली गेली आहेत. वक पक्ष्याच्या पंखांनी तयार केलेले छत्र चांगले असते. परंतु मिश्रित पंखांचे छत्र बनवू नये. तीन, चार, पांच, सहा सात वा आठ पर्वांनी युक्त असा दंड प्रशस्त असतो.

भद्रासन पांच अंगुले उंच व क्षीरकाष्ठाने निर्मित असावे. ते सुवर्ण-चित्रित व तीन हात विस्तृत असावे. धनुष्यासाठी लोह, शृंग वा काष्ठ या तीन वस्तूंचा उपयोग करावा. वंश, भंग व चर्म या तीन वस्तूंची प्रत्यंचा बनवावी. दारुनिर्मित श्रेष्ठ धनुष्याचे प्रमाण चार हात मानले गेले आहे. मुष्टिग्राहासाठी धनुष्याचा मध्यभाग द्रव्यनिर्मित असावा. धनुष्य कामिनीच्या भ्रूलतेसमान असून अत्यंत संयत असावे. लोह वा शृंग यांचेही धनुष्य बनते. शृंगनिर्मित धनुष्यास अत्यंत उपयुक्त व सुवर्णबिंदूंनी अलंकृत करावे. कुटिल, स्फुटित, छिद्रयुक्त धनुष्य निंदित असते. धातूंत सुवर्ण, रजत, ताम्र व कृष्णलोह यांचा उपयोग करावा. शाङ्र्गधनुष्यांत महिष, शरभ, रोहिणी मृग यांच्या शृंगांना महत्त्वाचे शुभस्थान आहे. चंदन, वेत, साल, धव, अर्जुन या वृक्षांच्या काष्ठांचे शरासन उत्तम असते. यांना शरदऋतूत कापून पक्क्या बांबूंनी तयार केलेले धनुष्य सर्वोत्तम असते. धनुष्य व खड्ग यांना त्रैलोक्यमोहनमंत्रांनी पूजित करावे.

लोह, बांबू, सरकाडच्या, इत्यादींनी निर्माण झालेले बाण साधे, स्वर्णाभ, स्नायुश्लिष्ट, सुवर्णपुंखभूषित, तैलधौत, सोनेरी असावेत. राजाने यात्रेत वा अभिषेक करताना धनुष्यबाणाची, इतर अस्त्रांची, पताकांची, अन्नसंग्रहाची पूजा करावी.

एकदा भगवान ब्रह्मदेवांनी सुमेरुपर्वतावरील शिखरावर आकाश-गंगेच्या किनाऱ्यावर एक यज्ञ केला होता. त्यांनी या यज्ञात उपस्थित झालेल्या लोहदैत्यास पाहिले. 'हा आपल्या यज्ञात विघ्न तर आणणार नाही ?' या विचाराने ब्रह्मदेव चिंताग्रस्त होताच अग्नीतून एक महा-बलवान पुरुष प्रकट झाला. त्याने ब्रह्मदेवांना वंदन केले. देवांनी प्रसन्न होऊन त्याचे अभिनंदन केले. यामुळे तो 'नंदक' होऊन खड्गरूप

बनला. भगवान श्रीहरींनी नंदकखड्गास स्वत:चें आयुध बनविले. देवांनी या कृतीस विरोध करून त्या खड्गास पकडले. ते खड्ग म्यान्यातून बाहेर पडले. त्या खड्गाची कांती निळी होती. त्याची मूठ रत्नखचित होती. त्यानंतर ते वाढून शंभर हाताचे झाले. लौहदैत्याने गदेच्या प्रहाराने देवांना युद्धभूमीवरून पिटाळून लावण्यासाठी युद्ध सुरू केले. भगवान विष्णूंनी त्या लौहदैत्याचे सारे अंग त्या खड्गानें कापून काढले. नंदकाच्या स्पर्शानें छिन्नभिन्न होऊन दैत्याचे लौहमय अंग भूमीवर पडले. अशा प्रकारे लोहासुराचा वध करून भगवान श्रीहरींनी त्याला वर दिला की, 'तुझ्या पवित्र अंगापासून लोह भूतलावर आयुधाचं काम करील' नंतर श्रीविष्णूंच्या कृपाप्रसादानें ब्रह्मदेवांनीही सर्वसमर्थ श्रीहरींची पूजा केली.

खटीखट्टर देशात निर्मित खड्ग दर्शनीय असते. ऋषीक देशातील खड्ग शरीरास चिरणारे असून शूर्पारक देशातील खड्ग अत्यंत दृढ असते. वंगदेशातील खड्ग तीक्ष्ण व आघात सहन करणारे असते. अंगदेशातील खड्ग श्रेष्ठ मानले गेले आहे. ज्या खड्गाचा शब्द दीर्घ व किंकिणीच्या ध्वनीसारखे असते, ते धारण करावे. ज्या खड्गाचा अग्रभाग पद्मपत्र, मंडल वा करवीरपात्रासारखा असतो, जे घृतगंधानें युक्त आणि आकाशाच्या कांतीसारखा ज्याचा वर्ण असतो, ते खड्ग उत्तम होय. खड्गावर समांगुलावर स्थित लिंगसमान चिन्ह प्रशंसित आहे. खड्गावर आपले मुख पाहू नये. उष्टया हातानें त्याला स्पर्श करू नये. खड्गाची जात, त्याचे मूल्य कोणासही सांगू नये. रात्री झोपताना खड्ग उशाशी घेऊन झोपावे.

## आणि अशी रत्नपरीक्षा

पुढल्या दोनशेसेहेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी वसिष्ठास रत्नांची लक्षणे सांगितली आहेत. राजानें रत्नें धारण करावीत. वज्र (हिरा), मरकत, पद्मराग, मुक्ता, महानील, इंद्रनील, वैडूर्य, गंधसस्य, चंद्रकान्त, सूर्यकान्त, स्फटिक, पुलक, कर्केतन, पुष्पराग, ज्योतिरस, राजपट्ट, राजमय, शुभसौगन्धिक, गंज, शंख, ब्रह्ममय, गोमेद, रुधिराक्ष,

भल्लातक, घूली, मरकत, तुष्यक, सीस, पीलु, प्रवाळ, गिरिवज्र, भुजंगमणी, वज्रमणी, टिट्टिभ, भ्रमर, उत्पल; या रत्नांना विजय प्राप्तीसाठी सुवर्णमंडितकरून धारण करावे. अंतर्भागात प्रभायुक्त, निर्मल, सुसंस्थान असतील अशाच रत्नांना धारण करावे. प्रभाहीन, मलिन, खंडित; अशा रत्नांना धारण करू नये.

सर्व रत्नांत हिरा सर्वश्रेष्ठ आहे. जो हिरा जलात तरेल, अभेद्य असेल, षट्कोणी असेल, इंद्रधनुष्याप्रमाणे निर्मळ असेल, हलका व सूर्याप्रमाणे तेजस्वी असेल, पोपटाच्या पंखांच्या वर्णाचा असेल, स्निग्ध, कांतिमान असेल तर तो शुभ मानला गेला आहे. मरकतमणी सुवर्णचूर्णासमान सूक्ष्म बिंदूंनी विभूषित असल्याने श्रेष्ठ मानला आहे. स्फटिक वा पद्‌मराग अरुणिमामुळे युक्त व अत्यंत निर्मळ असल्यानें उत्तम मानला गेला आहे. मोती शिंपल्यातून तयार होतो. परंतु शंखापासून बनलेले मोती अधिक निर्मल व उत्कृष्ट असतात. हत्तीचे दात व कुंभस्थलापासून, सूकरापासून, मत्स्य व वेणुनागापासून, मेघांपासून बनलेले मोती अत्यंत श्रेष्ठ असतात. मौक्तिकांत गोलाई, शुक्लता, स्वच्छता व महत्ता; हे गुण असतात. उत्तम इंद्रनीलमणी दुधात ठेवल्यास अधिक प्रकाशित व सुशोभित होतो. जें रत्न स्वतःच्या प्रभावानें सर्वांचे रंजन करील ते अमूल्य समजावे. नील व रक्तप्रभेचे वैडूर्य श्रेष्ठ असते.

यानंतर दोनशेसत्तेचाळिसाव्या अध्यायात गृहासाठी योग्य भूमी, वास्तुमंडल, वृक्षारोपणविधी यांचे वर्णन आहे. पुढल्या अध्यायात विष्णू आदींच्या पूजनात उपयोगी असणाऱ्या विविध पुष्पांचे कथन आहे. मालती, मल्लिका, यूथिका, गुलाब, कण्हेर, पावन्ती, अतिमुक्तक, कर्णिकार, कुरण्टक, कुब्जक, तगर, करंब, बाण, वनमल्लिका, अशोक, कुंद, तमाल; यांची पुष्पे पूजेसाठी उपयोगी आहेत. बिल्वपत्र, शमीपत्र, भृंगराजपत्र, तुलसी, कृष्णतुलसीं, वासक यांची पुष्पे पूजेत ग्राह्य मानली गेली आहेत. केतकीचे पान व पुष्प, पद्म, रक्तकमल, हीसुद्धा पूजेत उपयुक्त आहेत. मदार, धोतरा, गुंज, पर्वतीय मल्लिका, कुटज, शाल्मली, काटेरी वनस्पती, यांच्या फुलांनी पूजा करू नये.

## आणि असा धनुर्वेद *

दोनशे एकोणपन्नासाव्या अध्यायात अग्निदेवांनी वसिष्ठासाठी चार पदांनी युक्त असणाऱ्या धनुर्वेदाचे वर्णन केले आहे. धनुर्वेद पांच प्रकारांचा आहे. रथ, हत्ती, घोडे व पायदळ यांचा आश्रय घेऊन याचे वर्णन करता येते. यंत्रमुक्त, पाणिमुक्त, मुक्तसंधारित, अमुक्त, बाहुयुद्ध हे धनुर्वेदाचे पांच प्रकार आहेत. शस्त्रसंपत्ती व अस्त्रसंपत्ती यांना अनुसरून युद्धाचे दोन प्रकार होतात. ऋजुयुद्ध व मायायुद्ध असे आणखी पुन्हा दोन भेद याचे होतात. क्षेपणी (गोफण), धनुष्य, यंत्र आदीद्वारे अस्त्र फेकले जाते तेव्हा ते 'यन्त्रमुक्त' होते. प्रस्तरखंड, तोमरयंत्र आदींना 'पाणिमुक्त' म्हटले गेले आहे. भाला आदी शस्त्र फेकून पुन्हा हातात घेता येते. त्याला 'मुक्तसंधारित' म्हणतात. खड्गास 'अमुक्त' म्हणतात; आणि ज्यात शस्त्रांचा, अस्त्रांचा प्रयोगच होत नाही, जे मल्लांप्रमाणे लढले जाते त्या युद्धास 'नियुद्ध' म्हणतात.

ज्यात धनुष्यबाणाचा प्रयोग होतो ते युद्ध श्रेष्ठ मानले गेले आहे.

---

* 'धनुर्वेद' यजुर्वेदाच्या एक उपवेद आहे. प्राचीन काळी या विद्येचा प्रचार होता. भारतवर्षातील क्षत्रियकुमार या विद्येवरील ग्रंथ अभ्यासीत असत. आता काही थोड्या ग्रंथांतच या विद्येचा निर्देश झालेला दिसतो, शुक्रनीती, कामन्दकीय नीतिसार, अग्निपुराण, श्रीचिंतामणी, वृद्ध शाङ्र्गधर, युद्धजयार्ण, युक्तिकल्पतरू, नीतिमयूख, इत्यादी ग्रंथांत याचे उल्लेख आढळतात.' धनुर्वेदसंहिता ' नावाचे एक वेगळे पुस्तकही आहे. नेपाळातील काठमांडू येथील गोरखनाथांच्या मठाचे महंत योगी नरहरिनाथांनी धनुर्वेदावरील एक प्राचीन पुस्तक उपलब्ध करून दिले आहे. ब्रह्मदेव व महेश्वर यांच्या पासून या उपवेदाची निर्मिती झाली, असेही काही विद्वान मानतात. परंतु मधुसूदनसरस्वतींच्या कथनानुसार विश्वामित्रांनी ज्या धनुर्वेदाचा प्रचार केला तो यजुर्वेदाचा उपवेदच होय. 'वीरचिंतामणी 'मध्ये धनुर्वेदाची मोठी प्रशंसा केली आहे. अग्निपुराणात तर या धनुर्वेदाचा चार अध्यायांत महत्त्वाचा भाग आला आहे. महाभारतातील आदिपर्वात अध्याय २२०, श्लोक ७२ मध्ये धनुर्वेदाच्या चार पदांचा उल्लेख केला आहे. मंत्रमुक्त, पाणिमुक्त, मुक्तामुक्त, अमुक्त; ही चार पदे होत. दीक्षापाद, संग्रहपाद, सिद्धिपाद व प्रयोगपाद, या चार पदांचा उल्लेख पं. मधुसूदनसरस्वतींनी केला आहे.

भाल्यांचे युद्ध मध्यमकोटीचे मानतात. खड्गाचा प्रहार असणारे युद्ध निम्नकोटीचे असते. बाहुयुद्ध सर्वांत निकृष्ट कोटीचे मानतात. धनुर्वेदात क्षत्रिय व वैश्य या दोनही वर्णांचे गुरू[1] ब्राह्मण मानले गेले आहेत. आपत्तिकाळात स्वतः शिक्षण घेतल्यावर शूद्रासही युद्धाचा अधिकार असतो. वर्णसंकरजांनाही ही विद्या शिकविली जाते.[2]

अंगुष्ट, गुल्फ, पार्ष्णिभाग, पाय हे एकसाथ राहून परस्पर जोडले गेले असतील तर लक्षणानुसार त्याला 'समपद' नावाचे स्थान म्हणतात. अशाच वैशाख, मंडल, आलीढ, संपुट इत्यादी स्थानांचे वर्णनही याच अध्यायात आले आहे. धनुष्यबाण कसे चालवावेत यासंबंधीही निर्देश येथे आहे. धनुर्धर योद्धयाचे शरीर कसे असावे, त्याची गुरुनिष्ठा कशी असावी, बाण कसा सोडावा, बाण कोणत्या मापाचा असावा; यांचेही मार्गदर्शन येथे आहे. घोडे, रथ, हत्ती यांवर बसूनही धनुष्याचा उपयोग करता येतो.

## धनुष्यबाण, लक्ष्यवेध, वेध्यांचे विविध प्रकार

योध्याने पूर्ण लांबीचे धनुष्य तयार करावे. त्याला चांगले धुऊन, पुसून यज्ञभूमीवर स्थापित करावे. गदादी आयुधांनाही चांगले साफ करावे. त्यानंतर बाणांचा संग्रह करावा. कवच धारण करून, एकचित्त होऊन, तूणीर घेऊन त्याला पाठीवर उजव्या काखेपाशी दृढ बांधावे. विलक्ष्य बाणही यामुळे तूणीरात सुस्थिर राहातील. त्यानंतर उजव्या हाताने तूणीरामधून बाण काढावेत. डाव्या हाताने धनुष्य उचलावे.

---

[1] 'गुरू' शब्दाचा अर्थ आहे धनुर्वेदाचे शिक्षण देणारे आचार्य. 'धनुर्वेद-संहितांमध्ये सात प्रकारच्या युद्धांचा उल्लेख करून हे सातही प्रकार जाणणारे 'आचार्य' असतात. 'आचार्य, सप्तयुद्ध, स्यात्' असे म्हटले आहे. धनुष्य, चक्र, कुन्त, खड्ग, क्षुरिका, गदा, बाहू, या सातांनी केलेल्या युद्धांना 'सप्तयुद्ध' असे म्हणतात.

[2] 'वीरचिंतामणी'च्या सहाव्या व सातव्या श्लोकांत म्हटले आहे की, 'आचार्याने ब्राह्मण शिष्यास धनुष्य, क्षत्रियास खड्ग, वैश्यास कुंत (भाला) व शूद्रास गदा यांचे शिक्षण द्यावे.' यावरून अस्त्रविद्या व युद्धविद्याही सर्व वर्णांना खुली होती, हे स्पष्ट होते.

त्याच्या मध्यभागी बाणाचे संधान [1] करावे.

चित्ताला विषाद आणू देऊ नये. उत्साहसंपन्न असावे. धनुष्याच्या दोरीवर बाणाच्या टोकास राखावे व 'सिंहकर्ण' [2] नावाची मुष्टी करून दोरी ओढावी. समभावाचे संधान करून बाण लक्ष्याकडे सोडावा. धनुष्य चांगले उंच, जमिनीवर टेकविल्यास वीराच्या कपाळापर्यंत असावे. बाण वारंवार सोडावेत त्यानंतर तीक्ष्ण, परावृत्त, गत, निम्न, उन्नत व क्षिप्र या वेधांचा [3] अभ्यास वाढवावा. या वेध्यांचे अनेक भेद आहेत. दृढ, दुष्कर, चित्रदुष्कर, हे वेध्याचे तीन भेद महत्त्वाचे आहेत. या तीन भेदांचे दोन दोन प्रकार होतात. 'नतनिम्न' व 'तीक्ष्ण' हे दृढवेध्याचे दोन भेद. 'दुष्करवेध्यां'चे 'निम्न' व 'ऊर्ध्वगत' हे दोन भेद; आणि 'चित्रदुष्करा'चे मस्तकपन' व 'मध्य' हे दोन भेद आहेत.

भ्रमणशील, अत्यंत चंचल, सुस्थिर, कसेही असले तरी लक्ष्यावर सर्व बाजूंनी प्रहार करावा. उत्तम भेदन व छेदन करावे. त्याला सर्व बाजूंनी पीडा उत्पन्न करावी. या सर्व विधीची उपासना अनुष्ठानपूर्वक करावी. मन, नेत्र, दृष्टी यांची लक्ष्याशी एकता स्थापना करण्याची कला अवगत करून घ्यावी. मग त्या योध्यास यमराजासही सहज जिंकता येईल.

## पाश, तलवार, लाठी

दोनशेएकावन्नाव्या अध्यायात अग्निदेवांनी पाश, तलवार इत्यादींची माहिती दिली आहे. ज्याने हात, मन व दृष्टी यांना जिंकले आहे, अशा लक्ष्यसाधकाने युद्ध करण्यासाठी वाहनावर आरूढ व्हावे.

---

[1] 'वासिष्ठ धनुर्वेदा'नुसार 'संधान' तीन प्रकारचे असतात. अध, ऊर्ध्व व सम. दूरच्या लक्ष्यास मारायचे असेल तर अध:संधान उपयोगी येतो. लक्ष्य निश्चल असेल तर समसंधान करावे. चंचल लक्ष्यासाठी ऊर्ध्वसंधान उपयोगी येते.

[2] वसिष्ठकृत 'धनुर्वेदसंहिते'त मुष्टीचे पांच भेद सांगितले आहेत. पताका, वज्रमुष्टी, सिंहकर्ण, मत्सरी व काकतुंडी हे ते पांच भेद होत. प्रत्येक भेदाचे लक्षणही दिले आहे.

[3] 'वासिष्ठ धनुर्वेदा'त पुष्पवेध, मत्स्यवेध, मांसवेध असे तीन प्रकारचे वेध सांगितले आहेत.

पाश दहा हात मोठा, गोलाकार, हातास सुखद असा असावा. त्याला चांगला मुंज, हरिणाची ताँत आणि निशाणासाठी दोरी यांची आवश्यकता असते. सुदृढ पट्टसूत्रादींचेही सुंदर पाश बनविता येतात. पाशास हातात घेऊन उजव्या हाताने तो उलगडावा. त्याला कुंडलाकार बनवावे. सर्वत्र घुमवून शत्रूच्या मस्तकावर वरून तो फेकावा. पाशद्वारे यथोचित रीतीनें शत्रूस बंधनात टाकावे.

कमरेस म्यानसहित तलवार बांधावी. ती डावीकडे लटकलेली असावी. म्यानास डाव्या हातानें घट्ट पकडून ठेवावे. उजव्या हातानें तलवार बाहेर काढावी. तलवार सहा अंगुले लांब अथवा सात हातांची असावी. लोहाच्या शलाका, नाना प्रकारची कवचे यांनी योध्यानें आपले शरीर सुरक्षित ठेवावे. तूणीराच्या चर्मानें मढवलेली एक नवीन मजबूत लाठी आपल्यापाशी असावी. उजव्या हाताने लाठी उचलून शत्रूवर प्रहार करावा व त्यास मारावे. यात गती वाढली तर दोनही हातांनी लाठीचा वापर करता येतो.

## तलवारीचे हात, विविध आयुधे, मल्लयुद्धांचे डाव

पुढल्या दोनशेबावन्नाव्या अध्यायात तलवारीचे नाना डाव वा हात, पाश, चक्र, शूल, तोमर, गदा, परशू, मुद्गर, भिन्दिपाल, वज्र, कृपाण, क्षेपणी, गदा इत्यादी आयुधांची व मल्लयुद्धाच्या डावांची माहिती आलेली आहे. भ्रान्त, उद्भ्रान्त, अविद्ध, आप्लुत, विप्लुत, लुप्त (वा सृत), सम्पात, समुदीर्ण, श्येनपात, आकुल, उद्भूत, अवधूत, सव्य, दक्षिणी, अनालक्षित, विस्फोट, करालेंद्र, महासख, विकराल, निपात, बिभीषण, भयानक, समग्र, अर्ध, तृतीयांश, पाद, पदार्ध, वारिज, प्रत्यालीढ, आलीढ, वराह व लुलित; हे ढालतलवारीचे बत्तीस हात रणभूमीवर उपयोगी होतात.

परावृत्त, अपावृत्त, गृहीत, लघु, ऊर्ध्वक्षिप्त, अधःक्षिप्त, संधारित, विधारित, श्येनपात, गजपात, ग्राहग्राह्य; हे अकरा पाशांचे प्रकार युद्धात उपयोगी येतात. ऋजू, आयत, विशाल, तिर्यक्, भ्रामित हे पांच व्यस्त पाश होत. छेदन, भेदन, पात, भ्रमण, शमन, विकर्तन, कीर्तन, ही

सात कर्मे चक्राची आहेत. आस्फोट, क्ष्वेडन, भेद, त्रास, आन्दोलितक, आघात ही सहा 'शूल' कर्मे होत. दृष्टिघात, भुजाघात, पार्श्वघात, ऋजुपात, पक्षपात, इषुपात, ही तोमराची कार्ये होत. आहत, विहृत, प्रभूत, कमलासन, ततोर्ध्वगात्र, नमित, वामदक्षिण, आवृत्त, परावृत्त, पदोद्भूत, अवप्लुत, हंसमर्द (वा हंसमार्ग) व विमर्द, ही गदेची कर्मे आहेत. कराल, अवघात, दंशोपप्लुत, क्षिप्तहस्त, स्थित व शून्य ही परशूची कर्मे समजावीत.

ताडन, छेदन, चूर्णन, प्लवन, घातन, ही मुदगाराची कर्मे होत. संभ्रांत, विश्रांत, गोविसर्ग, सुदुर्धर ही भिंदिपालाची कर्मे होत. हीच लगुडाचीही आहेत. अन्त्य, मध्य, परावृत्त, निदेशान्त. ही वज्र व पट्टिश यांची कर्मे होत. हरण, छेदन, घात, भेदन, रक्षण, पातन, स्फोटन; ही कृपाणाची कर्मे होत. त्रासन, रक्षण, घात, बलोद्धारण, आयत; ही क्षेपणाची म्हणजे गोफणीची कार्ये होत. संत्याग, अवदंश, वराहोद्धूतक हस्तावहस्त, आलीन, एकहस्त, अवहस्तक, द्विहस्त, बाहुपाश, कटिरेचितक, उद्‌गत, उरोघात, ललाटघात, भुजाविधमन, करोद्धूत, विमान, पादाहति, विपादिक, गात्रसंश्लेषण, शांत, गात्रविपर्यय, ऊर्ध्वप्रहार, घात, गोमूत्र, सव्य, दक्षिण, पारक, तारक, दंड (गंड) कबरीबंध, आकुल, तिर्यग्बन्ध, अपामार्ग, भीमवेग, सुदर्शन, सिंहाक्रान्त, गजाक्रान्त व गर्दभाक्रान्त; हे गदायुद्धाचे हात आहेत.

आता मल्लयुद्धाचे डाव पाहा. आकर्षण, विकर्षण, बाहुमूल, ग्रीवाविपरिवर्त, सुदारुण पृष्ठभंग, पर्यासन, विपर्यास, पशुमार, अजाविक, पादप्रहार, आस्फोट, कटिरेचितक, गात्राश्लेष, स्कन्धगत, महीव्याजन, उरोललाटघात, विस्पष्टकरण, उद्धूत, अवधूत, तिर्यङ्मार्गगत, गजस्कंध, अवक्षेप, अपराङ्मुख, देवमार्ग, अधोमार्ग, अमार्गगमनाकुल, यष्टिघात, अवक्षेप, वसुधादारण, जानुबंध, भुजाबंध. सुदारुण, गात्रबंध, विपृष्ठ, सोदक, श्वभ्र आणि भुजावेष्टित हे मल्लयुद्धाचे डाव झाले.

युद्धाच्या वेळी कवच धारण करून, शस्त्रास्त्रांनी संपन्न होऊन, हत्ती इत्यादी वाहनांवर आरूढ होऊन जावे. उत्तम अंकुश धारण केलेले दोन माहुत बरोबर असावेत. एकाने हत्तीच्या मानेवर बसावे. दुसऱ्याने

खांद्यावर बसावे. शिवाय दोन धनुर्धर व दोन खड्गधारी बरोबर असावेत. प्रत्येक हत्तीच्या रक्षणासाठी तीन तीन घोडेस्वार व घोड्यांच्या रक्षणासाठी तीन तीन धनुर्धारी पायदळ असावेत. त्यांचे रक्षण चर्म वा ढाल धारण करणाऱ्या योध्यांनी करावे. प्रत्येक शस्त्राची पूजा त्याच्या मंत्राने करावी. त्रैलोक्यमोहनकवचाने पाठ करूनच युद्धास जावे. तरच शत्रूवर विजय होईल व भूतलाचे रक्षण होईल.

## असे हे व्यवहारशास्त्र

अग्निदेवांनी दोनशेत्रेपन्नाव्या अध्यायात व्यवहारशास्त्राचे निरूपण केले आहे. त्यामुळे नय व अनय यांचा विवेक दृढ होईल. त्याचे चार चरण, चार स्थाने, चार साधने सांगितली आहेत. ही चारांची हितकारी, चारांत व्याप्त व चारांचे कर्ते म्हणून आहेत. आठ अंगे, अठरा पद, शंभर शाखा, तीन योनी, दोन अभियोग, दोन द्वारे आणि दोन गती यांनी हा व्यवहार युक्त असतो.

धर्म, व्यवहार, चरित्र. राजशासन हे व्यवहारदर्शनाचे चार चरण होत. यांतील उत्तरोत्तर पाद पूर्वपूर्व पादाचे साधक आहेत. या सर्वांत 'धर्मा'चा आधार सत्य आहे. 'व्यवहारा'चा आधार सत्य आहे. 'चरित्र' पुरुषांच्या संग्रहावर आधारित आहे. 'शासन' राजाच्या आज्ञेवर अवलंबित आहे साम, दाम, दंड, भेद या चार उपायांनी साध्य असल्याने तो 'चार साधनांचा' म्हटला गेला आहे. चार आश्रमांचे रक्षण केल्याने तो 'चतुर्हित' आहे. अभियोक्ता, साक्षी, सभासद व राजा यांतील एक एक चरणात त्याची स्थिती आहे. म्हणून त्याला 'चतुर्व्यापी' म्हणतात. तो धर्म, अर्थ, यश, लोकप्रियता या चारांची वृद्धी करणारा आहे. म्हणून त्याला 'चतुष्कारी' म्हटले जाते.

राजपुरुष, सभासद, शास्त्री, गणक, लेखक, सुवर्ण, अग्नी, जल या आठ अंगांनी तो युक्त असल्याने तो 'अष्टांग' आहे. काम, क्रोध, लोभ या तीन कारणांनी मनुष्याची यात प्रवृत्ती होते. म्हणूनच याला 'त्रियोनि' असे म्हटले आहे. कारण या तीन गोष्टी विवाद करणाऱ्या

आहेत. अभियोगाचे दोन भेद आहेत. १) शंकाभियोग व २) तत्त्वाभियोग. शंका असत् पुरुषांच्या संसर्गाने येते. तत्त्वाभियोग चिन्ह वा प्रमाण पाहून होतो. या दोनही पक्षांशी संबंधित असणारा 'दोन द्वारांचा' म्हटला जातो. यांतील पूर्वपाद 'पक्ष' व उत्तरपाद 'प्रतिपक्ष' म्हटला जातो. 'भूत' व 'छल' यांचे अनुकरण केल्याने तो दोन गतींनी युक्त मानला गेला आहे.

ऋण देय कसे आहे? ऋण अदेय कसे आहे? कोणी द्यावे, कोणत्या वेळी द्यावे? कोणत्या प्रकाराने द्यावे, ऋण देण्याचा विधी काय आहे? या देण्याची वसुली कशी करावी? या सर्वांचा विचार 'ऋणदान'मध्ये येतो. कोणावर तरी विश्वास ठेवून जर एखाद्याने शंकारहित होऊन त्याला आपले काही द्रव्य विश्वाची ठेव म्हणून वर मापून दिले, तर त्याला लोक 'निक्षेप' नावाचा व्यवहार म्हणतात. जेव्हा वणिक आदी अनेक माणसांनी सहकारिता निर्माण करून कोणते काम केले तर त्याला 'सम्भूयसमुत्थान' असे नाव आहे. जर कोणी मनुष्य प्रथम विधिपूर्वक द्रव्याचे दान देऊन पुन्हा ते स्वतःजवळच ठेवण्याची इच्छा करील तर त्याला 'दत्ताप्रदानिक' नावाचे विवादपद म्हणतात. सेवा स्वीकारूनही जर ती केली नाही तर तो व्यवहार 'अभ्युपेत अशुश्रूषा' या नावाचा विवादपद होईल. भृत्यांना वेतन देणे, न देणे यांच्यासंबंधीचा विवाद 'वेतनानपाक्रम' या नावाने ओळखला जातो. सापडलेले वा चोरलेले द्रव्य परोक्षात विकले गेले तर 'अस्वामिविक्राय' नावाचा विवादपद होतो. जर कोणता व्यापारी पण्यद्रव्याचा मूल्य देऊन विक्री करू लागला व खरेदीची किंमत न देऊ लागला तर तो 'विक्रीयासंप्रदान' नावाचा विवादपद होतो. जर ग्राहकाने मूल्य देऊन वस्तू खरेदिली, पण त्या वस्तूस त्याने नीट ओळखले नाही तर त्याचे हे आचरण 'क्रीतानुशय' म्हटले जाते.

पाखंडी व नैगम आदींची स्थिती 'समय' या नावाने ओळखली जाते. यासंबंधी विवादपदास 'समयानपाककर्म' म्हटले जाते. याज्ञवल्क्यांनी यास 'संविद्व्यतिक्रम' असे नाव दिले आहे. क्षेत्राचा अधिकार घेऊन सेतू, केदार इत्यादीसंबंधी जो विवाद होतो तो

'क्षेत्रज' म्हटला जातो. स्त्री व पुरुष यांच्या विवाहासंबंधी विवादपदास 'स्त्रीपुंसयोग' असे नाव आहे. पुत्रगण पैतृक धनाचे विभाजन करतात, त्याला 'दायभाग' म्हणतात. बलाच्या अभिमानें जे कर्म साहसाने केले जाते त्यांस 'साहस' नावाचा विवादपाद म्हणतात.

कोणाचा तरी देश, जाती, कुल आदींवर दोषारोपण करून प्रतिकूल वचन बोलल्यास 'वाक्पारुष्य' मानले जाते. दुसऱ्याच्या शरीरावर हात, पाय, आयुध यांनी प्रहार अथवा अग्नी आदीने घात केल्यास ते 'दंडपारुष्य' होते. असेच द्यूत, प्राणिद्यूत, प्रकीर्णक इत्यादींचेही वर्णन आले आहे. राजानें सर्वांशी व्यवहार कसा करावा, प्रतिवाद कसा करावा, हत्या करणारे, डाके घालणारे, चोरी करणारे, शिव्या देणारे, मारपीट करणारे, दूध देणाऱ्या गायीचे अपहरण करणारे, स्त्रीसंबंधित प्रश्न; इत्यादींचाही विचार येथे झाला आहे. दुष्टास कसे ओळखावे याचेही दिग्दर्शन आहे. न्यायशास्त्र, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र यांतील धर्मशास्त्र बलवान मानले गेले आहे. मानुषप्रमाण, दैविकप्रमाण, शासन, चीरक, भुक्ती इत्यादींचा निर्देश करून कोणता अभियोग सिद्ध होत नाही, यासंबंधी मार्गदर्शन आहे. ऋणदानासंबंधीचा व्यवहार सांगताना १/८० भागाचे प्रतिमास व्याज धर्मसंमत मानले गेले आहे. ऋण देणारा व घेणारा यांच्या व्यवहारासंबंधीही मार्गदर्शन आहे.

## साक्षी, लेखा व विविध दिव्ये

दोनशेचोपन्नाव्या अध्यायात ऋणदान व उपनिधीसंबंधी विवरण आले आहे. यानंतर पुढल्या दोनशेपंचावन्नाव्या अध्यायात साक्षी, लेखा, दिव्ये, तुला, अग्नी, जल, विष, कोश इत्यादी दिव्यांची माहिती आली आहे. तपस्वी, कुलीन, दानशील, सत्यवादी, कोमलहृदयी, धर्मात्मा, पुत्रयुक्त, धनी, पंचयज्ञादी वैदिक क्रियांनी युक्त असे आपल्या जातीचे वा वर्णाचे पांच वा तीन साक्षी असावेत. स्त्री, बालक, वृद्ध, जुगार खेळणारा, मद्यपी, उन्मत्त, पातकी, रंगमंचावर उतरणारा चारण, पाखंडी, विकलेन्द्रिय, पतित, आप्तसंबंधी, अर्थसंबंधी, सहायक, शत्रू, चोर, साहसी, दृष्टदोष, निर्धूत (बंधुबांधवांनी परित्यक्त) इत्यादींना

साक्षी बनविता येणार नाही. या साक्षीचे धर्म, त्याने दिलेली साक्ष यांचेही वर्णन येथे आले आहे.

यानंतर लेखाप्रकरण झाल्यावर दिव्यप्रकरण सांगितले आहे. तुला, अग्नी, जल, विष, कोश ही पांच दिव्ये धर्मशास्त्रानें मानली आहेत. वृद्ध, अंध, पंगू, रोगी, या सर्वांच्या शुद्धीसाठी, त्यांच्या अपराधांच्या निवारणार्थ 'तुळा' नावाचे एक दिव्य मानले गेले आहे. तुलादिव्यात अभियुक्तास एका पारडयात बसवून त्याचे वजन करतात. त्यानंतर त्याने पुढील मंत्रानें तुलेस अभिमंत्रित करून म्हणावे, 'सूर्य, चंद्र, वायू, अग्नी, आकाश, भूमी, जल, हृदय, यम, दिन, रात्री, दोन संध्या, धर्म; हे सर्व मनुष्याचा वृत्तान्त जाणतात. तुला, तू सत्याचं स्थान आहेस. देवांनी तुला पूर्वकाली निर्माण केलं. म्हणून कल्याणी, तू सत्यास प्रकट कर. मला संशयापासून दूर कर. माते, जर मी पापी वा अपराधी असेन तर माझं पारडं खाली कर. मी जर दोषपूर्ण असेन तर त्यानं मला धरून वर उठावं.'

अग्निदिव्य करणाऱ्या माणसाने हातांत धान्य पसरून, काळ्या तिळांनी चिन्हित करून ते रंगीत करावेत. त्या हातांच्या ओंजळीत पिंपळाची सात पानें ठेवावीत. हातासहित त्या पानांना आवेष्टित करावे. यानंतर दिव्य करणाऱ्यानें अग्नीची प्रार्थना करावी, 'अग्निदेवा, तू सर्व भूतमात्रांत, प्राण्यांत संचारतोस. तू सर्वांना पवित्र करतोस. तुला सर्व काही माहीत आहे. माझ्या पापपुण्याचा तू निवाडा करून सत्य प्रकट कर.' यानंतर त्याच्या हातांत पन्नास पळांचा जळणारा लोहपिंड ठेवावा. तो घेऊन दिव्य करणारा मनुष्य हळूहळू सात मंडलांपर्यंत चालेल. या मंडलाची लांबीरुंदी सोळा सोळा अंगुलांची असावी. इतके करून जर हात जळला गेला नसेल तर मनुष्य शुद्ध मानावा. लोहपिंड मध्येच पडून गेला तर शपथकर्त्यानें पुन्हा तो उचलून दिव्य करावे.

जलदिव्य करणाऱ्याने जलदेवाची, वरुणदेवाची प्रार्थना करावी, 'वरुणा, तू पवित्रांत पवित्र आहेस. तू सर्वांना पवित्र बनवितोस. मी शुद्धीसाठी योग्य आहे. माझी शुद्धी कर. सत्याच्या बलानं माझं रक्षण कर.' या मंत्राने जल अभिमंत्रित करून मनुष्याने जलात नाभीपर्यंत

उभे राहून जलात डुबी घ्यावी. याच वेळी एखाद्या व्यक्तीनें बाण चालवावा. तो सुटलेला बाण मनुष्य परत घेऊन येईपर्यंत तो मनुष्य जलात डुबलेला असेल तर तो शुद्ध मानला जातो.

विषद्रव्याचे दिव्य असेच आहे. त्यानें विषाची प्रार्थना करावी. 'विषा, तूं ब्रह्मदेवांचा पुत्र आहेस. सत्यधर्मात तू अधिष्ठित आहेस. या कलंकापासून तू माझं रक्षण करावंस. तू माझ्यासाठी अमृत व्हावंस' अशी प्रार्थना करून हिमालयावर निर्माण झालेले शाङ्र्गविषास त्याने भक्षण करावे. जर त्याला ते विष पचले, तर न्यायाधिकाऱ्याने त्याला शुद्ध मानावे.

कोशदिव्यासाठी न्यायाधिकाऱ्यानें उग्रदेवांचे पूजन करावे. त्यांचे अभिषेकजल आणावे. शपथ करणाऱ्यास त्यातील काही जल पाजावे. जर चौदा दिनांपर्यंत राजा अथवा देवता यांना पीडा न झाली तर तो शुद्ध मानला जावा.

## वडिलार्जित धन, दायविभाग, स्त्रीधन इत्यादी

स्वामीच्या नातेवाइकांना जे धन प्राप्त होते त्यास 'दाय' म्हणतात. दायाचे दोन भेद आहेत. एक 'अप्रतिबन्ध' व दुसरा 'सप्रतिबन्ध', पुत्रांना व पौत्रांच्या पुत्रांना आणि पौत्रत्वामुळे पिता व पितामह यांच्या धनावर अनायस स्वत्व प्राप्त होते. म्हणून यास 'अप्रतिबन्ध' म्हटले गेले आहे. चुलता, बंधू आदींचे पुत्र यांना स्वामीच्या अभावामुळे धनावर अधिकार प्राप्त होतो. म्हणून हा 'सप्रतिबन्ध' होय. दोनशेछपन्नाव्या अध्यायात अग्निदेवांनी वसिष्ठांना यासंबंधी माहिती दिली आहे.

जर पित्यानें आपल्या ह्यातीत सर्व पुत्रांना धनाची वाटणी करून दिली तर इच्छेनुसार ज्येष्ठ पुत्रास श्रेष्ठ भाग देईल किंवा सर्व पुत्रांना समान भाग देईल. जर पित्याने पुत्रांना समभाग दिला असेल तर त्यानें आपल्या पत्नींनाही समान भाग द्यावा. पण त्यांना पती अथवा सासरा यांच्याकडून स्त्रीधन मिळाले नसावे. पुत्र धनार्जनाच्या कार्यात समर्थ असला तरी, पित्याच्या धनाची इच्छा न करणारा असला तरी त्याला

थोडेफार धन व ऋण समान वाटून द्यावे. मातेचे ऋण फेडून जे धन उरेल त्या मातृधनाचा वाटा कन्यांना वाटला जावा. त्या नसतील तर पुत्रांनी तो वाटा घ्यावा.

या धनाच्या वाटणीचा पुष्कळ तपशील या अध्यायात दिलेला आहे. औरस कोण, अनौरस कोण, याचाही निवाडा केला आहे. आपल्याच वर्णाची स्त्री जेव्हा धर्मविवाहास अनुसार पत्नी म्हणून आणली जाते ती 'धर्मपत्नी' होय. तिच्या ठायी स्वतःच्या वीर्याने उत्पन्न झालेला पुत्र 'औरस' मानला जातो. हा सर्व पुत्रांत मुख्य होय. नंतर पुत्रिका पुत्र होय. तोही औरसच मानला जातो. आपल्या स्त्रीच्या गर्भापासून, कोणा सगोत्र पुरुषापासून वा दिरापासून जो पुत्र उत्पन्न होतो, त्याला 'क्षेत्रज' पुत्र म्हणतात. पतीच्या घरात लपून छपून सजातीय पुरुषापासून उत्पन्न झालेला पुत्र 'गूढज' होय. अविवाहित कन्येस झालेला पुत्र 'कानीन' होय. अक्षतयोनी व क्षत्रयोनी विधवेस सजातीय पुरुषापासून पुत्र झाला तर तो 'पौनर्भव' होय. मातेने, पित्याने ज्यास दुसऱ्याच्या मांडीवर दिलेले असते त्यास 'दत्तक' पुत्र म्हणतात. कोणा माता-पित्यापासून खरेदी केलेला पुत्र 'क्रीतपुत्र' म्हणून ओळखला जातो. कोणाला धन देऊन पुत्र तयार केला जातो तो 'कृत्रिम' होतो. माता-पितारहित पुत्र जो स्वतः होऊन 'मला आपला पुत्र बनवा' असे म्हणतो तो 'दत्तात्मा' पुत्र होय. जो विवाहापूर्वीच गर्भात आला व गर्भवतीच्या विवाहानंतर तो जन्मास आला तर तो 'सहोढज' पुत्र होतो. ज्याला माता-पित्यांनी टाकलेले आहे, अशा समान वर्णाच्या पुत्रास जर कोणी स्वीकारले तर तो 'अपविद्ध' पुत्र होतो अशा या बारा पुत्रांना पूर्वपूर्वाच्या अभावाने उत्तरउत्तर पुत्रांना पिंडदान, धनांशभाग यांचा अधिकार प्राप्त होतो. असेच दासीपुत्रांचेही वर्णन आले आहे.

पुत्रहीन पुरुष स्वर्गवासी झाल्यास त्याच्या धनाचा भाग क्रमशः पत्नी, कन्या, माता-पिता, सहोदर बंधू, असहोदर बंधू, भ्रातृपुत्र, गोत्रजपुरुष, बंधुबांधव, शिष्य वा सजातीय, सहपाठी इत्यादींच्या पूर्व-पूर्वाच्या अभावाने उत्तरोत्तर माणसास मिळावा. वानप्रस्थ, संन्यासी, नैष्ठिक ब्रह्मचारी यांच्या धनाचे अधिकारी धर्मभ्राता, श्रेष्ठ शिष्य,

आचार्य होतात. वाटलेले धन जर पुन्हा एकत्रित आले तर त्यास 'संसृष्ट' म्हणतात. हे धन ज्याच्यापाशी असते ते सर्व 'ससृष्टी' होतात. नपुंसक, पतित, त्यांचे पुत्र, पंगू, उन्मत्त, जड, अंध, असाध्य रोगग्रस्त यांचे केवळ भरणपोषण करावे. त्यांना वाटणीचा भाग देण्याची जरूरी नाही.

माता, पिता, पती, बंधू यांनी दिलेले, विवाहासमयी जमा झालेले धन स्त्रीधन होय. जर स्त्री संतानहीन झाली तर ते धन तिच्या पतीस मिळू शकते. ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य या चार प्रकारच्या विवाहांच्या विधीने विवाहित स्त्रिया संतानहीन झाल्या तर त्यांचे धन पतीस प्राप्त होते. जर त्यांना संतानें असतील तर ते धन त्यांच्या कन्यांना मिळेल.

## सीमाविवाद, स्वामिपालविवाद, अस्वामिविक्रय, दत्ताप्रदानिक, इत्यादी

दोनशेसत्तावन्नाव्या अध्यायात वरील विषयांचे विवेचन विस्तृतपणाने आले आहे. दोन गावांच्या संबंधित शेतीच्या सीमेसंबंधी विवाद उपस्थित झाला तर सामंतानें स्थविर (वृद्ध), गोप (गवळी), सीमावर्ती शेतकरी, सर्व वनवासी या सर्वांना जमवून निर्णय घ्यावा. सीमा सेतू, वारूळ, चैत्य, देवस्थान, वाळू इत्यादींनी उपलक्षित असावी. सामंताने, निकटवर्ती माणसांनी लाल फुलांची माळ, लाल वस्त्र धारण करून, शिरावर माती धारण करून सीमेचा निर्णय करावा. सीमावादात सामंताने असत्य भाषण केले तर राजा त्याला शिक्षा करू शकतो. राजाही सीमावादाचा निर्णय देऊ शकतो. आराम (उद्यान), आयतन (मंदिर), ग्राम, वापी, कूप, क्रीडावन, गृह, नाले इत्यादींच्या निर्णयासंबंधीही हीच रीत असावी. मर्यादेचे उल्लंघन, सीमेचा भेद, क्षेत्राचे अपहरण यांसाठी राजाने शिक्षा करावी.

यानंतर गाय, म्हैस, मेंढी, बकरी इत्यादींना चारणारे जर कोणाच्या शेतात नेऊन चारीत असतील तर कोणता दंड करावा? याचाही विचार याच प्रकरणात झालेला आहे. दुसऱ्याच्या शेतातील पीक नष्ट करणाऱ्या म्हशीवर आठ माष (पणाचा विसावा भाग) दंड

राजानें करावा. गायीवर अर्धा व मेंढी-बकरीवर त्याहून अर्धा दंड करावा. म्हैस आदी पशू शेतात चरून तेथेच बसले तर दुप्पट दंड करावा. ज्या जमिनीत केवळ तृण व काष्ठच होते, तिला जर सुरक्षित राखले तर तिला 'विवीत' (रक्षित) असे म्हणतात. या रक्षित जमिनीस धक्का देणाऱ्या जनावरांनाही तसाच दंड करावा. गाढवे व उंट यांनाही दंड करावा. ज्याचे नुकसान झाले असेल त्याला उचित अशी भरपाई द्यावी. चारणाऱ्या गोपालास केवळ शारीरिक दंड दिला तरी चालेल.

जर शेत रस्त्यावर असेल, गावाजवळ असेल, सुरक्षित भूमीजवळ असेल आणि तेथे अजाणता हानी पोचली असेल तर कोणाचाच दोष न मानता दंड करू नये. सांड (सोडलेला बैल), देवास दिलेला पशू, व्यालेली दहा दिवसांतील गाय, कळपातून सुटून आलेले जनावर जर दुसऱ्याच्या शेतात घुसेल तर त्यालाही दंड करू नये. गोपालांनी प्रातः-काली जनावरे चारण्यासाठी न्यावीत व सायंकाळी घरी आणून स्वामीच्या स्वाधीन करावीत. वेतनभोगी गवळ्याच्या प्रमादानें जनावर मेले तर ते जनावर राजानें पशुस्वामीस द्यावे. गोपालाचा दोष असेल तर त्याला साडेतेरा पणांचा दंड करावा. ब्राह्मण सर्व स्थानांतून तृण, काष्ठ, पुष्प ग्रहण करू शकतो ग्राम व शेती यांतील अंतर शंभर धनुष्यांचे असावे. असे अंतर सभोवती सोडून शेतीची जमीन करावी. मोठ्या गावासाठी हे अंतर दोनशे धनुष्यांचे, नगरासाठी हे अंतर चारशे धनुष्यांचे असावे.

यानंतर याच अध्यायात 'अस्वामिविक्रय' व्यवहार सांगितला आहे. ठेव म्हणून ठेवलेले द्रव्य हरवले, स्वतः चोरून घेतले, स्वामीच्या अपरोक्ष विकले तर ते कर्म 'अस्वामिविक्रय' म्हटले जाते. 'दत्ता-प्रदान्तिक' नावाचा एक विषय याच अध्यायात आला आहे. अयोग्य मार्गाने जर कोणी द्रव्य दिले व ते पुन्हा परत मागण्याचा प्रयत्न केला तर तो 'दत्ताप्रदानिक' व्यवहार होतो. आपल्या जीविकेचा उपरोध होणार नाही, अर्थात कुटुंबाचे भरण-पोषण होऊन वाचलेले धन हे देण्यास हरकत नाही. स्त्री व पुत्र कोणासच देऊ नये. आपला वंश

असताना कोणासही सर्वस्वाचे दान करू नये. प्रतिग्रह प्रकट रूपानें ग्रहण करावा. स्थावर भूमी, वृक्ष आदींचा स्वीकार सर्वांच्या समक्ष करावा. एकदा दिलेली वस्तू परत मागू नये.

एकदा विकत घेतलेली वस्तू परत करणाऱ्या माणसाच्या व्यवहारास 'क्रीतानुशय' असे म्हणतात. वस्तू ज्या दिवशी घेतली त्याच दिवशी ती परत करावी. ती अविकृत रूपात असावी. दुसऱ्या दिवशी जर ती परत केली तर तिचे मूल्य १।३० ने कमी करावे. जर तिसऱ्या दिवशी ती परत केली तर मूल्य १।१५ ने कमी करावे. यानंतर मात्र ती वस्तू खरेदीदाराचीच राहाते. बीजाची परीक्षा दहा दिवसांत, लोखंडाची एका दिवसांत, वाहनाची पांच दिवसांत, रत्नांची सात दिवसांत, दासीची एका मासात, दूध देणाऱ्या जनावराची तीन दिवसांत होते. सुवर्ण अग्नीत घालून क्षीण होत नाही, पण चांदी प्रतिशत दोन पल, शिसे प्रतिशत आठ पल, तांबे प्रतिशत पांच पल व लोह दहा पल कमी होते. असाच वस्त्रांचाही हिशेब दिला आहे.

एकदा सेवा स्वीकारून ती जर केली नाही तर 'अभ्युपेत्याशुश्रूषा' नावाचा व्यवहार होतो. असाच विचार 'संविद्व्यतिक्रम', 'वेतनादान', 'द्यूतसमाव्हय' यांच्या संबंधीही झाला आहे. नियत म्हणजे केलेली व्यवस्था. 'समय' वा 'संविद्' या नावांनी ओळखली जाते. तिचे उल्लंघन झाल्यास 'संविद्-व्यतिक्रम' होतो. राजानें आपल्या नगरात भवन निर्माण करून त्यात वेदसंपन्न ब्राह्मणांना जीविका नेंऊन स्थापित करावे. त्यांनी धर्माचे अनुष्ठान करावे. ब्राह्मणांनी आपला धर्म न सोडता सामाजिक वा राजनिर्मित, निर्धारित धर्माचे पालन करावे. जो मनुष्य समूह वा संस्था यांचे द्रव्य ग्रहण करतो, मर्यादेचे उल्लंघन करतो, त्याचे राजानें सर्वस्व हिसकावून घ्यावे व त्याला निर्वासित करावे. समाजाच्या विपरीत आचरण करणाऱ्या माणसाला राजानें दंड करावा. समूहाच्या कार्यासाठी राजाकडून मिळालेले धन समाजासाठीच खर्च व्हावे. जो वेदसंपन्न आहे, पवित्र अंतःकरणाचा आहे, लोभशून्य आहे. कार्यकुशल आहे, समाजहितैषी आहे, त्याचे वचन सर्वांनी पाळावे. 'श्रेणी' (व्यापार करणारे), नैगम (वेदोक्त धर्माचे आचरण करणारे),

'पाखंडी' (वेदविरुद्ध आचरण करणारे) आणि 'गण' (शस्त्रास्त्रे वापरणारे) या सर्वांना हा विधी महत्त्वाचा आहे. राजानें यांचे धर्मभेद व पूर्ववृत्ती यांचे रक्षण करावे.

आता वेतनादान पाहा. जो भृत्य वेतन घेऊन काम सोडून जातो, त्यानें स्वामीस वेतनाच्या दुप्पट धन परत करावे. भृत्यानें सदा शेती आदींचे रक्षण करावे. वेतनाची निश्चिती न करता भृत्यापासून काम घेतले तर राजानें एकदशांश उत्पन्न भृत्याला द्यावे. भारवाहकापासून एखादे पात्र फुटले तर राजानें ज्याचे पात्र त्याला द्यावे. यात्रेत विघ्न आणणाऱ्या भृत्यास वेतनापेक्षा दुप्पट दंड करावा.

द्यूत खेळताना लबाडी केली तर, कपट केले तर त्यास 'द्यूत-समाव्हय' म्हणतात. सोनें, चांदी आदींनी खेळला जाणारा जुगार 'द्यूत' म्हणून ओळखला जातो. पण प्राण्यांच्या घोडदौडीवरही द्यूत खेळतात. त्याला 'समाव्हय' म्हणतात. परस्परांनी मान्य केलेल्या पणास वा शर्थीस 'ग्लह' म्हणतात. द्यूत खेळण्यासाठी जो सभाभवनात येतो, त्याला 'सभिक' म्हणतात. या द्यूतक्रीडेचेंही नियम येथे सांगितले आहेत.

## वाक्पारुष्य, दंडपारुष्य, साहस, स्त्रीसंग्रहण इत्यादी

यानंतर दोनशेअठ्ठावन्नाव्या अध्यायात काही संकीर्ण विवादास्पद विषयांची चर्चा आलेली आहे. **वाक्पारुष** म्हणजे भयंकर कटू शब्दांत शिव्या देणे. देश, जाती, कुल इत्यादीसंबंधी अश्लील व प्रतिकूल अर्थाचे शब्द वापरणे. त्यामुळे ऐकणारांस उद्वेग वाटतो. 'गौडदेशवाले मोठे झगडे करणारे आहेत' हे वाक्य देशाला उद्देशून आहे. 'ब्राह्मण मोठे लोभी असतात' हे जातीला उद्देशून आहे. 'विश्वामित्रगोत्राचे मोठे क्रूर स्वभावाचे असतात.' हे कुलावर आक्षेप घेणारे आहे. अशा प्रकारे निष्ठुर, अश्लील व तीव्र असे तीन प्रकार वाक्पारुष्याचे होतात. आई-बहिणीवरून शिवी दिल्यास ती अश्लील होते. 'तू मद्यपी आहेस. गुरु-पत्नीगामी आहेस' अशी कटू वचनें तीव्र असतात. या वाक्पारुष्याच्या अपराधाबद्दल दंड सांगितला आहे.

न्यूनांग (लंगडा, लुळा इ.) न्यूनेंद्रिय (अंध, बहिरा) अथवा रोगी (कोडी) यांना कोणी अपशब्द बोलले तर राजानें त्याला बारा पण दंड करावा. 'मी तुझ्या बहिणीशी, तुझ्या आईशी समागम करीन' असे शिवराळ बोलणाऱ्यास राजाने पंचवीस पणांचा दंड करावा. 'मी तुझा हात उपटून टाकीन. तुझी मान मोडीन, डोळे फोडून टाकीन.' असे कटू बोलणाऱ्यास राजानें शंभर पणांचा दंड करावा.

दुसऱ्याच्या शरीरावर, त्याच्या स्थावरजंगम वस्तूंवर हात, पाय, शस्त्र यांनी आघात केल्यास अथवा राख, धूळ, मलमूत्र फेकून दुःख देणे, या व्यवहाराला दंडपारुष्य म्हणतात. 'अवगोरण' (मारण्याचा उद्योग), 'निःसंगपातन' (निष्ठुरतापूर्वक पाडणे), 'क्षतदर्शन' (रक्त बाहेर काढणे) या तीन प्रकारच्या दंडपारुष्यांना राजानें नीट परीक्षा करून दंड करावा. चिखल, राख, धूळ फेकणाऱ्यास दहा पण, अपवित्र वस्तू फेकणाऱ्यास वा थुंकणाऱ्यास राजाने वीस पणांचा दंड करावा. ब्राह्मणेतराने ज्या अंगानें ब्राह्मणास पीडा दिली असेल त्या अंगाचे छेदन करावे. पाय ओढला, केस, वस्त्र ओढले, हात हिसकला तर अपराधीस दंड करावा. शरीरातून रक्त न आले असेल तर बत्तीस पण दंड व्हावा. रक्त आले असेल तर त्याच्या दुप्पट, चौपट दंड करावा. कान, हात, पाय, दात, नाक तोडणाऱ्यास पाचशे पण दंड करावा. मारहाण करून शारीरिक पीडा करणारा दंडास पात्र होतो. क्षुद्र पशूस पीडा करणारा दंडास पात्र होतो. वृक्षांच्या शाखा तोडल्यास दंड करावा.

सामान्य द्रव्य अथवा परकीय द्रव्य बलपूर्वक अपहरण केल्यास 'साहस' नावाचे कर्म होते. दुसऱ्याचे द्रव्य घेतल्यास द्रव्याच्या दुप्पट दंड करावा. 'मी केले नाही' असे खोटे बोलला तर त्यास दुप्पट दंड करावा. 'मी तुला धन देईन. तू चोरी कर' असे सांगून दुसऱ्याला करायला लावणाराही दंडास पात्र होतो. आचार्यांची निंदा केली, त्याच्या आज्ञेचे उल्लंघन केले तर, भावजयीवर प्रहार केला तर, प्रतिज्ञा करून न दिले तर, कोणाच्या बंद घराचे कुलुप तोडले तर पन्नास पणांचा दंड सांगितला आहे. नियोगाशिवाय स्वेच्छापूर्वक विधवेशी

गमन करणे, संकटग्रस्तास संरक्षण न देणे, विनाकारण लोकांकडून संरक्षण मागणे, अनुचित शपथ घेणे, दासीचा गर्भ पाडणे; या अपराधांनाही दंड सांगितला आहे. धोब्याने दुसऱ्याचे कपडे वापरले तर तीन पण, त्यानें ते विकले तर, भाड्यानें दिले तर त्याला दहा पण दंड करावा. वजनात कमीजास्त करणे, सुवर्णात भेसळ करणे, खोटी नाणी तयार करणे, वैद्यकी न जाणता पशू व मनुष्य यांवर उपाय करणे, निरपराध माणसास कैद करणे, औषध, तेल, मीठ, गंधद्रव्य, धान्य, गूळ इत्यादींत भेसळ करणे हे सर्व अपराध आहेत. त्यांना दंड सांगितला आहे.

व्यापारी एकत्र येऊन लोभाने जर कारू व शिल्पी यांना पीडा देण्यासाठी मूल्याची वृद्धी करतील तर राजाने त्यांना एक हजार पणांचा दंड करावा. व्यापाऱ्यानें देशज वस्तूंवर शेकडा पांच टक्के नफा मिळवावा. विदेशी वस्तूंवर दहा टक्के नफा मिळवावा. मूल्य घेऊन अन्य वस्तूची विक्री केली, पण खरेदी करणाऱ्यास ती वस्तूच दिली नाही तर **विक्रीयासंप्रदान** या नावाचा अपराध होतो. विक्रेय वस्तू चल असेल वा अचल असेल. गणित, तुलित, मेय, क्रियोपलक्षित व रूपोतलक्षित, दीप्तिलक्षित; असे सहा प्रकार वस्तूंचे होतात. सुपारीचे फळ मोजता येतें. म्हणून हा प्रकार ‘ गणित ’ झाला. सोने, कस्तुरी, केशर यांना तुलता येते, म्हणून हा प्रकार ‘ तुलित ’ झाला. धान्यादी वस्तू मापानें मापता येतात म्हणून त्या ‘ मेय ’ झाल्या. घोडे, म्हशी आदी पशू मोजता येतात, पण त्यांची चाल, त्यांची धार, त्यांच्यापासून उत्पन्न इत्यादी दृष्टींनी त्याचा क्रयविक्रय होतो. म्हणून या ‘ क्रियोपलक्षित ’ वस्तू झाल्या. पण्यस्त्री (वेश्या) तिच्या रूपावरून ‘ रूपोपलक्षित ’ ठरते. हिरा मोती, मरकत, पद्मराग इत्यादी वस्तू ‘ दीप्तिलक्षित ’ आहेत. या सहा प्रकारच्या वस्तू त्यांची किंमत देऊनही जर मिळाल्या नाहीत तर व्यापाऱ्यास दंड सांगितला आहे.

जेव्हा व्यापारी एकत्र येऊन व्यापार करतात तेव्हाही राजानें त्यांच्या व्यापारात लक्ष घालावे. वस्तूच्या किमतीवरील विसावा भाग राजानें शुल्करूपानें घ्यावा. या प्रकारास ‘ सम्भूयसमुत्थान ’ कार्य

म्हटले आहे. स्तेयप्रकरणात चोरीच्या साहसाचा विचार झाला आहे. चौर्यकर्माची मीमांसा या प्रकरणात आहे. नाना प्रकारच्या वस्तूंच्या चोऱ्यांना नाना दंड सांगितले आहेत. दुसऱ्याची स्त्री व दुसराच पुरुष यांच्या वैषायिक प्रेमास 'स्त्रीसंग्रहण' साहस म्हटले आहे. प्रथम, मध्यम व उत्तम असे याचे भेद दंडनीतीत आहेत. अयोग्य देशात, कालात, एकांतात काही न बोलता परस्त्रीकडे कटाक्ष टाकणे, हसणे हे प्रथम साहस होय. तिला फूल, हार, धूप, भूषण, वस्त्र देणे, खाण्या-पिण्याचे प्रलोभन दाखविणे हें मध्यम साहस होय. एकान्तात एका आसनावर बसणे, केस पकडणे यास उत्तम साहस म्हटले आहे. केस पकडून क्रीडा करणाऱ्या पुरुषास व्यभिचारी म्हणून पकडावे. सजातीय नारीशी समागम करणाऱ्यास एक हजार पण दंड करावा. नीच जातीशी तो रमला तर पांचशे पण दंड व्हावा. उच्च जातीच्या स्त्रीशी रममाण झाला तर त्याला वधाची शिक्षा सांगितली आहे. अशा स्त्रीचे नाक, कान आदी कापावेत. जो पुरुष परस्त्रीची निरी, स्तन, कंचुकी, नाभी, केस यांना स्पर्श करील, तो व्यभिचारी समजावा. त्याला व त्या स्त्रीला दंड करावा. पशूबरोबर मैथुन करणाऱ्यास शंभर पणांचा दंड सांगितला आहे. दासीवर बलात्कार केल्यास दहा पणांचा दंड आहे. चांडाली वा संन्यासिनी यांच्याशी समागम करणाऱ्याच्या ललाटावर 'भग' चिन्ह अंकित करून त्याला देशातून घालवून द्यावे.

यानंतर शेवटी 'प्रकीर्णक-प्रकरण' आले आहे. जो राजाज्ञेत फरक करील, व्यभिचारी वा चोरास जो सोडून देईल, त्यालाही दंड सांगितला आहे. ब्राह्मणास अभक्ष्य पदार्थाचे भोजन देणारा दंडनीय आहे. कृत्रिम सुवर्णाची विक्री करणारा, खराब मांस विकणारा, संकट-ग्रस्त माणसास न सोडविणारा अपराधी मानला गेला आहे. राजाची निंदा करणारा, राजाच्या मंत्र्यांना जो फितवणारा आहे, शत्रुपक्षास बातमी देणारा आहे, त्या माणसाची जीभ कापून त्यास देशातून घालवून द्यावे. मृताच्या अंगावरील वस्त्रे विकणे, गुरूला कठोर बोलणे, राजाच्या आसनावर बसणे, अशा अपराधांना शिक्षा सांगितल्या आहेत. न्यायालयात पराजित होऊनही पराजय न मानणे हाही एक अपराधच

आहे. धर्म, अर्थ, कीर्ती, लोकपंक्ती, अर्थसंग्रह, प्रजेकडून सन्मान, स्वर्गलोकी सनातन स्थान, हे सात गुण न्यायी राजास प्राप्त होतात.

## ऋग्विधान– विविध कामनांसाठी वैदिक मंत्र

वसिष्ठासाठी अग्निदेवांनी दोनशेएकोणसाठाव्या अध्यायात वैदिक मंत्रांची विधिविधाने सांगितली आहेत. महर्षी पुष्करांनी परशुरामांना ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद यांतील काही विधाने सांगितली आहेत. भोग व मोक्ष यांसाठी प्रथम 'ऋग्विधान' सांगितले आहे. गायत्रीमंत्राचा उच्चार करून, प्राणायाम करताना जलात उभे राहून, होम करून जप करणाऱ्या पुरुषाच्या सर्व कामना पूर्ण होतात. दिवसभर उपवास करून जो फक्त रात्री भोजन करतो, त्या दिवशी अनेकदा स्नान करून गायत्रीचा दहा हजार जप करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. गायत्रीचा एक लाख जप केल्यास तो मोक्षाचा अधिकारी होतो. 'प्रणव' परब्रह्म आहे. त्याचा जप सर्व पापे नाहीशी करणारा आहे. नाभीपर्यंत जलात उभे राहून ॐकाराचा शंभर वेळा जप करून अभिमंत्रित केलेले जल जो प्राशन करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो.

गायत्रीच्या प्रथम अक्षराच्या, प्रणवाच्या तीन मात्रा आहेत. अकार, उकार व मकार. यांनाच 'ऋक्', 'साम्', 'यजुष्' हे तीन वेद म्हणतात. यांच्या देवता ब्रह्मा, विष्णू व शिव आहेत. गार्हपत्य, आहवनीय, दक्षिणाग्नी हे तीन अग्नी यांचे आहेत. अघमर्षणमंत्र 'ऋतं च सत्यं च०' म्हणून पाण्यात बुडी मारल्यास सर्व पापे दूर होतील. 'अग्निमीळे पुरोहितम्०' हा ऋग्वेदाचा मंत्र अग्निदेवतेचे सूक्त आहे. या मंत्राचा जप करणारा, तीन वेळा स्नान करून हवन करणारा, भिक्षान्नावर राहाणारा, वायुसूक्तांचा जप करणारा मनोवांच्छित कामना पूर्ण करून घेतो. त्याला 'धारणशक्ती' प्राप्त होते. त्याने प्रतिदिन 'सदसस्पति०' इत्यादी तीन ऋचांचा जप करावा,

'अम्बयो यन्त्यध्वमि०' आदी तीन ऋचांचा जप अकालमृत्यूचा नाश करणारा आहे. कैदेत असणाऱ्या द्विजाने 'शुन:शेपो यमह्वद्गृभीत:०'

इत्यादी तीन ऋचांचा जप करावा. याने त्याची सर्व पापे नाहीशी होतील. तो रोगरहित होईल. 'इन्द्रस्थ०' आदी सोळा ऋचांचा जप जो करील त्याला शाश्वत कामनांची सिद्धी प्राप्त होईल. बुद्धिमान मित्राची प्राप्ती होईल. 'हिरण्यस्तूप:०' इत्यादी मंत्रांचा जप शत्रूच्या गतिविधीत बाधा आणील, 'ये ते पन्था:०' या मंत्रांचा जप करणारा क्षेमाचा धनी होतो. रुद्रासंबंधीच्या सहा ऋचा म्हणून प्रतिदिन शिवांची स्तुती केल्यास, रुद्रदेवास चरू अर्पण केल्यास परम शांतीची प्राप्ती होईल. 'उद्वयं तमस:०' व 'उदुत्यं जातवेदसम्०' या ऋचांनी प्रतिदिन उगवणाऱ्या सूर्यास जलांजली दिल्यास मानसिक दुःखांचा नाश होतो. 'द्विषन्तं०', 'यद्विप्रा:०' या मंत्रांनी अपराधी माणसाच्या मनास शांती प्राप्त होते. आरोग्याची कामना मनात करणाऱ्याने 'पुरीष्यासोऽग्नय:०' या ऋचेचा जप करावा. या ऋचेचा अर्धा भाग शत्रूचा नाश करणारा आहे. 'नव य:०' आदी सूक्तांचा जप केल्यास शत्रूंचे दमन होते. अध्यात्माचे प्रतिपादन करणाऱ्या 'क०' आदी ऋचांनी मोक्षाची प्राप्ती होते.

'आ नो भद्रा:०' या ऋचेच्या जपाने दीर्घ आयुष्य मिळते. हातांत समिधा घेऊन 'त्वं सोम०' या ऋचेने शुक्लपक्षातील द्वितीयेच्या चंद्राचे दर्शन घ्यावे. त्याला वस्त्रांची प्राप्ती होईल. 'जात वेदसे०' या मंगलमय जपाचे ध्यान यात्रीने मार्गात करावे. त्याचे सर्व भय दूर होईल. 'प्र मन्दिने पितुमदर्चता०' या ऋचेचा जप केल्यास स्त्रीची प्रसूती सुखपूर्वक होते. 'मा नस्तोके०' या ऋचेने भगवान शंकरांची स्तुती करावी. मनुष्य सर्व भूतांना अजेय होतो. 'स्वप्नेनाभ्युष्या चुमुरिम्०' या ऋचेचा तीनही वेळा जप केल्यास दुःस्वप्नांचा नाश होतो. उत्तम भोजनाची प्राप्ती होते. 'उभे पुनामि रोदसी०' या मंत्राने राक्षसांचा नाश होतो. 'तमागन्म सोमरय:०' या ऋचेचा जप करणारा आततायी भयापासून मुक्त होतो.

'कया शुभा सवयस:०' या ऋचेचा जप करणारा आपल्या जातीत श्रेष्ठता मिळवितो. 'पितुं नू स्तोषं०' या मंत्राच्या जपाने अन्न उपस्थित होते. 'अग्ने नय सुपथा०' या मंत्राने घृताचा होम केल्यास

उत्तर परलोकाची प्राप्ती होते. ‘गणानां त्वां०’ या मंत्राने उत्तम स्निग्ध पदार्थ प्राप्त होतात. ‘यो मे राजन्०’ ही ऋचा दुःस्वप्नांचे शमन करणारी आहे. ‘कृणुष्व पाजः०’ या सूक्ताचा जप करून तुपाची आहुती देणारा पुरुष शत्रूचा प्राण घेऊ शकतो. ‘हंसः शुचिवत्०’ या मंत्राचा जप करून सूर्याचे दर्शन घ्यावे. मनुष्य पवित्र होतो. कृषी करणाऱ्याने मौन राहून क्षेत्राच्या मध्ये स्थालीपाक होम करावा. ‘इंद्राय स्वाहा। मरुद्भ्यः स्वाहा। पर्जन्याय स्वाहा। एवं भगाय स्वाहा’ म्हणून त्या देवतांना आहुत्या द्याव्यात. स्त्रीच्या योनीत ज्याप्रमाणे बीजवपनासाठी जननेंद्रियाचा व्यापार होतो, त्याचप्रमाणे बीज पेरण्यासाठी नांगराचा भूमीशी संयोग करावा. ‘शुनासीराविमां०’ या ऋचेचा जप करावा. नंतर गंध, माल्य, नमस्कार करून सर्व देवदेवतांची पूजा करावी. सर्व कृषिकर्म अमोघ होईल. ‘समुद्रादूर्मिर्मधुमान्०’ या मंत्राचा जप केल्यास अग्निदेवापासून अभीष्ट वस्तूची प्राप्ती होते. ‘विश्वानि के दुर्गहा०’ या ऋचेने अग्निदेवाचे पूजन केल्यास सर्व विपत्तींचा नाश होतो. ‘अग्ने त्वम्०’ या ऋचेने मनोवांछित धनाची प्राप्ती होते.

‘स्वस्ति पन्थामनु चरेम०’ या मंत्राच्या उच्चाराने यात्रा सुखद होते. ‘वि जिव्हीष्व वनस्पते०’ या जपाने शत्रू रोगग्रस्त होतो. याच मंत्राने गर्भवतीची लौकर सुटका होते. पशुधनाची इच्छा करणाऱ्याने ‘मनसः कामम्०’ इत्यादी ऋचांचा जप करावा. संतान हवे असणाऱ्याने ‘कर्दमेन०’ या मंत्राने स्नान करावे. ‘अश्वपूर्वां०’ या मंत्राने स्नान केल्यास राज्याची कामना पूर्ण होते. अशा अनेक उपयुक्त मंत्र या अध्यायात आले आहेत. दोनशेसाठाव्या अध्यायात यजुर्वेदाच्या मंत्रांची विधाने आली आहेत. दोनशेएकसष्टाव्या अध्यायात सामवेदाचे व दोनशेबासष्टाव्या अध्यायात अथर्ववेदाचे मंत्र आले आहेत.

## नाना प्रकारचे उत्पात व त्यांची शांती

दोनशेत्रेसष्टाव्या अध्यायात पुष्करांनी परशुरामास लक्ष्मीची वृद्धी करणाऱ्या ‘श्रीसूक्ता’चा निर्देश केला आहे. ‘हिरण्यवर्णां हरिणीं’ इत्यादी पंधरा ऋग्वेदऋचा श्रीसूक्ताच्या म्हणून प्रसिद्ध आहेत.

' रथे० ', ' अक्षराजाय० ', ' वामा० ' आणि 'चतस्र०' हे चार मंत्र म्हणजे यजुर्वेदीय श्रीसूक्त आहे. ' श्रावन्तीय साम ' हे सामवेदीय श्रीसूक्त व ' श्रियं धातर्मयि धेहि ' हे अथर्ववेदाचे सूक्त आहे. या सूक्तांनी लक्ष्मीची प्रार्थना करून कमल, बेल, तिल यांची आहुती द्यावी.

प्रत्येक वेदात एक ' पुरुषसूक्त ' आहे. याचा मंत्र म्हणत श्रीविष्णूंना एक एक जलांजली दिल्यास सर्व पापांचा नाश होतो. अठरा शांतींत सर्व उत्पातांचा नाश करणाऱ्या अमृता, अभया, सौम्या; या तीन शांती सर्वोत्तम आहेत. अमृता शांती सर्वदैवत्या, अभयाशांती ब्रह्मदैवत्या, सौम्याशांती सर्वदैवत्या आहे. या तीनही शांती कशा कराव्यात यासंबंधीही मार्गदर्शन या अध्यायात आहे. या शांती 'दिव्य', ' आन्तरिक्ष ' व ' भौम ' या तीन प्रकारच्या उत्पातांचे शमन करणाऱ्या आहेत. नक्षत्रांपासून होणारे उत्पात दिव्य. उल्कापात, दिग्दाह, सूर्यास खळे पडणे, गंधर्वनगराचे दर्शन होणे इत्यादी उत्पात अंतरिक्षात आहेत. भूमीवरील उत्पात ' भौम ' होत. या सर्व उत्पातांच्या शांतीसंबंधीची विधाने या अध्यायात आली आहेत.

## आयुर्वेदाचे सार

दोनशेचौसष्टाव्या अध्यायात काम्य बलिवैश्वदेवप्रयोग, काकबली, कुक्कुरबली, गोग्रास; इत्यादींची माहिती आली आहे. पुढल्या अध्यायात दिग्पाल स्नानविधीची व पुढल्या दोनशेसहासष्टाव्या अध्यायात विनायकस्नानविधीची माहिती आहे. यानंतरच्या अध्यायात माहेश्वरस्नान, दोनशेअडुसष्टाव्या अध्यायात सांवत्सरकर्मे, इंद्र व शची यांची पूजा, आणि भद्रकालीची राजाने करायची पूजा; इत्यादी विषय आले आहेत. छत्र, अश्व, ध्वज, गज, पताका, खड्ग, कवच, दुंदुभी यांच्या प्रार्थनेचे मंत्र दोनशेएकोणसत्तराव्या अध्यायात आले आहेत. दोनशेसत्तराव्या अध्यायातील विष्णुपंजरस्तोत्र (स्तोत्र शेवटी स्तोत्रमंजूषेत दिलेले आहे.) दोनशेएकाहत्तराव्या अध्यायात वेदांचे मंत्र, त्यांच्या शाखा, वेदांचा महिमा; इत्यादी विषय आले आहेत. विभिन्न पुराणे महाभारत यांच्या

श्रवणाची फले, दानमाहात्म्य हे विषय दोनशेबहात्तराव्या अध्यायात, सूर्यवंश, सोमवंश, यदुवंश, कृष्णांच्या पत्नी व त्यांचे पुत्र, तुर्वसू आदी राजांचे वंश, अंगवंश, पुरुवंश इत्यादी नेहमीचे विषय दोनशेअठ्ठ्याहत्तराव्या अध्यायापर्यंत आले आहेत.

यानंतरच्या सात आठ अध्यायांत आयुर्वेदाचे सर्वांगीण वर्णन आले आहे. हा आयुर्वेद भगवान धन्वन्तरीने सुश्रुतास सांगितला होता. सिद्धयोग, सिद्धमंत्र, मृतसंजीवनकारक औषधे इत्यादींचाही निर्देश या विभागात आला आहे. वैद्याने ज्वराक्रान्त व्यक्तीच्या बलाची परीक्षा करावी. त्याला लंघन करायला सांगावे. नंतर त्याला सुंठीने युक्त अशा धन्याचा, नागरमोथ्याचा, खसाचा, लालचंदनाचा सुगंधी काढा द्यावा. ज्वर निघण्यासाठी घाम जाण्याची योजना करावी. वातादी दोष नसतील तर विरंजन द्रव्य देऊन मूग, मसूर, चणे, कुळथ, डाळिंब इत्यादी पदार्थ खाण्यास सांगावेत. रक्तपित्त, गुल्मरोग, उदररोग, प्रमेहरोग, दमा व खोकला, हृदयरोग, मदात्ययरोग, मूत्रकृच्छ्र रोग; इत्यादी रोगांवर नाना प्रकारची औषधे सांगितली आहेत.

कानात दुखत असेल तर बकऱ्याचे मूत्र व तेल यांनी कान भरल्यास दोष कमी होईल. असेच उपाय शिरोरोग, नेत्ररोग यांच्यासाठीही सुचविले आहेत. दीर्घ जीवनाच्या प्राप्तीसाठी रात्री त्रिफळा घृतमधाच्या बरोबर घ्यावा. विंचू चावल्यास मोरपंख व घृतधूर लाभदायक होतो. यानंतर पुढल्या अध्यायात सर्व रोगहर औषधांचा निर्देश केला आहे. व्याधी चार प्रकारच्या असतात. शारीरिक, मानसिक, आगन्तुक व सहज असे ते प्रकार होत. ज्वर, कुष्ठ आदी शारीरिक व्याधी होत. क्रोधादी मानसिक व्याधी, जखमेसारख्या आगंतुक व्याधी आणि भूक, वृद्धत्व इत्यादी सहज व्याधी होत. शारीरिक व आगन्तुक व्याधींच्या नाशासाठी रविवारी ब्राह्मणाची पूजा करून त्याला घृत, गूळ, मीठ, सुवर्ण यांचे दान द्यावे. सोमवारी त्याला उटणे द्यावे. शनिवारी तेल द्यावे. अश्विन महिन्यात गोरस, गायीचे तूप, दूध, दही, अन्न दिल्याने सर्व रोगांपासून मुक्त होता येते. घृत व दूध यांनी शिवलिंगास स्नान घालावे. मनुष्य रोगहीन होईल त्रिमधुर (शर्करा, गूळ व मध)

यांत बुडवून दूर्वांचे हवन गायत्रीमंत्रानें केल्यास मनुष्य सर्व रोगांपासून मुक्त होईल. ज्या नक्षत्रात रोग झाला असेल त्याच नक्षत्रात स्नान करून बली द्यावा. भगवान विष्णूंचे स्तोत्र मानसरोग दूर करणारे आहे. यानंतर वात, कफ, पित्त या दोषांचे व रस, रक्त, मांज, मेद, अस्थी, मज्जा, शुक्र इत्यादींचे वर्णन आले आहे.

खाल्लेले अन्न पक्वाशयापासून दोन भागांत विभक्त होते. एका अंशापासून मल व दुसऱ्या अंशापासून रस यांची निर्मिती होते. विष्ठा, मूत्र, घाम हे मलरूपानें बाहेर येतात. नेत्रमल, नासामल, कर्णमल, देहमल; असे या मलाचे भेद आहेत. रस आपल्या सर्व शरीरात रुधिराच्या रूपात परिणत होतो. मांस, मेद, अस्थी, मज्जा, शुक्र व रंग वा वर्ण आणि ओजस् यांची परस्परांपासून निर्मिती होते. चिकित्सा करणाऱ्यानें देश, काल, पीडा, बल, शक्ती, प्रकृती इत्यादींची पाहाणी प्रथम करावी. औषधाचा प्रारंभ चतुर्थी, चतुर्दशी, नवमी या तिथींना, शनिवारी व मंगळवारी या वारांना टाळावा. विष्णू, गाय, ब्राह्मण, चंद्र, सूर्य आदी देवदेवतांची पूजा करून रोग्यासाठी खालील मंत्राचा जप करावा.

ब्रह्मदक्षश्विरुद्रेन्द्रभूचन्द्रार्कानिलानलाः ।
ऋषश्चौषधीग्रामा भूतसंघाश्च पान्तु ते ॥
रसायनमिवर्षीणां देवनाममृतं यथा ।
सुधैवोत्तमनागानां भैषज्यमिदमस्तु ते ॥

ब्रह्मदेव, दक्ष, अश्विनीकुमार, रुद्र, इंद्र, भूमी, चंद्रमा, सूर्य, अनिल, अनल, ऋषी, औषधीसमूह, भूतसमुदाय यांनी तुझे रक्षण करावे. ऋषींसाठी रसायन, देवांसाठी रसायन, देवांसाठी अमृत, श्रेष्ठ नागांसाठी सुधा, ही उत्तम गुणकारी असतात, त्याचप्रकारे औषध हे तुझ्यासाठी आरोग्यकारक व प्राणनाशक व्हावे. हा या श्लोकाचा भावार्थ आहे. चिकित्सेत देशाचा विचार येतो. खूप वृक्षांचा जलमय देश 'अनूप' नावानें ओळखला जातो. तेथे वात व कफ यांची निर्मिती होते, जांगल, साधारण, असेही देशांचे प्रकार आहेत. वात, पित्त व कफ यांचीही

लक्षणे सांगितली आहेत. वात, रुक्ष, शीत व चल आहे. पित्त उष्ण असते. पित्त कटुमय असते. कफ स्थिर, अम्ल, स्निग्ध व मधुर असतो. मधुर, अम्ल लवण हे कफकारक व वायुनाशक असतात. या त्रिदोषांची भरपूर चर्चा आली आहे.

देहाच्या मध्यभागी हृदय आहे. हे मनाचे स्थान आहे. स्वभावत: दुर्बल, थोडया केसांचा, चंचल, अधिक बोलणारा, विषमानल, जो स्वप्नात आकाशात उडत असतो तो मनुष्य वात प्रकृतीचा असतो. वय होण्याआधीच ज्याचे केस पिकतात, गळू लागतात, ज्यास क्रोध येतो, घाम अधिक येतो, गोड वस्तू ज्यास आवडतात, स्वप्नात ज्याला अग्नी दिसतो, तो पित्त प्रकृतीचा होय. जो दृढ अंगाचा, स्थिरचित्त, सुंदर, कान्तियुक्त, चिकट केसांचा, स्वप्नात स्वच्छ जल पाहणारा कफ प्रकृतीचा मनुष्य समजावा. तामस, राजस, सात्त्विक असे तीन प्रकारचे लोक असतात. सर्व मनुष्यांत वात, कफ, पित्त असतात. मैथुनाने वा फार काम केल्याने रक्तपित्त होते. कदान्न भोजनाने व शोकाने वायू कुपित होतो. अस्थिभंग, मुखास तुरट वास, तोंड सुकून जाणे, जांभई येणे, रोमांच उभे राहाणे; अशी वायुजनित रोगलक्षणे आहेत. नखे, डोळे, शिरा यांना पिवळा रंग देणे, तोंड कडू होणे, तहान लागणे, शरीराची आग होणे; ही पित्तव्याधीची लक्षणे होत. आळस, तोंडास पाणी सुटणे, उष्णाची अभिलाषा ही कफज व्याधीची लक्षणे होत. स्निग्ध व गरम भोजन केल्याने, तेलाने मालिश केल्याने, तैलपान केल्याने वातरोगाचे निवारण होते. तूप, दूध, चंद्राची किरणे यांनी पित्तरोग दूर होतो. मधाबरोबर त्रिफळा घेतल्यास कफाचे शमन होईल. सर्व रोगांच्या शांतीसाठी भगवान विष्णूंचे ध्यान व पूजन हे सर्वोत्तम औषध आहे.

दोनशेएक्याऐंशिव्या अध्यायात रसादिकांचे वर्णन आले आहे. मधुर, आम्ल व लवणरस चंद्रापासून उत्पन्न होतात. कडू, तिखट, तुरट, रस अग्नीपासून तयार होतात. द्रव्याचा विपाक तीन प्रकारचा असतो. एक कडू, दुसरा अम्ल, तिसरा खारट. वीर्य दोन प्रकारचे असते. एक शीत, दुसरे उष्ण, मधुर, तिखट, खारट, 'शीतवीर्य' समजतात. उरलेले

रस ‘ उष्णवीर्य ’ समजतात. अशी विविध प्रकारची रसमीमांसा या अध्यायात आली आहे. दोनशेब्याऐंशिव्या अध्यायात आयुर्वेदाच्या दृष्टीने वृक्षांचे वर्णन केले आहे. घराच्या उत्तरेस प्लक्ष (पिंपरी), पूर्वेस वड, दक्षिणेस आम्र, पश्चिमेस अश्वत्थ वृक्ष असावेत. घराच्या दक्षिणेस काटेरी वृक्ष शुभ मानला गेला आहे. आवासाशेजारी उद्यान असावे. सर्व बाजूंनी सुगंधी फुले असावीत. वृक्षारोपणाचाही विधी समजावून दिला आहे. लिंब, अशोक, पुन्नाग, शिरीष, प्रियंगू, कदली, जांभूळ, बकुळ, डाळिंब या वृक्षांना लावून ग्रीष्म ऋतूत प्रातःकाली व सायंकाळी आणि वर्षाऋतूत दिवसा जलाने शिंपावे. वृक्षांच्यामध्ये वीस हातांचे अंतर उत्तम असावे. सोळा हातांचे अंतर मध्यम व बारा हातांचे अंतर अधम समजावे. वृक्षांना केव्हा कापावे, खत कोणते घालावे, यासंबंधीही मार्गदर्शन आहे.

दोनशेत्र्याऐंशिव्या अध्यायात मंत्ररूप औषधांचे विवेचन आहे. ‘ॐकारा’चा मंत्र सर्व रोग दूर करणारा आहे. या मंत्राने मनुष्य अमर बनतो. गायत्रीमंत्रही उत्कृष्ट आहे. ‘ ॐ नमो नारायणाय ’ हा अष्टाक्षरी मंत्र सर्व मनोरथ पूर्ण करणारा आहे. ‘ ॐ नमो भगवते वासुदेवाय ’ हा द्वादशाक्षरी मंत्र सर्व काही देणारा आहे. ‘ॐ हूं विष्णवे नमः ’ हा मंत्र एक उत्तम औषध आहे. ‘ धर्मः, सद्धर्मकृत्, धर्मी ’ या धर्मसंबंधी नामांच्या जपाने मनुष्य शुद्ध होतो. श्रीदः, श्रीशः, श्रीनिवासः, श्रीधरः, श्रीनिकेतनः, श्रियःपतिः श्रीपरमः या श्रीपतिनामसंत्रांने मनुष्य धन-संपत्तीने युक्त होतो. कामी, कामप्रदः, कामः, कामपालः, हरिः, आनन्दः, माधवः, या नाममंत्रांनी सर्व कामना पूर्ण होतात. रामः, परशुरामः, नृसिंहः, विष्णुः, त्रिविक्रमः, या श्रीहरींच्या नामांनी युद्धात विजय प्राप्त होतो. विद्याभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांनी ‘ श्रीपुरुषोत्तमः ’ या नामाचा जप करावा. ‘ दामोदरः ’ नाम बंधन दूर करते. ‘ पुष्कराक्षः ’ हा नाममंत्र नेत्ररोग दूर करतो. ‘ हृषिकेशः ’ हा मंत्र भयहारी आहे.

औषधकर्मात ‘ अच्युत ’ या अमृत-मंत्राचा जप करावा. संग्रामात ‘ अपराजित ’चा व जल पार करताना ‘ श्रीनृसिंह ’चा जप करावा. पूर्वादी दिशांची यात्रा करणाऱ्याने ‘ चक्री ’, ‘ गदी ’, ‘ शाङ्‌र्गी ’,

'खड्गी' यांचे चिंतन करावे. व्यवहारात भक्तिभावाने 'सर्वेश्वर अजित' याचे स्मरण करावे. 'नारायणा'चे स्मरण प्रत्येक वेळी करावे. नृसिंहाचे स्मरण सर्व प्रकारची भीती दूर करणारे आहे. गरुडध्वजाचे नाव विषाचे हरण करणारे आहे. वासुदेवाचा जप सतत करावा. दुःस्वप्नातून मुक्तता होण्यासाठी 'नारायणा'चे व दाहआदीपासून निवारण होण्यासाठी 'जलाशयीं'चं स्मरण करावे. पुत्राच्या प्राप्तीसाठी 'जगत्सूति' जगत्स्रष्टयाचे चिंतन करावे. शौर्याच्या कामनेसाठी 'श्रीबलभद्र' यांचे स्मरण करावे.

दोनशेपंच्याऐंशिव्या अध्यायात आत्रेयांच्या मृतसंजीवनकारक दिव्य सिद्धयोगांचे वर्णन आले आहे. पुढल्या दोनशेंशहाऐंशिव्या अध्यायात मृत्युंजययोगांचे विवेचन आले आहे. यानंतर गजचिकित्सा, अश्ववाहनसार, अश्वचिकित्सा, अश्वशांती, गजशांती, गवायुर्वेद इत्यादी विषय आले आहेत. हे पशुवैद्यक महत्त्वाचे आहे. गजरोगांच्या प्रशमनासाठी गजशांतीचा प्रयोग सांगितला आहे. कोणत्याही शुक्ल पंचमीस विष्णू, लक्ष्मी, नागराज ऐरावत यांची पूजा करावी. त्यानंतर ब्रह्मदेव, शिव, विष्णू, इंद्र, कुबेर, यमराज, चंद्रमा, सूर्य, वरुण, वायू, अग्नी, पृथ्वी, आकाश, शेषनाग, पर्वत, विरूपाक्ष, महापद्म, भद्र, सुमनस, देवजातीय आठ हत्ती; यांचे पूजन करावे. या निमित्तानें शांतिकर्माचेही वर्णन आले आहे.

दोनशे ब्याण्णवाव्या अध्यायात 'गवायुर्वेद' सांगितला आहे. राजानें गायी, ब्राह्मण यांचे पालन करावे. गोशांती करावी. गायी पवित्र व मंगलमय असतात. त्यांचे शेण व मूत्र दारिद्र्याचा नाश करतात. त्यांच्या शरीरास खाजवावे, त्यांना गोंजारावे, त्यांची शिंगे कुरवाळावीत. त्यांना जल पाजावे. गोमूत्र, गोमय, गोदुग्ध, दही, तूप, कुशोदक यांनी दुःस्वप्नांचा नाश होतो. गायींना ग्रास दिल्यानें स्वर्गाची प्राप्ती होते. ज्याच्या घरी गाय कष्टी असते, तो नरकगामी होतो. गोहितात तत्पर राहाणारा ब्रह्मलोकास जातो. गोदान, गोमाहात्म्य, गोरक्षण यांनी मानवाच्या कुळाचा उद्धार होतो. ही पृथ्वी गायीच्या श्वासानें पवित्र होते. तिच्या स्पर्शाने पापांचा क्षय होतो. गाय परम मंगलमय आहे. या

गायींची निगा कशी राखावी, त्यांना औषधपाणी कसे करावे, यांचेही मार्गदर्शन या अध्यायात आहे.

पंचमी तिथीस सदा शांतीसाठी गोमयाकार भगवान लक्ष्मी-नारायणांची पूजा करावी. हेच 'अपराशांतिव्रत' आहे. आश्विनी पौर्णिमेस श्रीहरींचे पूजन करावे. गोपूजन करावे. गीत व वाद्य यांनी वृषभयुद्धाचे आयोजन करावे. गायींना लवण द्यावे. गायींचे पूजन करावे. अग्निदेवांनी सांगितले आहे की, शालिहोत्राने सुश्रुतास 'अश्वायुर्वेद' व पालकाप्याने अंगराजास 'गवायुर्वेद' सांगितला आहे.

## अशी ही मंत्रविद्या

यानंतर दोनशेत्र्याण्णवाव्या अध्यायात मंत्रविद्येचे स्वरूपवर्णन केले आहे. ही विद्या भोग व मोक्ष देणारी आहे. वीस अक्षरांपेक्षा अधिक असणारा 'मालामंत्र', दहापेक्षा अधिक अक्षरांचे मंत्र, दहापेक्षा कमी अक्षरांचे बीजमंत्र असतात. मालामंत्र वृद्धावस्थेत सिद्ध होतात. मंत्र यौवनावस्थेत सिद्ध होतात. मंत्रांच्या तीन जाती आहेत. स्त्री, पुरुष व नपुंसक. ज्या मंत्रांच्या अंती 'स्वाहा' पदाचा प्रयोग होतो, तो स्त्री-जातीय होय. ज्याच्या शेवटी नमःचा उपयोग होतो, तो नपुंसक व इतर सर्व पुरुषजातीय होय. हे वशीकरण व उच्चाटनकर्मात प्रशस्त मानले गेले आहेत. क्षुद्र क्रिया व रोगनिवारण आणि शांतिकर्म यांसाठी स्त्री-जातीय मंत्र उपयुक्त होतात. विद्वेषण, अभिचार इत्यादींत नपुंसक मंत्र उपयोगी पडतात.

मंत्रांचे आणखी दोन भेद आहेत. एक 'आग्नेय' व दुसरा 'सौम्य'. ज्या मंत्राच्या आदी 'प्रणव' असतो तो आग्नेय मंत्र. ज्याच्या शेवटी प्रणवाचा उपयोग होतो तो सौम्यमंत्र होय. हे मंत्र केव्हा, कसे जपावेत याचेही मार्गदर्शन आहे. साधकाच्या नामाचे प्रथमाक्षर व मंत्राचे आदी अक्षर यांची गणना करून मंत्र साधकास अनुकूल, की प्रतिकूल हे पाहाता येते. यासाठी नक्षत्रचक्राचा एक मंत्र दिला आहे, तो असा—

**राज्यलाभोपकराय प्रारभ्यारिः स्वरः कुरून् ।**
**गोपालकुकुटीं प्रायात् फुल्लारवित्युदिता लिपिः ॥**

यानंतर बारा राशींत वर्णांचे विभाजन केले आहे. राशिज्ञानाचा उपयोग सांगितला आहे. सिद्धादी मंत्रशोधनाचा प्रकार निवेदन केला आहे. त्यानंतर खाली दिल्याप्रमाणे लिपि(मातृका)न्यास सांगितला आहे, तो असा आहे–

'ॐ अं नमः केशान्तेशु । ॐ आं नमः, मुखे । ॐ इं नमः, दक्षिणनेत्रे । ॐ ईं नमः, वामनेत्रे । ॐ उं नमः, दक्षिणकर्णे । ॐ ऊं नमः, वामकर्णे । ॐ ऋं नमः, दक्षिणनासापुटे । ॐ ॠं नमः, वामनासापुटे । ॐ लृं नमः, दक्षिणकपोले । ॐ ॡं नमः, वामकपोले । ॐ एं नमः, ऊर्ध्वोष्ठे । ॐ ऐं नमः, अधरोष्ठे । ॐ ओं नमः, ऊर्ध्वदन्तपङ्क्तौ । ॐ औं नमः, अधोदन्तपङ्क्तौ । ॐ अं नमः, मूर्ध्नि । ॐ अः नमः, मुखवृत्ते । ॐ कं नमः, दक्षिणबाहुमूले । ॐ खं नमः, दक्षिणकूर्परे । ॐ गं नमः, दक्षिणमणिबन्धे । ॐ घं नमः, दक्षिणहस्ताङ्गुलिमूले । ॐ ङं नमः, दक्षिणहस्ताङ्गुल्यग्रे । ॐ चं नमः, वामबाहुमूले । ॐ छं नमः, वामकूर्परे । ॐ जं नमः, वाममणिबन्धे । ॐ झं नमः, वामहस्ताङ्गुलिमूले । ॐ ञं नमः, वामहस्ताङ्गुल्यग्रे । ॐ टं नमः, दक्षिणपादमूले । ॐ ठं नमः, दक्षिणजानुनि । ॐ डं नमः, दक्षिणगुल्फे । ॐ ढं नमः, दक्षिणपादङ्गुलिमूले । ॐ णं नमः, दक्षिणपादाङ्गुल्यग्रे । ॐ तं नमः, वामपादमूले । ॐ थं नमः, वामजानुनि । ॐ दं नमः, वामगुल्फे । ॐ धं नमः, वामपादाङ्गुलिमूले । ॐ नं नमः, वामपदाङ्गुलयग्रे । ॐ पं नमः, दक्षिणपार्श्वे । ॐ फं नमः, वामपार्श्वे । ॐ बं नमः, पृष्ठे । ॐ भं नमः, नाभौ । ॐ मं नमः, उदरे । ॐ यं त्वमागत्मने नमः, हृदि । ॐ रं असृगात्मने नमः, दक्षांसे । ॐ लं मांसात्मने नमः, ककुदि । ॐ वं मेदात्मने नमः, वामांसे । ॐ शं अस्थ्यात्मने नमः, हृदयादिदक्षहस्तान्तम् । ॐ षं मज्जात्मने नमः हृदयादिवामहस्तान्तम् । ॐ सं शुक्रात्मने नमः, हृदयादिदक्षपादान्तम् । ॐ हं आत्मने नमः. हृदयादिवामपादान्तम् । ॐ ळं परमात्मने नमः, जठरे । ॐ क्षं प्राणात्मने नमः, मुखे ।

याप्रमाणे प्रारंभी 'प्रणव' व शेवटी 'नमः' पद जोडून लिपीश्वराचा, मातृकेश्वरांचा न्यास करावा. श्रीकंठ, अनंत, सूक्ष्म, त्रिमूर्ती, अमरेश्वर, अर्घीश, भारभूती, तिथीश, स्थाणुक, हर, झिण्टीश, भौतिक, सद्योजात, अनुग्रहेश्वर, अक्रूर व महादेव; या सोळा 'स्वरमूर्तिदेवता' आहेत. क्रोधीश, चण्डीश, पञ्चात्तक, शिवोत्तम, एकरुद्र, कूर्म, एकनेत्र, चतुरानन, अजेश, सर्वेश, सोमेश, लाङ्गली, दारुक, अर्धनारीश्वर, उमाकान्त, आषाढी, दण्डी, अद्रि, मीन, मेष, लोहित, शिखी, छगलाण्ड, द्विरेण्ड, महाकाल, कपाली, भुजंगेश, पिनाकी, खड्गीश, बक, श्वेत, भृगु, नकुली, शिव व संवर्तक; या 'व्यंजनमूर्तिदेवता' आहेत. या श्रीकंठादी रुद्रांचा त्यांच्या शक्तींसह क्रमशः न्यास करावा.

न्यासाचा विधी असा आहे. 'हसौं अं श्रीकण्ठाय पूर्णोदर्यै: नमः। हसौं आं अनन्ताय विराजायै नमः' याच प्रकारे अन्य स्वरशक्तींचाही न्यास करावा. व्यंजनशक्तींच्या न्यासासाठी असाच विधी आहे. 'हसौं कं क्रोधीशाय महाकाल्यै नमः। हसौं खं चण्डीशाय महासरस्वत्यै नमः' इत्यादी मंत्र आहेत. साधकानें वाटल्यास उदयादी अंगांचाही न्यास करावा. कारण संपूर्ण मंत्र सांग झाला तरच सिद्धिदायक होतो. हृल्लेखेस व्योम-बीजानें युक्त करून अंगांचा न्यास करावा. हृदयादी अंग मंत्रांच्या अंती जोडून म्हणावे, 'ऱ्हां हृदयाय नमः। ऱ्हीं शिरसे स्वाहा। ऱ्हूं शिखायै वषट्। ऱ्हैं कवचाय हुम्। ऱ्हौं नेत्रत्रयाय वौषट्। ऱ्हः अस्त्राय फट्।' हा झाला षडंगन्यास. पंचांगन्यासात नेत्रास सोडून द्यावे. निरंगमंत्राचा त्याच्या स्वरूपानेंच अंगन्यास करून क्रमशः वागीश्वरीदेवी (ऱ्हीं)चा एक लाख जप करावा; आणि दशांश तिळांची आहुती द्यावी. लिपीची अधिष्ठात्री देवता वागीश्वरी आपल्या चार हातांत अक्षमाला, कलश, पुस्तक आणि कमल धारण करते. ही देवी कवित्वाची शक्ती प्रदान करते. म्हणून जपकर्माच्या आधी सिद्धीसाठी न्यास करणे अगत्याचे आहे. यामुळे अकवीही निर्मल कवी होऊन जातो. मातृकान्यासात सर्व मंत्र सिद्ध होतात. अशी ही मंत्रपरिभाषा या अध्यायात आहे.

## असे हे सर्पविज्ञान

यानंतर दोनशेचौऱ्याणव्या अध्यायात नागलक्षणे अग्निदेवांनी सांगितली आहेत. नागांची उत्पत्ती, सर्पदंशाचे प्रकार, अशुभ लक्षणे, मर्मस्थळे; इत्यादींची माहिती या अध्यायात आलेली आहे. शेष, वासुकी, तक्षक, कर्कोटक, पद्म, महापद्म, शंखपाळ, कुलिक; असे आठ नागश्रेष्ठ आहेत. यांतील दोन नाग ब्राह्मण, दोन क्षत्रिय, दोन वैश्य, दोन शूद्र असतात. चार वर्णांचे हे नाग क्रमशः एक हजार, आठशे, पांचशे, तीनशे फण्यांनी युक्त असतात. यांचे वंशज पांचशे नाग झाले. आकारभेदाने सर्पांचे फणी, मंडली, राजिल; असे तीन भेद होतात. हे वात, पित्त, कफप्रधान आहेत. यांशिवाय व्यन्तर, दोषमिश्र, दर्वीकर इत्यादी जातींचेही सर्प आहेत. चक्र, हल, छत्र, स्वस्तिक, अकंश या चिन्हांनी ते युक्त असतात. गोनस सर्प विविध मंडलांनी चित्रित, दीर्घकाय व मंदगामी असतो. राजिल सर्प स्निग्ध, ऊर्ध्वभागी, पार्श्वभागी रेखांनी सुशोभित असतो. व्यंतर सर्प मिश्रित चिन्हांनी युक्त असतो. या सर्पप्रकारांचेही आणखी पुष्कळ उपप्रकार सांगितले आहेत. सर्पांच्या उत्पत्तीबद्दल विवेचन आहे.

आषाढापासून तीन महिनेपर्यंत सर्पांची गर्भस्थिती असते. त्यानंतर चौथ्या महिन्यात सर्पीण दोनशेचाळीस अंडी प्रसवते. सर्पशावक अंड्यांतून बाहेर येताच त्यांच्यांत स्त्री, पुरुष, नपुंसक असा भेद निर्माण होण्यापूर्वीच सर्पगण त्यांच्यापैकी काहींना खाऊन टाकतात. कृष्णसर्प डोळे फुटल्यावरच अंड्यातून बाहेर येतो. बारा दिवसांनंतर त्यास ज्ञान प्राप्त होते. वीस दिवसांनी सूर्यदर्शन झाल्यावर त्याला बत्तीस दात व चार दाढा यांची प्राप्ती होते. सर्पाच्या दाढा कराली, मकरी, कालरात्री, यमदूतिका या प्रकारच्या असतात. या विषयुक्त असतात. सहा महिन्यांनी सर्प कात टाकतो. त्याचे आयुष्य एकशेवीस वर्षांपर्यंत असते. शेष आदी नाग क्रमशः रविवारादी वारांचे स्वामी मानले गेले आहेत.

यानंतर सर्पदंशाचा विचार केला आहे. नक्षत्रांनुसार इष्टानिष्टता सांगितली आहे. सर्पदंशाचे चार भेद सांगितले आहेत. यांतील

तीन, दोन व एक दंश वेदनात्मक व रक्तस्राव करणारे आहेत. पाय व कूर्मसमान आकाराचा दंश मृत्यूने प्रेरित असतो. सर्पांचा निवास कोठे असतो ? सर्प बिनविषारी असतात का ? यांचाही विचार झालेला आहे. देवमंदिर, शून्यगृह, वारूळ, उद्यान, वृक्षाचे कोटर, दोन रस्त्यांचे मीलन, स्मशान, नदी, सागर, द्वीप, चौक, राजप्रासाद, गृह, कमलवन, पर्वतशिखर, जीर्णकूप, जीर्णगृह, वृक्ष, जंबूवृक्ष, औदुंबरवृक्ष, वेणुवन, वटवृक्ष, जीर्ण प्राकार; इत्यादी सर्पांची वसतिस्थाने होत. इंद्रियछिद्र, मुख, हृदय, कक्ष, ग्रीवामूल, तालू, ललाट, ग्रीवा, शिर, नाभी, चरण; इत्यादी अंगांना दंश झाला तर अशुभ असतो.

यानंतर सर्पविषाची चिकित्सा आली आहे. मंत्र, ध्यान, औषध यांनी सर्पविषावर उपाय करता येतात. 'ॐ नमो भगवते नीलकण्ठाय' या मंत्राच्या जपाने सर्पाच्या विषाचा नाश होतो. घृतासह गोमयाचा रस प्राशन करावा. विष दोन प्रकारचे असते. 'जंगम' व 'स्थावर' असे दोन प्रकार आहेत. सर्प, मूषक यांच्यांत जंगम विष असते. स्थावर विषाचेही काही भेद सांगितले आहेत. शांत स्वराने युक्त ब्रह्मा (क्ष्रौं) लोहित (ह्रीं), नारक (ॐ), शिव (ह्रौं) अशा चार अक्षरांचा नियतिसंबंधी नाममंत्र आहे. हाच शब्दमय तार्क्ष्य (गरुड) मानला गेला आहे.

'ॐ ज्वल महामते हृदयाय नमः, गरुड विशाल शिरसे स्वाहा, गरुड शिखायै वषट्, गरुडविषभञ्जन प्रभेदन प्रभेदन वित्रासय वित्रासय विमर्दय विमर्दय कवचाय हुम्, उग्ररूपधारक सर्वभयंकर भीषय भीषय सर्वं दह दह भस्मीकुरु स्वाहा, नेत्रत्रयाय वौषट् । अप्रतिहतशासनं वं हूं फट्. अस्त्राय फट्.'

तार्क्ष्यमंत्र कसा जपावा याचाही विधी सांगितला आहे. 'हं यं रं वं लं' हा पंचाक्षरमंत्रराज आहे. या मंत्राने भयानक विषाचे स्तंभन होते. हा 'व्यत्यस्तभूषण' बीजमंत्र आहे. याखेरीज विष, ज्वर, रोग, अपमृत्यू यांवर विजय मिळविण्यासाठी मंत्र दिले आहेत. 'पक्षि पक्षि महापक्षि महापक्षि वि वि स्वाहा । पक्षि पक्षि महापक्षि क्षि क्षि स्वाहा' हे दोन पक्षिराज गरुडाचे मंत्र आहेत. 'पक्षिराजाय विद्महे पक्षिदेवाय

धीमहि तन्नो गरुडः प्रचोदयात्' हा गरुड-गायत्रीमंत्र आहे. याशिवाय 'ॐ नमो भगवते नीलकंठाय चिः । अमलकंठाय चिः । सर्वज्ञकंठाय चिः । क्षिप क्षिप ॐ स्वाहा । अमलीनीलकंठाय नैकसर्पविषापहाय । नमस्ते रुद्र मन्यवे' या मंत्रानेंही विष चटकन उतरते.

यानंतर पुढल्या दोनशेशहाण्णवाव्या अध्यायात व दोनशेसत्त्याण्णवाव्या अध्यायात पंचांगरुद्रविधान व विषहारीमंत्र व औषधे यांची चिकित्सा आली आहे. 'ॐ हं हं उग्रं वीरं महाविष्णुं ज्वलन्तं सर्वतोमुखम् । नृसिंहं भीषणं भद्रं मृत्युमृत्युं नमाम्यहम्' हा नृसिंहमंत्र विषव्याधीचा नाश करतो. 'ॐ नमो भगवते पक्षिरुद्राय दष्टकमुत्थापयोत्थापय, दष्टकं कम्पय कम्पय जल्पय जल्पय सर्पदंष्टमुत्थापयोत्थापय लल लल बन्ध बन्ध मोचय मोचय वररुद्र गच्छ गच्छ वध वध त्रुट त्रुट वुक वुक भीषय भीषय मुष्टिना विषं संहर संहर ठ ठ' या पक्षिरुद्रमंत्राने सर्पविषाचा नाश होतो. सर्पबंधनाचाही मंत्र असा आहे,

'ॐ नमो भगवते रुद्र नाशय विषं स्थावरजंगमं कृत्रिमाकृत्रिमं विषमुपविषं नाशय नानाविषं दष्टकविषं नाशय धम धम दम दम वम वम मेघान्धकारधारावर्षंकर्षं निर्विषीभव संहर संहर गच्छ गच्छ आवेशय आवेशय विषोत्थापनरूपं मंत्राद् विषधारणम् ॐ क्षिप ॐ क्षिप स्वाहा.', 'ॐ ऱ्हां ऱ्हीं स्त्री सः ठं प्रौं ऱ्हीं ठः' हा मंत्र जपल्याने सर्पास बंधनकारक होतो. यानंतर आणखी एक मंत्र 'पातालक्षोभमंत्र' नावाचा सांगितला आहे तो असा. 'ॐ नमो भगवते रुद्राय' प्रताधिपतये हुलु हुलु गर्ज गर्ज नागान् भ्रामय भ्रामय मुञ्च मुञ्च मोहय मोहय कट्ट कट्ट आविश आविश सुवर्णपतङ्ग रुद्रो ज्ञापयति स्वाहा.' हा मंत्रही विषनाशक आहे.

यानंतर दोनशेअठ्ठाण्णवाव्या अध्यायात गोनसादींची चिकित्सा केली आहे. 'ॐ ऱ्हां ऱ्हीं अमलपक्षि स्वाहा' या मंत्राने अभिमंत्रित करून तांबूलाच्या प्रयोगाने मंत्रवेत्ता मण्डली (गोनस) आदी सर्पांचे विष हरण करतो. यानंतर याच अध्यायात मूषकांचे सोळा प्रकार सांगितले आहे. मूषकविषाच्या नाशाचा उपायही सांगितला आहे. 'ॐ नमो भगवते रुद्राय चिवि चिवि चिछन्द चिछन्द किरि किरि भिन्द

भिन्द खड्गेन छेदय छेदय शूलेन भेदय भेदय चक्रेण दारय दारय ॐ हूं फट्' या मंत्राने अभिमंत्रित करून औषध द्यावे. म्हणजे सर्व प्रकारचे विष उतरेल. वृश्चिकविषाचेही थोडे विवेचन येथे आले आहे. 'ॐ सुभद्रायै नमः, ॐ सुप्रभायै नमः' या मंत्राने औषधी वनस्पती उपटाव्यात, खालील मंत्राचा उच्चार करून त्या भक्षण कराव्यात.

नमः पुरुषसिंहाय नमो गोपालकाय च ।
आत्मनैवाभिजानाति रणे कृष्णः पराजयम् ।
अनेन सत्यवाक्येन अगदो मेऽस्तु सिद्ध्यतु ॥

याखेरीज स्थावर विषांच्या औषधासंबंधी पुढील मंत्राचा प्रयोग करावा, 'ॐ नमो वैदूर्यमात्रे तत्र रक्ष मां सर्वविषेभ्यो गौरि गान्धारि चाण्डालि मातङ्गिनी स्वाहा हरिमाये' विष प्राशन झाले असेल तर ते वमन कसे करावे हेही याच अध्यायात सांगितले आहे.

## आणखी काही मंत्रसिद्धी

यानंतर दोनशेनव्याण्णवाव्या अध्यायात बालादिग्रहहर बालतंत्र समजावून सांगितले आहे. यालाच बालतंत्र म्हणतात. शिशूस जन्माच्या दिवशी 'पापिनी' नावाची दुष्ट ग्रही ग्रहण करते. बालकास उद्वेग प्राप्त होतो. आईचे दूध पिणे ते सोडून देते. त्याची लाळ गळत असते. वारंवार ते मान फिरविते. अशा 'भीषणी', 'घण्टाली', 'काकोली', 'हंसाधिका' 'फट्कारी', 'मुक्तकेशी', 'श्रीदंडी', 'ऊर्ध्वग्रही', 'रोदनी', 'पूतना', 'मुकुटा', 'गोमुखी', 'पंकजा', 'तापसी', 'राक्षसी', 'चंचला', 'यातना', 'चटका', 'यमुना', 'जातवेदा', 'काला', 'कलहंसी', 'देवदूती', 'बलिका', 'वायवी', 'यक्षिणी', 'मुण्डिका', 'वानरी', 'गंधवती', 'पूतना', 'सुकुमारी' अशा अनेक ग्रहदेवता लहान मुलास ताप देतात. अशा ग्रहींचा ताप दूर व्हावा म्हणून खालील मंत्र सांगितला आहे, 'ॐ नमः सर्वमातृभ्यो बालपीडासंयोगं भुञ्ज भुञ्ज चुट चुट स्फोटय स्फोटय स्फुर स्फुर गृण्ह गृण्हाक्रन्दयाऽऽक्रन्दय एवं सिद्धरूपो ज्ञापयति । हर हर निर्दोषं कुरु कुरु बालिकां बालं स्त्रियं पुरुषं वा सर्व-

ग्रहाणामुपक्रमात् । चामुण्डे नमो देव्यै ऱ्हूं ऱ्हूं ऱ्हीं अपसर अपसर दुष्ट-ग्रहान् ऱ्हूं तद्यथा गच्छन्तु गृह्यका:, अन्यत्र पन्थानं रुद्रो ज्ञापयति.'

याशिवाय आणखी एक रक्षाकारी मंत्र असा आहे. 'ॐ नमो भगवति चामुण्डे मुञ्च मुञ्च बलं बलिकां वा बलिं गृण्ह गृण्ह जय जय वस वस ' ब्रह्मदेव, विष्णू, शिव, कार्तिकेय, पार्वती, लक्ष्मी व मातृका-गण ज्वर व दाह यांनी पीडलेल्या या कुमारास मुक्त करावे, याचे रक्षण करावे, असा भावार्थ या मंत्राचा आहे.

यानंतर पुढल्या तीनशेव्या अध्यायात नाना प्रकारच्या ग्रहबाधा व रोग दूर करणारे मंत्र यांचे विवेचन आले आहे. हर्ष, इच्छा, भय, शोक यांनी, प्रकृतीच्या विरुद्ध, अपवित्र भोजन केल्याने, गुरू व देवता यांच्या कोपाने मनुष्यास पांच प्रकारचे उन्माद होतात. वातज, कफज, पित्तज, सन्निपातज व आगन्तुक. भगवान रुद्रांच्या क्रोधामुळे अनेक प्रकारचे ग्रह उत्पन्न झाले. नदी, तलाव, पर्वत, उपवन, पूल, संगम, शून्यगृह, वृक्ष येथे ते लोकांना पकडतात. गर्भवती स्त्रीस, ऋतुस्नात स्त्रीस, नग्न स्त्रीस ते त्रास देतात. अपमान, वैर, विघ्न, भाग्यातील उलटापालट यांच्यामुळेच या गोष्टी घडतात.

म्हणून या ग्रहांची शांती करावी लागते. त्यांचे ध्यान, त्यांचे पूजन, त्यांची आराधना करून उपाय योजावे लागतात. आठ शक्तींची अर्चना करताना म्हणावे, 'रां दीप्तायै नमः पूर्वस्याम् । रीं सूक्ष्मायै नमः आग्नेयकेसरे । रूं जयायै नमः दक्षिणकेसरे । रें भद्रायै नमः नैर्ऋत्य-केसरे । रैं विभूत्यै नमः पश्चिमकेसरे । रौं विमलायै नमः वायव्यकेसरे। रौं अमोघायै नमः उत्तरकेसरे । रं विद्युतायै नमः ईशानकेसरे । रः सर्वतोमुखै नमः मध्ये.' यानंतर ज्वर-गायत्रीचा मंत्र असा आहे, 'ॐ भस्मास्त्राय विद्महे । एकदंष्ट्राय धीमहि । तन्नो ज्वरः प्रचोदयात् ॥'

त्यानंतर तीनशेएकाव्या अध्यायात सिद्धिगणपतीचे मंत्र आले आहेत. प्रथम सामान्य पंचांगन्यास करताना म्हणावे, 'गणजयाय स्वाहा हृदयाय नमः । एकदंष्ट्राय हुं फट् शिरसे स्वाहा । अचलकर्णिने नमो नमः शिखायै वषट् । गजवक्त्राय नमो नमः कवचाय हुम् । महोदर-हस्ताय चण्डाय हुं फट्, अस्त्राय फट् ' यानंतर अष्टदलांच्या कमलावर

गणेशाच्या चारही विग्रहांची स्थापना करावी. 'गणाधिपतये नमः', 'गणेश्वराय नमः', 'गणनायकाय नमः', 'गणक्रीडाय नमः', 'वक्रतुण्डाय नमः', 'एकदंष्ट्राय नमः । महोदराय नमः । गजवक्त्राय नमः । लंबोदराय नमः । विकटाय नमः । विघ्नराजाय नमः । धूम्रवर्णाय नमः' अशा आठ मूर्तींची पूजा करावी.

यानंतर याच अध्यायात 'ह्यौ ॐ' हे **मार्तंडभैरव** नावाचे बीज सांगितले आहे. 'अं सूर्याय नमः । हं भास्कराय नमः । उं भानवे नमः । एं रवये नमः । ओं दिवाकराय नमः' अशा प्रकारे पांच मूर्तींचा न्यास करावा. यानंतर पुढल्या अध्यायात आणखी काही मंत्र सांगितले आहेत. 'ऐं कुलजे ऐं सरस्वति स्वाहा' हा अकरा अक्षरांचा सरस्वतिविद्यामंत्र आहे. 'ॐ ऱ्हीं ॐ नमः कामाय सर्वजनहिताय सर्वजनमोहनाय प्रज्वलिताय सर्वजनहृदयं ममाऽऽस्मगतं कुरु कुरु ॐ' या मंत्राच्या जपाने सर्व जग वश होते. 'ॐ ऱ्हीं चामुण्डे अमुकं दह दह पच पच मम वशमानयानय स्वाहा ॐ' हा चामुंडेचा वशीकरणप्रयोगातील मंत्र आहे. 'ॐ नमो भगवते त्र्यम्बकायोपशमयोपशमय चुलु चुलु मिलि मिलि भिदि भिदि गोमानिनि चक्रिणि हूं फट्. अस्मिन् ग्रामे गोकुलस्य रक्षां कुरु शान्ति कुरु कुरु कुरु ठ ठ ठ' हा गोसमुदायाचा रक्षणमंत्र आहे.

पुढल्या तीनशेतीनाव्या अध्यायात अष्टाक्षरमंत्र व त्याचा न्यासयुक्त विधी समजावून दिला आहे. 'ॐ नमो नारायणाय' हा श्रीविष्णूंचा अष्टाक्षरमंत्र होय. पुढल्या अध्यायात अग्निदेवांनी पञ्चाक्षरदीक्षा विधान समजावून दिले आहे. यापुढल्या अध्यायात श्रीविष्णूंची पंचावन नावे निवेदन केली आहेत. ती शेवटी स्तोत्रमंजूषेत दिली आहेत. पुढल्या तीनशेसहाव्या अध्यायात श्रीनरसिंहादींचे मंत्र दिले आहेत. स्तंभन, विद्वेषण, उच्चाटण, भ्रामण, मारण इत्यादींसाठी पुढील मंत्राचा स्मशानभूमीत तीन लाख जप करावा. तो मंत्र असा– 'ॐ नमो भगवते उन्मत्तरुद्राय भ्रम भ्रम भ्रामय भ्रामय अमुकं वित्रासय वित्रासय उद्भ्रामय उद्भ्रामय रुद्र रौद्रेण रूपेण हूं फट् स्वाहा' भगवान नरसिंहांचा मंत्र सर्व पापांचा नाश करणारा आहे. तो मंत्र असा आहे, 'ॐ क्ष्रौ नमो भगवते नारसिंहाय ज्वालामालिने दीप्त दंष्ट्रायाग्नि-

नेत्राय सर्वरक्षोघ्नाय सर्वभूतविनाशाय सर्वज्वरविनाशाय दह दह पच पच रक्ष रक्ष हुं फट्.'

तीनशेसाताव्या अध्यायात धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारही पुरुषार्थांचा सिद्धी देणारा त्र्यैलोक्यमोहन नावाचा मंत्र दिला आहे. पुढल्याच अध्यायात त्र्यैलोक्यमोहिनी, लक्ष्मी, भगवती दुर्गा, यांचे मंत्र दिले आहेत. चार दारांनी युक्त अशा 'शक्रवेश्मा'चे चिंतन करावे. शक्रवेश्मयंत्र थोडक्यात असे असावे.




शक्रवेश्मयंत्राचे स्वरूप

यानंतर याच अध्यायात महिषासुरमर्दिनीचा अष्टाक्षरमंत्र असा दिला आहे. 'ॐ ह्रीं महामहिषमर्दिनि स्वाहा' हा मूलमंत्र असून त्याचा पंचांगन्यास असा आहे. 'महिषमर्दिनि हु फट्, हृदयाय नमः। महिषशत्रूत्सदिनि हुं फट्, शिरसे स्वाहा । महिषं भीषय हुं फट्, शिखायै वषट् । महिषं हन हन देवि हुं फट्, कवचाय हुम् । महिषसूदनि हुंफ ट्, अस्त्रान फट्' या अंगन्यासांसह मंत्रास 'दुर्गाहृदय' समजतात. 'ॐ ह्रीं दुर्गे दुर्गे रक्षणि स्वाहा' हा दुर्गामंत्र आहे.

पुढल्या अध्यायात त्वरितापूजेचे वर्णन आले आहे. त्वरिताविद्येचे ज्ञान भोग व मोक्ष देणारे आहे. प्रथम 'ॐ आधारशक्तै नमः' या मंत्राने आधारशक्तीचे स्मरण करावे. 'ॐ प्रों पुरु पुरु महासिंहाय नमः' या मंत्राने सिंहासन प्रदान करावे. 'पद्माय नमः' या मंत्राने पूजा करावी. मूलमंत्राचा उच्चार करून 'ॐ ऱ्हीं हुं खें च च्छे क्षः स्त्री हूं क्षें ऱ्हीं फट् त्वरितायै नमः' या मंत्राचा अंगन्यास असा आहे. 'खे च हृदयाय नमः । च छे शिरसे नमः । छे क्षः शिखायै नमः । क्षः स्त्री कवचाय नमः । स्त्री हूं नेत्राय नमः । हूं क्षें अस्त्राय नमः' त्वरिता-गायत्रीचा मंत्र असा आहे. 'ॐ त्वरिताविद्यां विद्महे । तूर्णविद्यां च धीमहि । तन्नो देवी प्रचोदयात्' यानंतर त्वरितादेवीचा पूजाविधी सांगितला आहे.

पुढल्या तीनशेदहाव्या अध्यायात अपरत्वरितादेवीचा मंत्र सांगन मुद्राही दिल्या आहेत. त्याच्या पुढल्या अध्यायात त्वरितामंत्राच्या दीक्षा-ग्रहणाचा विधी समजावून दिला आहे. त्यापुढल्या अध्यायात त्वरिता-विद्येपासून प्राप्त होणाऱ्या सिद्धींचे वर्णन आले आहे. पुढल्या तीनशे-तेराव्या अध्यायात आणखी काही मंत्रांचे वर्णन आहे. गणंजय, गणाधिप, गणनायक, गणेश्वर, वक्रतुण्ड, उत्कट, लम्बोदर, गजवक्त्र, विकटानन, या सर्वांची पद्मदलांनी पूजा करावी. विनायकाचा पूजाविधीही समजावून दिला आहे. यानंतर याच अध्यायात त्रिपुराभैरवीचा पूजन-विधी सांगितला आहे. याच वेळी असितांगभैरव, रुरुभैरव, चण्डभैरव, क्रोधभैरव, उन्मत्तभैरव, कपालिभैरव, भीषणभैरव व संहारभैरव; या आठ भैरवांचेही पूजन आहे. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इन्द्राणी, चामुण्डा, महालक्ष्मी; या मातृकांचीही पूजा सांगितली आहे. 'ऐं क्षैं प्रेतपद्मासनाय नमः । ॐ ऐं ऱ्हीं हसौः त्रिपुरायै प्रेत-पद्मासनसमास्थितायै नमः' हा प्रेतपद्मासनास्थ त्रिपुराभैरवीचा पूजामंत्र दिला आहे.

याच अध्यायात 'ॐ नमो भगवति ज्वालामालिनि गृध्रगणपरि-वृते स्वाहा' हा ज्वालामालिनीमंत्र आला आहे. नंतर 'ॐ श्रीं ऱ्हीं क्लीं

श्रियै नमः ' हा श्रीमंत्र आहे. 'ॐ ऱ्हीं गौर्यै नमः ' हा गौरीमंत्र आहे. 'ॐ ऱ्हीं ऐं नित्यक्लिन्ने भद्रद्रवे स्वाहा ' हा नित्यक्लिन्नामंत्र आहे. विद्यार्णवमंत्रात नित्या, सुभद्रा, समंगला, वनचारिणी, सुभगा, दुर्भगा, मनोन्मनी व रुद्ररूपिणी, अशा देवता आहेत. 'ॐ ऱ्हीं अनंगाय नमः। ॐ ऱ्हीं स्मराय नमः। ॐ ऱ्हीं मन्मथाय नमः । ॐ ऱ्हीं माराय नमः। ॐ ऱ्हीं कामाय नमः ' हे पांच कामदेवाचे मंत्र आहेत. त्याच्या हातांत पाश, अंकुश, धनुष्य, बाण अशी आयुधे असून उपासकानें त्यांचेही चिंतन करावे. ' नित्यक्लिन्नाविद्या 'मंत्र असा आहे.

'ॐ छं (ऐं) नित्यक्लिन्नें मदद्रवे ओं ओं (स्वाहा) अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण त थ द ध न प फ ब भ म य र ल व श स ह क्षः ॐ छं (ऐं) नित्यक्लिन्ने मदद्रवे स्वाहा '

याच अध्यायात आणखी एक गौरीमंत्र सांगितला आहे तो असा; 'ॐ ऱ्हीं गौरि रुद्रदयिते योगेश्वरी हूं फट् स्वाहा '

या नंतर तीनशेचौदाव्या अध्यायात निग्रहयंत्र, कालीअनुष्टुभ-मंत्र, अनुग्रहचक्र, लक्ष्मीमंत्र; इत्यादींचा परिचय आला आहे. 'का ली मा र र मा ली का लीनमोक्षक्षमोनली । मामोदेततदेमोसा क्षयत्वत्वतक्षय' हा काली–अनुष्टुभमंत्र आहे. 'श्री सा मा या या मा सा श्री, स नो या ज्ञे ज्ञे या नो सा । मा या ली ला ला ली या मा, या ज्ञे ला ली ली ला ज्ञे या ' हा लक्ष्मीमंत्र आहे.

या नंतर पुढल्या तीन अध्यायांत स्तंभनादी मंत्र, कुब्जिकाविद्या-मंत्र, सकलादी मंत्रांचा विधी, इत्यादी विषय आले आहेत. स्तंभन, मोहन, वशीकरण, विद्वेषण, उच्चाटण यांच्या प्रयोगांत हे मंत्र उपयोगी येतात. त्यांचे थोडक्यात स्वरूप असे आहे.

**मालामंत्र**– ॐ शत्रुमुखस्तम्भनी कामरूपा आलीढकारी । ऱ्हीं फें फेत्कारिणी मम शत्रूणां देवदत्तानां मुखं स्तम्भय स्तम्भय मम सर्व-विद्वषिणां मुखस्तम्भनं कुरु कुरु ॐ हूं फे फेंत्कारिणि स्वाहा । '

**अघोरमंत्र**– ॐ नमो भगवत्यै भगमालिनि विस्फुर विस्फुर, स्पन्द स्पन्द, नित्याक्लिन्ने द्रव द्रव हं सः क्रींकाराक्षरे स्वाहा । ॐ फें हुं

फट् फेत्कारिणी ऱ्हीं ज्वल ज्वल त्रैलोक्यं मोहय मोहय, गुह्यकालिके स्वाहा ॥

**नवग्रहमंत्र–** ॐ नवग्रहाय सर्वशत्रून् मम साधय साधय, मारय मारय आं सों मं बुं गुं शुं शं रां कें ॐ स्वाहा ॥

**शत्रूच्या नाशासाठी मंत्र–** ॐ कुञ्जरी ब्रह्माणि, ॐ मञ्जुरी माहेश्वरी, ॐ वेताली कौमारी, ॐ कालो वैष्णवी, ॐ अघोरा वाराही, ॐ वेतालीन्द्राणी, ॐ उर्वशी चामुण्डा, ॐ वेताली चण्डिका, ॐ जयाली यक्षिणी, नवमातारो हे मम शत्रुं गृण्हत गृण्हत. भोजपत्रावर हा मंत्र लिहून, त्यावर शत्रूचे नाव लिहून स्मशानभूमीत या मंत्राची पूजा केल्यास शत्रूचा नाश होतो.

**कुब्जिकाविद्या–** 'ऐं ऱ्हीं श्रीं हसखफ्रें हसौः ॐ नमो भगवति हसखफ्रें कुब्जिके ह्स्रां ह्स्त्रूं अघोरे घोरे अघोरमुखिछ्रां छ्रीं किणि किणि विच्चै हसौः हसखफ्रें श्रीं ह्रीं ऐं' या मंत्राने सर्व कार्यांची सिद्धी होते.

यानंतर तीनशेसतशाव्या अध्यायात सकलादी मंत्रांचा परिचय करून दिलेला आहे. सकल, निष्कल, शून्य, कलाढ्य, समलंकृत, क्षपण, क्षय, अन्तस्थ, कण्ठोष्ठ व शिव ही प्रासादपरा नावाच्या मंत्राची आठ शिवरूपे आहेत. अमृत, अंशुमान, इंद्र, ईश्वर, उग्र, ऊहक्, एकपाद, ऐल, ओम, औषध, अंशुमान, वशी हे क्रमशः अकरादी स्वरांचे द्योतक आहेत. कामदेव, शिखण्डी, गणेश, काल, शंकर, एकनेत्र, द्विनेत्र, त्रिशिख, दीर्घबाहू, एकपाद, अर्धचंद्र, वलय, योगिनीप्रिय, शक्तीश्वर, महाग्रंथी, तर्पक, स्थाणू, दन्तुर, निधीश, नन्दी, पद्म, शाकिनीप्रिय, मुखबिम्ब, भीषण, कृतान्त (यम), प्राण, तेजस्वी, शक्र, उदधी, श्रीकण्ठ, सिंह, शशांक, विश्वरूप, नारसिंह; ही ककारादींची रूपे आहेत.

यानंतरच्या अध्यायात अघोरास्त्रमंत्र, शिवगायत्री, पाशुपतास्त्रमंत्र, गंगामंत्र, शिवमंत्रराज, चण्डकपालिनीमंत्र, क्षेत्रपालबीजमंत्र, महामृत्युंजयमंत्र, ईशानादीमंत्र इत्यादींचा परिचय तीनशेचोविसाव्या अध्यायापर्यंत करून दिला आहे. त्यांतील काही मंत्र असे आहेत.

**अघोरास्त्रमंत्र–** ऱ्हीं स्फुर स्फुर प्रस्फुर प्रस्फुर घोर घोरतरतनरूप चट चट प्रचट प्रचट कह कह वम वम बन्ध बन्ध घातय घातय,

हुं फट्

शिवगायत्री– महेशाय विद्‌महे । महादेवाय धीमहि । तन्नः शिवः प्रचोदयात् ।

गंगासंबंधी वशीकरणमंत्र– ॐ नमो भगवते गंगे कालि कालि महाकालि महाकालि मांसशोणितभोजने रक्तकृष्णमुखि वशमानय मानुषान् स्वाहा ।

क्षेत्रपालबलिमंत्र– ॐ ज्वलल्लोचन कपिलजटाभारभास्वर विद्रावण त्रैलोक्यडामर डामर दर दर भ्रम भ्रम आकट्ट आकट्ट तोटय तोटय मोटय मोटय दह दह पच पच एवं सिद्धिरुद्रो ज्ञापयति यदि ग्रहोऽपगतः स्वर्गलोकं देवलोकं वाऽऽरामविहाराचलं तथापि तमावर्तं-यिष्यामि बलिं गृण्ह गृण्ह ददामि ते स्वाहा ।।

वशीकरणासाठी सिद्धविद्या– ॐ उत्तिष्ठ चामुण्डे जम्भय जम्भय मोहय मोहय (अमुकं) वशमानय स्वाहा.

महामृत्युंजयमंत्र– ॐ जूं सः वषट्

मृतसंजीवनीमंत्र– ॐ हं सः हूं हूं सः, ह्‌ः सौः

रुद्रशांतिमंत्र– ॐ रुद्राय च ते ॐ वृषभाय नमोऽविमुक्ताया-सम्भववाय पुरुषाय च पूज्यायेशानाय पौरुषाय पञ्च पञ्चोत्तरे विश्व-रूपाय करालाय विकृतरूपायाविकृतरूपाय ।।

यानंतर तीनशेपंचविसाव्या अध्यायात रुद्राक्षधारणविधी निवेदन केला आहे. त्यानंतरच्या अध्यायात गौरी आदी देवींच्या व मृत्युंजयाच्या पूजेचे विधान समजावून दिले आहे. नंतरच्या अध्यायात उपयुक्त माला, अनेक मंत्र, लिंगपूजा, देवालयाचे महत्त्व असे विषय आले आहेत.

## आणि असे छंदःशास्त्र

तीनशेअठ्ठाविसाव्या अध्यायापासून पुढे तीनशेपस्तिसाव्या अध्यायापर्यंत छंदःशास्त्राचे स्वरूप समजावून दिले आहे. अग्निदेवांनी पिंगलोक्त छंदाचेच क्रमशः वर्णन केले आहे. मगण, नगण, भगण, यगण, जगण, रगण, सगण व तगण हे आठ गण होत. प्रत्येक गण तीन तीन अक्षरांचा असतो. यांतील लघुगुरुअक्षरांवरून व त्यांच्या क्रमांवरून

त्यांची नावे पडलेली आहेत. आर्षी. दैवी, आसुरी, प्राजापत्या, याजुषी, साम्नी, आर्ची, ब्राह्मी हे गायत्रीछंदाचे आठ भेद आहेत. दैवी गायत्री एक अक्षराचा. आसुरी पंधरा अक्षरांचा, प्राजापत्या आठ अक्षरांचा, याजुषी सहा अक्षरांचा, साम्नी बारा अक्षरांचा, आर्ची अठरा अक्षरांचा छंद असतो.

यानंतर गायत्री ते जगती छंदांचे भेद त्यांच्या देवता, स्वर, वर्ण, गोत्र इत्यादींचे वर्णन आले आहे, त्रिष्टुप्, अनुष्टुप्, प्रतिष्ठा गायत्री, अतिपाद निचृत्, उष्णिक्, बृहती, सत:पंक्ती, आस्तारपंक्ती, संस्तार-पंक्ती, अक्षरपंक्ती, पदपंक्ती, जगतीपंक्ती, शंकुमती, कुकुदमती इत्यादी विविध छंदांची लक्षणे सांगितली आहेत. गायत्री आदी छंदांच्या देवता क्रमश: अग्नी, सूर्य, चंद्रमा, बृहस्पती, मित्रावरुण, इंद्र व विश्वेदेव अशा आहेत. षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद हे या छंदांचे स्वर आहेत. श्वेत, सारंग, पिशंग, कृष्ण, नील, लोहित (लाल) व गौर हे या छंदांचे वर्ण आहेत. अग्निवेश्य, काश्यप, गौतम, अंगिरा, भार्गव, कौशिक व वसिष्ठ ही या सात छंदांची गोत्रे आहेत.

यानंतर तीनशेएकतिसाव्या अध्यायात आणखी काही छंदांची ओळख करून दिलेली आहे. एकशेचार अक्षरांचा 'उत्कृती' छंद असतो. शंभर अक्षरांचा 'अभिकृती' छंद, शहाण्णव अक्षरांचा 'संस्कृती' छंद, ब्याण्णव अक्षरांचा 'विकृती' छंद, अठ्ठ्याऐंशी अक्षरांचा 'आकृती' छंद, चौऱ्याऐंशी अक्षरांचा 'प्रकृती' छंद, ऐंशी अक्षरांचा 'कृती' छंद, शहात्तर अक्षरांचा 'अधिकृती' छंद, बहात्तर अक्षरांचा 'धृती' छंद, अडुसष्ट अक्षरांचा 'अत्यष्टी' छंद, चौसष्ट अक्षरांचा 'अष्टी', साठ अक्षरांचा 'अतिशक्वरी', छपन्न अक्षरांचा 'शक्वरी', बावन्न अक्षरांचा 'अतिजगती', अठ्ठेचाळीस अक्षरांचा 'जगती' छंद असतो. हे झाले वैदिक छंद.

आता लौकिक छंद पाहा. 'गायत्री'पासून 'त्रिष्टुप्'पर्यंत जे आर्ष छंद वैदिक म्हणून सांगितले आहेत, ते लौकिक छंदही आहेत. त्रिष्टुप्, पंक्ती, बृहती, अनुष्टुप्, उष्णिक् व गायत्री अशी त्यांची नावे आहेत. गायत्री छंदात एक एक अक्षर कमी होत 'सुप्रतिष्ठा', 'प्रतिष्ठा',

'मध्या', 'अत्युक्तात्युक्त' इत्यादी छंद येतात. छंदाच्या चौथ्या भागास 'पाद' वा 'चरण' म्हणतात. छंद तीन प्रकारचे आहेत. गणच्छंद, मात्राछंद व अक्षरछंद. आर्या, गीती, विपुला या छंदांची उदाहरणे दिली आहेत. आदिविपुला, उभयविपुला, अंत्यविपुला; असे विपुलाचे तीन प्रकार आहेत. यांनाच नामविपुला, महाविपुला व जघनविपुला असेही म्हणतात. चपलाछंदाचेही असेच भेद वर्णन केले आहेत.

मात्राछंदाचेही नाना प्रकार वर्णन केले आहेत. वैतालीय, औपच्छद, आपातलिका, प्राच्यवृत्ती, उदोच्यवृत्ती, प्रवृत्तिक, चारुहासिनी, अपरांतिका, मात्रासमक, वानवासिका, विश्लोक, चित्रा, उपचित्रा, पादाकुलक, गीत्यार्या, शिखा, ज्योती, सौम्या, चूलिका; इत्यादी मात्राछंदांचे वर्णन दिलेले आहे. पुढल्या तीनशेबत्तिसाव्या अध्यायात विषमवृत्ताचे विवेचन आले आहे. वृत्ताचे भेद तीन. सम, अर्धसम व विषम. या सर्वांचे प्रकार पुढील तीन अध्यायांत सांगितले आहेत. प्रमाणी, वक्त्र, चपला, विपुला, पदचतुरूर्ध्व, आपीड, प्रत्यापीड, मंजरी, लवली, अमृतधारा, सौरभ, केतुमती, हरिणप्लुता, अपरवक्त्र, पुष्पिताग्रा, यवमती, शिखा, इत्यादी छंद आहेत.

तनुमध्या, कुमारललिता, चित्रपदा, विद्युन्माला, हलमुखी, भुजंगशिशुभृता, शुद्धविराट्, मयूरसारिणी, मत्ता, उपस्थिता, रुक्मवती, इंद्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, उपजाती, दोधक, शालिन, वातोर्मी, भ्रमरीविलसिता, रथोद्धता, स्वागता, वृत्ता, श्येनी, रम्या. विलासिनी, वंशस्था, इंद्रवंशी, द्रुतविलम्बित, जलोद्धतगती, कुसुमविचित्रा, चञ्चलाक्षिका, भुजंगप्रयात, प्रमिताक्षरा, कान्तोत्पीडा, वैश्वदेवी, नवमालिनी, प्रहर्षिणी, रुचिरा, मत्तमयूर, गौरी, असंबाधा, अपराजिता, वसन्ततिलका,उद्धर्षिणी,चंद्रावती, मणिगणनिकर, ऋषभगजविलसित, शिखरिणी, पृथ्वी, वंशपत्रपतित, मन्दाक्रान्ता, कुसुमितलतावेल्लिता, शार्दूलविक्रीडित, सुवदना, स्रग्धरा, सुभद्रक, आकृती, अश्वललिता, मत्तक्रीडा, तन्वी, क्रौञ्चपदा, भुजंगविजृम्भित, अपहाव, दंडक; इत्यादी अनेक वृत्तांची नावे समवृत्तांच्या अध्यायात त्यांच्या लक्षणांसहित आली आहेत,

तीनशेपस्तिसाव्या अध्यायात 'प्रस्तरनिरूपण' आले आहे. त्या-

नंतरच्या अध्यायात शिक्षानिरूपण आले आहे. वर्णांची संख्या त्रेसष्ट अथवा चौसष्ट मानली गेली आहे. त्यांत एकवीस स्वर, पंचवीस स्पर्श, आठ यादी (य, र, ल, व, श, ष, स, ह) आणि चार यम मानले गेले आहेत. अनुस्वार, विसर्ग, दोन पराश्रित– जिव्हामूलीय व उपध्मानीय आणि दुःस्पृष्ट ळकार; असे त्रेसष्ट वर्ण मानले गेले आहेत. वर्ण, वर्णांची स्थाने, त्यांचे प्रकार; इत्यादी विषयांचे व्याकरण यात आले आहे.

## काव्यादींची लक्षणे

तीनशेसदतिसाव्या अध्यायात काव्याची लक्षणे आली आहेत. ध्वनी, वर्ण, पद, वाक्य; हेच संपूर्ण वाङ्मय मानले गेले आहे. शास्त्र, इतिहास, काव्य यांची गणना या वाङ्मयात होते. वेदादी शास्त्रांत शब्दाची प्रधानता व इतिहासपुराणांत अर्थाची प्रधानता आहे. या दोहोंत अभिधाशक्तीला, वाच्यार्थाला महत्त्व असते. काव्याची प्रकृती वेगळी असते. जगतात मनुष्यजीवन दुर्लभ आहे. त्यात विद्या ही आणखीनच दुर्लभ आहे. कवित्वाचा गुण तर अधिकच दुर्लभ. काव्यरचना, प्रतिभा या शक्ती तर आणखीच दुर्लभ आहेत. लोकव्यवहार व वेदशास्त्राचे ज्ञान हे काव्यप्रतिभेचे जन्मस्थान आहे. सिद्ध मंत्रांच्या प्रभावाने जे काव्य निर्माण होते ते अयोनिज असते.

गद्य, पद्य व मिश्र असे काव्याचे तीन प्रकार आहेत. गद्य, चूर्णक, उत्कलिका, वृत्तगंधी इत्यादी गद्यभेद सांगितल्यावर आख्यायिका, कथा, खंडकथा, परिकथा, कथानिका; हे गद्यकाव्याचे भेद सांगितले आहेत. त्यांची लक्षणे सांगितली आहेत. पद्याला चतुष्पदी म्हटले आहे. त्याचे दोन भेद– वृत्त व जाती. सम, अर्धसम, विषम असे तीन भेद पिंगलमुनींनी केले आहेत. गंभीर काव्यसमुद्र पार करण्यासाठी छंदविद्येची नौका अगत्याची आहे. महाकाव्य, कलाप, पर्यायबंध, विशेषक, कुलक, मुक्तक, कोष; हे सर्व पद्याचे प्रकार होत. या सर्वांची लक्षणे सांगितली आहेत. वाग्वक्रिमा (वक्रोक्ती) इत्यादींचा निर्देश आहे.

## आणि असे हे नाटकनिरूपण

दोनशेअडतिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी वसिष्ठास नाटकावरील निरूपण ऐकविले आहे. प्रथमच रूपकाचे सत्तावीस भेद सांगितले आहेत. नाटक, प्रकरण, डिम, ईहामृग, समवकार, प्रहसन, व्यायोग, भाण, वीथी, अंक, त्रोटक, नाटिका, सट्टक, शिल्पक, कर्णा, दुर्मल्लिका, प्रस्थान, भाणिका, भाणी, गोष्ठी, हल्लीशक, काव्य, श्रीगदित, नाट्यशासक, रासक, उल्लाप्य व प्रेङक्षण हे ते सत्तावीस भेद होत. नाटकास धर्म, अर्थ, काम यांचे कारण वा साधन मानले आहे. पूर्वरंगाची नांदी आदी बावीस अंगे असतात. देवदेवतांना नमस्कार, गुरुजनांची प्रशस्ती, ब्राह्मण, राजा यांचे आशीर्वाद या गोष्टी नांदीत येतात. नांदीपाठानंतर सूत्रधार येतो. यात कवीची गुरुपरंपरा, वंशप्रशंसा, पौरुष, काव्याचे प्रयोजन यांचा निर्देश असतो. नटी, विदूषक व पारिपार्श्वक हे सूत्रधाराबरोबर असतात.

नाटकाचा विषय उपस्थित होतो. त्यास आमुख वा प्रस्तावना म्हणतात. प्रवृत्तक, कथोद्घात, प्रयोगातिशय हे आमुखाचे तीन भेद होत. सूत्रधार जेव्हा उपस्थित काल, ऋतू वगैरेंचे वर्णन करतो, त्या प्रवेशास प्रवृत्तक म्हणतात. इतिवृत्तास नाटकादींचे शरीर म्हटले आहे. त्याचे दोन भेद. एक सिद्ध व दुसरा उत्प्रेक्षित. बीज, बिंदू, पताका, प्रकरी, कार्य या पांच अर्थप्रकृती सांगितल्या आहेत. प्रारंभ, प्रयत्न, प्राप्तिसद्भाव, नियतफलप्राप्ती, फलयोग या कार्यावस्था असतात. रूपकात मुख, प्रतिमुख, गर्भ, विमर्श, निर्वहण या क्रमशः पांच संधी होत.

## शृंगारादिक रस, भाव, नायक इत्यादी

पुढल्या तीनशेएकोणचाळिसाव्या अध्यायात काही साहित्यगुणांची चर्चा आलेली आहे. वेदान्तशास्त्रात परब्रह्म परमेश्वरास अक्षर (अविनाशी), सनातन, अजन्मा, अद्वितीय, चैतन्यस्वरूप, ज्योतिर्मय समजतात. त्याचा सहज स्वरूपभूत आनंद कधी कधी व्यंजित होतो. या आनंदाच्या अभिव्यक्तीचे नाव आहे चैतन्य. यासच चमत्कार, रस अशीही नावे आहेत. आनंदाचा प्रथम विकार अहंकार या नावाने

ओळखला जातो. अहंकारापासून अभिमान ओळखला जातो. या अभिमानातच तीन लोकांची समाप्ती आहे. अभिमानापासून रतीची निर्मिती झाली. व्यभिचारी आदींच्या साह्यानें ही रती पुष्ट झाली की 'शृंगारा'चा जन्म होतो. याच शृंगाराचे हास्य आदी अनेक भेद प्रकट झाले आहेत. हे रस परमात्म्याच्या सत्त्वादी गुणांच्या विस्तारानें प्रकट होतात. अनुरागातून शृंगार, तीक्ष्णतेतून रौद्र, उत्साहापासून वीर, संकोचापासून बीभत्स रसाचा उदय होतो. यांतूनच शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत हे नऊ रस तयार झाले. शृंगार, रौद्र, वीर व बीभत्स हे चारच सहज रस आहेत. त्याशिवाय धनास शोभा नाही, त्याप्रमाणे रसहीन वाणीस शोभा नाही. अपार काव्यसंसारात कवीच प्रजापती आहे. तोच काव्यात या जगताचे त्याच्या रुचीनुसार व अनुभवानुसार रूप प्रकट करतो. रस भावहीन नसतो. भाव रसहीन नसतो. या भावांनीच रसाची, भावनेची अभिव्यक्ती होते. 'भाव्यन्ते रसा एभिः' (यांतून रस भावित होतात.)

'रती' आदी आठ भाव असतात. 'स्तंभ' आदी आठ सात्त्विक भाव मानले गेले आहेत. सुखाच्या मनोऽनुकूल अनुभवासच रती म्हटले आहे. हर्ष आदीमुळे चित्ताचा विकास हास्यात होतो. अभीष्ट वस्तूच्या नाशाने मनास विकलता येते, तीस शोक म्हणतात. प्रतिकूल आचरण करणाऱ्यावर कठोरता उदित होते. तोच क्रोध होय. पुरुषार्थास अनुकूल मनोभाव उत्साह आहे. चित्र आदी पाहून जी मानसिक विकलता येते, तीस भय म्हणतात. दुर्भाग्यवादी पदार्थांची निंदा जुगुप्सा होते. आश्चर्यास विस्मय म्हणतात. स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभेद, वेपथू, वैवर्ण्य, अश्रू, प्रलय हे अष्टभाव होत. निर्वेद, ग्लानी, शंका, मत्सर, असूया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह इत्यादी विकारांचेही वर्णन आले आहे. स्मृती, मती, व्रीडा वा लज्जा, चपलता, हर्ष, आवेश, जडता, घृती, गर्व, विषाद, उत्कंठा वा उत्सुकता, अपस्मार, त्रास, वीप्सा, अमर्ष, प्रबोध, अवहित्य, उग्रता, वितर्क, व्याधी, उन्माद इत्यादी भावांचे वर्णन करून विभावादीचेही विवेचन आले आहे.

चौसष्ट कलांचे गीतिकादी दोन भेद होतात. कुहक व स्मृती प्रायः

हास्योपहारक आहेत. यानंतर अनुभावांचे वर्णन आले आहे. पौरुष, स्त्रैण अशा दोन प्रकारच्या मानसिक व्यापारांचा भेद सांगितला आहे. शोभा, विलास, माधुर्य, स्थैर्य, गांभीर्य, ललित, औदार्य व तेज ही आठ पौरुष कर्मे होत. नीच जनांची निंदा, उत्तम पुरुषांशी स्पर्धा, शौर्य, चातुर्य यांनी मानसिक कार्याच्या रूपात शोभेचा आविर्भाव होतो. भाव, हाव, हेला, शोभा, कांती, दीप्ती, माधुर्य, शौर्य, प्रगल्भता, उदारता, स्थिरता, गंभीरता; हे बारा स्त्रियांचे विभाव आहेत. आलाप, प्रलाप, विलाप, अनुलाप, संलाप, अपलाप, संदेश, निर्देश हे वाणीचे भेद आहेत. दुसऱ्यांना अभीष्ट अर्थाचे ज्ञान देण्यासाठी बुद्धीचा आश्रय घेऊन वागारंभाचा व्यापार होतो. त्याचेही रीती, वृत्ती व प्रवृत्ती; असे तीन भेद आहेत.

## रीतिनिरूपण

पुढल्या तीनशेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी 'वाग्विद्ये'चे सम्यक ज्ञान व्हावे, काव्यशास्त्राचा परिचय व्हावा, म्हणून 'रीति'चे वर्णन केले आहे. पांचाली, गौडी, वैदर्भी, लाटी; हे रीतीचे चार भेद होत. पांचालीरीती उपचारयुक्त, कोमल, लघुसमास यांनी युक्त असते. गौडीरीतीत संदर्भांची अधिकता व समासांची दुर्बोधता असते. वैदर्भीरीती उपचाररहित, सामान्यत: कोमल व समासवर्जित असते. लाटीरीती संदर्भांनी युक्त असून तीत समास स्पष्ट नसतात.

क्रियांत विषमता प्राप्त ज्या वाक्यरचनेमुळे होत नाही तीस 'वृत्ती' म्हटले आहे. भारती, आरभटी, कैशिकी, सात्त्वती; या रीतीच्या चार प्रकारांचाही निर्देश आहे. भारती वृत्ती वाचिक अभिनयाने युक्त असते. नटनटी यांच्या आश्रयाने ही प्रकट होते. भरताने ही प्रयुक्त केल्याने हिला 'भारती' असे नाव मिळाले. वीथी, प्रहसन, आमुख व नाटक; ही भारतीची चार अंगे होत. वीथीची तेरा अंगे आहेत. ती अशी— उद्घातक, लपित, असत्प्रलाप, वाक्श्रेणी, नालिक, विपण, व्याहार, त्रिगत, छल, अवस्यन्दित, गण्ड, मृदव व उचित. तापस आदींच्या परिहासयुक्त वचनास 'प्रहसन' म्हणतात. 'आरभटीवृत्ती'त माया,

इंद्रजाल, युद्ध आदींची बहुलता असते. याही वृत्तीचे संक्षिप्तकार, पात व वस्तूत्थापन; असे तीन भेद आहेत.

## नृत्यादीत उपयोगी आंगिक कर्मे

तीनशेएकेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी अभिनयाच्या वेळी नृत्यआदींच्या समयी ज्या शारीरिक क्रिया होतात त्यांना 'आंगिक कर्मे' म्हटले आहे. लीला, विलास, विच्छित्ती, विभ्रम, किलकिञ्चित, मोट्टायित कुट्टमित्त, बिब्बोक, ललित, विहृत, क्रीडित व केली; हे नायिकांच्या यौवनकालात सहजभावाने प्रकट होणारे अलंकार आहेत. या सर्वांची लक्षणेही सांगितली आहेत. शिर, हात, वक्षःस्थल, पार्श्वभाग; ही क्रमशः अंगे आहेत. यांनाच उपांगे म्हणतात. अंगप्रत्यंगांच्या प्रयत्नजनित क्रियांशिवाय नृत्याचा प्रयोग सफल होत नाही.

आकंपित, कंपित, धुत, विधुत, परिवाहित, आधूत, अवधूत, अंचित, निहंचित, परावृत, उत्क्षिप्त, अधोगत व लोलित; अशी तेरा प्रकारची शिरःकर्मे आहेत. भ्रूकर्मे सात प्रकारची आहेत. रस, स्थायीभाव व संचारीभाव यांच्या संबंधाने अभिनय तीन प्रकारचा होतो. त्याचे आणखीही छत्तीस भेद आहेत. असेच इतर अंगांचेही भेद सांगितले आहेत. मुखाचे सहा, नासिकेचे सहा, निःश्वासाचे नऊ भेद आहेत. ओष्ठकर्माचे सहा, पादकर्माचे सहा, चिबुकक्रियाचे सात, ग्रीवाकर्मांचे नऊ भेद सांगितले आहेत. हातांचा अभिनय प्रायः 'असंयुत' व 'संयुत' अशा दोन प्रकारचा असतो.

असंयुत हाताचे चोवीस भेद आहेत ते असे– पताक, त्रिपताक, कर्तरीमुख, अर्धचंद्र, उत्कराल, शुकतुण्ड, मुष्टी, शिखर, कपित्थ, कटकामुख, सूच्यास्य, पद्मकोष, अतिशिरा, मृगशीर्षक, कामूल, कालपद्म, चतुर, भ्रमर, हंसास्य, हंसपक्ष, संदंश, मुकुल, ऊर्णनाभ, ताम्रचूड. संयुत हाताचे तेरा भेद असे आहेत– अंजली, कपोत, कर्कट, स्वस्तिक, कटक, वर्धमान, असंग, निषध, दोल, पुष्पपुट, मकर, गजदंत, बहिःस्तंभ. वक्षःस्थलाच्या अभिनयाचे पांच प्रकार होतात. उदरकर्म अनतिक्षाम, खल्व, पूर्ण या तीन प्रकारचे असते. पार्श्वभाग व जंघा यांचीही पांच

पाच कर्मे आहेत. नाटचनृत्यादी पादकर्माचेही अनेक भेद होतात.

## अभिनयाचे प्रकार, रसांचे प्रकार, अलंकार

काव्य, नाटक, आदीतील विषय ज्यामुळे अभिमुख होतो, मूर्त पात्रांच्या ज्या कार्यकलापामुळे प्रत्यक्षात येतो त्यास अभिनय म्हणतात. सात्त्विक, वाचिक, आंगिक, आहार्य; असे अभिनयाचे चार प्रकार आहेत. स्तंभ, स्वेद आदी सात्त्विक अभिनय होय. वाणीने होणारा अभिनय वाचिक होय. शरीराने होणारा आंगिक अभिनय व बुद्धिजन्य होणारा आहार्य अभिनय होय.

संभोग व विप्रलंभ हे शृंगाराचे दोन भेद आहेत. त्यांचेही प्रच्छन्न व प्रकाश असे आणखी दोन भेद आहेत. पुर्वानुराग, मान, प्रवास, करुणात्मक; असे विप्रलंभ शृंगाराचे चार भेद आहेत. संभोग शृंगार स्त्री व पुरुष यांच्या आश्रयाने तयार होतो. या शृंगाराची साधिका वा अभिव्यंजिका ' रती ' मानली गेली आहे. वैवर्ण्य, प्रलय, यांच्याशिवाय यात आणखीही सात्त्विक भावांचा उदय होतो. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारही पुरुषार्थांनी शृंगाररसाची वृद्धी होते. अभिनय शृंगाराचे वचनक्रियात्मक व नेपथ्यक्रियात्मक असे दोन भेद आहेत. हास्याचे सहा भेद मानले आहेत. स्मित, हसित, विहसित, उपहसित, अपहसित, अतिहसित अशा प्रकारांची लक्षणेही दिली आहेत. करुणरसाचे तीन प्रकार आहेत. त्याचा स्थायीभाव शोक आहे. धर्मोपघातजनित, चित्त-चित्तविलासजनित व शोकदायघटनाजनित असे तीन भेद करुण रसाचे मानले जातात. अंगकर्म, नेपथ्यकर्म, वाक्कर्म; यांच्याद्वारे रौद्ररसाचे तीन भेद होतात. क्रोध हा या रसाचा स्थायीभाव होय. यात स्वेद, रोमांच, वेपथु आदी सात्त्विक भावांचा उदय होतो.

दानवीर, धर्मवीर, युद्धवीर हे तीन वीररसाचे भेद होत. उत्साह हा याचा निष्पादक हेतू आहे. वीररसातूनच भयानक रसाची उत्पत्ती आहे. भय नावाचा स्थायीभाव याचा आहे. बीभत्सरसाचे उद्वेजन व क्षोभण हे दोन भेद आहेत. दुर्गंध आदींनी उद्वेजन व रुधिरक्षणापासून क्षोभण निर्माण होतो. जुगुप्सा हा याचा स्थायीभाव होय.

काव्यसौंदर्याची अभिवृद्धी करणाऱ्या धर्मांना अलंकार म्हणतात. शब्द, अर्थ व शब्दार्थ यांनुसार यांचे तीन प्रकार होतात. शब्दांनी अलंकृत झालेला शब्दालंकार. छाया, मुद्रा, शक्ती, युक्ती, गुंफना, वाकोवाक्य, अनुप्रास, चित्त, दुष्कर या संकरांना सोडून शब्दालंकारांचे नऊ भेद आहेत. या सर्व भेदांचे विवरण या तीनशेबेचाळिसाव्या अध्यायात आले आहे. तीनशेबेचाळिसाव्या अध्यायात शब्दालंकारांचे विस्तृत वर्णन आलें आहे. अनुप्रासाचे एकवर्ण व अनेकवर्ण असे दोन प्रकार सांगितले आहेत. यांचेही पुन्हा भेद होतात. मधुरा, ललिता, प्रौढा, भद्रा, परुषा या एकवर्णगत आवृत्तीच्या पांच वृत्ती आहेत. या प्रत्येक वृत्तीचे लक्षणासह वर्णन आले आहे. या पाच वर्गांचे पुन्हा वर्णांच्या आवर्तनानुसार बारा भेद होतात ते असे— कर्णाटी, कौन्तली, कौंकी, कौंकणी, वाणवासिका, द्राविडी, माधुरी, मात्सी, मागधी, ताम्रलिप्तिका, औण्ड्री व पौण्ड्री.

यमकाचे लक्षण देऊन त्याचेही अव्यपेत व व्यपेत असे दोन प्रकार सांगितले आहेत. श्रेष्ठ यमकाचे दहा भेद असे— पादान्तयमक, काञ्ची-यमक, समुद्रयमक, विक्रान्त्ययमक, वक्रवालयमक, संदष्टयमक, पादादि-यमक, आम्रेडितयमक, चतुर्व्यवसितयमक व मालायमक. यांचेही अनेक भेद आहेत. भिन्नार्थवाची पदाचे स्वतंत्र व अस्वतंत्र असे दोन वर्ग होतात. चित्र हा एक शब्दालंकार आहे. प्रश्न, प्रहेलिका, गुप्त, च्युता-क्षर, दत्ताक्षर, च्युतदत्ताक्षर व समस्या असे आणखी सात भेद होतात. यांचे पुन्हा उपभेद आहेत. चित्रकाव्याचेही वर्णन या अध्यायात आले आहे. चित्रकर्मादी कल्पनांना बंध म्हणतात. यांचें आठ भेद आहेत. गोमूत्रिका, अर्द्धभ्रमक, सर्वतोभद्र, कमल, चक्र, चक्राब्जक, दंड, मुरज. या भेदांची लक्षणे व वर्णने या अध्यायात आलेली आहेत. बाण, धनुष्य, व्योम, खड्ग, मुद्गर, शक्ती, द्विशृंगाट, त्रिशृंगाट, चतुःशृंगाट, वज्र, मुसल, अंकुश, रथपद, नागपद, पुष्करिणी, असिपुत्रिका (कटचार वा सुरी) यांच्या आकृतींत चित्रबंध लिहिले जातात.

यानंतर पुढल्या दोनशेचव्वेचाळिसाव्या अध्यायात अर्थालंकारांचें लक्षणांसहित, प्रकारांसहित विवरण आले आहे. अर्थांचे अलंकरण

करणारे अर्थालंकार होत. अर्थालंकारांनी हीन सरस्वती विधवेप्रमाणे वाटते. स्वरूप, सादृश, उत्प्रेक्षा, अतिशय, विभावना, विरोध, हेतू व सम असे अर्थालंकारांचे आठ भेद आहेत. उपमा, रूपक, सहोक्ती, अर्थान्तरन्यास इत्यादी भेद सांगून उपमेचेही उपभेद सांगितले आहेत. ससमासा, असमासा, धर्मोपमा, वस्तूपमा, परस्परोपमा, विपरीतोपमा, नियमोपमा, अनियमोपमा, समुच्चयोपमा, व्यतिरेकोपमा, बहूपमा, मालोपमा, विक्रियोपमा, अद्भुतोपमा, मोहोपमा, संशयोपमा, निश्चयोपमा, वाक्यार्थोपमा, अन्योन्योपमा, गगनोपमा, प्रशस्त, निंदा, कल्पिता, सदृशी, किंचित्सदृशी असे उपमेचे अनेक प्रकार असतात. अर्थान्तरन्यास, उत्प्रेक्षा, अतिशयालंकार, संभव, असंभव, विशेषोक्ती, विभावना, विरोध, हेतू अशा आणखी काही अलंकाराचे व त्यांच्या भेदांचे वर्णन या अध्यायात आले आहे. पुढल्या तीनशेपंचेचाळिसाव्या अध्यायात शब्दार्थोभयलंकारांचे वर्णन आले आहे.

## काव्यगुणविवेक

तीनशेसेहेचाळिसाव्या अध्यायात काव्यगुणांची चर्चा आलेली आहे. गुणहीन काव्य अलंकारयुक्त असले तरी सहृदय माणसास ते प्रीतिकारक वाटत नाही. नारीचे यौवनजनित लालित्यरहित शरीर असेल तर तिला हाराचेही ओझे होते. दोषांचा अभाव म्हणजे गुण असे मात्र म्हणता येणार नाही. श्लेषादी गुण व गूढार्थत्व आदी दोष पृथक पृथक आहेत. काव्याला मोठी शोभा आणतात ते गुण होत. सामान्य व वैशेषिक असे त्यांचे दोन भेद आहेत. सर्वसाधारण गुण सामान्य असतो. जो गुण काव्यशरीराच्या शब्दांत आश्रित होतो त्यास शब्दगुण म्हणतात. याचे सात भेद आहेत. श्लेष, लालित्य, गांभीर्य, सौकुमार्य, उदारता, ओज, योगिकी (समाधी) हे ते भेद. शब्दांचे सुश्लिष्ट रूप श्लेष असते. संधी फारसे नसल्यास लालित्य येते. असे गुणांचे वर्णन सविस्तर आले आहे.

शब्द एक पण अर्थ दोन, यास अर्थगुण म्हटले आहे. साहित्यशास्त्रकारांनी याचेही सहा भेद सांगितले आहेत. प्रसाद, सौभाग्य,

यथासंख्य, प्रशस्तता, पाक, राग या सहा भेदांची ओळख करून दिलेली आहे. पाकाचे दोन प्रकार आहेत. मृद्वीकापाक, नारिकेलाम्बुपाक हे ते दोन भेद. राग, वैशेषिकगुण यांचीही ओळख करून दिलेली आहे. राग तीन प्रकारचे– एक हारिद्रराग, कौसुम्भराग व नीलीराग.

## आणि हा काव्यदोषविवेक

पुढल्या तीनशेसत्तेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी काव्यदोषांचे वर्णन केले आहे. 'दृश्य' व 'श्राव्य' काव्यांत दोष असेल तर सहृदय पाठकास तो कष्टदायक होतो. वक्ता, वाचक, काव्य यांच्या संदर्भात सात प्रकारचे दोष असतात. वक्ता म्हणजे कवी. तो संदिहान, अविनीत, अज्ञ, ज्ञाता या चार प्रकारांचा असतो. निमित्त व परिभाषा (संकेत) यांना अनुसरून अर्थाची प्रतीती शब्दांकडून घेणारा वाचक असतो. पद व वाक्य हे त्याचे दोन भेद होत. पददोष दोन प्रकारचे आहेत. एक असाधुत्व व दुसरा अप्रयुक्तत्व. व्याकरणशास्त्राच्या विरुद्ध पदात असाधुत्व दोष मानला आहे. काव्याच्या व्युत्पत्तीसंबंधाने ज्याचा उल्लेख केला जात नाही त्यास अप्रयुक्तत्व दोष म्हणतात. याचे पांच भेद होतात. छंदसत्व, अविस्पष्टत्व, कष्टत्व, असामयिकत्व आणि ग्राम्यत्व. अविस्पष्टत्वाचे भेद पुन्हा असे आहेत. गूढार्थता विपर्यस्तार्थता, संशयितार्थता, अन्यार्थत्व, अमसर्थत्व असे आणखी काही दोष आहेत. क्रियाभ्रंश, कारकभ्रंश, विसंधी, पुनरुक्तता, व्यस्तसंबंधता हे साधारण दोष आहेत. यांचेही पुन्हा उपप्रकार आहेत.

## असा एकाक्षरकोष

यानंतर तीनशेअठ्ठेचाळिसाव्या अध्यायात अग्निदेवांनी 'एकाक्षरविधान' आणि मातृकांची नावे व मंत्र यांचे विवरण केले आहे. 'अ' हे नाव भगवान विष्णूंचे आहे. 'अ' निषेधपरही आहे. 'आ' ब्रह्मदेवांचा बोध करतो. 'सीमा' या अर्थी अव्ययपदही येतो. क्रोध व पीडा या अर्थीही याचा उपयोग होतो. 'इ' कामअर्थासाठी येते. रती व लक्ष्मी या अर्थी 'ई'चा उपयोग होतो. 'उ' शिववाचक आहे. 'ऊ'

रक्षकाच्या अर्थाने उपयोगात येतो. 'ऋ'चा अर्थ बोधक आहे. 'ॠ' अदितीसाठी येतो. 'ऌ ॡ' ही दोन अक्षरे दिती व कुमार कार्तिकेय यांची बोधक आहेत. 'ए'चा अर्थ देवी आहे. 'ऐ' योगिनीचा बोध करते. 'ओ' ब्रह्मदेव व 'औ' महादेवांचा बोध करणारे आहे. 'अं'चा प्रयोग कामाच्या अर्थासाठी होतो. 'अ:' प्रशस्त वा श्रेष्ठ या अर्थी येतो.

'क'चा अर्थ ब्रह्मदेव, 'कु' कुत्सित वा निंदित या अर्थी येतो. 'ख' हे पद शून्यत्वाचा बोध करते. इंद्रिय व मुख यांचेही हे द्योतक आहे. 'ग' अक्षर पुल्लिंगी असेल तर गंधर्व, गणेश, गायक यांचा बोध करणारे असते. नपुंसकलिंगी 'ग' गीत या अर्थी येते. 'घ' घंटेचा बोध करते. 'ताडन' या अर्थी 'घ' येतो. 'ङ' अक्षर विषय, स्पृहा, भैरव यांचा बोध करते. 'च' दुर्जन आणि निर्मल अशा दोनही अर्थांनी येतो. 'छ'चा अर्थ छेदन आहे. 'जि' विजयासाठी येते. 'ज' पदगीत-वाचक आहे. 'झं'चा अर्थ प्रशस्त, 'ञं'चा बल व 'ट'चा गायन असा आहे. 'ठ'चा अर्थ चंद्रमंडल, शून्य, शिव आणि उद्‌बंधन असा आहे. 'ड' हें अक्षर रुद्र, ध्वनी व त्रास या अर्थी येते. धक्का व आवाज या अर्थी 'ढ'चा प्रयोग होतो. निष्कर्ष व निश्चय यांचे द्योतक 'ण' आहे. 'त'चा अर्थ आहे तस्कर (चोर) आणि डुकराचे शेपूट. 'थ' भक्षणाचा व 'द' छेदन, धारण, शोभन यांचा द्योतक आहे.

'ध' धाता व धत्तुरा या अर्थी येते. 'न'चा अर्थ समूह व सुगत (बुद्ध) या अर्थी येतो. 'प' म्हणजे उपवन. 'पूः' म्हणजे झंझावात. 'फु' म्हणजे फुंकणे आणि निष्फल होणे. 'बि' म्हणजे पक्षी. 'भ' ताऱ्यांचा बोध करते. 'मा' म्हणजे लक्ष्मी, मान आणि माता आहे. 'य'चा अर्थ योग, यात्री असा होतो. 'ईरिण' वृक्षाच्या अर्थासाठी येतो. 'र'चा अर्थ आहे अग्नी, बल आणि इंद्र. 'ल'चा विधाता, 'व'चा विश्लेषण (वियोग व जोड) आणि वरुण यांसारखा आहे. 'श'चा अर्थ शयन व सुख असा आहे. 'ष' श्रेष्ठ या अर्थी येतो. 'स'चा अर्थ परोक्ष, 'सा'चा लक्ष्मी, 'सं'चा बाल, 'ह'चा धारण व रुद्र आणि 'क्ष'चा अर्थ क्षेत्र, अक्षर, नृसिंह, हरी, क्षेत्र व पालक

असा होतो.

एकाक्षरमंत्र देवतारूप असतो. तो भोग व मोक्ष देणारा आहे. 'क्षौं हयशिरसे नमः' हा सर्व विद्या देणारा मंत्र आहे. अकारादी नऊ अक्षरांनाही मंत्राचे सामर्थ्य आहे. त्यांना मातृकामंत्र म्हणतात. कमलाच्या एकेक दलात त्यांना स्थापून त्यांची पूजा करावी. नऊ दुर्गांचीही पूजा होते. भगवती, कात्यायनी, कौशिकी, चंडिका, प्रचण्डा, सुरनायिका, उग्रा, पार्वती आणि दुर्गा यांचे पूजन या नऊ मातृकांत होते. 'ॐ चंडिकायै विद्महे भगवत्यै धीमहि तन्नो दुर्गा प्रचोदयात्' हा दुर्गामंत्र आहे. षडंग आदींचेही क्रमशः पूजन करावे. अजिता, अपराजिता, जया, विजया, कात्यायिनी, भद्रकाली, मंगला, सिद्धी, रेवती, सिद्ध आदी बटुक आणि एकपाद, भीमरूप, हेतुक, कापालिक यांचे पूजन करावे.

मध्यभागी नऊ दिक्पालांची पूजा करावी. मंत्रार्थाच्या सिद्धीसाठी 'ह्रीं दुर्गे रक्षिणी स्वाहा' या मंत्राचा जप करावा. गौरीची पूजा करावी. धर्म, स्कंद, शक्ती यांची पूजा करावी. प्रज्ञा, ज्ञानक्रिया, वाचा, वागीशी, ज्वालिनी, वामा, ज्येष्ठा, रौद्रा, गौरी, ह्री आणि पुरस्सरा यांचे 'ह्रीं: सः महागौरि रुद्रददयिते स्वाहा' या मंत्राने महागौरीचे, ज्ञानशक्तीचे, क्रियाशक्तीचे, सुभगेचे, ललितेचे, कामिनीचे, काममालेचे, इंद्रादी शक्तींचे पूजन एकाक्षरमंत्रानेंही होते. गणेशपूजनासाठी 'गं गणपतये नमः' या मंत्राचा उपयोग होतो. रक्त, शुक्ल, दंत, नेत्र, परशू आणि मोदक हे 'षडङ्ग' आहेत. 'गन्धोल्काय नमः' याने क्रमशः गंधादींचे निवेदन करावे. गज, गणपती, महोल्क यांचीही पूजा करावी. 'कूष्माण्डाय, एकदन्ताय, त्रिपुरान्तकाय, श्यामदन्तविकटहर-हासाय, लम्बनासाननाय, पद्मदंष्ट्राय, मेघोल्काय, धूमोल्काय, वक्र-तुण्डाय, विघ्नेश्वराय, विकटोत्कटाय, गजेन्द्रगमनाय, भुजगेन्द्रहाराय, शशांकधराय, गणाधिपते स्वाहा' या मंत्रांच्या आदी 'क' आदी एकाक्षरबीजे आणि अंती 'नमः' आणि 'स्वाहा' शब्दांचा प्रयोग करावा. या मंत्रांनी तिळयुक्त होमादी कर्मे करून मंत्रार्थभूत देवतेचे

आ...२०

पूजन करावे. अथवा द्विरेफ, द्विर्मुख, द्वयक्ष आदी पृथक पृथक मंत्र असू शकतात.

## आणि असे व्याकरणसार

अध्याय तीनशेएकोणपन्नासपासून तीनशेएकोणसाठपर्यंत व्याकरणाचे सार स्कंद वा कुमार कार्तिकेयाने कात्ययानासाठी निवेदन केले आहे. प्रथम प्रत्याहार आदी संज्ञा सांगितल्या आहेत.

अइउण्, ऋलृक्, एओङ्, ऐऔच्, हयवरट्, लण्, अमङणनम्, झभञ्, घढधष्, अबगडदश्, खफलठथचटतव्, कपय्, शषसर्, हल्, ही माहेश्वर-सूत्रे आणि 'अक्षर समाम्नाय' आहेत. यांनीच 'अण्' आदी 'प्रत्याहार' बनतात. उपदेशावस्थेत अंतिम 'हल्' आणि अनुनासिक 'अच्' ची 'हत्' संज्ञा होते. अण्, एङ्, अट्, यय्, (अथवा यम्), छव्, झष्, भष्, अक्, हक्, उक् । अण्, हण्, यण्, अम्, यम्, ङम्, अच्, इच्, एच्, ऐच्, अय्, मय्, झय्, खय्, जश्, झर, खर, चर, पर, अश्, हश्, वश्, झश्, अल् हल्, वल् रल्, झल्, शल्; हे सर्व प्रत्याहार आहेत.

या नंतर सिद्ध संधींचे स्वरूप वर्णन केले आहे. प्रथम स्वरसंधी व नंतर व्यंजनसंधी वर्णन केले आहेत. दण्डाग्रम्, साऽऽगता, दधीदम्, नदीहते, मधूदकम्, पिणृषभः, लृकारः; तवेदम्, सकलोदकम्, अर्धर्चोऽयम्, तवल्कारः, सैषा, सैन्द्री, तवौदनम्, खट्वौघोऽभवत्, इत्येवम्, व्यसुधी, वस्त्रलंकृतम्, पित्रर्थोपवनम्, दात्री, नायकः, लावकः, नयः, त इह, तविह इत्यादी तेऽत्र, योऽत्र, जलेकजम् । संधी न होता प्रकृतरूप राहाते त्यास प्रकृतिभाव म्हणतात. नो अहो, एहि, अ वेहि, इ. इन्द्रकम्, उ उत्तिष्ठ, कवी, एतौ, वायू एतौ; इत्यादी त्यांची उदाहरणे होत.

आता व्यंजनसंधी पाहा– वाग्यतः । अ जेकमातृकः । षडेते । तदिमे । अबादि । वाङ्नीतिः । षण्मुखः । वाङ्मनसः । इत्यादी वाग्भावादिः । वाक्श्लक्षणम् । तच्छरीकम् । तल्लुनाति । तच्चरेत् । कुङ्ङास्ते । सुगण्णिह । भवांश्चरन् । भवांश्छास्त्रः । भवांष्टीका । भवांष्ठकः । भवांस्तीर्थम् । भवांस्थेत्याह । भवँल्लेखा । भवाञ्जयः ।

भवाञ्छेते भवाञ्च्शेते, भवाञ्शेते । भवाण्डीनः । खम्धर्ता । खङ्करिष्यासि इत्यादी ।

या नंतर विसर्गसंधीचे वर्णन आले आहे. यानंतरच्या अध्यायात सुबन्तसिद्धरूपांचे विवेचन आले आहे. विभक्ती दोन आहेत. 'सुप्' व 'तिङ्' 'सुप्' विभक्ती सात आहेत. 'सु औ जस्' ही प्रथमा विभक्ती, 'अम् औट् शस्'–ही द्वितीया, 'टाभ्याम् भिस्' ही तृतीया, 'ङे भ्याम् भ्यस्'– ही चतुर्थी, 'ङसि भ्याम् भ्यस्' ही पंचमी, 'ङस् ओस् आम्' ही षष्ठी, आणि 'ङि ओस् सुप्' ही सप्तमी विभक्ती होय.

प्रातिपादक दोन प्रकारचे असते. एक 'अजन्त' व दुसरे 'हलन्त.' यांत पुल्लिग, स्त्रीलिंग आणि नपुसकलिंग असे तीन भेद होतात. 'वृक्ष' शब्द झाडवाचक आहे. हा अकारान्त पुल्लिंगी शब्द आहे. याच्या सात विभक्त्या, तीनही वचनांत अशा आहेत.

१ वृक्षः, वृक्षौ, वृक्षाः
२ वृक्षम्, वृक्षौ, वृक्षान्
३ वृक्षेण, वृक्षाभ्याम्, वृक्षैः
४ वृक्षाय, वृक्षाभ्याम्, वृक्षेभ्यः
५ वृक्षात्, वृक्षाभ्याम्, वृक्षभ्यः
६ वृक्षस्य, वृक्षयोः, वृक्षाणाम्
७ वृक्षे, वृक्षयोः, वृक्षेषु

याच प्रकारे राम, देव, इंद्र, वरुण, भव इत्यादी शब्दांची रूपे होतात. याचप्रकारे सर्वनामाचीही रूपे सिद्ध होतात.

१ सर्वः सर्वौ सर्वे
२ सर्वम् सर्वौ सर्वान्
३ सर्वेण सर्वाभ्याम् सर्वैः
४ सर्वस्मै सर्वाभ्याम् सर्वेभ्यः
५ सर्वस्मात् सर्वाभ्याम् सर्वेभ्यः
६ सर्वस्य सर्वयोः सर्वेषाम्

७ सर्वस्मिन् सर्वयोः सर्वेषु
संबोधन– हे सर्व हे सर्वौ हे सर्वे

असेच आकारान्त, इकारान्त, उकारान्त, ईकारान्त, ऊकारान्त शब्द चालवून दाखविले आहेत. स्त्रीलिंगी शब्दांची रूपे दिली आहेत. नपुंसकलिंगी शब्दांचेही विवेचन या अध्यायात आले आहे. अव्यय, संख्या यांचेही पूर्णतः विवेचन आले आहे. तीनशेबावन्नाव्या अध्यायात तर स्त्रीलिंगी शब्दांच्या सिद्ध रूपांचीच उदाहरणे आली आहेत. पुढल्या अध्यायात नपुंसकलिंगी शब्दांची सिद्ध रूपे दिली आहेत. तीनशेचोपन्नाव्या अध्यायात कारकविचार समजावून दिला आहे. तीनशेपंचावन्नाव्या अध्यायात समासांचे निरूपण आहे. प्रमुख सहा भेद सांगून नंतर अठ्ठावीस उपप्रकार निवेदन केले आहेत. नित्य व अनित्य वा 'लुक्' व 'अलुक्' हे प्रथम समासांचे भेद होतात. तत्पुरुष समासाचे आठ भेद व विभक्तींनुसार उदाहरणांसहित सांगितले आहेत. कर्मधारय समासाचे सात प्रकार आहेत. बहुव्रीही समासाचेही विभक्तींनुसार सात भेद दिले आहेत. द्वंद्वसमासाचे दोन भेद आहेत.

दोनशेछप्पन्नाव्या अध्यायात विविध तद्धित प्रत्ययांचा परिचय करून दिला आहे. दोनशेसत्तावन्नाव्या अध्यायात उणादिसिद्ध शब्दरूपांचे दिग्दर्शन केले आहे. दोनशेअठ्ठावन्नाव्या अध्यायात तिङ्विभक्त्यन्त सिद्धरूपांचे वर्णन आले आहे. तीनशेएकोणसाठाव्या अध्यायात कृदन्त शब्दांची सिद्ध रूपे वर्णन केली आहेत. पुढल्या तीनशेसाठाव्या अध्यायात स्वर्गादींची नामे, त्यांची लिंगे, रूपे यांचे विस्तृत वर्णन आले आहे. तीनशेएकसष्टाव्या अध्यायात अव्ययांचे विवेचन आले आहे.

## नानार्थांचे शब्द

तीनशेबासष्टाव्या अध्यायात नानार्थवर्गाचे वर्णन आले आहे. एकाच शब्दाचे नाना अर्थ कसे असतात? याचे दर्शन या अध्यायात होते. 'नाक' म्हणजे आकाश आणि स्वर्ग. 'लोक' म्हणजे संसार (जगत) व जनसमुदाय. 'श्लोक' म्हणजे अनुष्टुप् छंद व सुयश. 'सायक' म्हणजे बाण व तलवार. 'कलंक' म्हणजे चिन्ह व अपवाद.

'पुलाक' शब्द कदन्न, संक्षेप, भाताचा पिंड या अर्थांनी येतो.'कौशिक' शब्द इंद्र, गुग्गुळ, उल्लू, साप पकडणारा, या अर्थांनी येतो. शालवृक म्हणजें माकडे व कुत्री होय. 'मान' म्हणजे मापाचे साधनही होऊ शकते. 'सर्ग' शब्द स्वभाव, त्याग, निश्चय, अध्ययन, सृष्टी इत्यादी अर्थांनी उपयोगी होतो 'योग' म्हणजे कवचधारण, साम, ध्यान, संगती, युक्ती. 'भोग' म्हणजे सुख व स्त्रीचा उपभोग. 'अब्द' म्हणजे शंख व चंद्रमा; अशा अनेक शब्दांचे विवरण या अध्यायात आले आहे.

पुढल्या तीनशेत्रेसष्टाव्या अध्यायात भूमी, वनस्पती यांच्या वर्गाचे विवरण उदाहरणांसहित आले आहे. भूमी, पुर, पर्वत, वनौषधी, सिंह इत्यादी वर्गांचे वर्णन केले आहे. भू, अनंता, क्षमा, धात्री, क्ष्मा, कु, धरित्री ही भूमीची नावे आहेत. मृत् व मृत्तिका म्हणजे माती. जगत्, त्रिविष्टप, लोक, भुवन, जगती ही सर्व समानार्थाचे शब्द आहेत. अयन, वर्त्म, मार्ग, अध्व, पन्था, पदवी, सृती, सरणी, पद्धती, पद्या, वर्तनी, एकपदी हे शब्द मार्गवाचक आहेत. पूः, पुरी, नगरी,पत्तन, पुटभेदन, स्थानीय, निगम हे शब्द नगरवाचक आहेत. असाच विचार पुढल्या तीनशेचौसष्टाव्या अध्यायात मनुष्यवर्गाचा केला आहे. ना, नर, पञ्च-जन, मर्त्य हे शब्द पुरुषवाचक आहेत. योषित्, दोषा, अबला, वधू हे शब्द स्त्रीवाचक आहेत. अभिसारिका, कुलटा, पुंश्चली, असती हे व्यभि-चारिणी स्त्रीवाचक शब्द आहेत. नग्निका व कोटवी हे शब्द नग्न स्त्रीचा बोध करतात. अशा अनेक शब्दांचे विवरण करून तीनशेपासष्टाव्या अध्यायात ब्रह्मवर्गाचा व तीनशेसहासष्टाव्या अध्यायात क्षत्रिय, वैश्य व शूद्रवर्गाचा विचार झालेला आहे. वंश, अन्ववाय, गोत्र, कुल, अभिजन, अन्वय; ही वंशवाचक नामे आहेत. मूर्धाभिषिक्त, राजन्य, बाहुज, क्षत्रिय, विराट् हे शब्द क्षत्रियवाचक आहेत. विश्, भूमिस्पृश्, वैश्य हे वैश्य-जातिवाचक शब्द आहेत. वृषल, जघन्यज, शूद्र हे शब्द शूद्रवाचक आहेत. या जातींच्या व वर्णांच्या व्यवहारांचे विस्तृत वर्णन या अध्यायात आले आहे.

तीनशेअडुसष्टाव्या अध्यायात या सामान्य नामलिंगांचा विचार

झालेला आहे. सुकृती, पुण्यवान, धन्य हे शब्द पुण्यात्मा व सौभाग्यशाली पुरुषांसाठी येतात. ज्यांची अभिलाषा, आशय, अभिप्राय महान असतो त्यास महेच्छ व महाशय म्हणतात. प्रवीण, निपुण, अभिज्ञ, विज्ञ, निष्णात, शिक्षित हे शब्द सुयोग्य वा कुशल या अर्थी येतात. वदान्य, स्थूललक्ष, दानशोंड, बहुप्रद हे शब्द अधिक दान देणारासाठी वापरतात. कृती, कृतज्ञ, कुशल हे शब्दही प्रवीण, चतुर या अर्थाचे आहेत. आसक्त, उद्युक्त, उत्सुक हे शब्द उद्योगी व कार्यपरायण पुरुषासाठी येतात. अशा अनेक शब्दांचे विवेचन येथे आले आहे.

# ६ तत्त्वज्ञानदर्शन

## नित्य, नैमित्तिक व प्राकृतिक प्रलय

मंत्र, तंत्र. उपचारविधी यांनी समृद्ध असणाऱ्या अग्निपुराणात तात्त्विक चर्चा अशी फार थोडी आहे. काही निवडक विषयांचा निर्देश येथे केलेला आहे. तीनशेअडुसष्टाव्या अध्यायात अग्निदेवांनी प्रलयाचे तात्त्विक वर्णन केले आहे. नित्य, नैमित्तिक, प्राकृत व आत्यंतिक अशा प्रकारचे प्रलय असतात. जगात उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांचा नित्य होणारा मृत्यू हा नित्य प्रलय होय. एक हजार चतुर्युगे संपल्यावर ब्रह्मदेवांचा एक दिवस समाप्त होतो, तेव्हा त्या सृष्टीच्या लयास ब्राह्मलय म्हणतात. यालाच नैमित्तिक प्रलय असेही नाव आहे. पाचही भूतांचा प्रकृतीत लीन होण्याचा प्रसंग म्हणजे प्राकृत प्रलय होय. ज्ञान झाल्यावर जेव्हा आत्मा परमात्म्याच्या स्वरूपात स्थित होतो, तेव्हा आत्यंन्तिक प्रलय होतो.

पुढल्याच अध्यायात या आत्यंतिक प्रलयाचे आणखी विस्तृत

वर्णन आले असून गर्भाच्या उत्पत्तीचे विवेचन आले आहे. आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक संतापांनी त्रस्त झाल्यावर माणसास वैराग्य निर्माण होते. याच वेळी त्याला ज्ञान होते आणि हीच त्याची आत्यंतिक प्रलयाची वा मोक्षाची अवस्था होय. आध्यात्मिक ताप शारीरिक व मानसिक अशा प्रकारांचा असतो. शारीरिक तापांचेही अनेक भेद असतात. जीव भोगदेहाचा त्याग करून आपल्या कर्मानुसार पुन्हा गर्भवासी होतो. आतिवाहिक नावाचे शरीर मनुष्यास केवळ मृत्युकाळ समीप आल्यावरच प्राप्त होते. यमदूत त्या आतिवाहिक शरीरास यम-लोकात नेऊ लागतात. हा जीव कधी स्वर्गात वा कधी नरकात जातो. इहलोक ही कर्मभूमी व परलोक फलभूमी असते. यमराज जीवाच्या कर्मानुसार त्याला भिन्न भिन्न योनींत वा नरकांत टाकतो.

## गर्भस्थ जीवाची वाढ

जीव वायुरूप होऊन गर्भात प्रवेश करतो. पहिल्या महिन्यात तो कलल म्हणजे रजवीर्याच्या मिश्रित बिंदुरूप असतो. दुसऱ्या महिन्यात तो घनीभूत होतो. तो कठोर मांसपिंड धारण करतो. तिसऱ्या महिन्यात त्याला अवयव प्रकट होतात. चौथ्या महिन्यात हाडे, मांस, त्वचा यांची प्राप्ती होते. पांचव्या महिन्यात केस उगवतात. सहाव्या महिन्यात त्यात चैतन्य प्रकटते. सातव्या महिन्यात त्याला दुःखाचा अनुभव येतो. मस्तकाशी त्याचे हात बांधलेले असतात. बालक नपुंसक असेल तर उदराच्या मध्यभागी राहाते. कन्या असेल तर वामभागी व पुत्र असेल तर तो उजव्या भागी असतो. गर्भात या अंधाऱ्या अवस्थेत जीवाला भारी कष्ट होतात. सातव्या महिन्यांत तो मातेने खाल्लेल्या अन्नाचा रस घेऊ शकतो. आठव्या व नवव्या महिन्यात जीवास गर्भावस्थेत अतिशय त्रास होतो. माता रोगिणी असेल तर जीवास अधिकच कष्ट होतात. प्रसूतिवायूच्या प्रेरणेने त्याचे डोके खाली सरकते. गर्भाच्या बाहेर जीव येतो तेव्हा त्याची स्थिती नाजूक असते.

यानंतर त्याला ‘ख’ शब्दवाच्य आकाशामुळे शरीरावर छोटे छोटे छेद, कान यांची प्राप्ती होते. श्वासोच्छ्वास, गती, स्पर्श; हे

वायूचे गुण प्राप्त होतात. रूप, नेत्र, गर्मी, पचनक्रिया, पित्त, मेधा, वर्ण, बल, छाया, तेज, शौर्य; हे त्याच्या शरीरात वायुतत्त्वामुळे प्रकट होतात. घाम, रसना, चर्बी, वीर्य, मूत्र, कफ इत्यादींची प्राप्ती त्यास जलतत्त्वामुळे होते. घ्राणेन्द्रिय, केस, नखे, नाडया; यांची निर्मिती भूमितत्त्वामुळे होते. शरीरातील कोमल तत्त्वे मातेच्या रजामुळे निर्माण होतात. शिरा, स्नायू, शुक्र यांची प्राप्ती त्याच्या पित्याकडून होते. काम, क्रोध, भय, हर्ष, धर्माधर्मप्रवृत्ती, आकृती, स्वर, वर्ण, मूत्रादी क्रिया, इत्यादी क्रिया जीवात स्वतःच प्रकट होतात. अज्ञान, प्रमाद, आळस, क्षुधा, तृषा, मोह, मात्सर्य, वैगुण्य, शोक, आभास व भय; यांची प्राप्ती तमोगुणाने होते. काम, क्रोध, शौर्य, यज्ञाची अभिलाषा, फार बोलण्याची सवय, अहंकार, दुसऱ्याचा अनादर करण्याची प्रवृत्ती, यांची निर्मिती रजोगुणामुळे होते. धर्माची अभिलाषा, मोक्षाची आकांक्षा, भगवान विष्णूंची भक्ती, उदारता, उद्योगशीलता, यांची निर्मिती सत्त्वगुणाने होते. वात, कफ, पित्त यांचेही गुणविशेष त्याच्यात प्रकट होतात.

## चोवीस तत्त्वांच्या पलीकडे पुरुष

पुढल्या तीनशेसत्तराव्या अध्यायात शरीराच्या या अवयवांचे सविस्तर वर्णन आले आहे. कान, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका; ही ज्ञानेंद्रिये होत. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध; हे आकाशादी भूतांचे गुण होत. गुदा, उपस्थ, हात, पाय, वाणी ही कर्मेंद्रिये होत. मलत्याग, विषजनित आनंदाचा अनुभव, ग्रहण, चलन, वार्तालाप; ही या इंद्रियांची कामे होत. पांच कर्मेंद्रिये, पांच ज्ञानेंद्रिये, पांच विषय, पांच महाभूते, मन, बुद्धी, आत्मा (महत्तत्त्व), अव्यक्त (मूलप्रकृती); ही चोवीस तत्त्वे आहेत. या सर्वांच्या पलीकडे आहे पुरुष. रजोगुण, तमोगुण, सत्त्वगुण हे अव्यक्ताचे आश्रित आहेत. अंतःकरणाच्या उपाधीनें मुक्तपुरुष 'जीव' बनतो. तोच निरुपाधिक अवस्थेत 'पारब्रह्म' असतो. जो मनुष्य या परमपुरुषास जाणतो तोच परमपदास जातो.

## नरक व पापमूलक जन्म

पुढल्या तीनशेएकाहत्तराव्या अध्यायात प्राण्यांचा मृत्यू, नरक, पापमूलक जन्म यांचे विवेचन आले आहे. शरीरात वाताबरोबर ऊष्मा

व पित्त यांचाही प्रकोप होतो. नंतर वायूचाही प्रकोप होतो. दोन नेत्र, दोन कान, दोन नासिकापुटे, वरचे ब्रह्मरंध्र व मुख; ही आठ छिद्रे आहेत. शुभ कार्य करणाऱ्या मनुष्याचा प्राण प्राय: या मार्गांनी बाहेर येतो. गुदा व उपस्थ हीही दोन छिद्रें आहेत. पापी मनुष्याचा प्राण या छिद्रांतून बाहेर पडतो. योगी पुरुषाचा प्राण मस्तक भेदून इच्छेनुसार हव्या त्या लोकी भ्रमण करतो.

पापी जीव कोणकोणत्या नरकांत भटकतो ? या पृथ्वीच्या खाली नरकाच्या अठ्ठावीस श्रेणी आहेत. सातव्या तलाच्या शेवटी घोर अंधकारात हे नरक आहेत. घोरा, सुघोरा, अतिघोरा, महाघोरा, घोर-रूपा, तरलतारा, भयानका, भयोत्कटा, कालरात्री, महाचंडा, चंडा, कोलाहला, प्रचंडा, पद्मा, नरकनायिका, पद्मावती, भीषणा, भीमा, कंरालिका, विकराळा, महावज्रा, त्रिकोणा, पञ्चकोणिका, सुदीर्घा, वर्तुला, सप्तभूमा, सुभूमिका, दीप्तमाया; अशी त्यांची नावे आहेत. त्यांचे पांच पांच नायक भैरव या नावानें प्रसिद्ध आहेत. त्या सर्वांची संख्या एकशे-पंचेचाळीस आहे. तामिस्त्र, अंधतामिस्र, महारौरव, रौरव, असिपत्रवन, लोहभार, कालसूत्र, नरक, महानरक, संजीवन, महावीची, तपन, संप्रता-पन, संघात, कालोल, कुड्मल, पूतमृत्युक, लोहशंकू, ऋजींष, प्रधान, शाल्मली वृक्ष व वैतरणी नदी; इत्यादी नरकांना 'कोटिनायक' समजावे. पापी मनुष्यांस यांतून जावे लागते.

यानंतर पापमुलक जन्माचे वर्णन आले आहे. ब्रह्महत्यारा पुरुष मृग, कुत्रे, डुक्कर, ऊट यांच्या जन्मास जातो. मद्यपी गाढव, चांडाल, म्लेंच्छ बनतो. सोने चोरणारा किडा व पतंग होतो' गुरुपत्नीशी गमन करणारा तृण वा लता होतो. ब्रह्महत्यारा राजयक्ष्म्याचा रोगी बनतो. मद्यपीचे दात काळे असतात. जो जे पाप करतो तो त्याचे चिन्ह धारण करतो. अन्न चोरणारा मायावी असतो. वाणी (कविता) चोरणारा मुका होतो. धान्य चोरणारा एखाद्या अधिक अंगाचा होतो. चहाड-खोराच्या नाकात दुर्गंधी असते. तेल चोरणारा, तेल पिणारा किडा होतो. दुसऱ्याची स्त्री व ब्राह्मणाचे धन लुबाडणारा निर्जन वनात ब्रह्मराक्षस होतो. घृतचोर नीच जातीत जन्मतो. शाक चोरणारा कोंबडा होतो.

पशूंचे अपहरण करणारा बकरा होतो. दूध चोरणारा कावळा होतो.

यानंतर आधिदैविक व आधिभौतिक तापांचे वर्णन झाले आहे. गृह, अग्नी, देवता आदीमुळे जे कष्ट होतात ते आधिभौतिक होत. अशा रीतीने संसार या तीन प्रकारच्या दुःखांनी भरलेला आहे. ज्ञानयोग, कठोर व्रते, दानादी पुण्यकृत्ये, विष्णूंची पूजा आदींनी या संसारदुःखांचे निवारण होऊ शकते.

## यम, नियम, प्रणवमहिमा

तीनशेबहात्तराव्या अध्यायात अग्निदेवांनी अष्टांगयोगाचे वर्णन केले आहे. त्रिविधतापांपासून सुटका होण्याचा हा एक मार्ग आहे. चित्तास एके ठिकाणी स्थापित करणे म्हणजे 'योग' होय. चित्तवृत्तींचा निरोध म्हणजे योग. जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्य स्थापित करणे म्हणजे योग. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह हे पांच 'यम' आहेत. शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वराराधन हे पांच नियम आहेत. या प्रत्येकाचे विवेचन या अध्यायात आले आहे.

वेदांचा आरंभ प्रणवापासूनच आहे. प्रणवात सर्व वेदांची स्थिती असते. या प्रणवाचा अभ्यास करायला हवा. 'प्रणव' म्हणजे अकार, उकार व मकार असून वेद, भूः आदी तीन लोक, तीन गुण, जागृत, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्था, ब्रह्मा, विष्णू, महेश हे तीन देव म्हणजे प्रणवस्वरूपच आहेत. ब्रह्मा, विष्णू, रुद्र, स्कंद, देवी, महेश्वर, प्रद्युम्न, श्री, वासुदेव ही वास्तविक पाहाता ॐकाराचीच रूपे आहेत. ॐकार मात्रारहित वा अनंत मात्रांनी युक्त असतो. तो द्वैताची निवृत्ती करतो. तो शिवस्वरूप आहे. ओंकारास जाणणारा मुनी होतो. प्रणवाची चतुर्थ मात्रा, अर्धमात्रा 'गांधारी' म्हणून प्रसिद्ध आहे. ही प्रयुक्त झाली की मूर्धांत लक्षित होते. तीच 'तुरीय' या नावाने प्रसिद्ध आहे. ती ज्योतिर्मय आहे.

मनुष्याने हृदयकमलात असणाऱ्या आत्म्याचे वा ब्रह्माचे ध्यान करावे. जिभेने सदा प्रणवाचा जप करावा. प्रणव धनुष्य आहे. जीवात्मा बाण आहे. ब्रह्म लक्ष्य आहे. या लक्ष्याचा सावधान राहून भेद करावा.

हे एकाक्षर, प्रणवाक्षरच ब्रह्म आहे. या प्रणवाचा देवी गायत्री छंद आहे. अंतर्यामी ऋषी आहे. परमात्मा देवता आहे. भोग व मोक्ष यांच्या सिद्धीसाठी याचा उपयोग होतो. याच्या अंगन्यासाचा विधी असा आहे, 'ॐ भूः अग्न्यात्मने हृदयाय नमः' या मंत्राने हृदयास स्पर्श करावा. 'ॐ भुवः प्राजापत्यात्मने शिरसे स्वाहा' म्हणून शिरास स्पर्श करावा. 'ॐ स्वः सर्वात्मने शिखायै वषट्' म्हणून शिखेस स्पर्श करावा. 'ॐ भूर्भुवः स्वः सत्यात्मने कवचाय हुम्' या मंत्राने उजव्या हाताच्या अंगुलींनी डाव्या हाताच्या मूलभागास व डाव्या हाताच्या अंगुलींनी उजव्या हाताच्या मूळभागास स्पर्श करावा. त्यानंतर 'ॐ भूर्भुवः स्वः सत्यात्मने अस्त्राय फट्' म्हणून चुटकी वाजवावी. या प्रकारे अंगन्यास करून भोग व मोक्ष यांच्या सिद्धीसाठी भगवान विष्णूंचे पूजन, त्यांच्या नामांचा जप, त्यांच्यासाठी हवन इत्यादी करून ईश्वरपूजन करावे. जो मनुष्य प्रतिदिन बारा हजार प्रणवांचा जप करतो, त्याला बारा महिने प्रणवाचे ज्ञान होते. एक कोटी जप केल्यास अणिमादी सिद्धी प्राप्त होतात. एक लाख जप केल्यास सरस्वतीची कृपा होते. वैदिक, तांत्रिक व मिश्र अशा तीन प्रकारांनी विष्णूंचे यजन करता येते. जो मनुष्य भगवानांना साष्टांग नमस्कार घालतो त्याला उत्तम गती प्राप्त होते.

## असे हे ब्रह्मज्ञान

यानंतर तीनशेत्र्याहत्तराव्या अध्यायात आसन, प्राणायाम, प्रत्याहार यांचे वर्णन आले आहे. तीनशेचौऱ्याहत्तराव्या अध्यायात ध्यानाचे वर्णन आले आहे. धारणा व समाधी यांची वर्णनें पुढल्या दोन अध्यायांत आली आहेत. पुढल्या तीनशेसत्त्याहत्तराव्या अध्यायात श्रवण व मननरूप ज्ञानाचे विवेचन आले आहे. 'हा आत्मा परब्रह्म आहे. मीच ब्रह्म आहे.' असा निश्चय करणारा मनुष्य मुक्त होतो. देहाहून आत्मा भिन्न आहे हे नीट जाणावे. नेत्रादी इंद्रियेही आत्मा नाहीत. कारण ती कारणरूप आहेत. मन व बुद्धी यांचेही असेच आहे. दीपकाप्रमाणे तेही प्रकाशाचे कारण आहेत. म्हणून ते आत्मा होऊ शकत नाहीत. प्राणही आत्मा बनू शकत नाही. सुषुप्तावस्थेत त्यावर जडतेचा प्रभाव पडतो.

इंद्रियादी आत्म्याचे कारणरूप मात्र होतात. अहंकारही आत्मा नाही. कारण देहाच्याप्रमाणे तोही आत्म्यापासून पृथक असतो.

समाधीच्या आरंभी मुनीने असे चिंतन करावे. ब्रह्मापासून आकाश, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून जल, जलापासून पृथ्वी व पृथ्वीपासून सूक्ष्म शरीर प्रकट झाले आहे. स्थूल शरीराचे ध्यान करून ब्रह्मात त्याचा लय झाला आहे. अशी भावना करावी. पंचीकृत भूत व त्यांची कार्ये ' विराट् ' या नावाने ओळखली जातात. आत्म्याचे हे स्थूल शरीर अज्ञानाने कल्पित आहे. इंद्रियांकडून जे ज्ञान होते त्याला ' जागृतावस्था ' मानतात. जागृतीत अभिमानी आत्मा ' विश्व ' या नावाने ओळखला जातो. तीन प्रणवांची प्रथम मात्रा अकाररूपी आहे. अपंचीकृत भूत व त्यांची कार्ये यांना ' लिंग ' म्हटले आहे. दहा इंद्रिये, पंचतन्मात्रा व मन आणि बुद्धी या सतरा तत्त्वांतून युक्त असणाऱ्या आत्म्याच्या सूक्ष्म शरीरास ' हिरण्यगर्भ ' म्हटले आहे. आत्माच स्थूल व सूक्ष्म शरीरांना कारणीभूत होतो. आभासयुक्त ज्ञानास ' अध्याहृत ज्ञान ' म्हणतात. या अवस्थांचे साक्षी ब्रह्म न सत् आहे, न असत् आहे. न सदसत्रूप आहे. ते अवयवयुक्त नाही की अवयवरहित नाही. ते भिन्न नाही की अभिन्नहीं नाही. भिन्नाभिन्नरूपही नाही. ते सर्वथा अनिर्वचनीय आहे. या बंधनभूत संसाराची निर्मिती तेच करते. ब्रह्म एक असून ते केवळ ज्ञानानेच प्राप्त होते. कर्मांनी त्याची प्राप्ती होऊ शकत नाही.

## ' मी ज्योतिर्मय परब्रह्म आहे. '

यानंतर तीनशेअठ्याहत्तराव्या अध्यायात निदिध्यासनरूप वर्णन करताना अग्निदेवांनी म्हटले आहे, ' मी पृथ्वी, जल व अग्नी यांनी रहित असा स्वप्रकाशमय परब्रह्म आहे. मी वायू व आकाश यांहून विलक्षण असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी कारण व कार्य यांनी भिन्न असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी विराट्स्वरूपाहून पृथक असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी जागृतावस्थेपेक्षा वेगळे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी विश्वरूपाहून विलक्षण असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी अकारादी अक्षरां-

हून रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी वाक्, पाणि, चरण यांनी हीन असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी गुद, उपस्थ यांनी रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी वाहन, त्वचा, नेत्र यांनी वेगळे असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी रस व रूप यांनी विरहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सर्व गंधांनी विरहित असे ज्योतिरूप परब्रह्म आहे. जिव्हा व नासिका यांनी शून्य असे मी ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी शब्द व अर्थ यांनी विरहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी मन व बुद्धी यांनी रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी चित्त व अहंकार यांनी वर्जित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी प्राण व अपान यांहून पृथक असे परब्रह्म आहे.

'मी व्यान व उदान यांनी विलग असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी समान नावाच्या वायूने विरहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी जरा व मृत्यू यांनी विरहित असे परब्रह्म आहे. मी शोक व मोह यांच्या पलीकडील ज्योतिर्मय परब्रह्म आहे. क्षुधा व पिपासा यांनी शून्य असे मी ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी शब्दोत्पत्ती आदीहून वेगळे असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी हिरण्यगर्भाहून विलक्षण असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी स्वप्नावस्थेहून रहित असे परब्रह्म आहे. मी तेजाहून वेगळे असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी अपकार आदीहून हीन असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सामान्यज्ञानाहून शून्य असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी अध्याहाररहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सत्त्वादीगुणांनी विलक्षण असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सद्सद्भावाने रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सर्व अवयवांरहित असे परब्रह्म आहे. मी भेदाभेदरहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी सुप्तावस्थेहून शून्य असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे.

'मी प्राज्ञभावाने रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी मकारादींनी रहित ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी मानव व मेय यांनी रहित ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी मिती (माप) व माता (माप करणारा) यांहून भिन्न ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी साक्षित्व आदीहून रहित असे ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मी कार्यकारणाहून भिन्न असे ज्योतिर्मय

परब्रह्म आहे. मी देह, इन्द्रिये, मन, बुद्धी, प्राण, अहंकार, जागृती, स्वप्न, सुषुप्ती आदीहून मुक्त असे तुरीय ब्रह्म आहे. मी नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य, आनंद, अद्वैतरूप ब्रह्म आहे. मी विज्ञानयुक्त ब्रह्म आहे. मी सर्वथा मुक्त व प्रणवरूप ब्रह्म आहे. मो ज्योतिर्मय परब्रह्म आहे. मोक्ष देणारा समाधिरूप परमात्माही मीच आहे.'

## ब्रह्मभावाची प्राप्ती

तीनशे एकोणऐंशिव्या अध्यायात अग्निदेवांनी भगवत्स्वरूपाचे वर्णन करून ब्रह्मभावाच्या प्राप्तीच्या उपायाचे वर्णन केले आहे. धर्मात्मा पुरुष यज्ञानें देवरूप, तपस्येद्वारा विराटपदरूप, कर्मसंन्यासानें ब्रह्मपदी, वैराग्यानें प्रकृतीत व ज्ञानानें कैवल्यपद व मोक्षरूप पावता येते. प्रसन्नता, संताप, विषाद, यांपासून निवृत्त झाल्यावर वैराग्य प्राप्त होते. आसक्ती, फलेच्छा सोडून देणे हा संन्यास. जड व चेतन यांतील भिन्नताज्ञान झाल्यावर परमार्थज्ञान होते. हा परमात्मा यज्ञांचा स्वामी आहे. प्रवृत्ति-मार्गी ज्ञानयोगाच्या मार्गें या ज्ञानस्वरूप परमात्म्याचा साक्षात्कार करवून घेतात. ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत आदी वचनें याच पुरुषोत्तमाच्या स्वरूपाची आहेत.

याच्या प्राप्तीचे दोन मार्ग. एक ज्ञान व दुसरा कर्म. ज्ञान दोन प्रकारचे आहे. एक 'आगमजन्य' व दुसरे 'विवेकजन्य' होय. शब्दब्रह्म (वेदादी शास्त्रे व प्रणव) यांचा बोध आगमजन्यज्ञान व परब्रह्माचे ज्ञान विवेकजन्य होय. ब्रह्म दोन प्रकारांनी जाणता येते. एक शब्दब्रह्म व दुसरे परब्रह्म. वेदादी विद्यांना शब्दब्रह्म वा अपरब्रह्म म्हणतात व सत्स्वरूप अक्षरतत्त्वास परब्रह्म म्हणतात. हेच परब्रह्म 'भगवत्' शब्दाचा मुख्य वाचार्थ आहे. पूजा आदींनी त्याची उपासना हा औपचारिक (गौण) भाग आहे. 'भगवत्' शब्दातील 'भकार' दोन अर्थांचा आहे. एक पोषण करणारा व सर्वांचा आधार. 'गकारा'चा अर्थ आहे नेता (कर्मफलाची प्राप्ती करून देणारा), गमयिता (प्रेरक) आणि स्रष्टा (सृष्टी करणारा). संपूर्ण, ऐश्वर्य, पराक्रम, धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य, या सहांना 'भग' म्हणतात. विष्णूंत सर्व भूतांचा निवास असतो. हे

भगवान सर्वांचे धारक असून ब्रह्मदेव, विष्णू आणि शिव या तीनही रूपांत ते शोभतात. सर्व प्राण्यांची उत्पत्ती, विनाश, आवागमन, विद्या-आवागमन, विद्या-अविद्या यांना जाणणारे भगवान होत. दुर्गुणांचा त्याग, संपूर्णज्ञान, शक्ती, परमऐश्वर्य, वीर्य, तेज, हे 'भगवत्' शब्दाचे वाच्यार्थ आहेत.

यानंतर या विवेचनासाठी केशिध्वजानें खांडिक्यजनकास जो उपदेश केला होता त्याचा सारांश दिला आहे. यम, नियम, प्रत्याहार, प्राणजय, प्राणायाम, इंद्रियविजय, इत्यादी उपायांनी चित्ताची एकाग्रता वाढवावी. ब्रह्म हेच त्या शुभचित्ताचे आश्रयस्थान आहे. ते 'मूर्त' व 'अमूर्त' या दोन प्रकारचे असते. सनक, सननंदन आदी मुनी ब्रह्म-भावनेनें युक्त आहेत. देवतांपासून स्थावरजंगमपर्यंत सर्व प्राणी काम-भावनेनें युक्त आहेत. हिरण्यगर्भात ब्रह्मभावना व कर्मभावना, या दोनही असतात. संपूर्ण विश्व ब्रह्म आहे, या भावनेनें ब्रह्माची उपासना केली पाहिजे. जेव्हा सर्व भेद शांत होतात, जो सत्तामात्र असून वाणीस अगोचर आहे, जो स्वसंवेद्य आहे तोच ब्रह्मज्ञानरूप असतो. रूपहीन विष्णूंचे हेच उत्कृष्ट स्वरूप आहे. ते अजन्मा व अविनाशी आहेत. अमूर्तरूपाचे ध्यान प्रथम अवघड वाटते, म्हणून मूर्ताचे चिंतन करावे. असे केल्यानें मनुष्य भगवद्भावास पोचतो. परमात्म्याशी एकरूप होतो. अभिन्न होतो. भेदाची प्रचीती अज्ञानजन्य असते.

## जडभरत व सौवीरनरेश यांचा संवाद– अद्वैत ब्रह्मज्ञान

पुढल्या तीनशेऐंशिव्या अध्यायात जडभरतानें सौवीरनरेशास सांगितलेले अद्वैत ब्रह्मज्ञान विवरून सांगितले आहे. प्राचीनकाळी राजा भरत शालग्रामक्षेत्रात राहून भगवान वासुदेवांची पूजा करून तपस्येत मग्न होता. त्याची आसक्ती एका मृगात निर्माण झाली. अंतकाली त्याचेच स्मरण करून त्यानें प्राण सोडला. तेव्हा त्याला मृगाचा जन्म आला. तो 'जातिस्मर' या सिद्धीनें युक्त असल्यानें त्याला पूर्वजन्माचे स्मरण होते. त्यानें नंतर मृगरूप सोडून योगबलानें एका ब्राह्मणाच्या पुत्रात तो प्रकट झाला. त्याला संपूर्ण अद्वैताचा बोध झाला होता. तो

साक्षात ब्रह्मस्वरूपच होता.

लोकांत तो जडवत् व्यवहार करायचा. त्याला हृष्टपुष्ट पाहून सौवीरनरेशानें कामास जुंपले. राजाची पालखी वाहाणारा तो झाला. त्याची गती मंद होती. इतर वाहाणारे शीघ्र गतीचे होते. त्याचे मंदत्व पाहून सौवीरनरेश म्हणाला,

'अरे, इतर पाहा कसे गतिवान आहेत. तू नवा मनुष्य अति मंद आहेस. अरे, तू थकलास की काय? परिश्रम होत नाहीत? तू तर चांगला जाडाजुडा दिसतोस.'

तेव्हा भरत राजाला म्हणाला, 'राजन्, मी जाडाजुडा नाही. मी आपली पालखी घेतलेली नाही. मला थकावट आलेली नाही. मला परिश्रम पडत नाहीत. माझ्यावर तुमचा कसलाही भार नाही. पृथ्वीवर माझे दोन पाय आहेत. पायांवर मांड्या आहेत. त्यांवर पोट आहे. त्यावर वक्षःस्थल आहे. हात आहेत. खांदे आहेत. त्या खांद्यांवर पालखी आहे. मग माझ्यावर कसलं ओझं आहे? या पालखीत तुमचं म्हटलं जाणारं शरीर आहे. वास्तवात तुम्ही पालखीत आहात, मी पृथ्वीवर आहे, या दोनही गोष्टी मिथ्या आहेत! सौवीरनरेश, मी, आपण, या पृथ्वीवर जितके जीव आहेत त्यांचा भार या पंचमहाभूतांवर पडतो. पृथ्वीनाथ, सत्त्वादी गुणांच्या अधीन कर्मे असतात. कर्मे अविद्येच्या द्वारे होतात. आत्मा तर शुद्ध, अक्षर, शांत, निर्गुण, प्रकृतीच्या पलीकडचा आहे. सर्व प्राणिमात्रांत एकच आत्मा आहे. त्याची कधी वृद्धी होत नाही. कधी ऱ्हास होत नाही. मग तुम्ही 'मी चांगला जाडाजुडा आहे' असं कसं म्हटलंत? पालखी मला भार वाटते, तसेच तुम्हीही पृथ्वीस भार आहात. सर्व जीवजंतू, हे पर्वत, झाड, घर या सर्वांचा भार पृथ्वीला सहन करावा लागतो. नरेश, थोडा विचार तर करून पाहा. माझ्यावर कोणता भार पडलेला आहे? ज्या द्रव्यांनी ही पालखी बनली आहे तीच द्रव्यं तुमच्यांत, माझ्यात, सर्व प्राण्यांत असतात. सर्वांना समान द्रव्यांनी पुष्टी येते.'

या ब्राह्मणाचे हे शब्द ऐकताच राजा पालखीतून उतरला व त्याने त्याचे पाय पकडून क्षमा मागितली व तो म्हणाला, 'भगवन्, आपण

पालखी सोडून द्यावी. माझ्यावर कृपा करावी. मी आपल्या मुखातून काही ऐकू इच्छितो. मला उपदेश द्यावा. आपण कोण आहात ? आपलं आगमन इथं कशासाठी झालं ?'

'राजन्, ऐक. 'मी अमुक आहे' असं मी म्हणू शकत नाही. आत्म्यासाठी 'अहम्' शब्द, अनात्म्यात आत्मत्वाचा बोध करणारा 'अहम्' शब्द दोषपूर्ण आहे. सर्व शरीरात एकच आत्मतत्त्व असताना तुम्ही कोण ? मी कोण ? हे प्रश्न व्यर्थ आहेत. राजा, तू राजा आहेस. ही पालखी आहे. आम्ही तिचे वाहक आहोत, असं जे म्हटले जातं ते सत्य नाही. वृक्षापासून लाकूड तयार होतं. लाकडापासून ही पालखी बनली आहे हीत तुम्ही बसला आहात. सौवीरनरेश, या वृक्षाचं, या लाकडाचं नाव काय आहे ? 'महाराज वृक्षावर, लाकडावर बसले आहेत' असं नाही कुणी म्हणणार. पण नृपश्रेष्ठा, पालखी काय आहे ? रचनाकारानं लाकडास विशिष्ट आकार दिला आहे. म्हणून हा पुरुष, ही स्त्री, ही गाय, हा घोडा, हा हत्ती, हा वृक्ष अशा कर्मजनित भिन्न भिन्न नामांचा बोध होतो. या संज्ञा लोककल्पित आहेत. जीभ 'अहम्'चा उच्चार करते. दांत, ओठ, तालू, कंठ यांच्यांतूनही उच्चार होतात. पण ते 'अहम्'पदाचे वाच्यार्थ नसतात. कारण ते शब्दोच्चाराची साधनं असतात. वाणीच अहम्च्या रूपानं प्रकटते.

'राजा, मस्तक व गुदस्थान यांनी युक्त असणारे हे शरीर. पुरुष (आत्मा) याहून सर्वथा भिन्न आहे. म्हणून कोणत्या अवयवास 'अहम्' म्हणायचं ? भूपालशिरोमणे, 'मी आहे', 'तुम्ही आहात' असं म्हटलं जातं. पण वास्तवात पर्वत, पशू, वृक्ष आदींचा भेद सत्य नाही. शरीर-भेद कर्मजन्य असतात. राजा-सेवक हे भेदही असेच आहेत ! पृथ्वी-नाथ, तुम्ही सर्व लोकांचे राजे आहात. आपल्या पित्याचे पुत्र आहात. शत्रूचे शत्रू आहात. धर्मपत्नीचे पती आहात. पुत्राचे पिता आहात. यांपैकी कोणत्या नावानं मी तुम्हांस हाक मारू ? हे मस्तक तुमचं, हे उदर तुमचं, हे पाय तुमचे, या सर्वांहून वेगळं होऊन 'मी कोण आहे ?' याचा विचार करावा.'

'ब्रह्मन्, मी आत्मकल्याणाच्या इच्छेनं महर्षी कपिलांकडं निघालो होतो. पण आज आपणच मला ज्ञान दिलंत. या ज्ञानरूपी महासागराची प्राप्ती कशी होईल ? कल्याणाची सिद्धी कशी होईल ? मला उपाय सांगावा.'

'राजन्, तुम्ही पुन्हा कल्याणाचा प्रश्न विचारलात. परमार्थ काय आहे ? असं नाही विचारलंत ! परमार्थच सर्व प्रकारचं कल्याण करणारा आहे. मनुष्य देवादिकांची आराधना करून धनसंपत्तीची इच्छा करतो. पुत्र व राज्य मागतो. पण राजा, हेंच का देवास मागावं ? विवेकी मनुष्य परमात्म्याची प्राप्ती मागतो. परमात्मा व आत्मा यांचा संयोग, या एकत्वाचा बोध हाच खरा परमार्थ आहे. परमात्मा एक व अद्वितीय आहे. तोच व्यापक, शुद्ध, निर्गुण, प्रकृतीच्या पलीकडचा, जन्मवृद्धी यांनी रहित, सर्वगत, अविनाशी, उत्कृष्ट, ज्ञानस्वरूप, गुणजातींनी रहित असा विभू आहे. आता मी तुम्हांस निदाघ व ऋभू यांचा संवाद ऐकवितो. नीट ध्यान देऊन ऐका.' जडभरतानें हा संवाद राजाला ऐकविला.

ऋतू अथवा ऋभू हा ब्रह्मदेवांचा पुत्र मोठा ज्ञानी होता. त्याच्यापाशी ज्ञान घेऊन निदाघ देविकानदीच्या तटावरील एका नगरात राहू लागला. ऋभूनें आपल्या शिष्याचा पत्ता शोधला व तो हजार दिव्य वर्षांनी निदाघास पाहाण्यासाठी निघाला. त्या वेळी निदाघ बलिवैश्वदेव करून, भोजन करून आपल्या शिष्याला म्हणत होता, 'भोजनानंतर मला तृप्ती आली. भोजनच अक्षय तृप्ती देणारं आहे.' त्यावर ऋभूनें विचारले,

'ज्याला भूक लागते त्याची तृप्ती भोजनानं होते. मला तर कधीच भूक लागत नाही. मग माझी तृप्ती कशानं होईल ? भूक व तहान हे तर देहाचे धर्म आहेत. मला आत्म्याला हे कधीच स्पर्श करीत नाहीत. मी तर सदाच तृप्त आहे. पुरुष (आत्मा) आकाशाप्रमाणं सर्वत्र व्यापक आहे. म्हणून 'मी कुठून आलो ? कुठं निघालो आहे ?' हे प्रश्न ठीक नाहीत. मी कुठंच जात नाही. कुठून आलो नाही. तू माझ्याहून, मी तुझ्याहून भिन्न नाही. पार्थिव देहच पार्थिव अन्नाच्या

परिमाणूंनी पुष्ट होतो. ब्रह्मन्, मी तुझा आचार्य ऋभू आहे. तुला ज्ञान देण्यासाठी इथं आलो आहे. आता परत जातो. तुला ज्ञानाचा उपदेश दिला आहे. हे सर्व जगत एकमात्र वासुदेवसंज्ञक परमात्म्याचं रूप समज. यात भेदाचा अभाव आहे.'

जडभरताने ही कथा सांगून म्हटले, 'राजा, त्या उपदेशानं निदाघ अद्वैतपरायण झाला. सर्व प्राण्यांना तो स्वतःहून अभिन्नरूपात पाहू लागला. त्यानं ज्ञानानं मोक्ष मिळविला. त्याप्रकारे तूही मोक्ष प्राप्त करून घे. हे सर्व जग एकाच व्यापक विष्णूंनी भरलेलं आहे.'

जडभरताच्या या उपदेशाने सौवीरनरेश बंधनातून मुक्त झाला. ज्ञानस्वरूप ब्रह्मच या अज्ञानमय संसारवृक्षाचा शत्रू आहे, याचे निरंतर चिंतन करावे.

## गीतासार आणि यमगीता

तीनशेएक्याऐंशिव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनास सांगितलेल्या गीतेचे सार सांगितले आहे. हे भोग व मोक्ष देणारे आहे. सर्व अध्यायांचे सुबोध व मार्मिक सार सांगितल्यावर पुढल्या तीनशे-ब्याऐंशिव्या अध्यायात अग्निदेवांनी 'यमगीता' निवेदन केली आहे. यमराजाने ही नचिकेतास सांगितली होती. ही वाचून, ऐकून मोक्षाची प्राप्ती होते. यमराजाने सांगितले आहे,

अहो, केवढी आश्चर्याची गोष्ट आहे! मनुष्य अत्यंत मोहात पडून, अस्थिर चित्त होऊन आसन, शय्या, वाहन, वस्त्रादी, गृहादी भोगांना सुस्थिर मानून प्राप्त करू इच्छितो. पण भगवान कपिलांनी सांगितले आहे, 'भोगांत आसक्तीचा अभाव असावा. सदा आत्म-तत्त्वाचं चिंतन करावं. त्यातच मनुष्याचं परम कल्याण आहे.' 'सर्वत्र समतापूर्ण दृष्टी आणि ममता, अनासक्त होणं, हीच मनुष्यास कल्याण-कारक साधनं आहेत' असे आचार्य पंचशिखांनी म्हटले आहे.

आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक दुःखांना आदिअंत असतो. ती उत्पन्न होतात, नष्ट होतात. यांना क्षणिक समजून धैर्यपूर्वक सहन केलं पाहिजे. विचलित होता कामा नये. या प्रकारे दुःखाचा प्रतिकार

केल्यानेंच मनुष्याचे परम कल्याण होते, हे महाराज जनकाचे मत आहे. जीवात्मा व परमात्मा वस्तुतः अभिन्न आहेत. त्यांच्यात भेदाची जी प्रचीती येते तिचे निवारण करणे हीच परम कल्याणदायक गोष्ट आहे, असा ब्रह्मदेवांचा एक सिद्धान्त आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद यांत जे कर्म सांगितले आहे, त्याला आपले कर्तव्य समजून अनासक्त भावाने ते करणे हेच उत्तम साधन आहे, असे जैगीषव्यानें म्हटले आहे. सर्व कर्मांची आकांक्षा सोडून आत्म्याच्या सुखाचे साधन बनावे, हे देवलांचे मत आहे. कामनांच्या त्यागानें विज्ञान, सुख, ब्रह्म व परमपदाची प्राप्ती होते, असा सनकादींचा सिद्धान्त आहे.

काही म्हणतात, प्रवृत्ती व निवृत्ती या दोनही प्रकारची कर्मे करावीत. पण नैष्कर्म हेच ब्रह्म आहे. हेच भगवान विष्णूंचे स्वरूप आहे. श्रेयाचे श्रेय हेच आहे. ज्ञान, विज्ञान, आस्तिकता, सौभाग्य, उत्तम रूप या गोष्टी तपस्येने प्राप्त होतात. तपस्येने मनुष्याला सर्व गोष्टी प्राप्त होतात. विष्णूंशिवाय कोणते ध्येय नाही. निराहार राहाण्या-सारखी तपस्या नाही. आरोग्यासारखी बहुमोल वस्तू नाही. गंगेसारखी दुसरी नदी नाही. जगद्गुरू भगवान विष्णूंखेरीज दुसरा कोणी बांधव नाही.

नास्ति विष्णुसमं ध्येयं तपो नानशनात् परम् ।
नास्त्यारोग्यसमं धन्यं नास्ति गंगासमा सरित् ।
न सोऽस्ति बान्धवः कश्चिद् विष्णुमुक्त्या जगद्गुरुम् ।।
(३८२.१४.१५)

खाली, वर, मागे, पुढे, देह, इंद्रिये, मन, सुख यांत सर्वत्र भगवान श्रीहरीच आहे. अशा प्रकारे भगवानांचे चिंतन करावे. तो साक्षात श्रीहरीस जाऊन प्राप्त होईल. ब्रह्माच्या रूपातच भगवान विष्णू सर्वांच्या हृदयात विराजमान असतात. तेच यज्ञाचे स्वामी, यज्ञस्वरूप आहेत. त्यांना कोणी परब्रह्माच्या रूपानें, कोणी विष्णुरूपानें, कोणी शिवरूपाने, कोणी ब्रह्मरूपाने, कोणी इंद्ररूपानें, कोणी सूर्य, चंद्र, काळ यांच्या रूपांनी जाणतात. ते भगवान विष्णूच परब्रह्म आहेत.

आत्म्यास ‘ रथी ’ समजावे. शरीरास ‘ रथ ’ मानावे. बुद्धीस ‘ सारथी ’ समजावे. मनास ‘ लगाम ’ मानावे. विवेकी पुरुष इंद्रियांना ‘अश्व’ समजतो. विषयांना ‘ मार्ग ’ समजतो. शरीर, इंद्रिये, मनासहित आत्मा ‘ भोक्ता ’ असतो. विवेकी मनुष्य मनास काबूत ठेवून त्या परम-पदाची प्राप्ती करून घेतो. तोच संसाररूपी मार्ग पार करतो. विष्णूंच्या परमपदास जातो. यम, नियम आदी साधनांनी ब्रह्म व आत्मा यांची एकता जाणून मनुष्य सत्स्वरूपी ब्रह्मपदास जातो. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह हे पांच यम; शौच, संतोष, उत्तम तप, स्वाध्याय, ईश्वरपूजा हे पांच नियम; आसन, पद्मासन, प्रत्याहार, धारणा, ध्यान, ‘ मी ब्रह्म आहे ’ अशा भावनेनें साधलेली समाधी या मार्गाने मनुष्य ब्रह्मरूप होतो. ज्ञानानेच जीव स्वतःस ब्रह्मरूप मानतो. अशी ही यम-गीता * वाचणारा व ऐकणारा मोक्षपदास जातो.

# ७ उपसंहार व महिमा

## अध्यायाचा पाठ गोदानापेक्षा श्रेष्ठ

शेवटच्या तीनशेंत्र्याऐंशिव्या अध्यायात अग्निदेवांनी या पुराणांचा उपसंहार सांगून माहात्म्यही वर्णन केले आहे. अग्निपुराण हे ब्रह्मस्वरूप आहे. यात कधी संक्षेपाने वा कधी विस्ताराने ‘ परा ’ व ‘ अपरा ’ या दोनही विद्यांचे प्रतिपादन केले आहे. हे एक महापुराण आहे. वेदविद्या, विष्णुमहिमा, संसारदृष्टी, छंद, शिक्षा, व्याकरण, निघंटू, ज्योतिष, निरुक्त, धर्मशास्त्र, मीमांसा, न्यायशास्त्र, आयुर्वेद, पुराणविद्या, गंधर्व-

---

* ही ‘ यमगीता ’ कठोपनिषदातील ‘ यम-नचिकेता-संवाद ’ यावर आधारलेली आहे.

वेद, अर्थशास्त्र, वेदान्त, परमेश्वर; या सर्व 'अपरा विद्या' आहेत व परम अक्षरतत्त्व 'पराविद्या' आहे. या पुराणांत या दोनही विद्यांचे महत्त्व विशद केले आहे. सर्व काही विष्णुमयच आहे, असा ज्याचा भाव आहे, त्याला कलियुगाची बाधा होत नाही. त्यांचेच ध्यान करावे, चिंतन करावे. त्यांचीच कथा ऐकावी. केशवांचे कीर्तन हेच 'कर्म' आहे. श्रीकृष्णांच्या प्रसन्नतेसाठी ते करावे.

जो उत्कृष्ट परमार्थमार्ग पिता पुत्रास देणार नाही, गुरू शिष्यास देणार नाही, तो हे अग्निपुराण वाचकास दाखवील. या जगात स्त्री, पुरुष, पुत्र, धन, वैभव; सर्व काही मिळेल. परंतु असा उपदेश नाही मिळायचा. प्राण्यांची सृष्टी दोन प्रकारची असते. एक 'दैवी' व दुसरी 'आसुरी'. विष्णुभक्तीत रमणारी दैवी व तीपासून विमुख होणारी आसुरी होय. हे अग्निपुराण परमपवित्र, आरोग्य व धन देणारे, दुःस्वप्नांचा नाश करणारे, मनुष्यांना सुख व आनंद देणारे आहे. भव-बंधनापासून मोक्ष देणारे आहे. ज्या घरात हस्तलिखित अग्निपुराणाची पोथी आहे, तेथे उपद्रव होत नाही. प्रतिदिन अग्निपुराण ऐकणारा आहे त्यास तीर्थसेवन, गोदान, यज्ञ, उपवास यांची काय आवश्यकता आहे? जो प्रतिदिन एक प्रस्थ तिल व एक मासा सुवर्ण यांचे दान करून अग्निपुराणाचा एक श्लोक ऐकील त्याला त्या दानांचे फल प्राप्त होईल. याच्या एका अध्यायाचा पाठ गोदानापेक्षा श्रेष्ठ आहे. या पुराणश्रवणाच्या इच्छेनेच सारी पापे नष्ट होतात. वृद्धपुष्करतीर्थात शंभर कपिलांचे दान करून जे फल मिळते, ते अग्निपुराणाचा पाठ करून मिळेल.

## चारही वर्णांना उपयुक्त

'प्रवृत्ती' व 'निवृत्ती', 'परा' व 'अपरा' या सर्व विद्यांचे वर्णन या अग्निपुराणात आहे. प्रतिदिन अग्निपुराण ऐकणारा मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. जेथे अग्निपुराण असेल तेथे विघ्ने, बाधा, रोग, चोर, अनर्थ, गर्भपाताचे भय, पिशाच इत्यादींचा वास राहाणार नाही. या पुराणाच्या पाठाने ब्राह्मण वेदवेत्ता होईल. क्षत्रिय राजा

होईल. वैश्य धनवान होईल. शूद्र निरोगी होईल. अग्निपुराण प्रतिदिन ऐकणारा दिव्य, आंतरिक्ष व भौम आदी सर्व अपायांपासून मुक्त होईल. हेमंतऋतूत या पुराणाचे श्रवण करणाऱ्यास अग्निष्टोमयज्ञाचे फल मिळेल. शिशिरऋतूत श्रवण करणाऱ्यास अश्वमेधयज्ञाचे फल प्राप्त होईल. अशीच वाजपेय यज्ञ, राजसूययज्ञ यांची प्राप्ती पुराण ऐकणाऱ्यास होईल. ज्या घरी या पुराणाची पूजा होईल त्याला सतत विजय, भोग व मोक्ष यांची प्राप्ती होईल. हे अग्निपुराण ब्रह्मविद्या व अद्वैतज्ञान यांची प्राप्ती करून देणारे आहे.

## समृद्ध अग्निपुराण

पूर्वी वसिष्ठांच्या मुखातून ऐकलेले हे अग्निपुराण व्यासांनी सूताला सांगितले. हे परमपद प्राप्त करून देणारे आहे. ब्रह्म व वेद-स्वरूप असणारे हे पुराण पुरुषास श्रीहरींची प्राप्ती करून देणारे आहे. विद्यार्थ्यांना विद्या, राजांना राज्य, पुत्रहीनांना पुत्र. सौभाग्यकांक्षींना सौभाग्य, मोक्षाची इच्छा करणाऱ्यांना मोक्ष देणारे हे पुराण आहे. हे अग्निपुराण ब्रह्मरूप आहे. अग्निदेव या पुराणाचे वक्ते आहेत. म्हणून याला 'आग्नेयपुराण' असेही म्हणतात. याला वेदतुल्य मानले आहे. भोग व मोक्ष देणारे हे एक मोठेच साधन आहे. या पुराणापेक्षा श्रेष्ठ शास्त्र नाही, उत्तम श्रुती नाही. श्रेष्ठ ज्ञान नाही. उत्कृष्ट स्मृती नाही. आगम, विद्या, सिद्धान्त यांपेक्षा श्रेष्ठ व मंगल नाहीत. यापेक्षा वेदान्तही श्रेष्ठ नाही. हे पुराण सर्वोत्कृष्ट आहे. या पृथ्वीवर अग्निपुराणापेक्षा श्रेष्ठ व दुर्लभ अशी दुसरी कोणतीच वस्तू नाही.

या अग्निपुराणात सर्व विद्यांचा परिचय आहे. मत्स्यादी अव-तारांच्या कथा आहेत. गीता, रामायण, हरिवंश, महाभारत यांचाही परिचय यात आहे. सृष्टीचे दिग्दर्शन, वैष्णवआगम, देवतांची स्थापना, दीक्षाविधी, प्रतिमेचे लक्षण, मंदिराचे लक्षण, भोग व मोक्ष देणारे मंत्र, ब्रह्माण्ड-भुवनकोश यांची वर्णने, द्वीपे, सागर, वर्षे, नद्या; इत्यादींची वर्णने, तीर्थांची माहात्म्ये, नक्षत्रमंडल, ज्योतिष, युद्धजयवर्णन, वर्णा-श्रमधर्म, द्रव्यशुद्धी, प्रायश्चित्तविधी, राजधर्म, दानधर्म, नाना व्रते,

व्यवहार, शांतिकर्मे, धनुर्वेद, वैद्यक, गांधर्ववेद, अर्थशास्त्र, मीमांसा, न्याय, पुराणमाहात्म्य, छंद, व्याकरण, अलंकार, कल्प; इत्यादींनी हे पुराण समृद्ध बनले आहे. प्रलय, वेदान्त, ब्रह्मज्ञान, अष्टांगयोग, अक्षर-तत्त्वाचे निरूपण यांनी संपन्न असलेले हे पुराण पंधरा हजार श्लोकांचे आहे. एक कोटी श्लोकांचे हे पूर्वी होते. पण लोकांच्या हितासाठी अग्निदेवांनी हे संक्षेपाने पुन्हा कथन केले. हे संपूर्ण पुराण ब्रह्ममय आहे. याच्या सेवनाने मनुष्य कुलासहित स्वर्गास जाईल.

पुराणश्रवणाने मनोवांच्छित फलाची प्राप्ती होईल. श्रवणानंतर ब्राह्मणास भोजन द्यावे. या पुस्तकास चांगली पेटी करावी. अग्निपुराणाचे दान करणारा ब्रह्मलोकास जाईल. ज्या घरी हे पुराण असेल त्याच्या येथे उत्पातांचे भय राहणार नाही. भोग व मोक्ष यांची प्राप्ती करून देणारे हे पुराण ईश्वररूप मानून त्याचे स्मरण करावे.

# ८ स्तोत्रमंजूषा

## १. अपामार्जनविधानस्तोत्र

पराभिध्यानसहितैः प्रयुक्तं चाभिचारिकम् ।
गरस्पर्शमहारोगप्रयोगं जरया जर ।। १ ।।
ॐ नमो वासुदेवाय नमः कृष्णाय खड्गिने ।
नमः पुष्करनेत्राय केशवायादिचक्रिणे ।। २ ।।
नमः कमलकिञ्जल्कपीतनिर्मलवाससे ।
महाहवरिपुस्कन्धघृष्टचक्राय चक्रिणे ।। ३ ।।

दंष्ट्रोद्धृतक्षितिभृते त्रयीमूर्तिमते नमः ।
महायज्ञवराहाय शेषभोगाङ्कशायिने ।। ४ ।।
तप्तहाटककेशान्तज्वलत्पावकलोचन ।
वज्राधिकनखस्पर्श दिव्यसिंह नमोऽस्तु ते ।। ५ ।।
काश्यपायातिह्रस्वाय ऋग्यजुःसामभूषिणे ।
तुभ्यं वामनरूपायाक्रमते गां नमो नमः ।। ६ ।।
वराहशेषदुष्टानि सर्वपापफलानि वै ।
मर्द मर्द महादंष्ट्र मर्द मर्द च तत्फलम् ।। ७ ।।
नारसिंह करालास्य दन्तप्रान्तानलोज्ज्वल ।
भञ्ज भञ्ज निनादेन दुष्टान् पश्यार्तिनाशन ।। ८ ।।
ऋग्यजुःसामगर्भाभिर्वाग्भिर्वामनरूपधृक् ।
प्रशमं सर्वदुःखानि नवत्वस्य जनार्दन ।। ९ ।।
ऐकाहिकं द्वयाहिकं च तथा त्रिदिवसं ज्वरम् ।
चातुर्थिकं तथात्यु तथैव सततं ज्वरम् ।। १० ।।
दोषोत्थं संन्निपातोत्थं तथैवागन्तुकं ज्वरम् ।
शमं नयाशु गोविन्द च्छिन्धि च्छिन्ध्यस्य वेदनाम् ।।११।।

(३१. ९–१९)

दुसऱ्यांचे अनिष्ट चिंतणाऱ्या लोकांकडून जे अभिचारकर्म घडते, विषमिश्रित अन्नपानाचा, महारोगाचा प्रयोग होतो, त्या सर्वांना जराजीर्ण करून टाकावे, जीर्ण करून टाकावे.

ॐ भगवान वासुदेवांना नमस्कार असो. खड्‌गधारी श्रीकृष्णांना नमस्कार असो. आदिचक्रधारी कमलनयन केशवांना नमस्कार असो. कमलपुष्पाच्या केसरांप्रमाणे पीतनिर्मल वस्त्र धारण करणाऱ्या भगवान पीतांबरांस नमस्कार असो. जे महासमरात शत्रूंच्या स्कधांनी घृष्ट होते, असे चक्र चालविणाऱ्या भगवान चक्रपाणींना नमस्कार असो. आपल्या दाढांनी उचललेल्या पृथ्वीस धारण करणाऱ्या वेदविग्रहास,

शेषशय्याशायी महान यज्ञवराहांना नमस्कार असो. दिव्यसिंह, आपण केशान्त प्रतप्त सुवर्णाप्रमाणे कांतिमान आहात. आपले नेत्र प्रज्वलित पावकाप्रमाणे तेजस्वी आहेत. आपल्या नखांचा स्पर्श वज्रापेक्षाही तीक्ष्ण आहे. आपणांस नमस्कार असो. अत्यंत लघुकाय व ऋग्, यजू, साम या तीन वेदांनी भूषित आपण कश्यपकुमार वामन आहात. आपणांस नमस्कार असो. पुन्हा विराटरूपानें पृथ्वीस उल्लंघिणाऱ्या आपल्या त्रिविक्रमास नमस्कार असो.

वराहरूपी नारायणा, समस्त पापांच्या फलरूपांनी प्राप्त होणाऱ्या सर्व दुष्ट रोगांना आपण नष्ट करावे. नष्ट करावे. मोठमोठ्या दाढा असणाऱ्या महावराहा, पापजनित फलास नष्ट करावे. नष्ट करावे. विकटानन नृसिंहा, आपला दंतप्रांत अग्नीसारखा जाज्वल्यमान आहे. आर्तिनाशना, आक्रमण करणाऱ्या दुष्टांना आपण रोखावे. आपल्या दाढेनें या सर्वांचा नाश करावा. नाश करावा. वामनरूपधारी जनार्दना, ऋक्, यजु: व सामवेद यांच्या गूढतत्त्वांनी भरलेल्या वाणीद्वारे या सर्व आर्तजनांच्या सर्व दु:खांचे आपण शमन करावे. गोविंदा, यांचे त्रिदोषज, संनिपातज, आगन्तुक, ऐकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक आणि अत्यंत उग्र असा चातुर्थिक ज्वरास व सतत राहाणाऱ्या ज्वरासही आपण त्वरित शांत करावे. त्यांची वेदना मिटवावी. मिटवावी.

## २. द्वादशाक्षरस्तोत्र

ॐरूप: केशव: पद्मशंखचक्रगदाधर: ।
नारायण: शङ्खपद्मगदाचक्री प्रदक्षिणम् ।। १ ।।

नतो गदी माधवोऽरिशङ्खपद्मी नमामि तम् ।
चक्रकौमोदकीपद्मीशङ्खी गोविन्द ऊर्जित: ।। २ ।।

मोक्षद: श्रीगदी पद्मी शङ्खी विष्णुश्च चक्रधृक् ।
शङ्खचक्राब्जगदिनं मधुसूदनमानमे ।। ३ ।।

भक्त्या त्रिविक्रमः पद्मगदी चक्री च शङ्ख्यपि।
शङ्खचक्रगदापद्मी वामनः पातु मां सदा ॥ ४ ॥
गतिदः श्रीधरः पद्मी चक्रशार्ङ्गी च शङ्ख्यपि ।
हृषीकेशो गदी चक्री पद्मी शङ्खी च पातु नः ॥ ५ ॥
वरदः पद्मनाभस्तु शङ्खाब्जारिगदाधरः ।
दामोदरः पद्मशङ्खगदाचक्री नमामि तम् ॥ ६ ॥
तेने गदी शङ्खचक्री वासुदेवोऽब्जभृज्जगत् ।
संकर्षणो गदी शङ्खी पद्मी चक्री च पातु वः ॥ ७ ॥
वादी चक्री शङ्खगदी प्रद्युम्नः पद्मभृत्प्रभुः ।
अनिरुद्धश्चक्रगदी शङ्खी पद्मी च पातु नः ॥ ८ ॥
सुरेशोऽर्यब्जशङ्खाढ्यः श्रीगदी पुरुषोत्तमः ।
अधोक्षजः पद्मगदी शङ्खचक्री च पातु वः ॥ ९ ॥
देवो नृसिंहश्चक्राब्जगदी शङ्खी नमामि तम् ।
अच्युतः श्रीगदी पद्मी चक्री शङ्खी च पातु वः ॥ १० ॥
बालरूपी शङ्खगदी उपेन्द्रश्चक्रपद्म्यपि ।
जनार्दनः पद्मचक्री शङ्खधारी गदाधरः ॥ ११ ॥
यज्ञः शङ्खी पद्मचक्री हरिः कौमदकीधरः ।
कृष्णः शङ्खी गदी पद्मी चक्री मे भुक्तिमुक्तिदः ॥ १२ ॥
आदिमूर्तिर्वासुदेवस्तस्मात्संकर्षणोऽभवत् ।
संकर्षणाच्च प्रद्युम्नः प्रद्युम्नादनिरुद्धकः ॥ १३ ॥
केशवादिप्रभेदेन एकैकः स्यात्त्रिधा क्रमात् ॥ १४ ॥
द्वादशाक्षरकं स्तोत्रं चतुर्वींशतिमूर्तिमत् ।
यः पठेच्छृणुयाद्वाऽपि निर्मलः सर्वामाप्नुयात् ॥ १५ ॥
(४८. ९–१९)

या स्तोत्राचा अर्थ या ग्रंथाच्या पृष्ठे ९९ व १०० वर कृपया पाहावा.

## ३. समस्त पापनाशक स्तोत्र

विष्णवे विष्णवे नित्यं विष्णवे विष्णवे नमः।
नमामि विष्णुं चित्तस्थमहंकारगतिं हरिम् ॥ १॥
चित्तस्थमीशमव्यक्तमनन्तमपराजितम्।
विष्णुमीडचमशेषेण अनादिनिधनं विभुम् ॥ २॥
विष्णुश्चित्तगतो यन्मे विष्णुर्बुद्धिगतश्च यत्।
यच्चाहंकारगो विष्णुर्यद्विष्णुर्मयि संस्थितः ॥ ३॥
करोति कर्मभूतोऽसौ स्थावरस्य चरस्य च ॥
तत् पापं नाशमायातु तस्मिन्नेव हि चिन्तिते ॥ ४॥
ध्यातो हरति यत् पापं स्वप्ने दृष्टस्तु भावनात्।
तमुपेन्द्रमहं विष्णुं प्रणतार्तिहरं हरिम् ॥ ५॥
जगत्यस्मिन्निराधारे मज्जमाने तमस्यधः।
हस्तावलम्बनं विष्णुं प्रणमामि परात्परम् ॥ ६॥
सर्वेश्वरेश्वर विभो परमात्मन्नधोक्षज।
हृषीकेश हृषीकेश हृषीकेश नमोऽस्तु ते ॥ ७॥
नृसिंहानन्त गोविन्द भूतभावन केशव।
दुरुक्तं दुष्कृतं ध्यातं शमयाघं नमोऽस्तु ते ॥ ८॥
यन्मया चिन्तितं दुष्टं स्वचित्तवशवर्तिना।
अकार्यं महदत्युग्रं तच्छमं नय केशव ॥ ९॥
ब्रह्मण्यदेव गोविन्द परमार्थपरायण।
जगन्नाथ जगद्धातः पापं प्रशमयाच्युत ॥ १०॥
यथापराह्णे सायाह्णे मध्याह्णे च तथा निशि।
कायेन मनसा वाचा कृतं पापमजानता ॥ ११॥
जानता च हृषीकेश पुण्डरीकाक्ष माधव।
नामत्रयोच्चारणतः पापं यातु मम क्षयम् ॥ १२॥

(१७२. १–१८)

सर्वव्यापी विष्णूंना सदा नमस्कार असो. श्रीहरी विष्णूंना नमस्कार असो. मी आपल्या चित्तात स्थित असणाऱ्या सर्वव्यापी, अहंकारशून्य श्रीहरींना नमस्कार करतो. मी आपल्या मनात विराजमान असलेल्या, अव्यक्त, अनंत व अपराजित परमेश्वरास नमस्कार करतो. सर्वांचे पूजनीय, जन्ममरणरहित, प्रभावशाली श्रीविष्णूंना नमस्कार असो. विष्णू माझ्या चित्तात निवास करतात. विष्णू माझ्या बुद्धीत विराजमान आहेत. विष्णू माझ्या अहंकारात प्रतिष्ठित आहेत. विष्णू माझ्यातच स्थित आहेत. ते विष्णूच चराचर प्राण्यांच्या कर्मांच्या रूपात स्थित आहेत. त्यांच्या चिंतनाने माझ्या पापाचा नाश व्हावा. जे ध्यान करताच सर्व पापांचे हरण करतात, भावना करताच, जे स्वप्नात दर्शन देतात, जे इंद्राचे अनुज आहेत, जे शरणागतांचे दुःख दूर करतात, त्या पापहारी विष्णूंना मी नमस्कार करतो.

मी या निराधार जगतात अज्ञानांधकारात बुडत असून मला आपल्या हाताचा आधार देणाऱ्या परस्परस्वरूप श्रीविष्णूंना मी प्रणत होतो. सर्वेश्वर प्रभू, कमलनयन परमात्मन्, हृषीकेश, आपणांस नमस्कार असो. इंद्रियांचे स्वामी श्रीविष्णू, आपणांस नमस्कार असो. नृसिंहा, अनंतस्वरूप गोविंदा, समस्त भूतप्राण्यांची सृष्टी करणाऱ्या केशवा, माझ्याकडून जी दुर्वचने प्रकट झाली अथवा पापपूर्ण चिंतन झाले असेल, तर माझ्या या अपराधांना क्षमा करावी. क्षमा करावी. केशवा, मी आपल्या मनास वश होऊन न करण्याजोगे अत्यंत उग्र पापपूर्ण चिंतन केले असेल, त्याला आपण शांत करावे. परमार्थपरायण ब्राह्मण-प्रिय गोविंद, आपल्या मर्यादेपासून च्युत न होणाऱ्या जगन्नाथा, जगताचे भरणपोषण करणाऱ्या देवेश्वरा, माझ्या पापांचा विनाश करावा.

मी मध्यान्ह, अपराण्ह, सायंकाळ, रात्र या काळी जाणता वा अजाणता शरीर, मन, वाणी यांच्या द्वारे जे पाप केले असेल ते पुंडरी-काक्ष, हृषीकेश, माधव या आपल्या तीन नावांच्या उच्चाराने क्षीण व्हावे. कमलनयन लक्ष्मीपती, इंद्रियांचे स्वामी माधव, आपण आज माझ्या शरीराने व वाणीने केलेल्या पापांचे हनन करावे. आज मी खाताना, झोपताना, उभे राहाताना, चालताना, जागे असताना मन,

वाणी, शरीर जे स्थूल वा सूक्ष्म पाप केले असेल ते भगवान वासुदेवांच्या नामोच्चरणानें विनष्ट व्हावे. परब्रह्म, परमधाम, परमपवित्र असणाऱ्या श्रीविष्णूंच्या नामसंकीर्तनानें माझें पाप लुप्त व्हावे. ज्याला प्राप्त करून ज्ञानी लोक पुन्हा परतत नाहीत, जे गंध, स्पर्श आदींनी रहित आहे, ते श्रीविष्णूंचे परमपद माझ्या पापांचे शमन करो.

## ४. इंद्रकृत लक्ष्मीस्तोत्र

नमस्ये सर्वलोकानां जननीमब्धिसम्भवाम् ।
श्रियमुन्निद्रपद्माक्षीं विष्णुवक्षःस्थलस्थिताम् ॥ १ ॥
त्वं सिद्धिस्त्वं स्वधा स्वाहा सुधा त्वं लोकपावनि ।
संध्या रात्रिः प्रभा भूतिर्मेधा श्रद्धा सरस्वती ॥ २ ॥
यज्ञविद्या महाविद्या गुह्यविद्या च शोभने ।
आत्मविद्या च देवि त्वं विमुक्तिफलदायिनी ॥ ३ ॥
आन्वीक्षिकी त्रयी वार्ता दण्डनीतिस्त्वमेव च ।
सौम्या सौम्यं जगद्रूपं त्वयैतद्देवि पूरितम् ॥ ४ ॥
का त्वन्या त्वामृते देवि सर्वयज्ञमयं वपुः ।
अध्यास्ते देवदेवस्य योगिचिन्त्यं गदाभृतः ॥ ५ ॥
त्वया देवि परित्यक्तं सकलं भुवनत्रयम् ।
विनष्टप्रायमभवत् त्वयेदानीं समेधितम् ॥ ६ ॥
दाराः पुत्रस्तथागारं सुहृद्धान्यधनादिकम् ।
भवत्येतन्महाभागे नित्यं त्वद्वीक्षणान्नृणाम् ॥ ७ ॥
शरीरारोग्यमैश्वर्यमरिपक्षक्षयः सुखम् ।
देवि त्वद्दृष्टिदृष्टानां पुरुषाणां न दुर्लभम् ॥ ८ ॥
त्वमम्बा सर्वभूतानां देवदेवो हरिः पिता ।
त्वयैतद् विष्णुना चाम्ब जगद् व्याप्तं चराचरम् ॥ ९ ॥

मानं कोषं तथा कोष्ठं मा गृहं मा परिच्छदम् ।
मा शरीरं कलत्रं च त्यजेथाः सर्वपावनि ॥ १० ॥
मा पुत्रान् मा सुहृद्वर्गान् मा पशून् मा विभूषणम् ।
त्यजेथा मम देवस्य विष्णोर्वक्षःस्थलालये ॥ ११ ॥
सत्येन समशौचाभ्यां तथा शीलादिभिर्गुणैः ।
त्यज्यन्ते ते नराः सद्यः संत्यक्ता ये त्वयामले ॥ १२ ॥
त्वयावलोकिताः सद्यः शीलाद्यैरखिलैर्गुणैः ।
कुलैश्वर्यैश्च युज्यन्ते पुरुषा निर्गुणा अपि ॥ १३ ॥
स श्लाघ्यः स गुणी धन्यः स कुलीनः स बुद्धिमान् ।
स शूरः स च विक्रान्तो यस्त्वया देवि वीक्षितः ॥ १४ ॥
सद्यो वैगुण्यमायान्ति शीलाद्याः सकला गुणाः ।
पराङ्मुखी जगद्धात्री यस्य त्वं विष्णुवल्लभे ॥ १५ ॥
न ते वर्णयितुं शक्ता गुणान् जिह्वापि वेधसः ।
प्रसीद देवि पद्माक्षि मास्मांस्त्याक्षीः कदाचन ॥ १६ ॥
(२३७. १-१६)

जी सर्व लोकांची जननी आहे, जिचा जन्म समुद्रातून झाला आहे, तिचे नेत्र उमललेल्या कमलांप्रमाणे शोभायमान आहेत, जी भगवान विष्णूंच्या वक्षःस्थलावर विराजमान आहे, त्या लक्ष्मीदेवीस मी प्रणाम करतो. जगास पवित्र करणाऱ्या देवी, तूच सिद्धी आहेस. तूच स्वधा, स्वाहा, सुधा, संध्या, रात्री, प्रभा, भूती, मेधा, श्रद्धा व सरस्वती आहेस. शोभामयी देवी, तूच यज्ञविद्या, महाविद्या, गुह्यविद्या आणि मोक्षरूपाचे फल देणारी आत्मविद्या आहेस. आन्वीक्षिकी (तत्त्वज्ञान), त्रयी (ऋक्, यजु, साम), वार्ता (कृषी, गोरक्षण, व्यापार इत्यादी), दंडनीती तूच आहेस. देवी, तू स्वतःच सौम्यरूपाची सुंदरी आहेस. म्हणून तुझ्याने व्यापलेले हे जगही सौम्य, मनोहर आहे.

भगवती, कौमोदाची गदी धारण करणारी, देवाधिदेव भगवान विष्णूंच्या अखिल यज्ञमय विग्रहास, ज्याचे चिंतन योगीलोक करतात

त्यास आपल्या हृदयात निवासस्थान बनविणारी तुझ्याशिवाय कोण आहे ? देवी, तू सोडून देशील तर सारे त्रिभुवन नष्टप्राय होते. परंतु या वेळी ते तुझाच आश्रय घेऊन समृद्धिपूर्ण दिसत आहे. महाभागे, तुझ्या कृपादृष्टीनेच मनुष्यास सदा स्त्री, पुत्र, गृह, मित्र, धनधान्य आदींची प्राप्ती होते. देवी, ज्या पुरुषावर तुझी दयादृष्टी पडते, त्याच्या शरीरास निरोगीपण, ऐश्वर्य, शत्रुपक्षाची हानी आणि सर्व प्रकारची सुखे प्राप्त होतात. माते, तू सर्व भूतांची जननी आहेस. देवाधिदेव विष्णू सर्व जगताचे पितर आहेत. तू आणि भगवान विष्णूंनी या चराचर जगतास व्यापून टाकले आहे.

सर्वांना पवित्र करणाऱ्या देवी, तू माझा मान, माझी प्रतिष्ठा, तूच कोश, अन्नभांडार, गृह, सामानसुमान, शरीर, स्त्री; यांपैकी कोणाचाही त्याग करू नकोस. भगवान विष्णूंच्या वक्षःस्थलावर निवास करणाऱ्या देवी, माझे पुत्र, मित्र, पशू, माझी आभूषणे यांचाही तू त्याग करू नकोस. विमल स्वरूपादेवी, ज्या मनुष्यांचा तू त्याग करतेस, त्यांना सत्य, समता, शौर्य, शील आदी सद्‌गुणही त्वरित सोडून जातात. तुझी कृपादृष्टी पडताच गुणहीन मनुष्य त्वरित शील आदी सर्व उत्तम गुणांनी व अनेक पिढ्यांच्या ऐश्वर्याने युक्त होतो. देवी, ज्याकडे तू एकदा कृपादृष्टीने पाहिले आहेस, तो प्रशंसनीय, गुणवान, धन्यवादास पात्र, कुलीन, बुद्धिमान, शूर व पराक्रमी होतो. विष्णुप्रिये, तू जगताची माता आहेस. ज्याकडे तू आपले मुख मागे फिरवितेस, त्याचे शीलादी सर्व गुण तत्काल दुर्गुणात रूपांतरित होतात. कमलांसमान नेत्र असणाऱ्या देवी, ब्रह्मदेवांची जिव्हाही तुझ्या गुणांचे वर्णन करण्यास समर्थ नाही. तू माझ्यावर प्रसन्न व्हावेस. माझा परित्याग तू कधी करू नकोस.

## ५. श्रीविष्णुपंजरस्तोत्र

त्रिपुरं जघ्नुषः पूर्वं ब्रह्मणा विष्णुपञ्जरम् ।
शंकरस्य द्विजश्रेष्ठ रक्षणाय निरूपितम् ।। १ ।।

वागीशेन च शक्रस्य बलं हन्तुं प्रयास्यतः ।
तस्य स्वरूपं वक्ष्यामि तत् त्वं श्रृणु जयादिमत् ॥ २ ॥
विष्णुः प्राच्यां स्थितश्चक्री हरिर्दक्षिणतो गदी ।
प्रतीच्यां शार्ङ्गधृग् विष्णुर्जिष्णुः खड्गी ममोत्तरे ॥३॥
हृषीकेशो विकोणेषु तच्छिद्रेषु जनार्दनः ।
क्रोडरूपी हरिर्भूमौ नरसिंहोऽम्बरे मम ॥ ४ ॥
क्षुरान्तममलं चक्रं भ्रमत्येतत् सुदर्शनम् ।
अस्यांशुमाला दुष्प्रेक्ष्या हन्तुं प्रेतनिशाचरान् ॥ ५ ॥
गदा चेयं सहस्रार्चिः प्रदीप्तपावकोज्ज्वला ।
रक्षोभूतपिशाचानां डाकिनीनां च नाशनी ॥ ६ ॥
शार्ङ्गविस्फूर्जितं चैव वासुदेवस्य मद्रिपून् ।
तिर्यङ्मनुष्यकूष्माण्डप्रेतादीन् हन्त्वशेषतः ॥ ७ ॥
खड्गधारोज्ज्वलज्योत्स्नानिर्धूता ये समाहिताः ।
ते यान्तु शाम्यतां सद्यो गरुडेनेव पन्नगाः ॥ ८ ॥
ये कूष्माण्डास्तथा यक्षा ये दैत्या ये निशाचराः ।
प्रेता विनायकाः क्रूरा मनुष्या जम्भगाः खगाः ॥ ९ ॥
सिंहादयश्च पशवो दंदशूकाश्च पन्नगाः ।
सर्वे भवन्तु ते सौम्याः कृष्णशङ्खरवाहताः ॥ १० ॥
चित्तवृत्तिहरा ये मे ये जनाः स्मृतिहारकाः ।
बलौजसां च हर्तारश्छायाविभ्रंशकाश्च ये ॥ ११ ॥
ये चोपभोगहर्तारो ये च लक्षणनाशकाः ।
कूष्माण्डास्ते प्रणश्यन्तु विष्णुचक्ररवाहताः ॥ १२ ॥
बुध्दिस्वास्थ्यं मनःस्वास्थ्यं स्वास्थ्यमैन्द्रियकं तथा ।
ममास्तु देवदेवस्य वासुदेवस्य कीर्तनात् ॥ १३ ॥

पृष्ठे पुरस्तान्मम दक्षिणोत्तरे विकोणतश्चास्तु जनार्दनो हरिः ।
तमीड्यमीशानमनन्तमच्युतं जनार्दनं प्रणिपतितो न सीदति ॥ १४ ॥
यथा परं ब्रह्म हरिस्तथा परो जगत्स्वरूपश्च स एव केशवः ।
सत्येन तेनाच्युतनामकीर्तनात् प्रणाशयेत्तु त्रिविधं ममाशुभम् ॥ १५ ॥
(२७०. १–१५)

भगवान ब्रह्मदेवांनी पूर्वी त्रिपुरसंहारासाठी 'विष्णुपंजर' नावाच्या स्तोत्राचा उपदेश केला होता. त्या विष्णुपंजर स्तोत्राचे स्वरूप असे आहे.

माझ्या पूर्वभागी चक्रधारी विष्णू व दक्षिणपार्श्वभागात गदाधारी श्रीहरी स्थित आहेत. पार्श्वभागी शार्ङ्गपाणी विष्णू व उत्तरभागी नंदक खड्गधारी जनार्दन विराजमान आहेत. भगवान हृषीकेश दिक्कोणांत, जनार्दन मध्यवर्ती अवकाशात माझे रक्षण करीत असतात. वराहरूपधारी श्रीहरी भूमीवर व भगवान नृसिंह आकाशात प्रतिष्ठित होऊन माझे संरक्षण करतात. ज्याच्या भोवती सुरे जडविले आहेत ते हे निर्मल 'सुदर्शनचक्र' फिरत राहिले आहे. हे जेव्हा प्रेतांना व निशाचरांना मारण्यासाठी निघते त्या वेळी याच्या किरणांकडे पाहाणेही अतिशय कठीण होते. भगवान श्रीहरींची ही 'कौमदकी' गदा सहस्र ज्वालांनी प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणे उज्ज्वल आहे. ही राक्षस, भूत, पिशाच व डाकिनी यांचा विनाश करणारी आहे. भगवान वासुदेवांच्या शार्ङ्गधनुष्याचा टणत्कार माझा शत्रु, कूष्माण्ड, प्रेत इत्यादी, तिर्यग्योनीगत जीव यांचा संपूर्ण संहार करते. जो भगवान श्रीहरींच्या खड्गधारामयी उज्ज्वल ज्योत्स्नेत स्नान करतो, तो माझा शत्रू त्वरित शांत होतो. जणू गरुडाच्याद्वारे सर्प शांत झाला आहे.

कूष्मांड, यक्ष, राक्षस, प्रेत, विनायक, क्रूर मनुष्य, शिकारी पक्षी, सिंह आदी पशू व डसणारे सर्प असतील ते सर्वच्या सर्व सच्चिदानंद-स्वरूप श्रीकृष्णांच्या शंखनादाने सौम्यभाव धारण करतात. जो माझी चित्तवृत्ती व स्मरणशक्ती हरण करतो, जो माझ्या बलाचा व तेजाचा नाश करतो, जो माझ्या कांतीस व तेजास विलुप्त करतो, जो उपभोग-सामग्री हरण करतो, जो शुभलक्षणांचा नाश करतो, तो कूष्माण्डगण श्रीविष्णूंच्या सुदर्शनचक्राच्या वेगाने जखमी व विनष्ट होतो. देवाधिदेव भगवान वासुदेवांच्या संकीर्तनाने माझी बुद्धी, माझे मन, इंद्रियांचे स्वास्थ्य, यांचा लाभ व्हावा. माझ्या मागेपुढे, उजव्या-डाव्या बाजूंना कोणवर्ती दिशांना, सर्व जागी जनार्दन श्रीहरींचा निवास व्हावा. सर्वांचे पूजनीय, मर्यादेपासून कधीच च्युत न होणारे अनन्तरूप परमेश्वर जनार्दनांच्या चरणांवर प्रणत होणारा कधीच दुःखी होत नाही. ज्या-प्रमाणे भगवान श्रीहरी परब्रह्म आहेत, त्याप्रमाणे परमात्मा केशवही जगत्स्वरूप आहेत. या सत्याच्या प्रभावाने व भगवान अच्युतांच्या नामकीर्तनानें माझ्या त्रिविध पापांचा नाश व्हावा.

## ६. पंचावन्न विष्णुनामे

जपन् वै पञ्चपञ्चाशद् विष्णुनामानि यो नरः ।
मन्त्रजप्यादिफलभाक् तीर्थेश्वर्चादि चाक्षयम् ॥ १ ॥
पुष्करे पुण्डरीकाक्षं गयायां च गदाधरम् ।
राघवं चित्रकूटे तु प्रभासे दैत्यसूदनम् ॥ २ ॥
जयं जयन्त्यां तद्वच्च जयन्तं हस्तिनापुरे ।
वाराहं वर्धमाने च काश्मीरे चक्रपाणिनम् ॥ ३ ॥
जनार्दनं च कुब्जास्त्रे मथुरायां च केशवम् ।
कुब्जाम्रके हृषीकेशं गङ्गाद्वारे जटाधरम् ॥ ४ ॥
शालग्रामे महायोगं हरिं गोवर्धनाचले ।
पिण्डारके चतुर्बाहुं शङ्खोद्धारे च शङ्खिनम् ॥ ५ ॥

वामनं च कुरुक्षेत्रे यमुनायां त्रिविक्रमम् ।
विश्वेश्वरं तथा शोणे कपिलं पूर्वसागरे ॥ ६ ॥
विष्णुं महोदधौ विद्याद् गङ्गासागरसंगमे ।
वनमालं च किष्किन्ध्यां देवं रैवतकं विदुः ॥ ७ ॥
काशीतटे महायोगं विरजायां रिपुंजयम् ।
विशाखयूपे ह्यजितं नेपाले लोकभावनम् ॥ ८ ॥
द्वारकायां विद्धि कृष्णं मन्दरे मधुसूदनम् ।
लोकाकुले रिपुहरं शालग्रामे हरिं स्मरेत् ॥ ९ ॥
पुरुषं पुरुषवटे विमले च जगत्प्रभुम् ।
अनन्तं सैन्धवारण्ये दण्डके शार्ङ्गधारिणम् ॥ १० ॥
उत्पलावर्तके शौरिं नर्मदायां श्रियः पतिम् ।
दामोदरं रैवतके नन्दायां जलशायिनम् ॥ ११ ॥
गोपीश्वरं च सिन्धवब्धौ माहेन्द्रे चाच्युतं विदुः ।
सह्याद्रौ देवदेवेश वैकुण्ठं मागधे वने ॥ १२ ॥
सर्वपापहरं विन्ध्ये औण्ड्रे तु पुरुषोत्तमम् ।
आत्मानं हृदये विद्धि जपतां भुक्तिमुक्तिदम् ॥१३॥
वटे वटे वैश्रवणं चत्वरे चत्वरे शिवम् ।
पर्वते पर्वते रामं सर्वत्र मधुसूदनम् ॥ १४ ॥
नरं भूमौ तथा व्योम्नि वसिष्ठे गरुडध्वजम् ।
वासुदेवं च सर्वत्र संस्मरन् भुक्तिमुक्तिभाक् ॥ १५ ॥
नामन्येतानि विष्णोश्च जप्त्वः सर्वमवाप्नुयात् ।
क्षेत्रेष्वेतेषु यच्छ्राध्दं दानं जप्यं च तर्पणम् ॥ १६ ॥
तत्सर्वं कोटिगुणितं मृतो ब्रह्ममयो भवेत् ।
यः पठेच्छृणुयाद्वापि निर्मलः स्वर्गमाप्नुयात् ॥ १७ ॥

(३०५. ९–१७)

मुने, जो मनुष्य भगवान विष्णूंच्या खालील पंचावन्न नावांचा जप करतो, त्याला मंत्रजपादींचे फल प्राप्त होते. तीर्थांत केलेल्या पूजनादींचे अक्षय पुण्य प्राप्त होते. पुष्करात पुण्डरीकाक्ष, गयेत गदाधार, चित्रकूटात राघव, प्रभासात दैत्यसूदन, जयंतीत जय, हस्तिनापुरात जयन्त, वर्धमानात वाराह, काश्मीरात चक्रपाणी, कुब्जाभात जनार्दन, मथुरेत केशवदेव, कुब्जाम्रकात हृषीकेश, गंगाद्वारी जटाधर, शालग्रामात महायोग, गोवर्धनगिरीवर हरी, पिंडरकात चतुर्बाहू, शंखोद्धारात शंखी, कुरुक्षेत्रात वामन, यमुनेत त्रिविक्रम, शोणिततीर्थात विश्वेश्वर, पूर्वसागरात कपिल, महासागरात विष्णू, गंगासागरसंगमात वनमाल, किष्किंधात रैवतकदेव, काशीतटात महादेव, विरजात रिपुंजय, विशाखयूपात अनिल, नेपाळात लोकभावन, द्वारकेत श्रीकृष्ण, मंदराचलात मधुसूदन, कोलाकुलात रिपुहर, शालग्रामात श्रीहरी यांचे स्मरण करावे.

पुरुषवटात पुरुष, विमलतीर्थात जगत्प्रभू, सैंधवारण्यात अनंत, दंडकारण्यात शाङ्‌र्गधारी, उत्पलवर्तकात शौरी, नर्मदेत श्रीपती, रैवतगिरीवर दामोदर, नंदात जलशायी, सिंधुसागरात गोपीश्वर, माहेंद्रतीर्थात अच्युत, सह्याद्रीवर देवदेवेश्वर, मागधवनात वैकुंठ, विंध्यगिरीवर सर्वपापहारी, औंड्रात पुरुषोत्तम आणि हृदयात आत्मा विराजमान असतो. तो आपल्या नामाचा जप करणाऱ्या साधकास भोग व मोक्ष देणारा आहे, असे जाणावे.

प्रत्येक वटवृक्षावर कुबेराचे, प्रत्येक चौकात शिवांचे, प्रत्येक पर्वतावर श्रीरामांचे व सर्वत्र मधुसुदनांचे स्मरण करावे. धरती व आकाशात नराचे, वसिष्ठतीर्थात गरुडध्वजाचे व सर्वत्र भगवान वासुदेवांचे स्मरण करणारा पुरुष मोक्षाचा धनी होतो. भगवान विष्णूंच्या या नामांचा जप करणारा मनुष्य सर्व काही प्राप्त करून घेतो. उपर्युक्त क्षेत्रांत जप, श्राद्ध, दान, तर्पण केले जाते. त्याच्या कोटिपटींनी पुण्य मिळते. ज्याचा तेथे मृत्यू होतो, तो ब्रह्मस्वरूप होतो. जो या प्रसंगाचे वाचन करील, श्रवण करील, तो शुद्ध होऊन स्वर्गास जाईल.

## ७. पाशुपतास्त्रमंत्र

ॐ नमो भगवते महापाशुपतायातुलबलवीर्यपराक्रमाय त्रिपञ्चनयनाय नानारूपाय नानाप्रहरणोद्यताय सर्वाङ्गरक्ताय भिन्नाञ्जनचयप्रख्याय श्मशानवेतालप्रियाय सर्वविघ्नानिकृन्तनरताय सर्वसिध्दिप्रदाय भक्तानुकम्पिनेऽसंख्यवक्त्रभुजपादाय तस्मिन् सिध्दाय वेतालवित्रासिने शाकिनीक्षोभजनकाय व्याधिनिग्रहकारिणे पापभञ्जनाय सूर्यसोमाग्निनेत्राय विष्णुकवचाय खड्गवज्रहस्ताय यमदण्डवरुणपाशाय रुद्रशूलाय ज्वलज्जिह्वाय सर्वरोगविद्रावणाय ग्रहनिग्रहकारिणे दुष्टनागक्षयकारिणे । ॐ कृष्णापिङ्गलाय फट् । हूंकारास्त्राय फट् । वज्रहस्ताय फट् । शक्तये फट् । दण्डाय फट् । यमाय फट् । खड्गाय फट् । नैर्ऋताय फट् । वरुणाय फट् । वज्राय फट् । पाशाय फट् । ध्वजाय फट् । अङ्कुशाय फट् । गदायै फट् । कुबेराय फट्ऽ । त्रिशूलाय फट् । मुद्‍राय फट् । चक्राय फट् । पद्माय फट् । नागास्त्राय फट् । ईशानाय फट् । खेटकास्त्राय फट् । मुण्डाय फट् । मुण्डास्त्राय फट् । कङ्कालास्त्राय फट् । पिच्छकास्त्राय फट् । क्षुरिकास्त्राय फट् । ब्रह्मास्त्राय फट् । शत्तयस्त्राय फट् । गणास्त्राय फट् । सिध्दास्त्राय फट् । पिलिपिच्छास्त्राय फट् । गन्धर्वास्त्राय फट् । पूर्वास्त्राय फट् । दक्षिणास्त्राय फट् । वामास्त्राय फट् । पश्चिमास्त्राय फट् । मन्त्रास्त्राय फट् । शाकिन्यस्त्राय फट् । योगिन्यस्त्राय फट् । दण्डास्त्राय फट् । महादण्डास्त्राय फट् । नमोऽस्त्राय फट् । शिवास्त्राय फट् । ईशानास्त्राय फट् । पुरुषास्त्राय फट् । अघोरास्त्राय फट् । सद्योजातास्त्राय फट् । हृदयास्त्राय फट् । महास्त्राय फट् । गरुडास्त्राय फट् । राक्षसास्त्राय फट् । दानवास्त्राय फट् । क्षौं नरसिंहास्त्राय फट् । त्वष्टस्त्राय फट् । सर्वास्त्राय फट् ।

नः फट् । वः फट् । पः फट् । फः फट् । मः फट् । श्रीः फट् । पेः फट् । भूः फट् । भुवः फट् । स्वः फट् । महः फट् । जनः फट् । तपः फट् । सत्यं फट् । सर्वलोक फट् । सर्वपाताल फट् । सर्वतत्त्व फट् । सर्वप्राण फट् । सर्वनाडी फट् । सर्वकारण फट् । सर्वदेव फट् । ऱ्हीं फट् । श्रीं फट् । हुं फट् । स्त्रुं फट् । स्वां फट् । लां फट् । वैराग्याय फट् । मायास्त्राय फट् । कामास्त्राय फट् । क्षेत्रपालास्त्राय फट् । हुंकारास्त्राय फट् । भास्करास्त्राय फट् । चन्द्रास्त्राय फट् । विघ्नेश्वरास्त्राय फट् । गौः गां फट् । स्त्रों स्त्रौं फट् । हौं ऱ्हौं फट् । भ्रामय भ्रामय फट् । संतापय संतापय फट् । छादय छादय फट् । उन्मूलय उन्मूलय फट् । त्रासय त्रासय फट् । संजीवय संजीवय फट् । विद्रावय विद्रावय फट् । सर्वदुरितं नाशय नाशय फट् ।

(अध्याय ३२२ वा)

मागे या प्रकारच्या स्तोत्रांचे वा मंत्राचे अर्थ दिलेले आहेत. ते ध्यानात घेता या स्तोत्राचा अर्थ सहज ध्यानात येणारा आहे. याची फक्त क्रमवार आवृत्ती करावयाची असते.

